

# अमरवाणी

नास्ति कामसमो व्याधिर्नास्ति मोहसमो रिपुः,
नास्ति क्रोधसमो वह्नि र्नास्ति ज्ञानात्परं सुखम् । ॥ १ ॥

[कामवासनेसारखा रोग नाही, मोहासारखा शत्रु नाही, क्रोधासारखा अग्नि नाही (आणि त्याचबरोबर) ज्ञानाहून मोठे सुख नाही.]

क्रोधो मूलमनर्थानां, क्रोधः संसार बंधनम्,
धर्मक्षयकरः क्रोधस्तस्मात् क्रोधं विसर्जयेत् ॥ २ ॥

[क्रोध हा सर्व अनर्थाचे मूळ कारण होय. त्याच्यामुळे संसाराचे बंधन (संभवते) आणि धर्माचा क्षय होतो! म्हणून क्रोधाचा त्याग केला पाहिजे.]

क्रोधो हि शत्रुः प्रथमो नराणां,
देहस्थितो देहविनाशनाय,
यथास्थितः काष्ठगतो हि वह्निः,
स एव वह्निर्दहते शरीरम् ॥ ३ ॥

[क्रोध हा मनुष्याचा प्रथम शत्रु होय. ज्या प्रमाणे लाकडातली आग लाकडाला जाळते तसाच क्रोध शरीराला जाळून टाकतो.]





# योग्याचा महिमा

प्राचीन काळी सिंहपुरी नगरीत एक योगी रहात असे. त्याच्याबरोबर अनेक शिष्यपण असत. तो योगी मधून मधून राजाकडे जाई आणि धर्म व नीति संबंधाने उपदेश करून राजाच्या मनाला शांति देत असे. म्हणून राजाच्या मनात योग्याविषयी फार श्रद्धा व भक्ति होती.

राजाने एकदा योगीराजांना राजवाड्यातच येऊन रहायला सांगितले आणि त्याच्यासाठी व त्याच्या सर्व शिष्य वृंदासाठी सर्व व्यवस्था राजवाड्यात करून देण्यात येईल. असे देखील सांगितले.

परंतु योग्याला ते पसंत पडले नाही. तो म्हणाला—"राजा, मी एक नियम केला आहे, दर रोज फक्त पांच घरी भिक्षा मिळेल तिच्यावर त्या दिवसाची भूक भागवायची. एकाच घरी राहून पोट भरतां येणार नाही, मला."

योगी म्हणाला ते ऐकल्यावर राजाने राज्यभर दवंडी पिटविली की योगी किंवा त्याचे शिष्य कधी भिक्षा मागायला आले तर त्यांना पोटभर भिक्षा घालावी. म्हणून त्या दिवसापासून योग्याला व त्याच्या शिष्याला पुष्कळ भिक्षा मिळू लागली. ते पाहून कित्येक गरीब लोक त्या योग्याच्या शिष्टमंडळीत सामील झाले.

एकदां योगी भिक्षेला निघाला आणि एका ताडीच्या दुकानासमोर उभा राहला. दुकानदार बाहेर येऊन म्हणाला—"योगिराज! आत यावे. परंतु माझ्याकडे आपल्याला देण्यालायक काही नाही, आहे ती ही ताडी आहे.

योगी आत गेला. दुकानदाराने एका मातीच्या भांड्यात ताडी ओतून दिली. "कृष्णार्पणम्" म्हणत योग्याने एकाच घोटात ती सर्व ताडी पिऊन टाकली.

कु. गुणवंत देशमुख




आपल्या गुरूला ताडी पिताना पाहून सर्व शिष्यांना फार आश्चर्य वाटले व आनंदही वाटला. सर्वांनी एकेक मातीचा पेलाभर ताडी पिऊन टाकली.

त्याचा परिणाम असा झाला की योग्याच्या सर्व शिष्यांना ताडीची चव कळली आणि चटकपण लागली. ते अट्टल पिणारे झाले.

दुसरी गोष्ट अशी घडली की राजाला ती गोष्ट कळली. योग्याने व त्याच्या शिष्यांनी ताडी प्याल्याचे कळल्यावर राजाने आपल्या द्वारपालकांना त्या योग्याला किंवा त्याच्या शिष्यांना राजवाडयात पाऊल टाकू देऊ नका अशी आज्ञा केली.

अशातऱ्हेने योग्याविरुद्ध गावभर चर्चा होऊ लागली. त्यामुळे लोकांच्या मनांत योग्याविषयी घृणा भाव उत्पन्न झाला. म्हणून त्याला पुरेशी भिक्षा मिळेनाशी झाली. प्रत्येक घरासमोर त्याला फार वेळ उभे रहावे लागे. त्याच्या शिष्यांची उपासमार

राहण्यात काही अर्थ नाही असे पाहून सर्व शिष्यमंडळी एकेक करून त्याला सोडून निघून गेली.

आणखी काही दिवस गेल्यावर तो योगी एका सोनाराच्या दुकानासमोर भिक्षेसाठी जाऊन उभा राहिला. योग्याला पाहून सोनार थट्टेने म्हणाला—"योगिराज, आपल्याला देण्यालायक माझ्याकडे काही नाही. हे वितळलेले सोने आहे. देऊ का?"

योगी म्हणाला—"हो दे की." सोनाराने एका बारीकशा मातीच्या वाटीत चिमटाने धरून वितळलेला सोन्याचा कढत रस आणून दिला योग्याने डोळे मिटून "कृष्णार्पणम्" म्हणत तो सर्व रस पिऊन टाकला आणि ढेकरा देत निघून गेला.

योग्याचे ते दिव्य राजाच्या कानावर गेले. तो योग्याचा महिमा पाहून चकित झाला. तो स्वतः त्या योग्याच्या शोधार्थ आला आणि त्याने त्याचे पाय धरून क्षमा मागितली.





# सहावा चोर

उज्जैन राज्यातली ही एक जुनी गोष्ट आहे. राज्यभर चोरांचा सुळसुळाट वाढला होता. राजाच्या शिपायांनी चोरांना पकडण्याची शिकस्त केली. पण सर्व प्रयत्न अयशस्वी ठरले. राजधानीतल्या श्रीमंत नागरिकांनी राजाकडे आपले गाऱ्हाणे नेले व म्हणाले—"महाराज! आपणच काही प्रयत्न केलात तर आम्हांला या चोरांपासून मुक्ति मिळेल." राजाने त्यांना लवकरच चोरांचा सुळासुळाट बंद करविण्याचे वचन देऊन पाठवून दिले.

मध्य रात्रीच्या सुमारास राजा स्वतः वेष पालटून निघाला आणि चौकात येऊन उभा राहिला. थोडया वेळाने एकेक करून चार जण तेथे आले. राजाने जवळ जाऊन विचारले—"मी येऊ का तुमच्या टोळीत? तुमच्याच सारखा मी पण एक चोर आहे. तुमचे विशेष काय, सांगा!"

"मी कसली भिंत असली तरी भोंक पाडू शकतो." पहिला चोर म्हणाला.

"मी प्रत्येक प्राण्याच्या आवाजाचा अर्थ सांगू शकतो." दुसरा म्हणाला.

"कुलूप लावलेल्या पेटीचा नुसता वास घेऊन पेटीत काय आहे, हे मी सांगू शकेन." तिसरा म्हणाला.

"मी एकदां कोणाचा आवाज ऐकला की पुढे कित्येक वर्षे लोटली तरी मी तो कोणाचा आहे हे ओळखू शकेन." चवथा चोर म्हणाला.

नंतर चारही चोरांनी राजाला विचारले—"आता, तू आपले विशेष काय, सांगशील की नाही?"

"माझ्याबरोबर राहणाऱ्या चोरांना कधी फांशीची शिक्षा होणार नाही." राजा म्हणाला. नंतर पांचही जण चोरी करायला निघाले. राजाने खुद्द राजवाडयातच चोरी

श्री ग. पा. कोराणे

करावी असे सुचविले. इतर चोरांना ते पसंत पडले. सर्व राजवाड्याजवळ येऊन पोचले. पहिल्या चोराने भिंतीला भोक पाडायला सुरवात केली. इतक्यात कोल्हेकुई ऐकू आली.

"याचा काय अर्थ?" राजाने दुसऱ्या चोराला विचारले.

"घराचा मालक उठतो आहे, असा त्याचा अर्थ आहे." दुसरा चोर म्हणाला.

इतक्यात घुबड बोलले. राजाने त्याचा अर्थ विचारला. दुसरा चोर म्हणाला– "याचा अर्थ घरमालक आपली चोरी पाहातो आहे."

ते ऐकून चोरांनी चोरीचा विचार सोडला व चकित होऊन परस्परांकडे पहात [illegible] लगेच दुसरा देखील भुंकू लागला.

"कुत्री काय म्हणत आहेत?" राजाने दुसऱ्या चोराला विचारले.

"पहिला कुत्रा आपल्याला पळून जा, म्हणतो आहे आणि दुसरा कुत्रा पहिल्या कुत्र्याचे तोंड बंद करा म्हणतो आहे." दुसऱ्या चोराने अर्थ सांगितला.

"आज शुभशकुन दिसत नाही. चला आणखी कोठे तरी जाऊ." चोर म्हणाले.

"तुम्ही भिण्याचे मुळीच कारण नाही. जे काम सुरू केले ते पुरे करा. मी तुम्हांला वाचविण्यासाठी आपला जीव द्यायला तयार आहे." असे म्हणत राजाने चोरांना प्रोत्साहन दिले. दुसऱ्या चोराच्या हुशारी [illegible] पणा दिसेल असे चारही चोरांना वाटले. म्हणून मनात भीति वाटत असून ही जे काम सुरू केले ते तडीस न्यावयाचे ठरवून पहिल्या चोराने भिंतीला भोक पाडायला सुरवात केली.

चोरांना राजवाड्यात सहा पेट्या मिळाल्या. तिसऱ्या चोराने त्यांचा वास घेऊन म्हटले–"काय पण आपले भाग्य! या पेट्यांत हिरे माणिक्ये आणि सोन्या-चांदीच्या वस्तू आहेत!".

पांच ही चोरांनी पाच पेट्या उचलल्या व सहावी पेटी भिंतीच्या भोकाजवळ ठेवून तेथून पाय काढला. दुसऱ्या दिवशी एका विशिष्ट जागी भेटायचे ठरवून पाचही चोर आपापल्या वाटेने निघून गेले. अर्थात राजा आपल्या वाड्यात परतला.

सकाळी उजाडले. पाहेरकऱ्यांचा प्रमुख सर्व ठीकठाक आहे की नाही याची पाहणी करीत भिंतीला भोक होते तेथे आला. आतल्या पाच पेट्या नाहीशा झाल्या होत्या व सहावी भिंतीच्या भगदाडाजवळ होती ती त्याने पाहिली. पाहरेकऱ्यांचा प्रमुख लगेच ती पेटी उचलून घेऊन आपल्या घरी ठेवून आला आणि सरळ राजाकडे जाऊन म्हणाला–"महाराज! आम्ही डोळ्यात तेल घालून रात्रभर पाहरा दिला तरी चोर आमच्या डोळ्यात धूळ फेकून राजवाड्यातल्या दागिन्यांच्या सहा पेट्या चोरून घेऊन गेले."












सहावा चोर कोण असावा, हे राजाला कळले. त्याने मुख्य पाहरेकऱ्याला, "काळजी करू नकोस आज रात्री सर्व चोर सांपडतील," असे सांगून पाठवून दिले.

त्या दिवशी रात्री चार चोर ठरल्या जागी आले तेव्हां शिपायांनी त्यांना धरले. दुसऱ्या दिवशी सर्व चोरांना दरबारात हजर करण्यात आले व त्यांना फांशीची शिक्षा देण्यात यावी असा राजाचा हुकूम झाला.

ते ऐकून चौथा चोर राजाला ओळखून म्हणाला–"महाराज, काल रात्री आम्ही चोरीला निघालो तेव्हां एक पांचवा चोर आमच्या बरोबर आला होता. निघण्यापूर्वी त्याने आम्हांला वचन दिले होते की त्याच्या साथीदारांना फांशीची शिक्षा झाल्यास तो सोडवील. परंतु त्याने आपल्या त्या वचनाप्रमाणे आम्हांला सोडविले नाही. आपण जी फांशीची शिक्षा दिली आहे ती पांचव्या चोराला देखील लागू आहे का?"

वचनाचे पालन करणार आहे." नंतर सभासदांकडे वळून राजा म्हणाला–"मीच होतो तो पाचवां चोर! मी या चोरांची शिक्षा फक्त रद्द करीत नाही तर त्यांनी जीजी पेटी उचलून नेली होती ती ती त्यांना बक्षिस देतो. कारण यांच्या अंगात एकेक विशेष गुण आहे. आजपासून त्यांना माझ्या दरबारात जागा मिळेल व ते चोरीचा धंदा सोडतील. परंतु सहाव्या चोराविषयी आपणां पैकी एकाला ही कल्पना नसेल. तो आमच्या पाहरेकऱ्याचा प्रमुख आहे."

राजाच्या तोंडचे ते अनपेक्षित वाक्य ऐकून त्या प्रमुखाचा चेहरा एकदम पडला. त्याच्या घरात सहावी पेटी सडतीत सापडली. त्याला राजाने हद्दपारीची शिक्षा दिली आणि त्याचे काम चारही चोरांना दिले.





# शिलारथ

[१४]

[ झाडाजवळ वाट पहात असलेल्या सेनापतीच्या मुलाला खड्गवर्मा व जीवदत्त दोघांनी भयभीत करून पळवून लावले. तो आपल्या सैनिकांबरोबर पळून गेला. परशुधारी तरुणाला झाडाच्या पोकळीतच सोडून खड्गवर्मा व जीवदत्त उत्तरेकडे जाता जाता एका ओढ्याच्या काठी आले. ओढ्यापलीकडे पाऊल टाकतांच त्यांना काही सैनिकांनी घेरले. पुढे–]

खड्गवर्मा व जीवदत्त दोघे त्या घोडेस्वारांकडे चकित होऊन पहात उभे राहले. हे लोक महेंद्रनगरचे सैनिक तर नसतील ना, असा एक संशय जीवदत्तच्या मनात येऊन गेला. ती गोष्ट त्यांना विचारावी असे देखील त्याला वाटले. पण तितक्यात एका घोडेस्वाराने भाला उगारून दोघांना गुपचुप चलायला संकेत केला व म्हणाला–"आमच्या राजाकडे चला. मागे पुढे करू लागलात तर हा भाला आरपार जाईल! पाहतां काय? चला!"

खड्गवर्माचा हात तत्क्षणी तलवारीवर गेला. परंतु जीवदत्तने त्याला थांबवून त्या घोडेस्वाराला विचारले–"तुमचे महाराज कोण? तुम्ही महेंद्रनगरचे शिपाई आहां का?"

"अरे, महेंद्र नगर कोठे आणि आमचे आनंदपूरचे राज्य कोठे? आमचे महाराज नित्यानंद महाप्रतापी महाराज आहेत.



तुमच्या विघ्नेश्वर पुजाऱ्याचे दिवस भरले म्हणून समज." तो घोडेस्वार म्हणाला.

"कोण विघ्नेश्वर पुजारी? आम्हांला नाही माहीत तो पुजारी. तुम्ही चुकतां आहां, असा आमचा समज आहे. आम्हांला आमच्या वाटेने पुढे जाऊ द्या." जीवदत्त म्हणाला.

"तुझ्या गमजा आमच्याजवळ चालणार नाहीत. महाराज काय तो विचार करतील. चला आमच्याबरोबर महाराजांकडे. आम्ही नाही जाऊ देणार तुम्हांला पुढे." घोडेस्वार भाला उगारून म्हणाला.

"खड्गवर्मा या लोकांचा आपल्याविषयी काहीतरी गैरसमज झालेला दिसतो आहे. आपण यांच्या महाराजांना आपली ओळख करून दिली तर ते आपल्याला आपल्या वाटेने जाऊ देतील." जीवदत्त म्हणाला.

त्यानंतर खड्गवर्मा व जीवदत्त त्या घोडेस्वारांबरोबर नित्यानंद महाराजांकडे गेले. नित्यानंद महाराजांनी दोघांना खाल-पासून वरपर्यंत लक्षपूर्वक पाहिले आणि विचारले–"तो दुष्ट विघ्नेश्वर पुजारी कोणत्या गुहेत राहतो? त्याचे बेत काय काय आहेत? त्याच्याबरोबर जंगली लोक किती आहेत? त्या राक्षसी हत्तीला त्याने कसे काय वश केले? या सर्व गोष्टी जशाच्या तशा सांगून टाकल्यात तर तुम्हांला जीवदान मिळेल. नाहीतर जागच्या जागी तुमचा शिरच्छेद होईल."

ते प्रश्न ऐकून जीवदत्त चकितच झाला. त्याला थोडा राग देखील आला. तरी स्वतःला थोडा आवरून तो म्हणाला–"महाराज! आपण विचारलेल्या एकाहि प्रश्नाचे उत्तर आमच्याकडे नाही. विघ्नेश्वर पुजारी कोण, कोठे राहतो वगैरे आम्हांला काही एक माहीत नाही. आम्ही खरे तेच सांगत आहो व खोटे बोलण्याची आम्हांला गरजच नाही. कारण आम्ही तीर्थाटनाला निघालेले तरुण युवक आहो."



आहे. पण तुम्ही क्षत्रिय आहां व तीर्थाटनाला निघालां आहां ह्या गोष्टींवर विश्वास कसा करावयाचा?" राजाने विचारले.

"पहा, मी तुझी खात्री करून देतो." असे म्हणत खड्गवर्माने म्यानेतून तलवार उपसली. त्याच वेळी थोड्या अंतरावर रानातून "विघ्नेश्वर पुजारी की जय!" असा जयजयकार करीत काही जंगली तरुण येत असलेले पुढे येत असलेले दिसले.

रथातूनच राजा नित्यानंदाने आपल्या सैनिकांना आज्ञा केली–"बघता काय, शत्रूवर हल्ला करा. त्यांची डोकी उडवा!"

राजाचे शिपाई शत्रूवर हल्ला करण्या-साठी धावणार, इतक्यात दूर एक भयंकर मोठा राक्षसी हत्ती दिसला. तो सामान्य हत्तीच्या मानाने तीन पट तरी मोठा होता. त्याच्या पाठीवर मुकुट धारण करून विघ्नेश्वर पुजारी होता.

त्या राक्षसी हत्तीला पाहताच राजाचे सर्व शिपाई थरथर कांपू लागले आणि काही पळू लागले. रानटी लोक त्यांचा पाठलाग करू लागले आणि राजाच्या रथाजवळ येऊन पोचले. राजा मोठ्याने सिंहगर्जना करीत म्हणाला–"आनंदपूरच्या शूर सैनिकांना आपल्या राजाचे रक्षण



करता येत नाही वाटते? भितरी भागूबाई! या रानटी लोकांशी शौर्याने लढा द्या."

त्या गडबडीत रथाचा एक घोडा बुजून इकडे तिकडे पळू लागला. दुसऱ्या घोड्याने एका रानटी माणसाला जोराने लाथ मारली. शिपाई, राजाचे रक्षण करण्याऐवजी पळून जात असलेले राजाने पाहिले. त्याचबरोबर त्याला हेदेखील दिसले की ज्या दोघां तरुणांना संशयावर त्याच्या सैनिकांनी धरून आणले होते ते जागचे जागी उभे होते. ते विघ्नेश्वर पुजाऱ्याचे हस्तक असते तर त्यांनी राजावर हल्ला केला असता. ते शत्रूचे हस्तक नाहीत याची खात्री पटताच राजा त्यांना उद्देशून म्हणाला–"क्षत्रिय



वीर हो! तुम्ही पुजाऱ्याचे हस्तक नाही, याची मला खात्री झाली आहे. तुम्ही या संकटातून माझे रक्षण कराल तर तुम्हांला माझ्या दरबारी मानाची जागा मिळेल. मी वचन देतो."

रथात थरथर कांपत बसलेल्या राजाला पाहून आणि त्याला बंदी करणाऱ्या रानटी तरुणांना आणि दूर राक्षसी हत्तीवर बसून हुकूम सोडणाऱ्या पुजाऱ्याला पाहून जीवदत्तला राजाची दया आली. तो खड्गवर्माला म्हणाला–"खरे खोटे काय, हे आपण मागाहून पाहून घेऊ. प्रथम या राजाचे रक्षण करणे आपले कर्तव्य आहे. त्या राक्षसी हत्तीवर बसलेल्या पुजाऱ्याला पाहून

सांगून जीवदत्त आपल्या कुवडीने रानटी लोकांना मारीत बडवीत जोराने राक्षसी हत्ती उभा होता तिकडे निघाला.

जीवदत्तला पुढे निघालेला पाहून खड्ग-वर्मा विद्युत्वेगाने रानटी लोकांवर तुटून पडला आणि त्यांची डोकी उडवीत पुढे निघाला. रानटी लोक घाबरून जाऊन हत्ती उभा होता तिकडे पळू लागले. हत्तीच्या पाठीमागे उभे राहून पुढे काय होते हे पहात राहले.

ते दृश्य पाहून राजा नित्यानंद खूप झाला. आनंदाने म्हणाला–"शौर्य व साहस असावे तर असे! हे दोघे वीर म्हणजे जणु-काही यमदूतच आहेत. त्याशिवाय इतक्या रानटी लोकांना पळवून लावणे शक्य नव्हते. गोष्टीत व पुराणात शौर्य साहसाच्या कथा ऐकल्या किंवा वाचल्या आहेत. पण प्रत्यक्ष डोळ्यांनी त्या मी आज पहात आहे."

"आता तुम्हांला कळले ना की, आम्ही तुमच्या शत्रूचे हेर नाही. आता राज-धानीला परत जा. शिकारीच्या नादांत विनाकारण या संकटात सापडलात आणि आम्ही पण फसलो." जीवदत्त म्हणाला.

"आमच्या राजधानीत येऊन यथोचित सत्कार करविल्याशिवाय तुम्ही जाणार? मी तुम्हांला आपल्या दरबारात उच्च मानाची

नका." नित्यानंद राजा म्हणाला.

"आम्हांला पुरस्कार अगर हुद्याचा मोह नाही. आम्हांला निरोप द्या. आम्ही आपल्या तीर्थाटनाला निघतो." असे म्हणत जीवदत्तने खड्गवर्माकडे सार्थक नजरेने पाहिले.

खड्गवर्मा त्याच्या तलवारीला लागलेले रक्त झुडपाच्या पानांनां पुसू लागला आणि त्या राक्षसी हत्तीकडे पाहू लागला.

जे रानटी लोक हत्तीच्या आड स्वरक्षणा-साठी पळून गेले होते ते हत्तीवर बसलेल्या पुजाऱ्याला काहीतरी सांगत होते. पुजारी त्यांना धीर देत खड्गवर्मा व जीवदत्त यांच्याकडे पहात होता.

जीवदत्त जवळ येऊन खड्गवर्माला म्हणाला–"मित्रा, तुला पुन्हां आपल्या तलवारीचा प्रयोग करावा लागणार असे वाटते आहे. तो त्या रानटी तरुणांना पुन्हां आपल्यावर सोडण्याच्या विचारात आहे. म्हणून त्यांच्याशी आपल्याला नक्कीच युद्ध करावे लागणार."

जीवदत्तचे बोलणे पुरेदेखील झाले नसेल, राक्षसी हत्ती एकाएकी खाली उतरू लागला. त्याचा वेग पाहून खड्गवर्मा देखील थक्क झाला. म्हणाला–"जीवदत्त! हा कोणत्या जातीचा हत्ती असेल रे?



दिसायला दोन हत्तींएवढा आहे. त्याची ती लांबलांब पावले पहा. त्याची सोंड हालत नाही, की अकडली आहे कळत नाही!"

"हा हत्तीच आहे का, मला संशय येतो आहे." खड्गवर्मा म्हणाला.

त्यावेळी सारथी राजाचा रथ वळवणार होता. सर्व सैनिक दूर उभे राहून हत्तीकडे पहात होते. हे लोक कोणत्या क्षणाला येथून पाय काढतील, सांगता येणार नाही असा विचार करून जीवदत्त नित्यानंदला चांगले ऐकू जाईल इतक्या उच्चे स्वराने म्हणाला–"तुम्ही रथ वळवून येथून निघून जा. आपले सैनिक पळून जाण्याच्या विचारात आहेत!"



नित्यानंद आपल्या सैनिकांना उद्देशून म्हणाला—"आपल्याला भिण्याचे मुळीच कारण नाही. हे दोघे वीर असेपर्यंत तो राक्षस हत्ती आपल्या अंगाला शिवणार देखील नाही." नंतर तो खड्गवर्मा व जीवदत्त दोघांना म्हणाला—"तुमचे शौर्य व साहस स्तुत्य आहे. त्या विघ्नेश्वर पुजाऱ्याच्या हत्तीला ठार करू शकलात तर माझे व माझ्या राज्याचे रक्षण केल्याचे श्रेय तुम्हांला लाभेल."

"त्या हत्तीला पाहून तुम्ही कां भितां आहां? एक वार करताच त्याची सोंड गळून खाली पडेल किंवा पाय मोडेल." खड्गवर्मा म्हणाला.

आहे. त्याच्या अंगावर कातडे नसून पोलादाचे कवच आहे. त्याच्या अंगावर सोडलेला बाण त्याच्या अंगाला लागून दूर जाऊन पडतो. त्या राक्षस हत्तीला ठार करण्याचा आम्ही निरनिराळ्या प्रकारे प्रयत्न करून पाहिला. पण अयशस्वी झाल्यामुळेच आम्हांला त्याची भीति वाटते आहे." नित्यानंद म्हणाला.

पोलादी कवचाची गोष्ट ऐकून खड्गवर्माला आश्चर्य वाटले. तो जीवदत्ताला म्हणाला—"काय रे हा हत्ती ऐरावत जातीचा का आहे? त्याच्या अंगावर म्हणे पोलादी कवच आहे? तरमग आपण ते पाहिलेच पाहिजे!" असे म्हणत खड्गवर्माने धनुष्यावर बाण चढवून हत्तीच्या पोटाचा नेम धरला. बाण सरळ हत्तीच्या पोटाला लागला अन् 'खण्‌ण' असा आवाज झाला आणि बाण दूर जाऊन पडला. ते पाहून विघ्नेश्वर पुजारी आनंदातिरेकाने हंसू लागला.

"त्या पुजाऱ्याची हिंमत प्रशंसनीय आहे. पण हत्ती इतका मोठा कसा काय आहे बुवा? त्याच्या अंगावर लोखंडी कवच कसे काय? हत्तीचे हे गुपित उलगडल्याशिवाय पुढे जाता कामा नये." खड्गवर्मा म्हणाला.

"यात काही तरी नक्कीच लबाडी दिसते आहे. पुजाऱ्याच्या डोक्यावर हा मुकुट कसा काय? याचे राजाशीं वैर कां बरे आहे? कदाचित पुजाऱ्याचा धंदा सोडून राजाची गादी पटकावण्याची महत्वाकांक्षा असेल मनात त्याच्या. त्या हत्तीच्या समाचाराला जाऊ या." जीवदत्त म्हणाला.

खड्गवर्मा व जीवदत्त त्यांच्याकडे येणाऱ्या हत्तीकडे वळले. ते पाहून नित्यानंद व त्याचे अनुयायी सैनिक किंकर्तव्य विमूढ होऊन पहात उभे राहले. सर्वांना दोघांचे ते दुस्साहस वाटले. हत्ती त्यांना क्षणार्धात पकडून पायाखाली दाबून ठार केल्याशिवाय राहणार नाही.

परंतु विघ्नेश्वर पुजारी हत्तीवर बेफिकीरपणे बसून आजूबाजूला चालणाऱ्या रानटी तरुणांना धीर देत पुढे येत होता. थोड्या वेळाने तो जीवदत्त व खड्गवर्मा दोघांना संबोधन करून म्हणाला—"हे वीरश्रेष्ठ हो! या, मी तुमचे स्वागत करतो. तुम्ही माझ्या अनेक अनुयायांचा वध केलात त्याचा मला थोडा देखील राग नाही. मी त्यांना, वाटल्यास तपोबलाने पुन्हां जिवंत करीन. परंतु या जंगलात तरुण वीरांचा तोटा नाही. म्हणून ते करण्याची गरजच नाही. मी एक विचारतो, तुम्ही माझ्या बाजूला या आणि खोटी वचने देणाऱ्या या राजाची खोड



मोडण्यास मला सहाय्य करा. तुम्ही मदत केलीत तर धन, दौलत जहागीर, तुम्ही मागाल ते मी द्यायला तयार आहे."

पुजारी म्हणाला ते ऐकून खड्गवर्मा व जीवदत्त हसू लागले. ते त्या हत्तीपासून वीस फुटावर उभे राहून विघ्नेश्वर पुजाऱ्याला म्हणाले—"अहो पुजारी, तुम्ही आपल्या हत्तीला तेथेच थांबवून ठेवा. आपण प्रथम परस्परांशी थोडे बोलून घेऊ या."

पुजाऱ्याने हत्तीच्या गंडस्थलावर एक बुक्का मारला. हत्ती उभा राहला. जीवदत्तने हत्तीकडे लक्षपूर्वक पाहिले व विचारले—"अहो पुजारी, तुम्ही म्हणालात,

राजाने खोटी वचने दिली ती कोणती? आम्हांला ऐकू द्या तरी!"

विघ्नेश्वर पुजाऱ्याने त्याला कोणकोणते स्वप्न पडले आणि स्वप्नातल्या गोष्टीवर राजाने कसा अपमान केला ते सर्व सांगितले व म्हणाला—"मी ज्या हत्तीवर बसलो आहे तो इंद्राच्या ऐरावताचा जवळचा नातेवाईक आहे. हा एक हजाराहून जास्त वर्षे वयाचा आहे. मी याच्या मदतीने आनंदपूर जिंकणार आहे. तुम्ही त्या राजाची मदद करण्याच्या भानगडीत पडून व्यर्थ प्राणास मुकाल. तुम्ही माझ्या बाजूने त्याच्याशी लढा, पाहिजे तर. तुम्ही मागाल ते मी तुम्हांला देईन."

पुजाऱ्याच्या बोलण्याच्या रीतीवरून खड्गवर्मा व जीवदत्त दोघांना आश्चर्या-बरोबर शंकापण आली. खड्गवर्मा राक्षसी हत्ती होता त्या दिशेने पावले टाकीत पुढे निघाला आणि म्हणाला—"तरमग हा ऐरावत जातीचा हत्ती आहे म्हणता? आणि वयाने एक हजार वर्षांचा आहे, नाही का?

पिल्लासारखा वाटतो.

खड्गवर्माबरोबर जीवदत्तदेखील हत्तीच्या जवळ येऊन पोचला. ते त्याची सोंड पाहून हत्ती खरा आहे की नकली हे पाहू लागले. त्याच वेळी पुजाऱ्याने हत्तीच्या गंडस्थलावर एक बुक्का मारला. दुसऱ्या क्षणाला हत्तीने आपली सोंड वळवून खड्गवर्मा व जीवदत्त दोघांना पकडले. त्याच वेळी रानटी तरुण मंडळी पुढे आली व त्यांनी त्या दोघांना धरले.

त्या स्थितीत खड्गवर्मा व जीवदत्त दोघांना काही एक करता आले नाही. विघ्नेश्वर पुजारी आपला राक्षसी आनंद दर्शवीत खदखदा हसला आणि म्हणाला—"मी ह्यांना गुहेतल्या देवळात घेऊन जातो. तुम्ही नित्यानंद राजाला धरून घेऊन या."

रानटी अनुयायी उडया मारीत नित्यानंद राजाकडे त्याला धरायला धावले. सारथ्याने रथ फिरविला. नित्यानंदाने आपल्या सैनिकांना त्या रानटी लोकांना थोपवून ठेवण्याचा आदेश दिला. (क्रमशः)



# अपराधी कोण?

विक्रमादित्याने आपला हट्ट सोडला नाही. तो झाडाजवळ गेला, प्रेत खांद्यावर काढून घेतले आणि नेहमीप्रमाणे मौनपणे स्मशानाच्या दिशेने चालू लागला. तेव्हां प्रेतात बसलेला वेताळ त्याला म्हणाला—"राजा, तू काही अपराध केल्याशिवायच शिक्षा भोगीत असावास असे वाटते. पण तुला माहीत नसेल, एक तरुण युवक अपराध करून ही दंड भोगल्याशिवाय सुटून गेला होता. त्याची गोष्ट मी तुला सांगतो. लक्ष देऊन ऐक." असे सांगून वेताळ गोष्ट सांगू लागला.

एक प्रवासी बरेच दिवस प्रवास केल्या-वर दमून गेला आणि संध्याकाळी कांचन-नगर नावाच्या गावी येऊन पोचला. ते गांव त्याला नवेच होते. म्हणून कोठे उतरावे हे त्याला कळेना. शेवटी एका घराच्या व्हरांड्यात ओट्यावर तो झोपला. दमून

गेल्यामुळे जमिनीला अंग लागताच त्याला झोप आली.

थोड्या वेळाने कोणी तरी बोलत असल्याचे ऐकून त्याची झोप मोडली. कोणी दोन व्यक्ती अगदी हळू बोलत होत्या. प्रवासी पडल्या पडल्या त्यांचे बोलणे ऐकत होता. त्यांच्या आवाजावरून व संभाषणावरून दोघांपैकी एक तरुण युवक आहे व दुसरा गावातला शिपाई आहे हे त्या प्रवाश्याने ओळखले.

"हे पहा, चोरी करणे हा एक मोठा अपराध आहे. तू या लहान वयात हा अपराध कां केलास? राजाचा दंड या जगात आणि मेल्यावर नरकवास, तुला भोगावा लागणार!" शिपाई म्हणाला.

[illegible] नाइलाजानें हा अपराध केला. या वेळेस मला क्षमा करा. मी पुन्हां चोरी करणार नाही." तो तरुण युवक म्हणाला.

"तुला चोरी कां करावी लागली रे? खरे सांग" शिपायाने विचारले.

त्या तरुण मुलाने आपली करुण कहाणी थोडक्यात सांगितली. म्हणाला–"मी एका गरीब कुटुंबात जन्मलो. माझे बाबा माझ्या लहानपणीच वारले. माझी आई श्रीमंत लोकांच्या घरी लहान मोठी कामे करी व जी मिळकत होई त्यावर कुटुंबाचा खर्च चाले. थोडे पैसे असेच काही दिवसांनी जमले. म्हणून तिने एक लहानशी खानावळ [illegible] सुमारास एक जोडपे आमच्या घरी आले. आईने त्यांच्या आंघोळीची व्यवस्था करून दिली व सैंपाकाला लागली. तिने त्यांच्या साठी पुन्हां सैंपाक केला. दोघं जेवून खाऊन रात्री आमच्याच घरीं झोपली.

परंतु दुसऱ्या दिवशी सकाळी दोघं नवरा बायको मृतावस्थेत आढळली. वैद्यांनी दोघांना तपासून पाहिले आणि विषप्रयोगाने दोघं मेल्याचे सांगितले. रात्री त्यांनी जे खाल्ले होते. त्यातले काही खाद्यपदार्थ उरले होते. त्यात मेलेली पाल सापडली ती चूक माझ्या आईच्या हातून नकळत घडली होती. जाणून बुजून असे कोणी करील का? परंतु ती गोष्ट राजाच्या दरबारी गेली. राजाने माझ्या आईला दरबारात बोलावून तिला त्या अपराधाबद्दल फांशीची शिक्षा सांगितली. काही दरबारी लोकांनी या अपराधाबद्दल एवढी मोठी शिक्षा देऊन नये असे सांगितले. कारण एक तर ती स्त्री होती व ती चूक नकळत घडली होती.

राजाने विचार करून एका महिन्याच्या आत दहा हजार रुपये दंड सरकारात न भरल्यास फांशीची शिक्षा देण्यात यावी असा निर्णय दिला.

आतां एवढी मोठी रक्कम कोठून आणायची हे मला कळेना. मी लाकडे फोडून स्वतःचा उदरनिर्वाह करू लागलो.







आपल्या आईला वांचविण्यासाठी मी सर्व प्रकारे प्रयत्न करून पाहिला. पण फुकट, शेवटीं निरुपाय होऊन मला हा मार्ग अवलं-बावा लागला. आजच शेवटचा दिवस उरला आहे. उद्यां माझ्या आईला फांशी देण्यात येईल. महिन्याभरात मी फक्त शंभर रुपये जमवू शकलो. म्हणून नाइलाजाने आज रात्री चोरी केली आणि तुमच्या हाती कैद झालो.

त्यात तरुण मुलाची ती करुण कहाणी ऐकून प्रवाश्याचे हृदय विरघळून गेले. शिपायाला देखील फार वाईट वाटले. तो त्याला म्हणाला–"खरोखरच तुझ्यावर फार मोठा प्रसंग येऊन पडला आहे. परंतु चोरी [illegible] काढण्याचा प्रयत्न करून पाहिलास का?"

"पण तुम्हीच सांगा, माझ्यासारख्या कफल्लकाला इतके मोठे कर्ज कोण देणार हो? आणि मी एवढे मोठे कर्ज फेडणार तरी कसे?" तरुण म्हणाला.

"तू एखाद्या श्रीमंत मुलीशी लग्न करून घेतले असतेस तर तुझ्यावरचे हे संकट टळले असते." शिपाई म्हणाला.

"तुम्ही श्रीमंत मुलीची गोष्ट म्हणता. अहो कोण्या गरीबाच्या मुलीशी तरी माझे लग्न अशा स्थितीत होऊ शकले असते का?" तरुण दीनवाणीने म्हणाला.

शिपाई काही वेळ विचार केल्यावर म्हणाला–"बरे तर झाले ते झाले, पुन्हां असे काम करू नकोस. मी देखील गरीबच आहे. मलादेखील अनेक कष्ट सहन करावे लागतात. तू जे धन चोरून आणले आहेस त्यांतले तुला आवश्यक तेवढे घे आणि बाकी मला दे. नंतर जा तू हवा तिकडे."

ते ऐकून प्रवाश्याला फार राग आला. चोराला बंदी करणे हे शिपायाचे काम आहे. त्याने अपराध्याला सोडले आणि चोरीच्या मालात वांटा मागितला. ते दोन्ही फार मोठे अपराध होते.

दुसऱ्या दिवशी तो प्रवासीपण दरबारात गेला. परंतु त्याने कोणाला काही सांगितले [illegible] भरली आणि आपल्या आईला सोडवून घेऊन निघून गेला.

वेताळाने येथवर गोष्ट सांगून विचारले–"राजा, यात कोणाचा अपराध मोठा मानावयाचा? एवढा मोठा दंड लावणाऱ्या राजाचा की चोरी करणाऱ्या तरुण मुलाचा? की अपराधी पकडला गेला असून लाच घेऊन त्याला सोडून देणाऱ्या शिपायाचा? की शिपाई व चोर दोघांचा अपराध माहीत असून गप्प बसणाऱ्या प्रवाश्याचा? आपण हे मानले की तरुणाची परिस्थिति ओळखून प्रवाश्याने त्याच्या अपराधाबद्दल ओरडा केला नसेल तरी त्याने मग शिपायाचा अपराध उघडकीला कां आणू नये? या सर्व शंकांचे समाधान माहीत असून तू करून दिले नाहीस तर परिणाम तुला माहीतच आहे. तुझ्या डोक्याची शंभर शकले होऊन तुझ्याच पायावर लोळू लागतील."

राजा विक्रमादित्य म्हणाला–"प्रवा-श्याला शिपायाने लांच घेतलेली पाहून राग आला. परंतु त्याने त्याचा अपराध उघड सांगितला असता तर तरुण मुलाचा अपराधपण आपोआप उघडकीस आला असता व परिणामी त्या तरुण मुलाच्या आईला फांशीची शिक्षा झाली असती. त्या मुलाच्या व त्याच्या आईच्या रक्षणासाठीच प्रवाश्याला शिपायाचा अपराध गिळून स्वस्थ बसावे लागले. शिपाई अपराध्याच्या बाबतीत निष्काळजी नव्हता. कारण त्याच्या दृष्टीने चोरी करणे एक महापापपण होते. त्या तरुणाची करुण कहाणी ऐकून त्याच्या पापात वांटेकरी होण्याचे त्याच्या मनात माझ्या मते आले. राजाच मोठा अपराधी ठरतो. कारण सैंपाकिणीचा धंदा करून पोट भरणाऱ्या एका गरीब बाईला त्याने दहा हजार रुपये दंड कसा काय केला? हा काय न्याय झाला?"

अशा तऱ्हेने राजाचे मौन भंग होतांच वेताळ प्रेतासह नाहीसा झाला आणि झाडाला जाऊन लोंबकळू लागला. •

(कल्पित)



# अंगरक्षक

एका राजाला एका अंगरक्षकाची गरज होती. त्या जागी काम करण्याच्या इच्छेने अनेक तरुण आले. परंतु साहस व पराक्रम हे दोन गुण आलेल्या तरुणांपैकी फक्त दोघांच तरुणात दिसून आले. त्यांपैकी एकाला प्रधानाने अंगरक्षकाच्या पदावर काम करण्यासाठी निवडले.

प्रधानाने प्रथम एकाला बोलवून विचारले–"समज, राजाला शत्रू उचलून घेऊन जात आहेत तर तू काय करशील ?"

"शत्रूशी युद्धाची घोषणा करून आणि शत्रूचा पराभव करून राजाला सोडवून घेऊन येईन." पहिला म्हणाला.

प्रधानाने दुसऱ्याला तोच प्रश्न केला.

तो म्हणाला–"मी जिवंत असेपर्यंत म्हणजे मला ठार केल्याशिवाय शत्रू राजाला धरून कसा काय घेऊन जाईल ?

अर्थात् त्या उत्तरावर संतुष्ट होऊन प्रधानाने पहिल्याला घरी जायला सांगितले आणि दुसऱ्याला अंगरक्षकाच्या पदावर नेमले.





# विद्यासागर

प्राचीन काळी पाटलीपुत्र येथे विद्यासागर नावाचा एक तरुण ब्राह्मण रहात असे. त्याने लहानपणीच वेदशास्त्रांचा अभ्यास करून मोठी विद्वत्ता संपादन केली होती. तरी विद्येची तहान भागली नाही. कारण अद्याप शिकायला या जगात पुष्कळ आहे असे त्याला वाटत होते. निरनिराळ्या विज्ञान शास्त्रांचा अभ्यास करण्याच्या हेतूने विद्यासागर देशाटनास निघाला.

जागोजागी विद्यासागराला मोठमोठे थोर विद्वान पंडित भेटले. परंतु त्याच्या मनाचे समाधान झाले नाही. कारण त्याला खरा विद्वान कोणीच आढळला नाही. तो प्रवास करीत करीत एका खोल दरीत येऊन पोचला. तो एका झाडाखाली स्वस्थ पडून राहीला आणि त्याला झोप लागली.

त्या झाडावर राहणारा ब्रह्मराक्षस झाडाखाली एका तरुण ब्राह्मणाला झोपेत असलेला पाहून खाली उतरून आला. त्याने विद्यासागराला जागे केले.

विद्यासागराने डोळे उघडून पाहिले तरसमोर एक दीर्घकाय मनुष्य उभा. त्याने नम्रतापूर्वक विचारले–"आपण कोण, हे नाही मी ओळखले. मी पाटलीपुत्राचा राहणारा आहे, माझे नाव विद्यासागर. मी वेदशास्त्रांचा अभ्यास केला आहे. तरी विद्येची तहान भागली नाही, म्हणून मी विद्वान पंडिताच्या शोधार्थ निघालो आहे."

ते ऐकून ब्रह्मराक्षस म्हणाला–"मुला! ज्ञान अफाट आहे. तू सहा महिने माझ्या-बरोबर राहलास तर मी तुला सर्व विद्या शिकवून विद्वान पंडित करी." विद्यासागराने मोठ्या आनंदाने त्या ब्रह्मराक्षसाचे शिष्यत्व स्वीकारले.

त्यानंतर ब्रह्मराक्षस पुन्हा झाडावर चढून बसला. विद्यासागर ब्रह्मराक्षस बसला होता

त्याच्या खालच्या फांदीवर बसला. सहा महिने त्या ब्रह्मराक्षसाजवळ विद्यासागराने अनेक विद्या व शास्त्रे शिकून घेतली. त्याने मंत्रविद्या देखील शिकून घेतली. त्याने सर्व विद्यांचे टिपण पिंपळाच्या पानांवर करून ठेवले.

सहा महिने झाल्यावर ब्रह्मराक्षस विद्या-सागराला म्हणाला–"मुला! तुला शिक्षादान करून मी शापमुक्त झालो आहे. आतां मी पुण्यलोकी जाणार आहे. तू स्वदेशी परत जाऊन शास्त्रविधीप्रमाणे विवाह करून घे आणि सुखाने गृहस्थाश्रमात पुढील आयुष्य घालव." असे सांगून ब्रह्मराक्षस अंतर्धान पावला.

विद्यासागर सर्व पाने एका गाठोड्यात बांधून घेऊन स्वदेशी निघाला. तो कलिंग [illegible] तहानेने त्याचा जीव कासावीस झाला. म्हणून एका घराच्या ओट्यावर तो विश्रांती-साठी थोडा आडवा झाला. त्यानंतर त्याला स्वतःची शुद्ध राहली नाही.

ते घर मंदाकिनी नामक एका शूद्र स्त्रीचे होते. ती रात्री उशिरां घरी परत आली तेव्हां तिला ओटीवर झोपत असलेला विद्यासागर दिसला. तिने त्याला जागे करण्याचा प्रयत्न करून पाहिला. पण विद्यासागर बेशुद्धावस्थेत पडलेला होता.

मंदाकिनी त्याला उचलून घरात घेऊन गेली आणि वैद्याला बोलवून तिने त्याचे औषधपाणी करविले. पुष्कळ दिवस उपास-तापास करीत लांब प्रवास केल्यामुळे [illegible] उरली नव्हती. परंतु वैद्याचे औषधपाणी व मंदाकिनीची सेवा यामुळे एका महिन्यात त्याची तब्येत छान सुधारली.

तब्येत सुधारल्यावर स्वदेशी निघतांना विद्यासागर मंदाकिनीचा निरोप घेत म्हणाला–"घर सोडून मला बरेच दिवस झाले. तू मला जी मदत केलीस तिचे स्मरण मला सर्वदा राहील. तुला या मदतीचे फळ यथावेळी नक्कीच मिळेल."

"याचे फळ देणे हे तर तुमच्याच हातात आहे. माझ्याशी विवाह करण्याची इच्छा अनेकांनी दर्शविली, परंतु मी त्यांपैकी एकाशींदेखील विवाहास तयार झाले नाही. आपल्याला पाहिल्यापासून विवाह करावयाचा तर आपल्याशीच असे मी मनाशी ठरविले. म्हणून माझी विनंति मान्य करून माझ्याशी विवाह करण्याची कृपा करावी.

विद्यासागर म्हणाला–"मी एक ब्राह्मण ब्रह्मचारी आहे. तू शूद्र कन्या आहेस. तुझ्याशी विवाह करावा लागला तर मला धर्मशास्त्राप्रमाणे त्यापूर्वी एका ब्राह्मण कन्येशी, एका क्षत्रिय कन्येशी व एका वैश्य कन्येशी विवाह करावा लागेल. तो नियम मोडता येणार नाही. तेव्हां मी काय करू हे तूच सांग."

"या सर्व प्रश्नांचे उत्तर देणे व धर्माचे रक्षण करणे हे एकट्या राजालाच शक्य आहे. मी राजाकडे जाऊन आपल्या





समोरील कोडे उलगडण्यास विनंति करते."
मंदाकिनी म्हणाली.

त्याप्रमाणे मंदाकिनी राजाकडे गेली आणि तिच्यासमोर तिच्या विवाहासंबंधी जो प्रश्न उभा होता तो निवेदन करून उचित ते करण्याची विनंति केली. राजाने विद्यासागरला दरबारात बोलावून घेतले. त्याचे पांडित्य पाहून राजा खुष झाला.

थोडावेळ त्याच्याशी संभाषण झाल्यावर राजा म्हणाला–"विद्यासागर बुद्धिमान आहे. मंदाकिनीची परिस्थिति पाहील्यास ती त्याची पत्नी होण्यालायक दिसते. विद्यासागरदेखील तिच्या इच्छेप्रमाणे विवाहास तयार आहे. ते शास्त्राप्रमाणे त्याला प्रथम अनुक्रमें ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य कन्यांशी विवाह करावा लागेल. त्यासाठी मी एक उपाय सुचवितो. आमचे मंत्री, मी व वैश्य कुलपति तिघांना विवाह योग्य कन्या आहेत. विद्यासागर तिघींशी

शक्य होईल.

तो निर्णय सर्व दरबारी मंडळीस पसंत पडला. विवाहाची तयारी सुरु झाली आणि एका सुमुहूर्तावर विद्यासागरचा अनुक्रमें चौघां कन्यांशी विवाह झाला. त्याच्या ब्राह्मण पत्नीचे नांव मालती होतें, क्षत्रिय पत्नीचे कलावती होते व वैश्य पत्नीचे सुमंगला होते. मंदाकिनी त्याची शूद्र पत्नी झाली.

या चार पत्नींबरोबर विद्यासागरने गृहस्थाश्रमात प्रवेश केला. त्याला चौघीं-पासून चार मुलगे झाले. ब्राह्मण पत्नी-पासून झालेल्या मुलाचे नाव वररुचि, क्षत्रिय पत्नीपासून झालेल्या मुलाचे नाव विक्रमादित्य, वैश्य पत्नीपासून झालेल्या मुलाचे नाव भट्टी व शूद्र पत्नीपासून झालेल्या मुलाचे नाव भर्तृहरि होते. चार ही मुलांनी अपार कीर्ति संपादन केली.





# सौजन्याचा दंड

[ ३ ]

अत्तफला खाली पडत असलेला पाहून आणखी एक हिजडा दुरून पळत आला. त्याने अत्तफला बसवून त्याच्या तोंडातून वाहू लागलेले रक्त पुसले. त्याच्या कपड्यांना लागलेली धूळ झाडली आणि विचारले–"काय पाहिजे आपणांला ?"

"मला दुसरे काही नको, ही एवढी चिट्ठी जफर वजिराच्या हातात पोचती झाली की पुरे." अत्तफ म्हणाला.

ती चिट्ठी घेऊन तो हिजडा महालात पोचला तेव्हां जफर आपल्या काही मोठ्या अधिकाऱ्यांबरोबर दारू पीत गायन ऐकत होता. तो स्वतः उभा होता व त्याच्या हातात दारूचा एक पेला होता. तो त्या वेळी अत्तफविषयीच बोलत होता.

वेळ पाहून हिजड्याने वाकून सलाम केला आणि चिट्ठी जफरच्या हातात दिली.

ती चिट्ठी पाहून जफर आनंदाने नाचू लागला आणि अचानक बेशुद्ध होऊन जमिनीवर पडला. त्याच्या हातातला पेला जमिनीवर आदळून फुटला व त्याचे तुकडे फरशीवर पसरले. एका तुकड्यावर त्याचे डोके आदळले म्हणून कपाळाला खोक पडली आणि रक्त वाहू लागले.

ते दृश्य पाहून हिजडा घाबरला आणि तेथून पळून गेला. जफरच्या मित्रमंडळींनी त्याला सहारा देऊन बसविले. त्याचे रक्त पुसले व म्हणाले–"हा अपशकुनी नोकर असेच काही तरी करून ठेवतो. तो चिट्ठी लिहिणारा कोण आहे त्याला नगररक्षक वलीच्याकडे पोचते करून पाचशे कोरडे ओढायला सांगा."

चिट्ठी लिहिणाऱ्याला धरण्यासाठी गुलाम धावले. परंतु अत्तफ त्यांना शांतपणे

अरबस्तानातील एक लोककथा

      



म्हणाला–"चिट्ठी पाठविणारा तो मी!" गुलाम नोकर त्याला धरून वलीकडे घेऊन गेले. त्याला वलीने पांचशे कोरडे मारण्याची शिक्षा देऊन तुरुंगात टाकले.

जफर शुद्धीवर आला तेव्हां त्याने नोकरांना विचारले–"माझ्या नावे चिट्ठी लिहिणारा मनुष्य कोठे आहे? त्याला लवकर आदरपूर्वक बोलावून घेऊन या, माझ्याकडे!"

अत्तफला जफरसमोर आणण्यात आले तेव्हां जफर त्याला मुळीच ओळखू शकला नाही. कारण उपासमार आणि वर पांचशे फटक्यांची शिक्षा भोगल्यावर त्याची जी स्थिति झाली असेल ती कल्पनेनेच कळण्या-सारखी आहे.

विचारले.

"मी दमास्कसहून आलो. माझे नांव अत्तफ!" अत्तफ म्हणाला.

"खास दमस्कसचेच राहणारे आहां की जवळपासच्या एखाद्या गावचे?" जफरने विचारले.

"पूर्वी तुम्ही कधी अत्तफ नावाच्या व्यक्तीचे नाव ऐकले आहे का? तो एक दानी म्हणून प्रसिद्ध होता!" जफरने काही वेळ थांबून पुन्हां विचारले,–

"दमास्कसला अत्तफच्या घरी तुमची व त्याची मैत्री जमली हे मला माहीत आहे आणि त्याहि पुढे मला हे देखील माहीत आहे की तुम्ही त्याच्या बायकोशी विवाह केलात. तुम्ही बगदादला परत येत असतां वाटेत भेटून त्याने आपला निरोप घेतला त्या वेळी आपण ज्या पेल्यातून दारू प्यालात त्याच पेल्याने तोदेखील प्याला!" अत्तफ म्हणाला.

"हे सर्व खरे आहे. पण निरोप घेतल्या-नंतर तो कोठे गेला व त्याचे काय झाले?" जफरने विचारले.

"आतां ते मी काय सांगू? त्याच्या नशिबाने पाठ फिरविली!" अत्तफने त्या-नंतर त्यावर जो जो प्रसंग गुजरला तो तो

मियां! मीच तो दुर्दैवी अत्तफ!"

ते ऐकून जफर मोठ्याने ओरडून म्हणाला–"या अल्ला!" आणि त्याने अत्तफला प्रेमाने मिठी मारली. त्या आनंदात दोघे थोडा वेळ देहभान विसरले. नंतर दोघांनी परस्परांविषयी बोलायला सुरवात केली.

त्यानंतर जफर अत्तफला प्रेमाने हात धरून महालात घेऊन गेला. त्याच्या आंघोळीची व्यवस्था केली व त्याला उत्तमोत्तम वस्त्रे परिधान करायला देऊन खलीफांकडे बोलावून घेऊन गेला.

जफर खलीफांना लवून मुजरा करून म्हणाला–"सरकार! हाच तो उदार अत्तफ. दमास्कस येथे मी याच्याकडे आतिथ्य सत्कार कसा असतो हे पाहिले." अशा तऱ्हेने जफरने अत्तफचा परिचय दिला.

त्या अशक्त व निस्तेज तरुणाकडे पाहून खलीफा म्हणाले–"थोर पुरुषा! तुमची ही अशी स्थिति कां झाली?"

अत्तफने त्याच्यावर जे जे प्रसंग गुजरले त्यांचे वर्णन थोडक्यात केले व म्हणाला–"हे सर्व माझे नशीब! मी कोणाला दोष देत नाही!"

अत्तफच्या तोंडी सर्व वृत्त ऐकून खलीफा जफरला म्हणाले–"बोल जफर! यांच्या-



कडून तुला कोण कोणत्या कामी मदत मिळाली?"

"मी यांचा आयुष्यभर ऋणी राहीन एवढे उपकार यांनी माझ्यावर केले आहेत. मी नगद तीन लाख दीनार यांच्याकडून घेतले आणि भेट म्हणून कित्येक दीनारांचा माल यांनी मला दिला. हे सर्व कर्ज कसे फेडायचे ह्याचा मी विचार करतो आहे. नंतर यांच्या पत्नीची गोष्ट राहूनच गेली. त्या संबंधी जे करावयाचे ते शांतपणे व गुप्तपणे करणे आवश्यक आहे." जफर खलीफांना म्हणाला. खलीफांनी ओळखले की त्या संबंधी दोघांना परस्पर काही बोलावयाचे असेल. म्हणून त्यांनी दोघांना निरोप दिला.










अत्तफला आपल्या घरी घेऊन जाताना जफर वाटेत म्हणाला–"मित्रा! तुझी प्राणप्रिया पत्नी येथेच आहे. तिच्या पवित्र अंगाला मी स्पर्शदेखील केलेला नाही. तिच्याशी लग्न झाले तरी तिचा चेहरा देखील मी पाहिला नाही. मी तिला काडी मोड देऊन तुझ्याशी विवाह करून घेण्यास मुक्त केले आहे. तू तिचा स्वीकार कर."

अशा तऱ्हेने पतिपत्नीचे मीलन पुन्हां होऊ शकले.

खलीफांच्या आज्ञेने दमस्कसच्या प्रमुख अधिकाऱ्याला कैद करून अंधार कोठडीत टाकण्यात आले.

जफरची मैत्री व खलीफांचा परिचय संपादन करून अत्तफ सपत्नीक बगदादला काही दिवस आनंदाने राहून मित्रमंडळींच्या आग्रहास्तव दमास्कसला परत गेला. दमास्कसला परत जाणे खलीफांना पसंत नव्हते. परंतु खलीफांनी त्याच्याकडून दमास्कसचा मुख्य अधिकारी होण्याची [illegible]

अत्तफ दमास्कसला गेला तेव्हां त्याच्या स्वागतासाठी सर्व शहर सजविण्यात आले होते. तोरणे, दिवा बत्ती व दारूची व्यवस्था होती. अत्तफ गेल्यामुळे गोर गरीब रडत होते ते आज आनंदाने त्याच्या स्वागता-साठी जमले होते व हर्षध्वनि करीत होते.

खलीफांनी नगर रक्षकाला फांशीची शिक्षा दिली होती. पण अत्तफने शिफारस करून त्याला मुक्त केले.

खलीफा रात्रभर वाचीत असतां एका-एकी हसला आणि मग रडू लागला होता. तर त्या जुन्या ग्रंथातली गोष्ट काय झाली? पण खलीफा ती गोष्ट पार विसरून गेले होते. जफरने देखील त्या पुस्तकातल्या गोष्टीची आठवण खलीफांना करून दिली नाही. खलीफा व जफर दोघांना त्या ग्रंथाची दखल उरली नाही तर आपण त्याची दखल घेण्याचे कारणच काय?

(संपूर्ण)





# पालट

मणिपूरच्या गादीवर एक वृद्ध राजा राज्य करीत असे. त्याला वंश चालू ठेवणारी मंदारवल्ली नावाची एकच एक नात होती. तिचा आजा जिवंत असता-नाच तिचा राज्याभिषेक झाला व ती राणी झाली.

एकदां तिचा आजा तिला म्हणाला– "मुली, तू लग्न करून घे. तुला जी मुले होतील त्यांच्याकडून आपला वंश चालू राहील. नाही तर तुझ्याबरोबर वंश खुटेल." मंदारवल्लीच्या मनात विवाह करण्याची मुळीच इच्छा नव्हती. कारण एका पुरुषाने लग्न करून तिच्यावर नवरेपणा गाजवावा, हे तिला मुळीच पसंत नव्हते. म्हणून ती आपल्या आजोबांना म्हणाली– "आजोबा! वंश चालू ठेवण्यासाठी कोणत्याहि पुरुषाशी लग्न केले तरी चालेल. तो राजघराण्यातलाच हवा, असे कोठे आहे? समजा, एकाद्या राजकुमाराशी लग्न केले तर तो गादीचा वारस होईल व गादीवर बसेल." असे आपल्या आज्याला समजावून सांगून तिने एका सामान्य दरबाऱ्याशी लग्न करून घेतले. तो नावापुरता तिचा पति होता. त्याला दरबारात किंवा राज्यात विशेष महत्वाचा हुद्दा नव्हता. राजवाड्यात राहून खाऊन पिऊन तो स्वस्थ पडून राही.

राणी मंदारवल्लीला काही काळ लोटल्यावर एक मुलगी झाली. तिचे नांव तिने मंदारमाला असे ठेवले. ती जन्मल्या-वर मंदारवल्लीचे आजोबा वारले. मरणा-पूर्वी तिच्या आज्याने तिला जवळ बोलावून सांगितले की, मुली, तुझी मुलगी लग्नाची झाली की तिचे लग्न करून दे. तिच्या पोटी जन्मलेला मुलगाच आपल्या गादीला वारस होईल."

सौ. संजीवनी वोकील








मंदारमाला वयात आली तेव्हां जवळपासच्या राज्यातून तिला सुंदर व पराक्रमी राजकुमारांकडून मागण्या येऊ लागल्या. काही राजकुमारांनी पाठविलेल्या राजदूतांचा मंदारवल्लीने अपमान केला. कारण तिला कोणत्याहि राजघराण्यात मुलीचे लग्न करून द्यायचे नव्हते. एखाद्या सामान्य माणसाशीच विवाह करून द्यावा असे तिच्या मनात होते. तिची मुलगी राणी व्हावी व तिचा नवरा गुलामासारखा तिच्या आज्ञेप्रमाणे वागत असावा असे तिला वाटत होते.

ती गोष्ट मदुरेचा युवराज मकरंद याला कळली. त्याने एका सामान्य माणसाचा पोशाख केला आणि मणिपूरला आला. [illegible] ती आला असल्याचे द्वारपालकाला सांगितले. द्वारपालकाने तसे कळविल्यावर राणीच्या आज्ञेने त्याला आत नेण्यात आले.

"काय पाहिजे तुला ?" राणीने विचारले.

"मी राजकन्येशी विवाह करण्याच्या हेतूने तिला मागणी घालायला आलो आहे." मकरंद म्हणाला.

"काय नांव तुझे ? कोठला राहणारा ?" राणीने विचारले.

"महाराणी, मी एक सामान्य मनुष्य आहे. मला घरदार नाही. जिथे राहीन तेच माझे गांव व घर." मकरंद म्हणाला.

मकरंद दिसायला देखणा होता. मुलीला असाच देखणा पण सामान्य मनुष्य वरा [illegible] मी राजकन्येचा विवाह करून देईन. परंतु एक गोष्ट मी स्पष्ट सांगते, माझ्या मागे तीच राणी होणार व तुला आयुष्यभर तिच्या आज्ञेबाहेर काही काम करतां येणार नाही. तुला आपला नवरेपणा तिच्यावर गाजविता येणार नाही." मकरंदने होकार दिला व विवाह ठरला.

मंदारमालेचा बाप तिला गुप्तपणे भेटून म्हणाला—"मुली, तू या लग्नाला होकार देऊ नकोस. तुझ्याहून कमी योग्यतेच्या माणसाशी लग्न करून तू कधी सुखी होणार नाहीस. तुझ्या आईचे डोके फिरले आहे. तिच्यासारखीच तू रहावीस असे तिला वाटते.

त्यानंतर मंदारमालेच आपल्या होणाऱ्या पतीला एकांतात भेटून म्हणाली—"तू माझ्याशी लग्न करून सुखी होणार नाहीस. अयोग्य पतीवर कोणत्याही स्त्रीचे खरे प्रेम नसते. आपल्याहून मोठ्या हुद्यावर असणाऱ्या बायकोकडून खऱ्या प्रेमाची अपेक्षा करणे व्यर्थच आहे."

ते ऐकून मकरंद स्मित करून म्हणाला—"मी स्वतःची गोष्ट स्वतः पाहून घेईन. मी नक्कीच तुझा प्रेमपात्र होऊ शकेन. मी सर्व गोष्टींचा विचार करूनच दूर देशातून तुला मागणी घालायला आलो आहे."

मकरंद जे म्हणाला त्यात मंदारमालेला आत्मविश्वास दिसला. ठरल्या प्रमाणे दोघांचा विवाह झाला. विवाह होताच




मकरंद मंदारमालेला म्हणाला—"आता चल माझ्या बरोबर माझ्या घरी." असे सांगून त्याने मंदारमालेचा हात धरला आणि चालू लागला. ते पाहून राणी मंदारवल्ली रागाने आपल्या शिपायांना म्हणाली—"त्याला थांबवा!"

मकरंदने तत्क्षण एका शिपायाच्या हातातली तलवार हिसकावून घेतली आणि म्हणाला—"खबरदार कोणी माझ्या वाटेवर उभा राहिला तर! त्याचे डोके तत्काळ त्याच्या पायांवर लोळू लागेल."

शिपाई दचकून बाजूला सरले.

मकरंद मंदारवल्लीला म्हणाला—"मी तुझ्या नवऱ्यासारखा कोपऱ्यात पडून राहीन असे तुला वाटले होय?"

मंदारवल्ली आपल्या मुलीला म्हणाली—"काय ग! हा काय बरळतो आहे, याचे तोंड बंद कर."

"माझे पति पराक्रमी आहेत तर ते मला भूषणावह आहे. मला त्यात काही गैर वाटत नाही. योग्य व पराक्रमी पती- [illegible] या शब्दात आईचे तोंड बंद केले.

त्याच वेळी मंदारमालेचा बाप तलवार उपसून मकरंदसमोर आला व म्हणाला—"कोण रे तू, माझ्या देखत माझ्या पत्नीचा अपमान करणारा? पाहतो मी तुझा पराक्रम!"

मकरंद व मंदारमालेचा बाप दोघांचे द्वंद्वयुद्ध झाले. त्यात मकरंदने आपल्या सासऱ्याचा मान राखण्यासाठी लुटुपुटुचेच युद्ध केले व हार मानली. मंदारवल्लीच्या पतीच्या शौर्याची सर्व दरबारी वाखाणणी करू लागले. तिला मनातल्या मनात पति विषयी आदर वाटू लागला. तिचे मन पालटले आणि ती त्या दिवसापासून पतीचा आदर करू लागली. म्हणून आपल्या मुलीला एक पराक्रमी पति मिळाल्याबद्दल तिला आनंद वाटला. मकरंद कोणी सामान्य मनुष्य नसून एक युवराज असल्याचे तिला कळल्यावर तिच्या आनंदाला पारावार उरला नाही.





# गणूचे गाढव

फार पूर्वी विजयनगर येथे एक प्रसिद्ध ज्योतिषी रहात असे. त्याने ज्योतिष् शास्त्रावरचे सर्व ग्रन्थ वाचून मोठे पांडित्य मिळविले होते. लोक त्याचा सल्ला घेऊन आपले कार्य आरंभ करीत. राजा स्वारीला निघण्यापूर्वी त्याच ज्योतिष्याला युद्धात जय होईल की पराभव हे विचारी. ज्योतिषी मुहूर्त पाहून सांगे त्याच मुहूर्तावर राजा स्वारीला निघे. त्या ज्योतिष्याने वर्तवलेले भविष्य कधी खोटे झाले नाही. अर्थातच त्याची ख्याती दूरदूरच्या देशापर्यंत पोचली होती.

ज्योतिषीबुवांना शेतीची फार आवड होती. पेरणी व कापणीच्या वेळी ते आपल्या गावी जात व स्वतःच्या देखरेखीखाली सर्व कामे करवून घेत.

एकदा ज्योतिषीबुवा कापणी झाल्यावर खळ्यात मळणी वगैरे करवून धान्याची रास लावीत होते. तेव्हां गावातला गणू धोबी आपल्या गाढवाला हाकीत तिकडून निघाला. ज्योतिष्याला धान्याची रास लावीत असलेला पाहून तो म्हणाला—"अहो, धान्याची रास कशाला लावता? पोती भरून लवकर घरी पोचती करा. तासाभरात वादळ व पाऊस येणार आहे."

ज्योतिषी हसून म्हणाला—"खुळ्या! आतां कसे काय रे वादळ अन् पाऊस? वेड लागले आहे का तुला? सूर्य कोणत्या राशीत आहे हे माहीत आहे का तुला? दक्षिणेकडचा वारा चालू झाला आहे. ढगाचा एक तुकडादेखील कोठे तरंगत असलेला दिसत नाही. या नक्षत्रावर पाऊस येणेच शक्य नाही."

"ज्योतिषीबुवा! मला ग्रह आणि नक्षत्र नाही माहीत. पण सूर्यास्ताच्या सुमारास मोठे वादळ येणार आणि मुसळधार पाऊस

श्री मा. न. पाटील

पडणार एवढे मी सांगतो. तुमचेच नुकसान होईल म्हणून सांगतो." एवढे सांगून गणू धोबी निघून गेला.

"गांवढळ लोक, यांना ग्रह नक्षत्राची काय कल्पना असणार? या वेळी इंद्राला काय वेड लागले आहे पाऊस पाडायला?" त्याने मजुरांना असे सांगितले व 'काम चालू ठेवा', म्हणाला.

परंतु सूर्यास्ताच्या सुमारास एकाएकी सोसाट्याचा वारा सुरू झाला, विजा चमकू लागल्या आणि मुसळधार पाऊस पडू लागला.

शेतात काम करणारे शेतकरी व मजूर काम टाकून घरी पळून गेले. धोब्याच्या बोलण्याकडे दुर्लक्ष करून त्याची थट्टा [illegible] वाटला. आपण वेळीच सावध झालो असतो तर एवढे नुकसान झाले नसते. ज्योतिष्-शास्त्राचा मी एवढा पंडित, पण माझे सर्व ज्ञान त्या धोब्याच्या भविष्यासमोर बिन-मोलाचे ठरले. परंतु गणू धोब्याला हे कळले कसे? त्याने कोणाला तरी विचारले असावे. तो पंडित कोण बरे असावा? गणूलाच जाऊन विचारू या. ज्योतिष्याने मनाशी ठरविले.

दुसऱ्या दिवशी सकाळी पाऊस थांबला तेव्हां ज्योतिषी गणू धोब्याकडे गेला आणि त्याने त्याला विचारले–"काय रे गणू, तू म्हणालास तसा काल संध्याकाळी मोठा पाऊस पडला अन् वादळ पण आले. पण [illegible] तुला? कोणी तरी सांगितल्याशिवाय तुला कळणे शक्यच नाही."



"बरोबर म्हणालात ज्योतिषीबुवा! मला माझ्या गाढवाने ते सांगितले. वादळ येण्यापूर्वी ते आपली पाठ कमानीसारखी वांकविते. त्याच्या अंगावर केस उभे राहतात व शेपूट दाबून ते थरथर कांपू लागते. काल अगदी तसेच त्याने केले होते. म्हणून वादळ येणार हे मी सांगितले." गणू म्हणाला.

"अरे गणू! मी सर्व ज्योतिष शास्त्र घोळून प्यालो आहे, तरी मला जे कळले नाही ते गाढवाला कळले. यावर माझा विश्वास बसत नाही." ज्योतिषी म्हणाला.

"अहो ज्योतिषीबुवा, काय म्हणता? उजाडण्यापूर्वी पहाटे कोंबडा नाही का आरवत? भरती येण्यापूर्वी पाण्यातले मासे उड्या मारतांना नाही का दिसत? त्यांना भरती केव्हां येणार हे कसे कळले हे कोणी विचारावे? आम्ही तरी नाही विचारणार बुवा!" गणू म्हणाला.

ज्योतिषी दीर्घ श्वास सोडू म्हणाला–"ठीक आहे, तुझे म्हणणे. पण बघ, ही गोष्ट आणखी कोणाजवळ बोलू नकोस. नाहीतर माझी अब्रू जाईल."

"अहो ज्योतिषीबुवा! मला तुमच्या अब्रूची फिकीर नाही म्हणता होय? अन् मला गरिबाला त्यात काय मिळणार आहे?" गणू म्हणाला.

तरी ज्योतिषी बुवांची चूक लोकांना कळलीच. धोब्याशी त्यांचे जे बोलणे खळ्यात झाले होते ते मजुरांनी ऐकले होते. त्यांनी चार लोकांना ज्योतिष्याचे भविष्य पार चुकल्याचे व मुसळधार पाऊस पडून नुकसान झाल्याचे सांगितले. म्हणून पुढे ज्योतिषी कधी एखादे भविष्य सांगू लागला की लोक म्हणत–"थांबा, थांबा! गणूच्या गाढवाचे याविषयी काय मत आहे, हे गणू धोब्याला विचारून पाहू या. प्रथम!"

कोऱ्या शास्त्रपंडितापेक्षा अशिक्षित शेतकरी किंवा धोबी बरा असे केव्हां केव्हां वाटते ते उगाच नाही!





# दत्तक पुत्र

एका गावी एक म्हातारी रहात असे. तिचे घर गावाच्या टोकाला होते. गावाला लागून एक जंगल होते. म्हातारीला एकच एक मुलगा होता. म्हातारी मुलाला घेऊन रानात जाई. दोघे लाकडे काटक्या गोळा करून घेऊन येत आणि त्या विकून जे पैसे मिळत त्यांवर त्यांचा उदरनिर्वाह चाले. पुढे म्हातारी वडाच्या पानांच्या पत्रावळी करून विकू लागली. हळूहळू मुलगा मोठा होऊ लागला. तेव्हां त्याच्या हौशीपण वाढू लागल्या. तो दररोज आईजवळ पैसे मागे व आई शक्य होई तेवढे पैसे देई. परंतु तिला अगदीच अशक्य झाले तेव्हां ती आपल्या मुलाला रागावली. म्हणाली—"घोड्या-सारखा वाढलास. चार पैसे मिळवून आणून आपल्या आईला मदत करायची सोडून आईने मिळविलेल्या पैशावर चैन करा-यला तुला लाज कशी रे नाही वाटत?"

एकदा मुलगा घर सोडून पळून गेला. म्हातारीला वाईट वाटले. पण करणार काय? उनाड मुलाला किती दिवस पोसणार?

एकदां म्हातारी वडाखाली पाने गोळा करीत असता उन्हाच्या झळा लागून म्हातारीला घेरी आली. ती झाडाखाली बेशुद्धावस्थेत पडली असता एक तरुण मुलगा त्या बाजूला आला. त्याला म्हातारीची दया आली. त्याने ओढ्याचे पाणी आणून म्हातारीच्या तोंडावर शिपडले व थोडे तिला प्यायला दिले.

म्हातारीने त्या अनोळखी मुलाला इतकी प्रेमाने सेवा करीत असलेले पाहून विचारले— "कोण रे बाळ तू? काय करतोस?"

"आजी, या जगात माझे असे कोणी नाही. मी कामाच्या शोधार्थ निघालो होतो." तो म्हणाला.

"मी पोचवितो तुमच्या घरापर्यंत."

घरी पोचल्यावर म्हातारी त्याला म्हणाली—"आता कोठे जातोस? काम मिळेपर्यंत रहा माझ्याच घरी."

त्या दिवसापासून तो मुलगा म्हातारीचे सर्व काम करू लागला. तो पत्रावळी विकून किंवा लाकडे विकून जे पैसे मिळत म्हातारीला आणून देई. म्हातारी काही औषधी वनस्पती व मुळ्या आणून देई. त्या विकून बरेच पैसे मिळत. हळूहळू त्यांच्याजवळ चार पैसे जमले. घराची डागडुजी करून दोघे आनंदाने त्या घरात राहू लागली.

एक दिवशी म्हातारीचा मुलगा एका-एकी घरी आला. घरची सुधारलेली स्थिति पाहून त्याने आईला पैसासाठी त्रास द्यायला सुरवात केली. पण आईने एक फुटकी कवडीसुद्धां त्याच्या हाती लागू दिली नाही. म्हणून म्हातारीच्या मुलाचे, तिने घरात मुलगा मानून ठेवलेल्या मुलाशी भांडण होऊ लागले. त्याला घरातून हाक-लून दिल्याशिवाय आई पैसे देणार नाही, असे म्हातारीच्या मुलाला वाटले. दोघांचे दररोज भांडण होई.

तेव्हां दोघे बाहेर गेले असतां म्हातारीने सर्व पैसे एका पुरचुंडीत बांधून कोठे तरी लपवून ठेवले आणि घरातले सामान इकडे तिकडे फेंकून रडत बसली. मुलगा घरी आल्यावर चोरांनी पैसे चोरून नेल्याचे आईने सांगितले. मुलगा म्हणाला—"तू पैसे मला दिले असतेस तर माझ्या उपयोगी पडले असते. तू दरिद्री ती दरिद्रीच." असे म्हणत मुलगा घर सोडून निघून गेला.

थोड्या वेळाने मानलेला मुलगा आला व त्याने सर्व स्थिति पाहिली व म्हणाला— "जे नशिबी होते ते राहले. नव्हते ते गेले. पुन्हां मेहनत करून मिळवू पैसे!"

"अरे मेहनतीचे पैसे असे कसे जातील? तो गेला आणि पैसे आले." असे म्हणत म्हातारीने पैशांची पुरचुंडी बाहेर काढली.

कु. अंजू ढवळे



# फुलांची

एक मासळी विकणारी कोळीण मासे विकून घरी येत असता वाटेत जोराचा पाऊस आला. ती ओली चिंब भिजून गेली आणि थंडीने थर थर कांपू लागली. जवळच एक घर पाहून ती ओसरीत उभी राहली. ते एका माळिणीचे घर होते. माळिणीला थंडीमुळे काकडत बसलेल्या कोळिणीला पाहुन तिची दया आली. तिने कोळिणीला घरात बोलवून कोरडे लुगडे बदलायला दिले अन् जेवायला वाढून झोपायला सांगितले. कोळिणीला बरे वाटले. माळिणीने कोळिणीला फुले ठेवली होती त्या खोलीत झोपायला सांगितले. त्याप्रमाणे ती झोपली.

पण खोलीभर फुलांचा वास सुटला होता. तो तिला सहन झाला नाही. तिला उलटी होईलसे वाटले. म्हणून तिला झोप लागेना. म्हणून उठून जाऊन ती मासळीची टोपली घेऊन आली आणि ती उशाशी घेऊन झोपली. तेव्हां मासळीच्या सुवासात तिला गाढ झोप लागली.






# खरा न्याय

एका गावी एक गरीब मनुष्य रहात असे. त्याला कोट्याधीश व्हावे असे फार वाटू लागले. त्याने खूप मेहनत करून पैसे मिळविले. ते सोन्याचे फक्त दोन दीनार. मरते समयी त्याने आपल्या मुलाला बोलाविले व म्हणाला–"मुला, मी आयुष्यभर कोट्याधीश होण्याची स्वप्ने पहात राहलो. पण दोन दीनारांपेक्षा जास्त वांचवू शकलो नाही. तू शिकला सवरला आहेस. दोन दीनारांच्या भांडवलावर व्यापार धंदा करून कोट्याधीश हो. तु कोट्याधीश झालास की स्वर्गात माझ्या आत्म्याला शांति मिळेल."

त्या गरीब माणसाच्या मुलाचे नांव श्रीमान होते. त्याने, बापाच्या मनातली इच्छापूर्ण करून आपले नांव सार्थक करून दाखविण्याचे ठरविले. त्याने त्या दोन दीनारांच्या भांडवलावरच आपल्या गावात व्यापार सुरू केला. काही काळ लोटल्यावर त्याला पुष्कळ पैसे मिळू लागले. परंतु एका ठराविक प्राप्तीनंतर त्याची प्राप्ती वाढतनाशी झाली. म्हणून त्याने राजधानीत जाऊन व्यापार करायला सुरवात केली. तेथे त्याची प्राप्ती वाढू लागली.

एकदा त्या राज्यात दुष्काळ पडला. दूरदूरच्या प्रदेशातून धान्य मागविण्यात येऊ लागले. गरीब लोक सावकाराला मागेल ते व्याज देऊन कर्ज काढू लागले. कित्येकांची घरेदारे गहाण पडली. गरीबांची ती स्थिति पाहून श्रीमानचे हृदय कळवळून आले. त्याने व्यापार करण्याचे सोडले आणि कमी व्याजाने लोकांना कर्ज देऊ लागला. काही गरीब लोकांना तर त्याने बिनव्याजाने कर्ज दिले. ही गोष्ट इतर व्यापाऱ्यांना पसंत पडली नाही. त्यांनी त्याच्याकडून कर्ज घेऊन त्याचा

श्रीयुत र. के. करमाळे












हात रिकामा करण्याचे ठरविले. चांगले श्रीमंत लोक सुद्धा त्याच्याकडे कर्जाउ रकम मागायला येऊ लागले. परंतु श्रीमानने त्यांच्याकडून जास्त व्याज मागितले.

व्यापाऱ्यांनी राजाच्या कानावर खोट्या तक्रारी त्याच्याविरुद्ध करायला सुरवात केली. म्हणाले–"महाराज! काही वर्षांपूर्वी श्रीमान नावाचा एक व्यापारी राजधानीत व्यापार करण्यासाठी आला. व्यापारात त्याने खूप पैसा मिळविला. परंतु तो आतां सावकारी करू लागला आहे. कोणाकडून भरमसाट व्याज तर कोणाकडून कमी व्याज असा गोंधळ त्याने चालविला आहे.

यथोचित दंड देण्याची कृपा करावी."

परंतु राजाने घाई केली नाही. तो एक श्रीमंत माणसाचा वेष करून श्रीमानच्या घरी गेला व एक मोठी रक्कम कर्जाऊ मागितली. श्रीमानने त्याला व्याजाचा जास्त दर लावून कर्ज देण्याचे कबूल केले. पण राजाने कर्ज घेण्याचे नाकारले आणि घरी गेला.

दुसऱ्या दिवशी श्रीमानला दरबारात हजर होण्यासाठी दरबारचा हुकूम आला. तो दरबारात आल्यावर राजाने त्याला विचारले–"तू सावकारीचा धंदा करतो आहेस. सर्वांकडून सारखे व्याज कां घेत नाहीस? कोणाकडून जास्त कोणाकडून कमी हे कसे काय? व्यापारात असा पक्षपात बरोबर नाही. तुझ्याविरुद्ध माझ्याकडे तक्रारी आल्या, परंतु मी तिकडे दुर्लक्ष केले होते. मी स्वतः वेष पालटून तुझ्याकडे आलो होतो व मी कर्जाऊ रक्कम मागितली. तू जास्त व्याज लावून रक्कम द्यायला कबूल झालास. तू काही लोकांना बिनव्याजी रक्कम देतोस हे मी ऐकतो. या आरोपांविरुद्ध तुझे काय उत्तर आहे?"

"महाराज, आपण म्हणालात ते बरोबर आहे. आरोपदेखील खोटा नाही. मी सर्वांकडून एक सारख्या दराने व्याज घेत नाही. पण आपण पक्षपात व अन्याय म्हणालात

जाऊन विचार केला तर मी असे कां करीत आलो हे न्याय आहे की नाही कळेल." श्रीमान म्हणाला.

राजाने श्रीमानची जबानी घेऊन त्याला परत पाठवून दिले आणि बराच वेळ आपल्या मंत्र्यांशी सल्लामसलत करीत बसला. परंतु श्रीमानच्या सावकारीत अन्याय व पक्षपात कसा काय नाही हे कोणाला कळेना. एकाच वस्तूची किंमत निरनिराळ्या गिऱ्हाईकांना निरनिराळी सांगितली तर तो अन्याय नव्हे तर काय?

शेवटी राजा म्हणाला–"श्रीमान आपला व्यापार न्याय म्हणतो आहे. जो कोणी त्याचा व्यापार न्याय आहे हे सिद्ध करून दाखवील त्याला मी तो मागेल ते देईन."

राजाला एकच एक मुलगी होती. श्रीमान दरबारात आला तेव्हां तिने त्याला पाहिले. त्याचे रूप व बोलण्या वागण्याचा राजकन्येच्या मनावर ठसा उमटला. राजकुमारी राजाला म्हणाली–"मला

वाटते, त्याचा व्यापार न्यायपूर्ण आहे. मी ते सिद्ध करून दाखवीन. पण आपण वचन दिल्याप्रमाणे मी मागेन ते दिले पाहिजे."

"मी कोणालाहि देईन म्हटले तर तुला कां देणार नाही, मुली?" राजाने विचारले.

"आपणांकडे श्रीमान विरुद्ध ज्यांनी तक्रार केली ते सर्व गोरगरिबांकडून भरमसाट व्याज वसूल करणारे सावकार आहेत. त्यांनी श्रीमानकडून कमी व्याजाने रक्कम घेऊन गरीबांकडून जास्त व्याज वसूल करण्याचा डाव रचला होता. परंतु श्रीमानने त्यांचा तो डाव हाणून पाडला. हे देखील हुशार व्यापाऱ्याचे कर्तव्यच नव्हे का?" राजकन्या म्हणाली. राजकुमारीचे म्हणणे राजाला पटले.

"मग तू माग, काय वाटेल ते मागून घे." राजा म्हणाला.

"श्रीमान बरोबर माझा विवाह करून द्यावा." राजकुमारी म्हणाली.

राजाने वचन दिल्याप्रमाणे श्रीमानशी राजकन्येचा विवाह करून दिला.



# डोळस ...

एकदा एका आंधळ्याला व एका लंगड्याला बरोबर बरोबर एका गावी जावे लागले. आंधळा लंगड्याला म्हणाला–"तू माझ्या खांद्यावर बस." लंगडा आंधळ्याच्या खांद्यावर बसून वाट दाखवू लागला.

थोडे अंतर चालून गेल्यावर लंगडा म्हणाला–"अहो सूरदास! येथे छान फणसाची बाग आहे हो! छान फणस लागले आहेत."

"फणसाची बाग? पण काय रे बागेच्या चारी बाजूला कुंपण आहे का? पहा जरा." आंधळ्याने विचारले.

लंगडा म्हणाला–"नाही!"

"तिकडे लोक येत जात असलेले दिसत आहेत का?" आंधळ्याने विचारले व लंगडा म्हणाला–"नाही!"

"कोणी राखणदार आहे का?" आंधळ्याने पुन्हां विचारले. या खेपेस देखील लंगडा म्हणाला–"नाही!"

"तरमग हे फणस खाण्यालायक नाहीत." आंधळा म्हणाला. त्याला पाहिल्याशिवाय ते फणस खाण्यालायक नाहीत हे कळले व डोळस लंगड्याला ते कळले नाही. आंधळाच खरा डोळस ठरला.





# न्यायाचे धन

प्राचीन काळी मलयगिरीच्या राज्यात धनपाल नावाचा राजा राज्य करीत असे. त्याचा शक्ति व धन यांवर फार विश्वास होता. राज्याचा खजिना भरलेला असला व सैन्य मोठे असले की राज्यात शांतता नांदत राहील व परकीय शत्रूची वक्रदृष्टी राज्याकडे वळणार नाही, असे राजाला वाटत होते. राजा प्रजेकडून जो कर वसूल करी त्यातली अर्धी रक्कम सैन्यासाठी निराळी काढून ठेवी आणि बाकी खजिन्यात टाकी. तो राजा प्रजेच्या सुखासाठी मुळीच खर्च करीत नसे.

परंतु धनपालचा मंत्री देशाटन अनुभवी होता. त्याने राजाला राज्यकारभार कसा केल्याने प्रजा सुखी होईल हे समजावून सांगितले. प्रजेचे सुख हेच राज्याचे खरे धन मानून राज्य करावे असे त्याने सांगितले.

परंतु मंत्र्याच्या सल्ल्याप्रमाणे राज्य केल्यास खजिना रिकामा होईल व प्रजा डोक्यावर चढेल असा विचार करून त्याने आपल्या मंत्र्याला राज्यातून हाकलून लावले. दुसऱ्या दिवशी राज्यात कोठे दृष्टीस पडल्यास शिरच्छेद केला जाईल, अशी धमकी पण राजाने मंत्र्याला दिली. म्हणून मंत्री त्याच दिवशी राज्य सोडून जंगलात जाऊन राहू लागला. जंगलात चोरांनी त्याला धरले आणि आपला नायक चंडविक्रम याच्याकडे त्याला घेऊन गेले.

आपला कैदी स्वत: राजाचा मंत्री असल्याचे जेव्हां चंडविक्रमला कळले तेव्हां हा मंत्री आपल्याला व आपल्या दोनशेवर अनुयायांना जाळ्यात फसवून पकडून नेण्यासाठी आला असावा असे चंडविक्रमला वाटले. म्हणून त्याचा डाव त्याच्यावरच

श्रीमती सरोजिनी नाईक

# डोळस

एकदा एका आंधळ्याला व एका लंगड्याला बरोबर बरोबर एका गावी जावे लागले. आंधळा लंगड्याला म्हणाला–"तू माझ्या खांद्यावर बस." लंगडा आंधळ्याच्या खांद्यावर बसून वाट दाखवू लागला.

थोडे अंतर चालून गेल्यावर लंगडा म्हणाला–"अहो सूरदास! येथे छान फणसाची बाग आहे हो! छान फणस लागले आहेत."

"फणसाची बाग? पण काय रे बागेच्या चारी बाजूला कुंपण आहे का? पहा जरा." आंधळ्याने विचारले.

लंगडा म्हणाला–"नाही!"

"तिकडे लोक येत जात असलेले दिसत आहेत का?" आंधळ्याने विचारले व लंगडा म्हणाला–"नाही!"

"कोणी राखणदार आहे का?" आंधळ्याने पुन्हां विचारले. या खेपेस देखील लंगडा म्हणाला–"नाही!"

"तरमग हे फणस खाण्यालायक नाहीत." आंधळा म्हणाला. त्याला पाहिल्याशिवाय ते फणस खाण्यालायक नाहीत हे कळले व डोळस लंगड्याला ते कळले नाही. आंधळाच खरा डोळस ठरला.





# न्यायाचे धन

प्राचीन काळी मलयगिरीच्या राज्यात धनपाल नावाचा राजा राज्य करीत असे. त्याचा शक्ति व धन यांवर फार विश्वास होता. राज्याचा खजिना भरलेला असला व सैन्य मोठे असले की राज्यात शांतता नांदत राहील व परकीय शत्रूची वक्रदृष्टी राज्याकडे वळणार नाही, असे राजाला वाटत होते. राजा प्रजेकडून जो कर वसूल करी त्यातली अर्धी रक्कम सैन्यासाठी निराळी काढून ठेवी आणि बाकी खजिन्यात टाकी. तो राजा प्रजेच्या सुखासाठी मुळीच खर्च करीत नसे.

परंतु धनपालचा मंत्री देशाटन अनुभवी होता. त्याने राजाला राज्यकारभार कसा केल्याने प्रजा सुखी होईल हे समजावून सांगितले. प्रजेचे सुख हेच राज्याचे खरे धन मानून राज्य करावे असे त्याने सांगितले.

परंतु मंत्र्याच्या सल्लयाप्रमाणे राज्य केल्यास खजिना रिकामा होईल व प्रजा डोक्यावर चढेल असा विचार करून त्याने आपल्या मंत्र्याला राज्यातून हाकलून लावले. दुसऱ्या दिवशी राज्यात कोठे दृष्टीस पडल्यास शिरच्छेद केला जाईल, अशी धमकी पण राजाने मंत्र्याला दिली. म्हणून मंत्री त्याच दिवशी राज्य सोडून जंगलात जाऊन राहू लागला. जंगलात चोरांनी त्याला धरले आणि आपला नायक चंडविक्रम याच्याकडे त्याला घेऊन गेले.

आपला कैदी स्वतः राजाचा मंत्री असल्याचे जेव्हां चंडविक्रमला कळले तेव्हां हा मंत्री आपल्याला व आपल्या दोनशेंवर अनुयायांना जाळ्यात फसवून पकडून नेण्यासाठी आला असावा असे चंडविक्रमला वाटले. म्हणून त्याचा डाव त्याच्यावरच

श्रीमती सरोजिनी नाईक

उलटवण्याचे ठरवून त्याचा कांटा लवकरात लवकर काढण्याचे त्याने ठरविले.

मंत्री चंडविक्रमला म्हणाला–"मला राजाने आपल्या राज्यातून निघून जायला सांगितले आहे. मी पुन्हां राज्यात पाऊल टाकले तर माझा शिरच्छेद केला जाईल. आता तुम्ही माझा निकाल लावायचा विचार करीत आसाल. पण माझी एक इच्छा आहे. मलय देशाच्या खजिन्यात अपार धन आहे. कमीत कमी ते तुमच्या उपयोगी पडले तर मी आनंदाने मरायला तयार होईन."

ते ऐकून चंडविक्रमच्या मनातली शंका दुणावली. मलय देशाचे सैन्य फार पराक्रमी असल्याचे त्याने ऐकले होते. [illegible] सांपडू. असा विचार करून तो मंत्र्याला म्हणाला–"आम्ही राजाचा खजीना लुटायला तयार आहो. परंतु तो लुटून होईपर्यंत तुम्ही आमच्या बरोबर राहले पाहिजे.

मंत्री त्या गोष्टीस कबूल झाला. तो चोरांच्या सरदाराला म्हणाला–"राजाचे शिपाई पैसेखाऊ आहेत. त्यांच्या अंगात लढण्याची शक्ति मुळीच नाही." नंतर तो कबूल केल्याप्रमाणे मध्य रात्रीच्या सुमारास चोरांच्या टोळीबरोबर खजिन्या-पर्यंत येऊन पोचला. मंत्री म्हणाला त्या-प्रमाणे शिपाई चोरांची वाट पहात असलेले चोरांच्या सरदाराला दिसले नाहीत. चार



[illegible] त्याप्रमाणे त्यांनी पाहरेकऱ्यांना व शेवटी राजाला स्वत: बंदी करून ठेवले. सर्व खजिना लुटून व पोती भरभरून घोड्यांच्या पाठीवर टाकली.

"आतां हे धन घेऊन जा आणि पुढील आयुष्य आरामाने रहा. यापुढे चोरी करण्याचा धंदा सोडा. तुम्ही आपल्या वाटेने जा. मी आपल्या वाटेने जातो." मंत्री चोरांच्या सरदाराला म्हणाला.

त्या वेळी चोरांच्या सरदाराच्या मनांत एक विचार आला. म्हणाला–"मी राजाला कैद केले आहे, यापुढे मीच राजा झालो तर? काय वाटते तुम्हांला?"

"तरमग हे सर्व धन बाहेर कोठे नेण्याची गरजच काय? खजिन्यातच राहू दे." मंत्री म्हणाला.

"ठीक आहे!" असे म्हणत चोरांच्या सरदाराने आपल्या अनुयायांना सांगून घोड्यांच्या पाठीवर टाकलेली पोती पुन्हां खजिन्यात ठेवविली. सर्व चोर खजिन्यात पोती ठेवायला गेल्यावर मंत्र्याने खजिन्याचे दार बंद करून कुलुप लावले. चोरांचा सरदार पोती नीट ठेवविण्यासाठी आत गेला होता. तो देखील कैद झाला.

त्यानंतर मंत्र्याने राजाला व पाहरे-कऱ्यांना सोडविले आणि राजाला म्हणाला–"महाराज! आपला खजिना लुटून नेणे किती सोपे आहे, हे पाहिलेत ना? आपले सैन्य खाऊन पिऊन व झिंगून पडून आहे. पाहरा देणारे देखील बेफिकीर होऊन उभे होते. या खजिन्याचा उपयोग प्रजेच्या हितासाठी जेव्हां होईल तेव्हांच हे धन खजिन्यात ठेवणे न्यायमुक्त ठरेल. नाही तर हे धन खजिन्यात राहिले काय व चोरांनी लुटून नेले काय सारखेच. त्या पासून देशाचे हित ते काय होणार?"

राजाचे डोळे तेव्हां उघडले. त्या दिवसा-पासून राजा मंत्र्याच्या सल्ल्याविरुद्ध काही काम करीतनासा झाला. त्याने आपले धन प्रजेच्या हितासाठीच करण्याचे ठरविले.



## येन केन प्रकारेण

एका गावी सोमू नांवाचा एक गरीब शेतकरी रहात असे. तो स्वभावाने फार दुष्ट होता. तो या न त्या कारणाने लोकांना त्रास देत असे. सोमूला रामू नांवाचा एक मुलगा होता. पण हुशार मुलगा होता.

सोमूच्या घराशेजारी श्यामू नामक एक श्रीमंत मनुष्य रहात असे. तो वारला तेव्हां त्याच्या मुलाने कर्त्तव्य म्हणून पुष्कळ पैसे खर्च करून दान धर्म केला व बापाची कीर्ति अजरामर केली.

सोमूने ती गोष्ट पाहिली आणि आपण मेल्यावर आपली कीर्ति अजरामर व्हावी असे त्याला वाटू लागले. अंत्यसमयी त्याने रामूला जवळ बोलाविले व म्हणाला–"श्यामूच्या मुलाने बापाची कीर्ति कशी अजरामर केली, तू पाहिलीच आहेस. माझे नाव सुद्धां अजरामर राहील असे काही तरी तू कर." असे सांगून सोमूने डोळे मिटले.

गरीबीत बापाची कीर्ति अजरामर होईल असे काय करावे हे रामूला सुचेना. बराच विचार करून त्याने मनाशी काही तरी ठरविले. तो एक काठी घेऊन वाटेने येणाऱ्या जाणाऱ्याना बडवू लागला.

गाववाले म्हणू लागले, "या रामूपेक्षां याचा बापच बरा होता की हो!"





# महाभारत

पांडवांचा वृत्तांत ऐकून धृतराष्ट्र भयभीत झाल्याचे शकुनी मामाने ओळखले आणि ती गोष्ट त्याने कर्णाला जाऊन सांगितली. दोघांनी ती गोष्ट दुर्योधनाला सांगितली. दुर्योधन स्वतःच काळजीत पडला होता.

तेव्हां कर्ण दुर्योधनाची समजूत घालण्याच्या हेतूने म्हणाला–"अरे राजा! पांडव रानावनात अनेक यातना सहन करीत आहेत. तू त्यांचे राज्य बळकावून सर्व ऐश्वर्य उपभोगीत आहेस. म्हणून पांडवांना काळजी वाटायला पाहिजे, तुला नाही. तू आपले सर्व वैभव त्यांच्या नजरेसमोर आणून दिलेस तर त्यांचा सारा दिमाख उतरणार नाही का? म्हणजे तुला व आम्हां सर्वांना आनंद होईल. तुझ्या अंतःपुरांतील राजमहीषींना पाहून द्रौपदीची मान नक्कीच खाली होईल व मनातल्या मनात तिचा जळफळाट होईल."

शकुनी मामांनी कर्ण म्हणाला त्याला जोरदार शब्दात दुजोरा दिला.

दुर्योधन म्हणाला–"तुम्ही म्हणालात ते सर्व बरोबर आहे. पण बाबांची संमती मिळाली पाहिजे ना? ते आपल्याला द्वैतवनात जायला परवानगी देणार नाहीत. तुम्हीच नाही का मला सांगितलेत की पांडवांच्या स्थितीचे वर्णन ऐकून त्यांना फार वाईट वाटले. म्हणून तुम्ही दुःशासनाचा पण या विषयी सल्ला घ्या आणि उद्या सकाळी मला कशा तऱ्हेने बाबांची परवानगी

३३. पांच व शंभर नाहीं, एकशे पांच



मिळवून घेता येईल याची सूचना द्या. भीष्माचार्य आजोबांचा सुद्धा होकार मिळविला पाहिजे. त्या दोघांची समजूत घालण्याचा एखादा उपाय योजून मला सांगा."

दुसऱ्या दिवशी कर्ण शकुनीला व दुःशासनाला बरोबर घेऊन दुर्योधनाकडे आला व म्हणाला–"आपल्या गायी द्वैत वनात चरायला सोडलेल्या आहेत. हिंस्र जनावरांपासून त्या गाईंच्या रक्षणाचा भार तुझ्यावर असल्या कारणाने द्वैतवनात जाऊन येणे आवश्यक आहे असे तू वृद्ध महाराजांना समजावून सांग. महाराज द्वैतवनात जायला नक्कीच परवानगी देतील. आपण पांडवांचा पाणउतारा करून परत येऊं."

सर्वांनी कर्णाने सुचविलेल्या उपायाबद्दल त्याची पाठ थोपटली. नंतर त्यांनी समंग नामक एका गवळ्याला बोलावून सर्व गोष्टी नीट समजावून सांगितल्या आणि म्हणाले–"आम्ही तुझ्याबरोबर महाराजांकडे येतो आणि तू द्वैत वनात महाराजांच्या गाई आहेत असे सांग."

त्या प्रमाणे समंग त्या दुष्ट चतुष्टयाबरोबर धृतराष्ट्राकडे गेला आणि म्हणाला–"महाराज, आपल्या गाई द्वैतवनाकडे गेल्या आहेत. तिकडे चारा पण चांगला आहे. परंतु रानटी श्वापदांपासून गाईंचे रक्षण करणे आवश्यक आहे. आपणांजवळ या गोष्टीचे निवेदन करण्यासाठी आलो होतो."

ते ऐकून कर्ण व शकुनी धृतराष्ट्राला म्हणाले–"महाराज, दुर्योधन द्वैतवनात जाऊन दुष्ट श्वापदांचा संहार करील व गाईंचे सहजी रक्षण होऊ शकेल.

धृतराष्ट्र शांतपणे सर्व ऐकून घेऊन म्हणाला–"गाईंचे रक्षण करणे एक आवश्यक काम आहे. परंतु यावेळी द्वैतवनात जाणे इष्ट नाही. तेथे पांडव रहात आहेत. तुम्ही तिकडे गेलात व विनाकारण त्यांनी तुमची किंवा तुम्ही त्यांची आगळीक काढली तर परिणाम फार वाईट होईल. मला इतर पांडवांची भीती वाटत नाही. परंतु भीम काळा नाग आहे. तो स्वतः आगळीक काढून तुमच्या सर्वांवर सूड उगविल्याशिवाय राहणार नाही. तुम्ही देखील काहीतरी उद्योग करालाच. नुकताच अर्जुन स्वर्गात जाऊन उत्तमोत्तम शस्त्रास्त्रे संपादन करून आला आहे. त्याच्या समोर तुमचा पाडाव लागणार नाही. म्हणून मी सांगतो ते ऐका. द्वैतवनात जाण्याचा विचार सोडा. गाईंच्या रक्षणासाठी आणखी कोणाला तरी पाठवून द्या."

शकुनी धृतराष्ट्राला म्हणाला–"महाराज, पण आम्ही असे काही होऊच देणार नाही. आम्ही पांडव राहतात त्या बाजूला जाणारच नाही. काही दिवस वनविहार करू आणि गाईंच्या खाण्यापिण्याची व्यवस्था कशी काय आहे हे पाहून परत येऊ. पांडव युधिष्ठिराच्या आज्ञेबाहेर नाहीत."

शकुनी म्हणाला ते धृतराष्ट्राला पटले. म्हणून तो म्हणाला–"बरे तर जा. संभाळून रहा." दुर्योधनाला परमानंद झाला. त्याने घोषयात्रेला जाण्याची तयारी सुरू केली. कर्ण, दुःशासन व शकुनी यांच्या सल्ल्याने सहस्रावधी रथ हत्ती, घोडे व सैनिक यांना व अंतःपुरातल्या राण्यांना बरोबर घेऊन आपले ऐश्वर्य पांडवांना दाखविण्यासाठी दुर्योधन निघाला.

द्वैतवनात सर्वांच्या उतरण्यासाठी तंबू व राहुट्या उभारण्यात आल्या. सुरवातीला



गाई गुरांची कशी काय व्यवस्था आहे याची पाहणी झाली. प्रमुख गवळ्यांना आवश्यक सूचना करण्यात आल्या. लोकगीते व लोकनृत्ये यांचे करमणुकीचे कार्यक्रम झाले.

दुर्योधन आपल्या मुलांबाळांसह वनविहाराला निघाला. द्वैतवनाच्या मध्यभागी एक रमणीय सरोवर होते. तेथेच उतरण्याचे ठरवून त्याने तेथे तंबू व राहुट्या उभारण्यास आज्ञा केली.

त्या सरोवराच्या पलीकडेच युधिष्ठिराचा आश्रम होता. दुर्योधनाने तेथे राहण्याचे ठरविले त्यावेळी युधिष्ठिराने ब्राह्मणांच्या सल्ल्याने सद्यस्क नामक यज्ञ सुरू केला होता. तो यज्ञकार्यात मग्न होता.











दुर्योधनाच्या आज्ञेने नोकरांनी या तीरावर राहुट्या व तंबू उभारण्यास सुरवात केली. त्याच वेळी त्या सरोवराच्या रक्षणार्थ नेमलेल्या गंधर्वांनी त्यांना अडविले आणि म्हणाले—"आमच्या प्रभूची अशी आज्ञा आहे की, इतर कोणाला या सरोवराच्या काठावर उतरण्याचा अधिकार नाही."

दुर्योधनाला त्याच्या नोकरांकरवी जेव्हां हे वर्तमान कळले तेव्हां त्याचा पारा एकदम चढला. त्याने नोकरांना सांगून पाठविले की तुम्ही कोणाची फिकीर करू नका. कोणी अटकाव करायला आला तर त्यांची पाठ मऊ करून त्यांना परत पाठवा. त्याप्रमाणे दुर्योधनाचे नोकर गंधर्वांच्या

वनविहारासाठी आले आहेत आणि त्यांच्या आज्ञेने तुम्ही येथून चालते व्हा. नाही तर तुमची खोड मोडण्यात येईल."

गंधर्वांचे नोकर ते ऐकून हंसले. म्हणाले—"तुमच्या महाराजांची आज्ञा! तुम्हीच चालते व्हा प्रथम. आमचे महाराज चित्रसेन गंधर्व यांच्या आज्ञेने आम्ही येथे आलो आहो. तुम्ही ही जागा सोडून युधिष्ठिराचा आश्रम आहे तिकडे जाऊन राहुट्या उभ्या करा. आमच्या महाराजांचा विहार करण्यासाठी हा राखीव प्रदेश आहे."

ते ऐकून दुर्योधन संतापला आणि म्हणाला—"मला येथून निघून जायला सांगणारे हे गंधर्व कोण आहेत रे?" असे म्हणत त्याने गंधर्वांची खोड मोडण्यासाठी आपले सैन्य पाठविले.

चित्रसेन गंधर्वाच्या आज्ञेने गंधर्वांनी दुर्योधनाचे सैन्य येताच त्याला पिटाळून लावले. ते दृश्य दुरून कर्ण व दुर्योधन पहात होते. दुर्योधनाची प्रशंसा मिळविण्याच्या हेतूने कर्ण गंधर्व सैन्यावर तुटून पडला. त्याने कित्येक गंधर्वांना ठार केले. परंतु इतक्यात सहस्रावधि गंधर्वांनी येऊन त्यालाच घेरले. कर्णाला संकटात पडलेला पाहून त्याच्या मदतीला दुर्योधनाचे भाऊ धावले. सुरवातीला जी नुसती चकमक

लागली. शेवटी स्वतः चित्रसेन गंधर्व रणांगणावर येऊन दाखल झाला.

चित्रसेनाने आपली माया टाकली. दुर्योधनाच्या सैनिकांना काय करावे, सुचेना आणि ते पळू लागले. दुर्योधनाच्या भावंडांनी आपले सैन्य परत गोळा करून आणण्याचा अयशस्वी प्रयत्न पण करून पाहिला. एकटा कर्ण शूर शिपायासारखा लढत होता. परंतु गंधर्व सैन्याने त्याच्या रथाचे तुकडे तुकडे करून टाकले. तेव्हां कर्ण विकर्णाच्या रथात बसून पळून गेला. दुर्योधनाला एकटा पाहून गंधर्वांनी त्याच्या मुसक्या बांधल्या. चित्रसेनाने त्याचा वध करणे बरोबर नाही असा विचार करून त्याला फक्त बंदी करून घेतले. नंतर गंधर्वांनी दुर्योधनाच्या इतर भावंडांना व अंतःपुरातील स्त्रियांना बंदी केले.

आपल्या राजाला व राजपरिवाला गंधर्वांनी बंदी केलेले पाहून कौरव सैनिक मदतीसाठी पांडवांच्या आश्रमाकडे धावले आणि हात जोडून युधिष्ठिराला म्हणाले—"हे महात्मन्! कौरव राजाला, त्याचे बंधु व त्यांच्या सर्व पत्नींना बंदी करून गंधर्व त्यांना गंधमादन पर्वताकडे नेत आहेत. त्यांना सोडवून उपकृत करावे."



सैनिकांच्या तोंडी ते वृत्त ऐकून भीम म्हणाला—"जे कांहीं व्हायला पाहिजे होते ते गंधर्वांनी करून दाखविले. आतां मोठे सैन्य उभे करण्याची व युद्ध करण्याची आपल्याला गरज उरली नाही. संकटांत सापडलेल्या भक्तास देव असाच पावतो."

ते ऐकून युधिष्ठिर त्याला थोडा रागाने म्हणाला—"भीमा! काळवेळ पाहून बोलायला शीक थोडा! कौरव आपला आश्रय मागायला आले आहेत त्यांचे रक्षण करणे आपले कर्तव्य आहे. आपल्या भाईबंदांच्या कुटुंबांचा अपमान हा आपला अपमान आहे. मी यज्ञदीक्षा घेतली आहे, युद्धाला स्वतः जाऊ शकणार नाही. म्हणून तू












अर्जुन, नकुल व सहदेव चौघे भाऊ जा आणि आपल्या भावंडांना सोडवून आणा. घाईगर्दीत आततायीपणा दाखवू नका. शक्य झाल्यास गुण्या गोविंदाने गंधर्वांशी बोलून व ते शक्य न झाल्यास युद्ध करून आपल्या बंधूंना सोडवून आणा. एक गोष्ट लक्षात ठेवा, आपले आपसांत भांडण असेल तेव्हां आपण पांच व ते शंभर. पण तिसरा कोणी आला तर आपण एकशे पांच आहो याची जाणीव गंधर्वांना करून द्या."

अर्जुनाने युधिष्ठिराच्या आज्ञेचे पालन करण्याचे वचन दिले. त्यानंतर भीम, नकुल व सहदेव यांना बरोबर घेऊन युद्धास निघाला. अर्जुनाला रथात बसून

करीत निघालेला पाहून कौरवांच्या सैन्यातल्या लोकांना जिवात जीव आल्यासारखे वाटले. पांडव पाठलाग करीत असल्याचे गंधर्वांना कळाले तेव्हां ते थांबले. अर्जुनाने जवळ जाऊन त्यांना समजाऊन सांगितले– "गंधर्व हो, तुम्ही ज्या दुर्योधनाला बंदी करून घेऊन चालला आहां तो आमचा भाऊ आहे, त्याला सोडून द्या. अशी आमचे दादा युधिष्ठिर यांची इच्छा आहे."

"अर्जुना! यांना बंदी करायला आम्हांला स्वत: इंद्राने आज्ञा केली आहे. त्याच्या आज्ञेचे पालन करणे आमचे कर्तव्य आहे." गंधर्व म्हणाला.

"गंधर्व राजाकरवी स्त्रियांना बंदी करणे अनुचित व अन्यायपूर्ण आहे. बऱ्या बोलाने मी सांगतो आहे तसा दुर्योधनाला, त्याच्या भावंडांना व सर्व स्त्रियांना मुक्त करा. तुम्ही तसे केले नाही तर मला तुमच्या बरोबर युद्ध करून त्यांना सोडवावे लागेल." अर्जुनाने स्पष्ट शब्दात सांगितले. पण गंधर्व युद्धाला तयार झाले.

पांडवांचे व गंधर्वांचे युद्ध सुरू झाले. गंधर्वांनी, कौरवांना घेरून जसे बंदी केले तसे पांडवांना पण बंदी करून घेता येईल असे समजून पांडवांना घेरले. परंतु पांडवांसमोर त्यांची डाळ शिजली नाही. अर्जुनाने

गंधर्वांवर बाणांचा वर्षाव करून त्यांना पळो की सळो करून सोडले.

युद्ध चालू असतां चित्रसेनाला अर्जुन आल्याचे कळले. त्याने त्याला स्वतःची ओळख दिली व म्हणाला–"अर्जुना! तू मला नाही का ओळखलेस? अरे, मी चित्रसेन, तुझा मित्र. हा दुष्ट दुर्योधन तुमची व द्रौपदीची मान खाली व्हावी यासाठी आपला दिमाख दाखवायला इकडे आला होता. ही गोष्ट देवेंद्राला कळली होती. म्हणून त्याने या सर्वांना धरून स्वर्गात घेऊन यायला आम्हांला पाठविले होते. म्हणून आम्ही त्यांच्या आज्ञेचे पालन करीत आहों."

ते ऐकून अर्जुन म्हणाला–"हा दुष्ट आहे हे आम्हांला माहीत आहे. तरी आमचा भाऊ आहे. त्याला सोडवून आणण्याची आमचा दादा युधिष्ठिर याची आज्ञा आहे. तू त्यांच्या समोर जाऊन तुला जे काही सांगावयाचे असेल ते सांग. मी तुझा मित्र व शिष्य या नात्याने ही गोष्ट सुचवीत आहे."

पांडवांच्या आश्रमात आला आणि युधिष्ठि-राला त्याने इंद्राच्या आज्ञेची गोष्ट सांगितली. सर्व ऐकून घेऊन युधिष्ठिर म्हणाला–"हे गंधर्वराज! तू दुर्योधनाचा वध केला नाहीस, फक्त त्याला बंदी केलेस. आमच्या वंशावर येणारे एक फार मोठे संकट टळले. तुला भेटण्याचे भाग्य मला या निमित्ते मिळाले, म्हणून मला परमानंद होत आहे. आता माझ्या विनंतीला मान देऊन दुर्योधन आदिकांना मुक्त कर."

चित्रसेनाने युधिष्ठिराच्या विनंतीला मान देऊन दुर्योधनादिकांना मुक्त केले आणि स्वर्गाकडे प्रस्थान केले.

त्यानंतर युधिष्ठिराने दुर्योधनालाजवळ बोलावून समजावून सांगितले. म्हणाला–"दुर्योधना! पुन्हां असे दुस्साहस करू नकोस. तुला त्यामुळे सुख मिळणार नाही. झाले गेले विसरून जा. तू अंतःपुरांतील स्त्रियांना घेऊन हस्तिनापूरला परत जा."





# शिवपुराण

[१०]

पार्वतीच्या विवाहाची हिमवानाने कुंकुम-पत्रिका पाठविली होती. ती वाचून त्याची मित्रमंडळी व नातेवाईकमंडळी सकुटुंब सपरिवार लग्नाला निघाली. ते आपल्या बरोबर सोन्याची फुले, मोती, माणिक्य, पाचू आदि मणि अहेर म्हणून द्यायला घेऊन आले. निरनिराळ्या पर्वतांचे प्रमुख नवरत्न, चंदन अगरू इत्यादि सुगंधी द्रव्ये, हत्ती, घोडे अहेरासाठी घेऊन आले. हिमवानाने सर्व अहेर आनंदाने स्वीकारून त्यांचा सर्व प्रकारे सत्कार केला आणि त्यांच्या आतिथ्याची उत्तम व्यवस्था केली.

अतिथींसाठी व विवाहासाठी दहा योजन विस्तीर्ण मांडव तयार करण्याचे काम हिमवानाने विश्वकर्माला सांगितले. हिमवानाची राजधानी औषधीपुर उत्तम प्रकारची तोरणे व पताकांनी सजविण्यात आली होती.

तिकडे कैलास पर्वतावर शंकराला हिमवानाची शुभ पत्रिका मिळाली. ती वाचून शंकराला फार आनंद झाला. वायुदेवाला पाठवून शंकराने नारदाला बोलवून घेतले. नारदाने बोलावण्याचे कारण विचारले.

"नारदा, पांच दिवसांनी माझा विवाह हिमवानाची मुलगी पार्वतीबरोबर होण्याचे निश्चित झाले आहे. वेळ थोडा आहे. तुला वांछित गमनाची शक्ति प्राप्त आहे. म्हणून त्रिलोकातल्या निवासियांस माझ्या वतीने माझ्या विवाहाचे निमंत्रण देऊन ये. कुबेराला भेटून विवाहास योग्य सर्व वस्त्रालंकार घेऊन यायला सांग." शंकराने नारदाला सांगितले.

शेवटच्या मलपृष्ठावरील चित्र





नारदाने मोठ्या आनंदाने ती कामगिरी स्वीकारली आणि शंकराचा निरोप घेऊन निघाला. ब्रह्मा, विष्णु व इंद्र आदिक देवांना भूलोक व नागलोकांतील लोकांना औपचारिक निमंत्रण देऊन नारद म्हणाला– "माघ शुद्ध एकादशीच्या दिवशी प्रातःकाळ शिवपार्वतीचा विवाह आहे. त्या विवाहास उपस्थित राहून वधुवरास आशीर्वाद द्यावा. त्यानंतर कुबेराला भेटून लग्नासाठी आवश्यक सर्व सामुग्री घेऊन कुबेराबरोबर कैलास पर्वतावर आला.

शिवपार्वतीच्या विवाहास ब्रह्मा, विष्णु व इंद्रादिक देव आणि सप्तर्षी कैलास पर्वतावर येऊ लागले. नंदी व भृंगी अतिथि

अतिथींच्या उतरण्याची व फराळाची उत्तम व्यवस्था ठेवली. शंकराने सर्वांना कुशल-वार्ता विचारून सर्वांचे स्वागत केले.

ब्रह्मदेवाने पौरोहित्य करावे असे ठरले. विष्णु, इंद्र आदिक आणि सप्तर्षी वडील-धारीमंडळी वरपक्षाकडील मानण्यात आली. शंकराचा मंगल अभिषेक करण्यासाठी बृहस्पतीने मुहूर्त धरला. त्या मुहूर्तावर गरुड, गंधर्व, यक्षनारी सप्तमाता, लक्ष्मी, सरस्वती, शची, अरुंधतीसारख्या पतिव्रतांनी शंकराला अभ्यंग स्नान घातले. हरिचंदन लावून शंकराला कंठहार घालण्यात आला. अत्रि, गौतम, भृगु आदिक महर्षींनी विधिवत् लग्नकंकण शंकराच्या उजव्या मनगटात बांधले आणि नवग्रहांची पूजा करविली.

त्यानंतर ब्रह्मदेवाच्या आज्ञेनुसार शंकर नवरदेव होऊन मंगल वाद्य ऐकत व नृत्य पहात औषधीपुरीच्या दिशेने निघाला. कैलास पर्वताच्या रक्षणासाठी रुद्रगणास नेमण्यात आले होते आणि नंदी व शंकराचे गण शंकराबरोबर निघाले होते. वीरभद्र, चंडीश्वर, भैरव आपापल्या वाहनांवर निघाले. शंख, डमरु, घंटा, शिंग, वेणु वीणा व मृदंगाच्या तालावर भद्रकाली व गण नृत्य करीत निघाले.

नवरदेवांना ऐरावतावर बसवून मिर-वणूक निघाली. सरस्वती व ब्रह्मदेव हंसावर, लक्ष्मी व विष्णु गरुडावर आणि शची व इंद्र उडत्या सिंहासनावर बसून निघाले. कुबेर नवनिधी घेऊन शंकराच्या मागे बसला. देवनारी व ऋषीपत्नी आणि अप्सरा चित्रविचित्र बहु मोल वस्त्रे परिधान करून विमानातून निघाल्या.

शंकराच्या विवाहचे वऱ्हाड औषध-पुरीच्या सीमेवर आले तेव्हां हिमवान आपले पुरोहित मुनीवर्य गर्ग, पत्नी मेनका व पुत्र यांच्या सह मंगलवाद्य वाजत असतां सामोरा आला. ब्रह्मदेव, विष्णु, देवेंद्र व ऋषीमुनींस त्याने प्रणाम केला आणि शंकरा-समोर हात जोडून उभा राहून म्हणाला– "तू सर्वेश्वर महादेव आहेस तुला जामाता करवून घेऊन मी कृतार्थ झालो. आतां माझ्या घरी येऊन पार्वतीचा हात आपल्या हातात घेऊन आमच्या सर्व कुटुंबियांस कृतार्थ कर." त्यानंतर हिमवानाने वराला पोशाख देऊन सुगंधी द्रव्ये, फुले व तांबूल देऊन वरपूजा केली. सर्व अतिथींना प्यावयास उत्तमोत्तम पेयें देण्यात आली. त्यांचा श्रम परिहार करण्यासाठी वधूपक्षाकडील लोक पंख्याने वारा करू लागले.

शंकराचे रूप पाहून वधूपक्षाकडील सर्व स्त्रियांनी पार्वतीला असा पती मिळाल्या-



बद्दल ती किती सौभाग्यवती आहे याचे परस्परांशी वर्णन केले. नंतर मेनका हात जोडून शंकराला म्हणाली–"मी इतरांचे बोलणे ऐकून काही काही बोलले. ते विसर तू शंकर आहेस, क्षमा कर." नंतर सौभाग्य-वती स्त्रियांनी शंकराला आशीर्वाद दिला.

शंकराला घेऊन हिमवान व मेनका वाजत गाजत व पुष्पवृष्टि करीत जनवासा होता तेथे आले. ज्यांना ज्यांना अहेर द्यावयाचा होता देऊन सर्वांची उतरण्याची उत्तम व्यवस्था करून दोघे आपल्या घरी परत आली.

पार्वती कुळरीतीप्रमाणे गौरीहाराला बसली. अंबिकेच्या देवळात जाऊन देवीला

नमस्कार केला व देवीचा आशीर्वाद घेतला. सौभाग्यवती स्त्रियांबरोबर ती देवळात जात असतां देव आकाशातून तिचे दर्शन घेऊन मनात म्हणत होते, ही परमेश्वरी आहे. हिचा शंकराशी विवाह झाला तर आपले सर्व कष्ट दूर होतील.

पार्वती अंबिकेची पूजा करून घरी परतली. मुहूर्ताची वेळ जवळ येत होती. शंकराला ऐरावतावर बसवून मंगलवाद्य वाजवीत विवाह मंडपाजवळ आणण्यात आले. हिमवानाने पुढे होऊन शंकराला मांडवात आणले व ब्रह्मदेवाने बोहोल्यावर मांडलेल्या पाटावर बसविले. हिमवान व मेनका दोघांनी जामाताचे चरण धुवून ते पाणी स्वतःवर शिंपडून घेतले आणि नंतर विधिवत कन्यादानाचा कार्यक्रम उरकला. शिवजी व पार्वती परस्परांकडे पाहून आनंदित झाली.

अशाप्रकारे शंकरपार्वतींचा विवाह थाटामाटाने पार पडला. सर्व शंकराचा निरोप घेऊन स्वस्थानी निघून गेले. शंकराने हिमवा- [illegible] [illegible] कडून हिमवान व मेनकेला कळविली.

हिमवान व मेनकेने पार्वतीला निरोप देण्यासाठी सर्व तयारी केली. सुंदर उत्तमोत्तम वस्त्रे, तिचे सिंहासन, दासी, संसाराला लागणारी भांडी वगैरे अहेराचे सामान देऊन पार्वतीला शंकराबरोबर जाण्यास निरोप दिला. निरोप देतांना म्हणाले—"सदाशिवा, आतां पार्वतीच्या सुख-दुःखाचा मालक तूच आहेस." सौभाग्यवती स्त्रियांनी शंकर पार्वतीला प्रेमपूर्वक आशीर्वाद दिला.

सुमुहूर्तावर शंकर पार्वतीसह कैलास-पर्वतावर आला आणि ऋषींच्या आदेशा-प्रमाणे विधिवत गृहप्रवेश झाला. तीन दिवस कैलासपर्वतावर जेवणावळी चालू होत्या. त्यानंतर ब्रह्मा, विष्णु व इंद्रादिक देव आणि सप्तर्षींनी शंकरपार्वतीला आशीर्वाद देऊन त्यांचा निरोप घेतला. शंकराने सर्वांस यथोचित वस्त्रे आदि देऊन निरोप दिला.



# १२०. 'स्पंज' याची शिकार

"स्पंज' हा एक पाणी ओढून घेणारा समुद्रात राहणारा प्राणी आहे. परंतु त्याला पाहून तो प्राणी असेलसे कोणाला वाटत नाही. त्याला डोके नसते व त्याच्या अंगात रक्त प्रवाहपण नसतो. परंतु तो वाढतो व त्याला पिले होतात. तो खातो. तो जिवंत असतो तोंपर्यंत त्याच्यावर एक एक पातळ कात असते. त्याचा आतील भाग मऊ रेषांचा गुंता असतो.

'स्पंज' अनेक प्रकारचे असतात. काही फार मूल्यवान असतात. ते समुद्राच्या तळातून मोत्यासारखे बाहेर काढावे लागतात. येथे काटेरी फावड्याने त्याला काढण्याचे चित्र दिले आहे. याला काढण्याचे काम करणारांना हवेचा पुरवठा करणारी नळी आणि त्याला बाहेर काढण्यासाठी जो दोर असतो तोदेखील चित्रात दिसेल.





# अमरवाणी

संपूर्ण कुंभो न करोति शब्दम्; अर्द्धो घटो घोषमुपैतिरनम्;
विद्वान कुलीनो न करोति गर्वम्; गुणैर्विहीना बहु जल्पयंति ॥ १ ॥

[भरलेले मडके असेल तर त्याचा आवाज होत नाही. अर्धवट भरलेल्या मडक्यातूनच आवाज येतो. तसाच कुलीन व विद्वान जो असतो गर्व करीत नाही. ज्याच्या अंगात काही गुण नसतात तोच जास्त बडबड करतो.]

श्रुति विभिन्ना; स्मृतयश्च भिन्ना; नैको मुनिर्यस्य वचो प्रमाणम;
धर्मस्य तत्वं निहितं गुहायाम्; महाजनो येन गत : स पंथा.......॥ २ ॥

[श्रुती म्हणजे वेद. वेदावेदात अंतर आहे आणि स्मृतीस्मृतीत अंतर आहे. कोणत्याहि मुनीचे वचन प्रमाण किंवा अकाट्य असे नाही. म्हणून धर्माचे तत्व गूढ आहे. यास्तव थोर पुरुष ज्या मार्गाने गेले तो अवलंबिणे श्रेयस्कर होय!

न वेत्ति यो यस्य गुणप्रकर्षम्
सतं सदा निंदति; नात्र चित्रम्!
यथा किराती करिकुंभजाताम्
मुक्तां परित्यज्य बिभर्ति गुंजाम......... ॥ ३ ॥

[गुणवान माणसाचे गुण ओळखण्याची शक्ति ज्याच्या अंगात नसते तो त्याची निंदा करतो; त्यात आश्चर्य काय? किरातिणीला हत्तीच्या कुंभस्थलातील मोत्यांची कल्पना नसते, म्हणून ती ते सोडून गुंजाची माळाच गळ्यात घालून मिरविते.]

गुणाची ओळख



# लबाडी

एक दिवशी एक शेतकरी आपले शेत नांगरीत होता. तेव्हां त्याला मातीत अचानक एक हिरा दिसला. त्याच्या लकाकी वरून ती एखादी मूल्यवान वस्तु असेलसे त्याला वाटले. म्हणून एका मोठ्या शहरात जाऊन त्याने तो एका जव्हेऱ्याला दाखविला.

जव्हेऱ्याने हिरा पाहिला आणि तो खरा आहे, हे ओळखून म्हणाला–"अहो, हा हिरा किमती आहे. विकणार आहां का? मी हा एक हजार रुपयांना विकत घ्यायला तयार आहे." शेतकऱ्याला आश्चर्य वाटले, एवढ्याशा खड्याची किंमत इतकी जास्त मिळणार आहे, त्याचा त्या गोष्टीवर विश्वासच बसेना. शेतकरी तो हिरा विकायला तयार झाला. म्हणून जव्हेऱ्याने हजार रुपये देऊन तो हिरा विकत घेतला. जव्हेऱ्याच्या प्रामाणिकपणाचे कौतुक करीत शेतकरी आपल्या गावी निघाला.

शेतकरी गावाबाहेर थोडेच अंतर चालून गेला असेल, समोरून दोन बुरखेवाले चोर आले आणि त्यांनी शेतकऱ्याला मारहाण करून त्याच्या जवळचे एक हजार रुपये लुबाडले आणि पळून गेले. शेतकरी रडत पुन्हां त्या शहरात परत आला आणि न्याया-धिशाकडे जाऊन घडलेला प्रकार सांगितला.

न्यायाधिशाला जव्हेरी इतका इनामदार कसा निघाला हे कळेना. कारण चांगला हिरादेखील जव्हेऱ्याकडे एवढ्या किमतीला कोणी विकत घेणे शक्य नव्हते. त्यात गांवढळ, त्याला हिऱ्याची किंमत काय कळणार? अशा माणसाला बुडविल्याखेरीज जव्हेरी रहात नाहीत. जव्हेरी किती इमानदार असला तरी अशा हिऱ्याची किंमत फार तर अर्धी देईल. परंतु या व्यापाऱ्याने पुरी किंमत दिली होती. म्हणून आश्चर्य करण्यासारखीच गोष्ट होती.

श्री. दिनकर देवरुखे

आहेस हे सांगतां कामा नये. मांडवांत तू कधी पाऊल टाकता कामा नये आणि पंक्तीत बसून जेवता कामा नये."

कमलाने शारदाला मजुरी करायला बोलाविले होते. लग्नसोहळा पाहण्यासाठी बोलाविले नव्हते. शारदाने भांडी घासली, उष्टी काढली, केरवारे केले सर्व कामे केली. पाहुणेमंडळींना ती कोणी मोलकरीण असावी असेच वाटे. सर्वांचे जेवणखाण झाल्यावर जे उरलेसुरले असे ते घेऊन एका बाजूला बसून खाऊन घेई.

लग्न सोहळा संपला. पाहुणे मंडळी आपापल्या गावी गेली. शारदाने उरलेले शिळे अन्न व पक्वान्ने एका टोपलीत भरले आणि आपल्या गावी निघाली.

कमलाने बहिणीच्या डोक्यावर टोपली पाहून विचारले–"टोपले भरून काय घेऊन चालली आहेस ग ?"

"काही नाही ग, उरलेले शिळे अन्न आहे. मुले घरी वाट पहात असतील की मावशीच्या घरून आई येईल तेव्हां काही घेऊन येईल." शारदा म्हणाली. ते बोलतांना तिला जी लाज वाटली असेल ती तिची तिलाच ठाऊक.

परंतु कमला तरातरा पुढे आली व बहिणीच्या डोक्यावरची टोपली ओढीत म्हणाली–"भिकारीण, ती भिकारीणच ! शिळे उरले ते असे वांटायला आहे वाटते? गुरे नाहीत वाटते, आमच्याकडे खायला ?"



शारदा कमलाच्या मनाची तुच्छता ओळखून तिच्याशी एक शब्द देखील बोल-ल्याशिवाय टोपली ठेवून निघून गेली. तिला असे जिणे नको वाटले.

घरी जात असता तिचा पाय एका मऊ वस्तूवर पडला. तिने खाली वांकून पाहिले तर तो मेलेला साप होता. तिने विचार केला देवानेच तिचे गाऱ्हाणे ऐकून मुक्तीचा मार्ग दाखविला आहे. तिने सापाचे तोंड व शेपटी तोडून टाकली आणि बाकी अंगाचे तुकडे करून टोपलीत ठेवून घरी गेली.

घरी गेल्यावर ती मुलांना म्हणाली– "तुमच्या मावशीने मासे दिले आहेत. मी ते शिजवून घालते तुम्हांला." नंतर तिने ते सापाचे तुकडे एका भांडयात ठेवून त्यात पुष्कळसे पाणी घातले आणि चुलीवर ते शिजायला ठेवून नवऱ्याला म्हणाली–"मी शेजारून थोडे तिखट व मसाला घेऊन येते. तुम्ही चमच्याने मधूनमधून हलवीत रहा." असे सांगून ती निघून गेली.

शारदाचा नवरा बायकोने सांगितल्या-प्रमाणे चमच्याने भांडयातले तुकडे हलवीत राहला. परंतु थोडया वेळाने भांडयात खडे असल्यासारखा आवाज होऊ लागला आणि चमच्यालापण एक निराळाच भास झाला.

तो चकित होऊन शेजारून बायकोला बोलावून घेऊन आला. परत आल्यावर



शारदाने दिवा जवळ नेऊन पाहिला, भांडयात सोन्याच्या तुकडयांसारखे कांही तरी लकाकत होते. ते पाहून नवरा बायको चकित झाले.

तेव्हां शारदाने नवऱ्याला घडलेला सर्व प्रकार सांगितला आणि देवाचे आभार मानीत म्हणाली–"देवाने हे किती उपकार केले !"

दोघांनी भांडयातून एकच तुकडा काढून तो जव्हेऱ्याला नेऊन दाखविला. जव्हेऱ्याने खरे सोने असल्याचे पाहून त्यांना योग्य किंमत दिली. त्यावर घरात लागणारी भांडीकुंडी, कपडेलत्ते वगैरे सामान घेऊन महिन्या दोन महिन्याला पुरेल एवढे धान्य

आहेस हे सांगतां कामा नये. मांडवांत तू कधी पाऊल टाकता कामा नये आणि पंक्तीत बसून जेवता कामा नये."

कमलाने शारदाला मजुरी करायला बोलाविले होते. लग्नसोहळा पाहण्यासाठी बोलाविले नव्हते. शारदाने भांडी घासली, उष्टी काढली, केरवारे केले सर्व कामे केली. पाहुणेमंडळींना ती कोणी मोलकरीण असावी असेच वाटे. सर्वांचे जेवणखाण झाल्यावर जे उरलेसुरले असे ते घेऊन एका बाजूला बसून खाऊन घेई.

लग्न सोहळा संपला. पाहुणे मंडळी आपापल्या गावी गेली. शारदाने उरलेले शिळे अन्न व पक्वान्ने एका टोपलीत भरले आणि आपल्या गावी निघाली.

कमलाने बहिणीच्या डोक्यावर टोपली पाहून विचारले–"टोपले भरून काय घेऊन चालली आहेस ग?"

"काही नाही ग, उरलेले शिळे अन्न आहे. मुले घरी वाट पहात असतील की मावशीच्या घरून आई येईल तेव्हां काही घेऊन येईल." शारदा म्हणाली. ते बोलतांना तिला जी लाज वाटली असेल ती तिची तिलाच ठाऊक.

परंतु कमला तरातरा पुढे आली व बहिणीच्या डोक्यावरची टोपली ओढीत म्हणाली–"भिकारीण, ती भिकारीणच! शिळे उरले ते असे वांटायला आहे वाटते? गुरे नाहीत वाटते, आमच्याकडे खायला?"



शारदा कमलाच्या मनाची तुच्छता ओळखून तिच्याशी एक शब्द देखील बोलल्याशिवाय टोपली ठेवून निघून गेली. तिला असे जिणे नको वाटले.

घरी जात असता तिचा पाय एका मऊ वस्तुवर पडला. तिने खाली वांकून पाहिले तर तो मेलेला साप होता. तिने विचार केला देवानेच तिचे गाऱ्हाणे ऐकून मुक्तीचा मार्ग दाखविला आहे. तिने सापाचे तोंड व शेपटी तोडून टाकली आणि बाकी अंगाचे तुकडे करून टोपलीत ठेवून घरी गेली.

घरी गेल्यावर ती मुलांना म्हणाली–"तुमच्या मावशीने मासे दिले आहेत. मी ते शिजवून घालते तुम्हांला." नंतर तिने ते सापाचे तुकडे एका भांड्यात ठेवून त्यात पुष्कळसे पाणी घातले आणि चुलीवर ते शिजायला ठेवून नवऱ्याला म्हणाली–"मी शेजारून थोडे तिखट व मसाला घेऊन येते. तुम्ही चमच्याने मधूनमधून हलवीत रहा." असे सांगून ती निघून गेली.

शारदाचा नवरा बायकोने सांगितल्याप्रमाणे चमच्याने भांड्यातले तुकडे हलवीत राहला. परंतु थोड्या वेळाने भांड्यात खडे असल्यासारखा आवाज होऊ लागला आणि चमच्यालापण एक निराळाच भास झाला.

तो चकित होऊन शेजारून बायकोला बोलावून घेऊन आला. परत आल्यावर



शारदाने दिवा जवळ नेऊन पाहिला, भांड्यात सोन्याच्या तुकड्यांसारखे कांही तरी लकाकत होते. ते पाहून नवरा बायको चकित झाले.

तेव्हां शारदाने नवऱ्याला घडलेला सर्व प्रकार सांगितला आणि देवाचे आभार मानीत म्हणाली–"देवाने हे किती उपकार केले!"

दोघांनी भांड्यातून एकच तुकडा काढून तो जव्हेऱ्याला नेऊन दाखविला. जव्हेऱ्याने खरे सोने असल्याचे पाहून त्यांना योग्य किंमत दिली. त्यावर घरात लागणारी भांडीकुंडी, कपडेलत्ते वगैरे सामान घेऊन महिन्या दोन महिन्याला पुरेल एवढे धान्य

व इतर पदार्थ दोघां नवरा बायकोने विकत घेतले.

त्या दिवशी आयुष्यभरात प्रथम सर्व मुलांना पोटभर खायला आणि अंगात घालायला कपडे मिळाले. मुले आनंदाने झोपली.

त्या गरीब कुटुंबाची स्थिति एकदम सुधारलेली पाहून गावकरी आश्चर्य करू लागले.

काही लोक म्हणाले–"नुकतेच शारदाच्या भाचीचे लग्न झाले नाही का? बहिणीने दिले असतील कपडे आणि पैसे! आहे ती चांगली श्रीमंत!"

परंतु कमलाने ते सर्व ऐकले तेव्हां तिला आनंद व्हायच्या ऐवजी दुःख झाले. तिला हेवा वाटू लागला, कोणत्या गोष्टीचा तिलाच कळेना. ती शारदाच्या गावी आली आणि गावप्रमुखाला म्हणाली–"माझी बहीण लग्नाला आली होती तेव्हां काय काय उचलून घेऊन आली, कोणास ठाऊक? तुम्ही चवकशी करून पहा."

गावप्रमुखाने शारदाला बोलावून विचारले. गंमत पहायला गावकरी स्त्री-पुरुष जमले.

गावप्रमुख कमलाला म्हणाला–"बाई! हे तुमचे भांडे असेल तर देवाची शपथ घेऊन सांगा आणि हे भांडे उचलून घेऊन जा."

कमलाने भांड्याला हात लावताच एक साप फडा वर करून कमलाला चांवायला फुसकारू लागला.

"अगोबाई, मेल्ये!" असे ओरडत कमलाने ते मडके तसेच जमिनीवर टाकले आणि दूर पळाली. मडके फुटले व त्यातून सोन्याचे तुकडे जमिनीवर पसरले. साप कोठे दिसला नाही.

ते पाहून सर्व कमलाला नावे ठेवू लागले. गावप्रमुखाने ते सोन्याचे तुकडे घेऊन जायला शारदाला सांगितले. ती ते तुकडे घेऊन घरी निघून गेली.

कमलाला तिच्या दुष्ट प्रवृत्तीचे चांगले फळ मिळाले.





# शिलारथ

[ १५ ]

[ खड्गवर्मा व जीवदत्त दोघे राजा नित्यानंद याच्याशी बोलत असतां पुजारी त्या राक्षसी हत्तीवर बसून आला आणि खड्गवर्मा व जीवदत्त दोघे हत्तीजवळ पोचताच हत्तीने दोघांना आपल्या सोंडेत कवटाळले. संधी पाहून पुजाऱ्याच्या जंगली अनुयायांनी त्यांना कैद केले. राजाने आपल्या अनुयायांना त्या जंगली लोकांना पळवून लावायला आज्ञा केली. पुढे–]

जंगली लोक भाले, बरछी व तलवारी घेऊन पुजाऱ्याचा जयघोष करीत राजा नित्यानंद रथात होता त्या बाजूला धावले. त्यांना पाहून राजाचे शिपाई पळून गेले. सारथी रथ पळून न्यायला तयारच होता. त्याने राजाच्या आज्ञेची प्रतीक्षा न करता घोड्यांना पळायला खुणावले व घोडे भरधाव पळू लागले. राजा चकित होऊन आपल्या सारथ्याला म्हणाला–

"सारथी! आपण पळपुट्यासारखे युद्धभूमीवरून पळून चाललो आहे. हे पाहून विघ्नेश्वर पुजाऱ्याची हिंमत जास्तच वाढेल. तो राजधानीवर स्वारी करायला मागेपुढे पाहणार नाही. म्हणून आपण तावडतोब काही तरी उपाय योजला पाहिजे."

सारथी क्षणभर काहीच बोलला नाही. पण नंतर म्हणाला–"महाराज, आपण भितरे आहों, हे काय पुजाऱ्याला कळले




नाही, म्हणता? आपण पळून आलो नसतो तर तेथे राहून तरी आपण काय करू शकलो असतो? आपण त्यांच्या हाती ठार झालो नसतो तर कैद तर नक्कीच झालो असतो. ते दोघे क्षत्रिय वीर आपल्या रक्षणासाठी आले व स्वत: संकटात सापडले."

"अरे रे, ते दोघे आपला जीव धोक्यात घालून आम्हांला वांचवायला आले होते. ते बिचारे त्या हत्तीच्या सोंडेत सापडले नसते तर नक्कीच आपल्याला त्यांची मदत झाली असती. तो पुजारी त्यांना ठार केल्याशिवाय राहणार नाही." असे म्हणून नित्यानंदने मागे वळून पाहिले.

त्या वेळी पुजाऱ्याचे अनुयायी हत्तीच्या पाठीवर दोघांच्या मुसक्या बांधून त्यांच्या तोंडावर काळे कापड गुंडाळीत होते.

राजा रथात उभा राहून आपल्याकडे पाहतो आहे हे दिसताच पुजाऱ्याला राग आला. "आज याला ठार तरी करीन नाहीतर कैद करून घेऊन येऊन सर्वांसमक्ष त्याचा शिरच्छेद करीन," असे दांतओठ चावून पुजारी स्वत:शी पुटपुटला. मी आनंदपूरच्या सिंहासनावर बसेन, आजच्या आज, असे मनातल्या मनात म्हणत तो आपल्या अनुयायांना म्हणाला—"या दोघां तरुणांनी घात केला नसता तर आज राजाला नक्कीच कैद केले असते. तरी थोडे धोरणाने वागायचे मी ठरविले आहे. या दोघांना ठार करावयाचे नाही. त्यांना आपल्याकडे वळवून घेऊ या. पहा तर, दोघे जिवंत आहेत का? बेशुद्ध असतील ते! जवळ जाऊन पहा."

पुजाऱ्याने तसे म्हटल्याबरोबर एक तरुण जंगली मनुष्य हत्तीवर चढला. त्याला औषधपाण्याची थोडीफार माहिती होती. त्याने जीवदत्त व खड्गवर्माच्या नाकांजवळ हात ठेवून श्वासोच्छ्वास चालू आहे की नाही, पाहले. नंतर नाडी पाहिली. नाडी चालू होती. तो जंगली तरुण ओरडून म्हणाला—"पुजारीधनी! दोघे जिवंत आहेत. नाडी चालू आहे. जबर [illegible] सहन न झाल्यामुळे बेशुद्ध झाले आहेत. थोड्या वेळाने शुद्धीवर येतील."

ते ऐकून पुजारी म्हणाला—"तरमग लवकर चला आपल्या गुहेकडे. त्यांच्या औषधपाण्याची व खाण्यापिण्याची काही तरी व्यवस्था करू या. हे वांचले व यांची मदत मिळाली तर आनंदपूरच काय, जवळ-पासची लहान मोठी राज्ये सहज जिंकता येतील! आपल्या या ऐरावत हत्तीचे गुपित आज नाही तर उद्या बाहेर पडल्याशिवाय राहणार नाही. म्हणून त्या पूर्वी या दोघांना आपल्याकडे वळवून घेतले पाहिजे. त्यांच्या मदतीने आज नाहीतर आणखी काही दिवसांनी नक्कीच आनंदपूर राज्य आपल्या कब्ज्यात येईल.

खड्गवर्मा व जीवदत्त पूर्णपणे बेशुद्ध नव्हते. त्यांना दोरखंडांनी आवळून बांधून ठेवल्यामुळे त्यांना थोडा त्रास होत होता. त्याशिवाय त्यांच्या तोंडावर काळे कापड बांधलेले होते. म्हणून त्यांना श्वासोच्छ्वास घ्यायला देखील त्रास होत होता. तरी विघ्नेश्वर पुजारी आपल्या अनुयायांशी जे काही बोलत होता, ते सर्व ऐकू येत होते आणि त्याचे बेत कळावे या हेतूने दोघे बेशुद्ध असल्याचे सोंग करून स्वस्थ पडून होते.



सुमारे अर्धातास त्या खडकाळ जागेतून चालत गेल्यावर पुजाऱ्याचा तो हत्ती एका जागी थांबला. पुजारी हत्तीवरून उतरून खाली आला व आपल्या जंगली अनुयायांना म्हणाला—"या दोघांना काही इजा झाल्या-शिवाय खाली उतरवून ईशान्येकडच्या कोठडीत नेऊन टाका. तेथे पोचल्यावर त्यांना बांधलेले दोरखंड सोडून त्यांना मोकळे करा. त्यांना खायला प्यायला चार पांच दिवस पुरेल एवढे गुहेत ठेवून द्या. या अवधीत आपल्याला एक महत्वाचे काम करावयाचे आहे."

मालकाच्या आज्ञेप्रमाणे रानटी तरुणांनी दोघांना हत्तीच्या पाठीवरून उतरवून



गुहेच्या एका खोलीत नेऊन ठेवले. त्यांना बांधलेले दोरखंड सोडून त्यांना मुक्त केले आणि चारपांच दिवस पुरेल एवढे अन्न पाणी त्या खोलीत ठेवून देऊन बाहेर निघून गेले. परंतु दोघांच्या तोंडावर बांधलेले काळे कापड मात्र सोडले नाही. तोपर्यंत दोघे बेशुद्धावस्थेत असल्यासारखे पडून राहले.

पुजाऱ्याचे रानटी अनुयायी बाहेर गेल्यावर दोघांनी त्यांच्या तोंडावर बांधून ठेवलेली काळी फडकी सोडून टाकली.

खोलीत उजेड नव्हता. कोठे खिडकी किंवा दरवाजादेखील दिसत नव्हता. परंतु कोठून तरी वाऱ्याची झुळुक मधून मधून येत होती. जीवदत्तने एकदा खोलीत चहूंकडे पाहिले आणि त्यांच्या सर्व शस्त्रांकडे व तलवारींकडे कौतुकाने पहात असलेल्या खड्गवर्माला म्हणाला–"खड्गवर्मा! तुला त्यात आश्चर्य ते काय वाटले रे? पुजाऱ्याने आपली शस्त्रास्त्रे काढून घेतली नाहीत! कारण आहे का माहीत? त्याला आपल्याशी मैत्री वाढवायची आहे आणि तो आपल्याला त्याचे अनुयायी करून घेणार आहे. आपल्या मदतीने त्याला त्याचा तो उद्देश पार पाडायचा आहे."

खड्गवर्माचा पारा अद्याप उतरलेला नव्हता. तो रागाच्या भरात म्हणाला–"त्या दुष्टाचा काय वाटेल तो उद्देश असू दे. तो माझ्यासमोर आला की मी एका क्षणात त्याचा शिरच्छेद केल्याशिवाय राहणार नाही. आपण आपल्या वाटेने विन्ध्य पर्वताकडे जात होतो आणि याने विनाकारण वाटेत आपल्याला अडवून ठेवले आहे."

"अरे! मोठ्याने ओरडू नकोस! कदाचित काळोखाला डोळे आणि भिंतीला कान नसतील कशावरून? पहिल्याने ही खोली किती मोठी आहे, मला पाहू दे. कदाचित कोठेतरी खिडकी किंवा दरवाजा असेल." असे म्हणत जीवदत्त भिंतीला धरून कोठे काही दार किंवा खिडकी आहे को पाहू लागला. त्याला कोठेच दार किंवा एखादी फट हाताला लागली नाही. परंतु दगडांच्या मधून ज्या भेगा होत्या त्यांतून वारा आत येत होता हे त्याला कळले. त्यावरून दगडावर दगड रचून गुहेच्या या बाजूची खोली तयार केली असल्याचे लक्षात आले.

जीवदत्त खड्गवर्माला ते सांगून म्हणाला–"खड्गवर्मा, तुतं पुजारी आपल्याला त्रास देईलसे वाटत नाही. त्याच्यापासून आपल्या जिवाला धोका नाही. आपल्याला हत्तीवरून ते लोक घेऊन आले त्यावेळी पुजारी आपल्या अनुयायांना जे म्हणाला ते ऐकून मी तर आश्चर्य चकितच झालो!"

"पुजारी कित्येक गोष्टी बोलला. त्यात कोणती गोष्ट तुला चकित करून सोडणारी वाटली?" खड्गवर्माने विचारले.

"तो म्हणाला होता की, ऐरावत जातीच्या हत्तीची गोष्ट फार दिवस गुप्त राहणार नाही, ही पहिली गोष्ट आणि दुसरी गोष्ट म्हणजे तो दुष्ट काही तरी साहसाचे काम दोनतीन दिवसात करण्याच्या विचारात आहे."

"त्यात आश्चर्य करण्यासारखे काय आहे? तो ऐरावत जातीचा हत्ती असू शकेलही. नाहीतर तो हत्तीच नसेल आणि त्याचे ते साहसाचे काम म्हणजे आनंदपुर



राज्यावर आपला अधिकार करण्याची योजना तो करीत असावा." खड्गवर्मा म्हणाला.

"खड्गवर्मा! अगदी बरोबर, त्याच गोष्टी असतील असे मला देखील वाटते आहे. आज आपण येथेच आराम करू या आणि उद्या सूर्योदय होताच येथून पाय काढू या. जाता जातां त्या पुजाऱ्याला पण वाटेला लावू या." जीवदत्त म्हणाला.

"ठीक! पुजाऱ्याने आपल्या जेवण खाण्याची व्यवस्था चारपांच दिवसांसाठी करून ठेवली आहे. या अवधीत आपण येथून पळून जाण्याचा उपाय केला पाहिजे. किती शहाणा आहे तो पुजारी नाही?



आपल्याला छान संधी देऊन गेला आहे." असे म्हणत खड्गवर्मा जोराने हसला.

संध्याकाळ झाली. खोलीत खूप काळोख झाला. दोघांनी मिळून खाऊन पिऊन घेतले आणि झोपण्याची तयारी करू लागले.

उजाडतांच त्याना खोली बाहेर कसली तरी गडबड चालू असल्याचे कळले. शेकडो जंगली तरुण जमा झाले होते आणि मोठमोठयाने काहीतरी बोलत होते. दोघांनी ते काय बोलत आहेत हे कानोसा घेऊन ऐकण्याचा प्रयत्न केला. परंतु त्यांना काहीच कळले नाही.

"जीवदत्त! मला वाटते, तो दुष्ट या जंगली लोकांना बरोबर घेऊन जाऊन कोणत्यातरी स्वारीवर निघत असावा." खड्गवर्मा म्हणाला.

"स्वारी आणखी कोठे करणार? राजा नित्यानंदांची गादी बळकावण्यासाठी आनंदपूरकडे हे लोक जाण्याच्या तयारीत असतील." जीवदत्त म्हणाला.

"म्हणजे आपण येथे तोंपर्यंत या कैदखान्यात खितपत पडून रहायचे की काय?" खड्गवर्माने विचारले.

"आपण का पडून राहणार? तो दुष्ट येथून निघून गेला की आपण या खोलीतून निघून जाऊ. त्यानंतर पुढे काय करावयाचे याचा विचार करू." जीवदत्तने सुचविले.

"या अंधारकोठडीतून आपण बाहेर जाणे इतके सोपे का आहे?" खड्गवर्माने चकित होऊन विचारले.

"कां नाही? तू पहा तर!" असे म्हणत जीवदत्त भिंतीजवळ गेला. दगडांच्या फटीतून त्याने बाहेर पाहिले. त्याला पांच सहा फुटावर तशीच आणखी एक दुसरी भिंत दिसली.

"अरे, पाहिलेस का? येथे दगडावर दगड रचून भिंती आणि भिंतींच्या बाजूला भिंती, अशीच बांधलेली ही गुहा दिसते आहे. बाहेर जंगली लोकांची गडबड थोडी थांबू दे, मग ठरवू काय करायचे ते." जीवदत्त म्हणाला.

एक तासाभरानंतर बाहेर सर्व सामसूम झाले. जीवदत्तला वाटले, कदाचित थोडया वेळाने पुन्हां कोणीतरी येईल किंवा गडबड होईल. परंतु बराच वेळ बाहेर कोणी बोललेले ऐकू आले नाही, तेव्हां खड्गवर्माकडे वळून तो म्हणाला—"या खोली बाहेर जाण्यासाठी वाट शोधण्याची आपल्याला गरजच काय? काल या खोलीत ज्या वाटेने आपण आलो त्याच वाटेने आपण बाहेर जाऊ. बाहेर पाहरा देणारे जे लोक आहेत तेच आपल्याला ती वाट दाखवितील. आवश्यक वाटल्यास, आत पाहरेकरी येतील तेव्हां तू त्यांना ठार कर. मी तुला खूण केली तरच, घाई करू नकोस."

त्यानंतर जीवदत्त खोलीत भिंतीजवळून फिरत मोठमोठयाने ओरडून हाका मारू लागला—"पुजारी, ए विघ्नेश्वर पुजारी!" खड्गवर्मापण तसाच मोठयाने ओरडून हाका मारू लागला. दोघांच्या आवाजाने ती गुफा दुमदुमू लागली.

एक दोन मिनिटात खोलीच्या भिंतीतून एका कोपऱ्याला एक चौकोनी दगड सरकू लागला. दगड बाजूला सरकल्यावर एक रानटी पाहरेकरी आत डोकावून दरडावीत म्हणाला—"कां ओरडतां आहां?"

जीवदत्त चकित झाल्यासारखे दाखवून काही वेळ त्या पाहरेकऱ्याकडे पहात उभा



राहला, आणि एकदम उडी मारुन त्याने त्या पाहरेकऱ्याची मानगुटी धरुन त्याला आत ओढले. म्हणाला—"तू आरडाओरडा केलास तर गळा दाबून टाकीन. तुला आपल्या जिवाची फिकीर असेल तर मी विचारतो त्या प्रश्नांची उत्तरे मुकाटयाने दे." असे सांगून जीवदत्तने त्या पाहरेकऱ्याला खोलीच्या भिंतीला टेकून बसविले.

तो रानटी मनुष्य भीतीने थरथर कांपत होता. जीवदत्त त्याला धीर देण्यासाठी त्याच्या पाठीवर हात फिरवून म्हणाला—"या खोलीवर पाहरा द्यायला आणखी किती लोक आहेत?"

"माझ्याशिवाय आणखी एकजण आहे. बाकी, सर्व लोक पुजारी धन्यावरोबर आनंदपूरच्या मोहिमेवर गेले आहेत." तो रानटी तरुण म्हणाला.

"तरमग तू त्या दुसऱ्याला या भोकातून हाक मारून आत बोलाव. तू त्याला सावध करण्याचा प्रयत्न केलास तर तुझ्या पाठीतून सुरा आरपार जाईल. माझा मित्र उभा आहे सुरा घेऊन." जीवदत्तने धमकावले.

त्याप्रमाणे त्या पाहरेकऱ्याने भितीतल्या भोकाजवळ जाऊन दुसऱ्याला पण आत बोलाविले. त्या वेळी खड्गवर्मा आपला सुरा पहिल्या पाहरेकऱ्याच्या पाठीवर रोखून उभा होता. दुसऱ्या पाहरेकऱ्याला त्याचा साथी संकटात सापडला असेल याची कल्पना देखील नव्हती. तो परत जाण्यासाठी मागे वळला. पण खड्गवर्माने त्याला धरून खाली पाडले.

जीवदत्त दोघांना दरडावून म्हणाला— "आतां खरे खरे सांगा, नाहीतर दोघांची डोकी उडवू. त्या पुजाऱ्याच्या बरोबर सर्व लोक निघून गेले की काही लोक गुहेबाहेर पाहऱ्यावर आहेत ?"

खड्गवर्मा तलवार घेऊन दोघां तरुणांना एका क्षणात ठार करण्याच्या पवित्र्यात उभा होता. दोघे थरथर कांपत होते. हात जोडून म्हणाले—"आमचा जीव घेऊ नका. आम्ही खरेखरे सांगतो, आमचे सर्व साथी पुजाऱ्याबरोबर आनंदपूरला गेले आहेत. फक्त आम्हां दोघांना तुमच्यावर पहारा ठेवण्यासाठी मागे ठेवले आहे."

"तरमग तुम्ही दोघे एक तासभर याच खोलीत बसून रहा. आम्ही बाहेर जाऊन येतो. तुम्हांला परत आल्याबरोबर सोडू." जीवदत्त म्हणाला.

दोघां तरुणांनीं हात जोडून नमस्कार केला. त्यानंतर खड्गवर्मा व जीवदत्त खोली बाहेर आले आणि त्यांनी त्या भोकावर दगड सरकवून ठेवून दिला. नंतर दोघे खाली जिना उतरून गेले. थोडे अंतर चालून गेल्यावर दुसऱ्या जिन्याच्या पायऱ्या चढून गुहेबाहेर डोंगरावर येऊन पोचले. (क्रमशः)





# संन्याशाला संसार

विक्रमादित्याने आपला हट्ट सोडला नाही. तो झाडाजवळ गेला, प्रेत खांद्यावर काढून घेतले आणि पुन्हां मौनपणे स्मशानाच्या दिशेने चालू लागला. तेव्हां प्रेतात बसलेला वेताळ त्याला म्हणाला—"राजा ! तू स्वतः आपल्यावर इतकी संकटे ओढवून कष्ट सहन करीत आहेस. परंतु अयशस्वी झाल्यावर तुझ्या मनातली श्रद्धा, आस्था व विश्वास सर्वं कापरासारखे उडून जातील आणि तू वेडा होशील की काय अशी भीति मला वाटू लागली आहे. मागे कनकभद्रने आपले व्रत, श्रद्धा व आस्था सर्वांचा त्याग करून संन्यासाश्रमातून पुन्हां गृहस्थाश्रमात प्रवेश केला होता. मी त्याची गोष्ट तुला सांगतो. लक्ष देऊन ऐक." असे सांगून वेताळ गोष्ट सांगू लागला.

महेश्वरम् नामक एका गावी एक शेतकरी रहात असे. त्याच्या जवळ थोडी



जमीन होती. पण तो खूप मेहनत करून पोटापाण्यापुरते आपल्या शेतातून उत्पन्न काढी. त्याला फार उशिरां एक मुलगा झाला. शेतकऱ्याने त्याचे नाव कनकभद्र असे ठेवले. एकुलता एक मुलगा आणि उतार वयात झालेला, म्हणून आई बाप मुलाचे सर्व लाड पुरवीत.

कनकभद्र वयात आल्यावर बाप त्याचे लग्न करून द्यायचे ठरवून त्याला म्हणाला–"बाळ, आतां तू लग्न करून घेऊन घर गृहस्थी संभाळ. आम्ही दोघं आतां किती दिवसांचे पाहुणे? आम्हांला उशिरां तुझ्यासारखा गुणी मुलगा झाला. पण आमच्या आई वडिलांना नातवाचे तोंड पाहणे शक्य ... नाही. ते भाग्य निदान आम्हांला तरी लाभावे, एवढी एकच इच्छा आहे."

परंतु कनकभद्राला संसारात पडायचे नव्हते. म्हणून तो म्हणाला–"बाबा! मला लग्न करण्याची इच्छा नाही. उलट संन्यास घेऊन मुक्तिमार्ग शोधावा म्हणतो."

म्हातारपणी जे विचार मनात यायला पाहिजेत ते विचार तरुण वयात मुलाच्या मनात आलेले पाहून म्हाताऱ्या आई वडिलांचे मन फार दुःखी झाले. तरी मुलाचे मन वळविण्याचा प्रयत्न दोघांनी चालू ठेवला. कनकभद्राला ते आवडले नाही आणि तो एक दिवशी काशी यात्रेला निघाला. त्याने एका संन्याशाजवळ दीक्षा घेऊन संन्यासाश्रमात प्रवेश केला.

काही वर्षे लोटली आणि महेश्वरम् गावाहून काही लोक काशी यात्रेला आले. त्यांच्या तोंडी वडील वारल्याचे आणि आई एकटी दुःखी मनाने आयुष्य कंठीत असल्याचे कळले. ते ऐकून कनकभद्राचे मन फार दुःखी झाले. तो आपल्या गुरूला भेटून म्हणाला–"गुरुवर्य! एकदा आपल्या गावी जाऊन दुःखी आईला भेटून यावे म्हणतो. वडील वारल्याचे आजच कळले."

गुरु स्मित करून म्हणाले–"अरे खुळ्या! संन्याशाचा बाप कोण आणि आई कोण? ... तर "अवघें विश्वचि माझें घर" आहे."

"तसे नव्हे गुरुवर्य! माझ्या वडिलांनी पाठीमागे काही पैसे माझ्यासाठी म्हणून ठेवले असतील तर ते आणून प्रभुचरणी अर्पण करावे म्हणतो." कनकभद्र म्हणाला.

तेव्हां गुरूने होकार दिला आणि कनकभद्र आपल्या गावकऱ्यांबरोबर व इतर प्रवाश्यांबरोबर महेश्वरमला निघाला. प्रवास काही दिवस सुखाचा झाला. वाटेत तीन चार मुक्काम संपवून सर्व प्रवासी पुढल्या मुक्कामाला निघाले. वाटेत एका चोरांच्या टोळीने त्यांना लुटले. काही लोक चोरांच्या हाती ठार झाले आणि जे उरले त्यांना चोरांनी त्यांच्या जवळच्या पैशाबरोबर आपसात वाटून घेतले. कनकभद्र व पार्वती नावाची एक तरुण स्त्री एका चोराच्या वांटयाला आली. तो लुटेरा दोघांना गंगेकाठच्या आपल्या झोपडीत घेऊन गेला आणि मजुरासारखी आपल्या घरची कामे करवून घेऊ लागला.

त्या लुटेऱ्याच्या घरी चार पाच गाई होत्या. गाईंचा चारा आणणे व त्यांचे दूध काढणे कनकभद्राचे मुख्य काम होते. पार्वती घरातली इतर सर्व कामे करी. डाकूच्या मनात एक दिवशी एक विचित्र विचार आला. हे दोघे आपले गुलाम आहेत. या दोघांना एकत्र नवराबायको सारखे रहायला सांगावे. यांना जी मुले होतील ती आपली गुलाम होतील. अशा-





तऱ्हेने गुलामांची संख्या खूप वाढेल. असा विचार करून त्याने दोघांसाठी एक निराळी झोपडी बांधून दिली आणि म्हणाला– "तुम्ही कोण काय मी ओळखीत नाही, तुमचे परस्परांचे नाते आहे की नाही, त्याची मला गरज नाही. आजपासून तुम्ही दोघे नवरा बायको झालात. या झोपडीत तुम्ही दोघे आता संसार थाटा."

दोघे त्या झोपडीत पोचले. पण पार्वती घाबरली. तेव्हां कनकभद्र तिला म्हणाला– "हे पहा, मी आहे संन्यासी, म्हणून तुला भिण्याचे काहीच कारण नाही. आपण आपल्या मालकाच्या सांगण्याविरुद्ध काही करण्यात धोका आहे. म्हणून आपण जगापुरते पति पत्नी प्रमाणे राहू आणि प्रत्यक्षात ब्रह्मचर्याचे पालन करू या."

ते ऐकून पार्वतीच्या मनाचे समाधान झाले आणि कनकभद्रविषयी तिच्या मनात आदरभाव उत्पन्न झाला. गुलामीच्या त्या स्थितीत दोघे परस्परांचे सुख-दुःख समजून घेऊन राहू लागली.

चोराच्या मनात त्यांच्या विषयी आता काही शंका उरली नाही व त्याने त्यांना हिंडण्या फिरविण्यास पूर्ण स्वतंत्रता दिली. कनकभद्रच्या मनात सहज एक विचार आला. मी संन्यासी आहे, सर्वसंग परि त्याग केला आहे. गुलामी आणि स्वतंत्र जीवन दोन्ही मला सारखी आहेत. परंतु पार्वती कुलीन घराण्यातली कन्या आहे. तिचे कोणा योग्य पुरुषाशी वेळीच लग्न झाल्यास तिचे पुढील आयुष्य सुखी होईल. परंतु तिला आज एका लुटेऱ्याची ती तोंडाने बोलली नाही तरी सुटका केव्हां मिळेल असे तिला मनातल्या-मनात वाटत असेल. तिला या गुलामीतून मुक्त करण्याचा मार्ग शोधला पाहिजे.

कनकभद्रने या गोष्टीवर बराच विचार केला आणि पळून जाणे हा एकच मार्ग त्याला दिसला. त्याने ती गोष्ट एक दिवशी रात्री पार्वतीला सांगितली.

पार्वती म्हणाली–"मला जिवाचा वीट आला आहे. पण मी ठरले बाई माणूस. काय करावे कळत नाही. पाहिजे तर तू पळून जा आणि मोकळा हो. मला बरोबर घेऊन गेलास की एक मोठा प्रश्न तलवारी सारखा तुझ्या मानेवर लोंबत राहील."





"पण मी तुझ्यासाठीच तर पळून जाण्याचा विचार करीत आहे. म्हणून मी एकट्याने पळून जाण्याचा प्रश्नच उरत नाही." कनकभद्र म्हणाला.

"तरमग ठरव कसे पळायचे आणि पुढे कोठे कसे जायचे? या प्रयत्नात माझा जीव गेला तरी मला हरकत नाही." पार्वती म्हणाली.

रात्री त्यांच्यावर नजर ठेवणारा कोणी नव्हता. ते जिवंत आहेत की मेले हे विचारणारादेखील त्यावेळी कोणी नव्हता. म्हणून एक दिवशी पार्वतीने दोघांना चार दिवस पुरेल एवढे खाण्यापिण्याचे पदार्थ तयार करून घेतले आणि दोघे दोन गाईंना घेऊन निघाले. वाटेत नदी होती ती गाईंच्या पाठीवर बसून त्यांनी पार केली आणि गाईंना सोडून दिले. उजाडेपर्यंत दोघे कोणत्या तरी शहरात येऊन पोचले. एका धर्मशाळेत जाऊन व्यवस्थापकाला, दोघां नवराबायकोला एक दोन दिवस उतरायला खोली देता का, विचारले. व्यव-स्थापकाने खोली दिली व दोघे रात्रभर खोलीत राहले. दुसऱ्या दिवशी कनकभद्रने



पार्वतीला तिच्या गावी पोचविण्याच्या हेतूने तिचे गाव कोठे आहे, विचारले.

पण पार्वती म्हणाली–"समज, मी आपल्या घरी पोचले तर तेथे माझे आई वडील असतील की ते कोणातरी लुटाऱ्याकडे गुलामी करीत असतील कोणी सांगावे. आणि असले तर मला इतके दिवस एका लुटेऱ्याकडे राहून आलेली ऐकून मला घरात घेतील का? तेव्हां तुला हरकत नसेल तर मी तुझ्याच घरी तुझ्या म्हाताऱ्या आईची सेवा करीन."

कनकभद्र पार्वतीबरोबर महेश्वरमला आला. कित्येक वर्षानंतर मुलाला घरी आलेला पाहून आईला आनंद झाला.

तिच्यावर एकामागून एक जे डोंगर कोसळले त्यांची आठवण करून म्हातारीला रडू कोसळले. कनकभद्र आईला धीर देत म्हणाला–"आई, तू सुनबाईला आण म्हणत होतीस ना, पहा तुझ्यासाठी मी एक चांगली सुनबाई हुडकून घेऊन आलो आहे." असे सांगून त्याने पार्वती बरोबर आईला नमस्कार केला. सुशील पार्वतीला पाहून म्हातारीला परमानंद झाला.

तेव्हां पासून कनकभद्रने पार्वती बरोबर संसारात प्रवेश केला.

येथवर गोष्ट सांगून वेताळ म्हणाला– "राजा! कनकभद्रचे हे वागणे विचित्रपणाचे नाही का? त्याने लहानपणी संन्यास घेतला काय आणि संन्यास घेतल्यानंतर पुन्हां संसार थाटला काय? या शंकांचे समाधानकारक उत्तर माहीत असुन तू दिले नाहीस तर त्याचा परिणाम तुला माहीतच आहे, तुझ्या डोक्याची शंभर छकले होऊन तुझ्याच पायावर लोळू लागतील."

ते ऐकून विक्रमादित्य म्हणाला–"कनकभद्राला जे वैराग्य झाले होते ते आयुष्यातले सर्व सुखोपभोग घेतल्यानंतर उत्पन्न झाले नव्हते. त्याला आपल्या बापासारखे रहायचे नव्हते एवढेच. परंतु त्याला खऱ्या सुख-दु:खाची कल्पना पार्वतीबरोबर गुलामीत रहातांना आली. आईच्या प्रेमाखातर तो काशीहून परत घरी निघाला होता. पार्वतीच्या दु:खी जीवनाची कल्पना त्याला झाली तेव्हां त्याला खरे जीवन काय असते हे कळले. स्त्री व पुरुष परस्पर सहानुभूति दाखवून विवाहित न झाले तरी परस्परांच्या जीवनात कसे समभागी होऊ शकतात हे त्याने प्रत्यक्ष अनुभवाने पाहिले होते. कनकभद्र घरी पोंचला तोंपर्यंत त्याच्या मनात पूर्ण बदल होऊन खऱ्या जीवनात त्याने प्रवेश करण्याचे ठरविले. त्यात विचित्र असे काहीच घडले नाही."

अशातऱ्हेने राजाचे मौनभंग होताच वेताळ प्रेतासह नाहीसा झाला आणि झाडाला जाऊन लोंबकळू लागला. (कल्पित)





# गर्वाचे घर खाली

अवंतीपूरच्या दरबारात हरनाथ शास्त्री व गुरुनाथ शास्त्री नावाचे दोघे विद्वान पंडित होते. त्यांच्याहून कोणी हुशार व बुद्धिमान जगात कोणी नाही असे त्यांना वाटत असे. म्हणून दोघे इतर विद्वानांचा अनादर व अपमान करीत.

कलिंगपूरच्या दरबारात सुगुणशर्मा नांवाचा एक विद्वान पंडित होता. फार मोठा विद्वान व बुद्धिमान म्हणून दरबारात आणि सर्वत्र त्याची ख्याती होती.

सुगुणशर्मांची ख्याती ऐकून हरनाथ शास्त्री व गुरुनाथ शास्त्री त्याचा पराभव करण्याचे मनाशी ठरवून निघाले. त्यांना जगात अजिंक्यपद मिळविण्याची इच्छा होती. म्हणून दोघे आपल्या राजाची परवानगी घेऊन कलिंग राजाच्या दरबारी आले आणि म्हणाले–"महाराज, आम्ही दोघे अवंतीपूरच्या दरबारचे पंडित आहो. आपल्या दरबारात सुगुणशर्मा नावाचे पंडित असल्याचे ऐकले तेव्हां त्यांचा पराभव करण्याच्या हेतूने आम्ही आलो आहो."

कलिंग राजाच्या परवानगीने सुगुणशर्मा त्यांना म्हणाला–"मी तसा मोठा पंडित नाही. तरी आपण दोघे आलांच आहां तर मला आनंदच आहे. आपल्या ज्ञानात वृद्धी करून घेण्यास मला चांगली संधी मिळेल. बरे तर मी एक प्रश्न विचारतो. दोघांना प्रश्न निरनिराळ्या वेळी व एकट्याने विचारणार आहे. माझ्या प्रश्नाचे दोघांनी उत्तर दिले तर आपण दोघे माझ्याहून मोठे विद्वान आहां हे मी मान्य करीन."

दुसऱ्या दिवशी दरबारात प्रश्न करण्याचे ठरले. आपल्या दरबारी पंडिताच्या बुद्धिमत्तेचा पराक्रम पाहण्यासाठी दरबारी लोक फार मोठ्या संख्येने हजर झाले.

श्री बा. द. देशपांडे

सुगुणशर्माने एका दोऱ्याला एक दगड बांधला आणि तो एका खांबाला लोंबत ठेवला. त्या दगडाला आणखी एक दोरा बांधून तो खाली लोंबत सोडला. नंतर प्रथम हरनाथ शास्त्रीला दरबारात सुगुणशर्माच्या बाजूला बसविण्यात आले. सुगुणशर्मा हरनाथ शास्त्र्यांना म्हणाला–"शास्त्रीबुवा! या दगडावर आणि खाली दोरे बांधलेले आहेत. मी खालचा दोरा ओढणार आहे. आतां खालचा की वरचा दोरा, तुटेल हे सांगू शकाल का?"

"वरचा दोरा तुटेल." हरनाथ शास्त्री एकदम म्हणाले.

सुगुणशर्माने खालचा दोरा धरून ओढला. परंतु हरनाथ शास्त्रींनी सांगितल्याप्रमाणे वरचा दोरा तुटला नाही, खालचा दोरा तुटला.

"मग, हारलात ना हरनाथ शास्त्री-बुवा? आता जाऊन गुरुनाथ शास्त्र्यांना पाठवून द्या." सुगुणशर्मा म्हणाला.

हरनाथ गुरुनाथला जाऊन म्हणाला– "मी विचार केल्याशिवाय उत्तर देऊन फसलो आणि वरचा दोरा तुटेल, म्हटले. पण तू खालचा दोरा तुटेल असे सांग. तू विजयी झालास तरी आपला गौरव राहील."

मध्यंतरी सुगुणशर्माने तुटलेला दोरा सोडून त्या दगडाला दुसरा बांधून ठेवला आणि खाली लोंबत सोडून ठेवला. गुरुनाथ शास्त्री सभेत आल्यावर सुगुणशर्मा शेजारी



येऊन बसले. सुगुणशर्माने त्यांनापण तोच प्रश्न विचारला.

"खालचा दोराच तुटेल." गुरुनाथ शास्त्री म्हणाले.

सुगुण शर्मा मनात थोडा हसला आणि त्याने खालचा दोरा ओढला आणि या खेपेस वरचा दोरा तुटला आणि दगडासकट खाली आला.

सर्व चकित होऊन पाहू लागले.

त्यानंतर सुगुण शर्मा गुरुनाथ शास्त्र्यांना म्हणाला–"ही सामान्य परीक्षा होती. या परीक्षेत तुम्ही दोघे हारलात. मला तुमच्या पांडित्याची माहिती नाही. तुम्ही दोघे पंडित असालही. परंतु तुम्हां दोघांत ज्ञानाचा अभाव आहे आणि गर्व जास्त आहे. म्हणून मी आव्हान केल्याशिवाय तुम्ही स्वत:हून ओळखदेख नसता मला जिंकण्या-साठी आलां. पुढे असा गर्व करण्याचे सोडून द्या. विद्वानाला नम्रता शोभते व गर्वाचे घर सर्वदा खाली होते, हे विसरू नका." असा सदुपदेश करून दोघांना निरोप दिला.

पण राजाला, पहिल्याने खालचा दोरा व नंतर वरचा कसा काय तुटला हे कळले नाही. त्याने सुगुणशर्मालाच त्याचे गुपित विचारले.

सुगुणशर्मा म्हणाला–"महाराज, ही एक सामान्य युक्ति आहे. प्रत्येक वस्तूमध्ये थोडे जाड्य असते. पहिल्या खेपेस मी खालचा दोरा ओढला. दगडाचे ओझे असलेल्या त्या दोऱ्याला थोडा ताण होता. पण खालच्या दोऱ्याला ओढल्यामुळे तो ताण वाढण्यापूर्वीच खालचा दोरा तुटला. दुसऱ्या खेपेस मी हलक्या हाताने खालचा दोरा ओढला. खालच्या दोऱ्याला ताण मुळीच नव्हता व ताण उत्पन्न होण्यापूर्वी वरच्या दोऱ्यात दगडाच्या वजनाने ताण वाढून दोरा तुटण्याच्या स्थितीत पोचला होता. ही युक्ति पाहिजे तर कोणी ही करून पहावी."

राजा सुगुणशर्माची युक्ति पाहून खूष झाला. आपल्या दरबाराची लाज राखल्या-बद्दल त्याचा उचित सत्कार करून त्याला एक मोठे इनाम दिले.



# किफायत कां केली

श्यामराव शेट श्रीमंत सावकार होते. ते चिक्कू नव्हते, मितव्यय त्यांचे ध्येय होते. एकदा सोमेश्वर नावाचा एक मनुष्य त्यांच्याकडे येऊन म्हणाला–"शेट साहेब! दिवाळी आली आहे. पंचवीस रुपये कर्ज म्हणून दिलेत तर माझ्यावर फार उपकार होतील." श्यामराव शेटनी रुपये दिले.

संध्याकाळी श्यामराव शेट आपल्या बायकोसाठी दिवाळीला एखादे नवे पातळ विकत घ्यायला एका दुकानात गेले. त्या दुकानात थोडा आधी सोमेश्वर गेला होता व त्याने पंचवीस रुपयांची एक साडी विकत घेतली होती.

श्यामराव शेटनी बारा पंधराच्या दरम्यान एक पातळ दाखवायला दुकानदाराला सांगितले. सोमेश्वर ते ऐकून विचारू लागला–"अहो शेटजी! तुम्ही एवढे श्रीमंत सावकार, इतक्या स्वस्तात दिवाळी होते का? याच्या दुप्पट किमतीला छान चांगली साडी मिळेल!"

"मितव्यय म्हणजे किफायत माणसाने आयुष्यात बाळगावी लागते, सोमेश्वर! कोणी येऊन पंचवीस रुपये कर्जाऊ मागितले तर कोठून आणू द्यायला?" श्यामराव शेटनी खोचक शब्दात विचारले.





# आशीर्वाद

फार प्राचीन काळी कांचीपुरम येथे गोविंदराज नांवाचा एक श्रीमंत मनुष्य रहात असे. तो पहिल्या नंबरचा चिक्कू व कवडी चुंबक होता. दारावर कोणी भिकारी येऊन उभा राहिला की तो त्याला पळवून लावीत असे. गोविंदराजला कुबड होते. म्हणून 'कुबडा गोविंदराज' असे त्याचे टोपण नाव पण होते.

एकदां त्याच्या घरी एक भिकारी आला. त्याने 'जेवायला वाढा' असा दारासमोर ओरडा सुरू केला. गोविंदराज त्याला तोंडाला आले ते बोलला.

तेव्हां भिकारी म्हणाला–"धनी! तीन दिवसांपासून उपाशी आहे. अंगात चालायला देखील शक्ति उरली नाही. एक घासभर अन्न वाढा."

गोविंदराजने त्याला शिवीगाळ करून नोकरांकरवी धक्के देऊन हाकलून लावले.

भिकाऱ्याला उपास मार झाल्याने चालवत नव्हते. तो रस्त्याच्या काठाला जाऊन धापा टाकीत बसला.

त्या वाटेने जाणाऱ्या एका आंधळ्याला त्या भिकाऱ्याच्या धापा टाकण्याचा आवाज ऐकू आला. तो भिकाऱ्याजवळ गेला आणि म्हणाला–"कोणरे बाबा तू! अशा धापा कां टाकतो आहेस, काय झाले काय तुला?"

भिकारी म्हणाला–"मी एक भिकारी आहे. कित्येक घरी भीक मागितली, पण कोणी घासभर अन्न वाढले नाही. भुकेने जीव कासावीस झाला आहे. म्हणून येथे येऊन बसलो."

"माझ्या घरी चल. माझ्याबरोबर बसून खा." या शब्दात भिकाऱ्याला धीर देत आंधळा त्याला आपल्या घरी घेऊन गेला.

त्या आंधळ्याने भिकाऱ्याला पोटभर जेवायला वाढले. भिकारी तृप्त झाला.

सौ. माधुरी माने

त्याने दोन्ही हात जोडून नमस्कार केला आणि म्हणाला–"देवाची कृपा होईल तर आपल्याला पुन्हां डोळे येतील." असा आशीर्वाद देऊन भिकारी निघून गेला.

त्या दिवशी रात्री आंधळयाच्या डोळयाला पाण्याची धार लागली. झोप आली नाही आणि सकाळी उठून पाहतो तर त्याला छान दिसू लागले.

आंधळयाला पुन्हां डोळे आल्याची गोष्ट गावभर पसरली. ती गोष्ट गोविंदराजला देखील कळली. तो धांवत धांवत त्या आंधळयाकडे आला आणि विचारू लागला–"खरंच का तुम्हांला चांगले दिसू लागले? मोठे आश्चर्यच आहे. झालं काय, सगळं मला सांगा, ऐकूं द्या तरी."

"काल तुझ्या घरासमोर एक भिकारी भीक मागायला आला होता न? त्याचा जीव भुकेने कासावीस झाला होता. तू त्याला काही खायला दिले नाहीस. पण मला त्याची दया आली. मी त्याला बोलावून घेऊन घरी आलो आणि पोटभर जेवायला वाढले. त्याने मला डोळे येतील असा आशीर्वाद दिला. आज सकाळी उठून पाहतो तर मला छान दिसू लागले आहे." दृष्टी आलेला मनुष्य म्हणाला.

"अरे रे! मी किती चुकलो? मी त्याला शिवीगाळ करून हाकलून लावले. त्याला जेवायला वाढून तृप्त केले असते तर माझे कुबड गेले असते." असे म्हणत गोविंदराज पश्चात्ताप करू लागला.



तेव्हांपासून गोविंदराजने तो भिकारी कोठे आहे याचा शोध सुरू केला. त्याला काय वाटेल ते करून हुडकून आणावयाचे आणि पोटभर खायला घालून आपले कुबड ठीक करून द्यायला सांगायचे असे त्याने मनाशी ठरविले.

दिवसभर हिंडून गोविंदराजने त्या भिकाऱ्याला शेवटी शोधून काढले आणि नम्रपणे आपल्या घरी बोलावून घेऊन आला. जवळ बसून त्याने त्याला पंच पक्वान्नांचे जेवण वाढले.

भिकारी जेवण झाल्यावर म्हणाला– "तुमचे कुबड ईश्वर कृपेने जावो!" असा त्याने आशीर्वाद दिला आणि निघून गेला.

गोविंदराजला आपले कुबड जाऊ लागल्यासारखे वाटले. दुसऱ्या दिवशी उठल्यावर त्याला वाटले की इतरांसारखे आपण ताठ उभे राहून चालावे. परंतु झाले उलटे. त्याची कंबर वांकली होती.

तो रागारागाने ज्याला डोळे आले होते त्याच्या घरी गेला आणि म्हणाला–"मी तुझ्या गप्पात फसलो. तू सांगितल्याप्रमाणे मी त्या भिकाऱ्याला चांगले खायला घातले. तुझ्याहून चांगली पंचपक्वान्नें वाढली. जातांना त्याने मला आशीर्वाद दिला की माझे कुबड जाईल. पण माझे कुबड आहे तसेच आहे."

डोळे आलेला मनुष्य स्मित करून म्हणाला–"तू आहेस मूर्ख! भिकारी म्हणजे देव नव्हे. मी तो उपाशी होता म्हणून जेवायला वाढले. त्याने जो आशीर्वाद दिला तो अंतरात्मा तृप्त झाला म्हणून दिला. ईश्वराला त्याचा आशीर्वाद खरा वाटला. आणि तू तो उपाशी नव्हता तेव्हां बोलावून पंचपक्वान्नें वाढलीस. स्वार्थ बुद्धीने तू हा उपकार केलास. भिकारी शिष्टाचाराला धरून आशीर्वाद देऊन गेला. पण तो खरा व्हायला देवाला प्रेरणा कशी काय होणार?"

ते ऐकून गोविंदराजचे डोळे उघडले. त्या दिवसापासून त्याने दुःखी व अपंग लोकांना दानधर्म करून आपला नावलौकिक वाढवला.



# जसा वेष तसेच शेष

एका गावी एक सोंगाड्या रहात असे. तो दरवर्षी दसऱ्याला निरनिराळे वेष करून पैसे मिळवी.

एकदा तो एका योग्याचा वेष धारण करून राजाच्या दरबारात गेला. राजाला त्याने आशीर्वाद देऊन उपदेश केला. राजाने खुष होऊन त्याला इनाम द्यायला प्रधानाला सांगितले.

तेव्हां सोंगाड्या म्हणाला–"अहो, आम्ही योगी! आम्हांला पैसा अडका घेऊन काय करायचे?" असे सांगून सोंगाड्या इनाम घेतल्या शिवाय निघून गेला.

दुसऱ्या दिवशी तो एका नाच्या पोऱ्याचे सोंग घेऊन आला. त्याने नाचून व गाणे म्हणून राजाला खुष केले. राजाने या खेपेस ही त्याला इनाम द्यायला प्रधानाला सांगितले.

इनाम हातात घेऊन सोंगाड्या म्हणाला–"महाराज! एवढेच?"

राजाने चकित होऊन त्याला विचारले–"काय रे, काल तुला मोठे इनाम द्यायला सांगितले होते. तू घेतले नाहीस आणि आज आणखी मागतो आहेस?"

"महाराज, 'जसा वेष तसेच शेष', सोंगाड्या म्हणाला.





# दीनदां डुबक

फार जुनी गोष्ट आहे, बसरा शहरी खुसरो नावाचा एक सुलतान राज्य करीत असे. त्याच्या पदरी अब्दुल्ला नावाचा एक मनुष्य नोकरी करीत असे. सुलतानाने त्याला तबेल्याचा अधिकारी नेमले होते. अब्दुल्ला सुलतानाच्या सर्व घोड्यांची देखरेख फार उत्तम करीत असे. परंतु त्याच्या विरुद्ध सुलतानाच्या कानावर कागाळ्या येऊ लागल्या. तो घोड्याच्या दाण्याकरिता दिलेल्या रकमेतून काही पैसे गडप करतो, असा सुलतानाला पण संशय येऊ लागला.

सुलतानाने एकदां त्याला बोलावून तंबी देऊन विचारले–"तू घोड्याच्या दाण्याकरिता दिलेल्या रकमेतील पैसे खातोस असे आढळून आले आहे, होय की नाही?"

अब्दुल्ला घुटमळला. आरोप सिद्ध झाला.

म्हणून सुलतानाने त्याला शंभर शिपायांचा पगार, पोशाख व इतर गरजा पुरविण्याचे काम दिले. अब्दुल्ला काही सुधारला तर पहावा म्हणून संधी देण्याच्या हेतूने सुलतानाने मुद्दाम ते काम त्याला दिले होते. पण अब्दुल्लाला ती गोष्ट कळली नव्हती.

अब्दुल्लाला आता जास्तच फावले. तो शिपायांच्या पगारातले. एक दोन दीनार पुढे देईन असे सांगून किंवा इतर तऱ्हेनें धमकी वगैरे देऊन स्वतःसाठी ठेवून घेऊ लागला. ही गोष्ट देखील सुलतानाच्या कानावर अर्थात् गेली.

तेव्हांपासून सुलतानाने पैशाचा व्यवहार त्याच्या हातात राहणार नाही असे काम देण्याचे ठरवून त्याला एका फुलबागेवर देखरेख करण्याचे काम दिले. त्याच्या हाताखाली दहा माळी काम करीत.

दोन महिने अब्दुल्लाविरुद्ध कोणतीही तक्रार आली नाही.

श्री शशिकान्त रणदिवे












एकदां सुलतानाचा लहान मुलगा फुलबागेत खेळत होता. त्याने जोराने चेंडू फेकला तो अब्दुल्लाला लागला. अब्दुल्लाने बेशुद्ध झाल्याचे सोंग केले. मुलाने अब्दुल्लाला खूप हलवून पाहिले. तेव्हां अब्दुल्ला हळूच डोळे उघडून म्हणाला–"पहा, मी सरकारांकडे वर्दी करतो."

सुलतानाचा मुलगा बापाला फार भीत असे. म्हणून घाबरून जाऊन तो अब्दुल्लाला म्हणाला–"ही गोष्ट बाबांच्या कानावर जाऊ देऊ नकोस." अब्दुल्लाची नजर त्या वेळी मुलाच्या गळ्यातल्या मोत्यांच्या हारावर होती. मुलाने विचार केला की तो हार अब्दुल्लाला देऊन टाकला की त्याचे तोंड बंद होईल त्याने दिल्याबरोबर अब्दुल्लाने आडवेढे घेतल्याशिवाय तो हार घेतला. त्या दिवसापासून तो मुलगा दररोज पैसे किंवा सोन्याचांदीची एकादी वस्तु आणून अब्दुल्लाला देऊ लागला.

ती गोष्ट माळ्यांना कळली व त्यांनी सुलतानाच्या कानावर ती गोष्ट घालू अशा धमक्या अब्दुल्लाला दिल्या.

पण अब्दुल्ला मुळीच भ्याला नाही. त्याने उलटच्या धमक्या द्यायला सुरवात केली. त्याला सुलतानाच्या मुलाकडून जे काही मिळते आहे त्यात माळी हिस्सा मागत आहेत, अशी सरकारात तक्रार करीन, असे त्याने धमकावले.

माळी घाबरले. ते ओळखून अब्दुल्लाने त्यांच्या पगारातला एखाद दीनार घेऊन त्यांना दोषमुक्त करून दिल्याचे सोंग केले.

परंतु काही दिवसांनी सुलतानाच्या बेगमला मुलाचा एकेक दागिना नाहीसा होऊ लागल्याचे दिसले. तिने मुलाला रागावून विचारले व त्याने खरे ते सांगून टाकले.

ती गोष्ट अर्थातच सुलतानाला पण कळली. माळ्यांनी पण अब्दुल्ला मुलाकडून सोन्याचांदीच्या वस्तू व पैसे कसे उकळीत होता हे सुलतानाला सांगून त्यांच्या पगारातला एखाद दीनारदेखील अब्दुल्ला घेत असल्याची तक्रार केली. तेव्हां सुलतानाने अब्दुल्लाला नोकरीवरून काढून लावले.

अब्दुल्ला निघून गेला. पण तीन दिवसांनंतर तो किल्ल्याच्या मुख्य द्वाराबाहेर एका जागी मोठमोठ्या खतावण्या घेऊन बसू लागला. तो सकाळपासून संध्याकाळपर्यंत किल्ल्यात कोण किती वाजतां व कोणत्या तारखेला गेले व कोण बाहेर आले, हे टिपून ठेवू लागला. एखादे गाढव रेंकू लागले तर ते देखील तो नमूद करून ठेवी. शिपाई ते सर्व पाहून हसत. सुलतानाला जेव्हां कळले तेव्हां तो देखील हसला. सर्वांनी त्याला वेड लागले असावे, असा विचार करून त्याच्याकडे दुर्लक्ष केले.

आणखी काही दिवस लोटले. एकदां मध्य रात्रीच्या सुमारास अब्दुल्ला आपल्या जागेवर बसून डुलक्या देत असतां किल्ल्याच्या चारी बाजूला जो खंदक होता त्यात पाणी भरलेले होते. त्या पाण्यात तीनदां





कोणती तरी मोठी वस्तु पडल्यामुळे 'डुबुक' असा आवाज झाला. अब्दुल्लाने आपल्या वहीत "खंदकांत उत्तरेकडे तीनदां डुबुक" असे लिहून ठेवून दिले.

त्या दिवशी रात्री किल्ल्यात कसला तरी उत्सव होता. पाहरेकरी दारू पिऊन झिंगून पडले होते. तीन चार डाकू किल्ल्यात शिरले आणि खजिन्यातून तीन मोठ्या पेट्या उचलून घेऊन पळाले. खंदकातून रात्री पेट्या नेणे शक्य नाही, असा विचार करून त्यांनी त्या पेट्या पाण्यात टाकल्या. किल्ल्यात जाण्याचा पूल खंदकावरून रात्री काढून ठेवण्यात आला होता. दुसऱ्या दिवशी रात्री खंदकातून पेट्या बाहेरच्या बाहेर उचलून नेता येतील, असे चोरांना वाटत होते.

परंतु उजाडताच खजिन्यात चोरी झाल्याचा गवगवा झाला. चोर व चोरीचा माल यांचा शोध सुरू झाला. पण कोठेच सुगावा लागला नाही. तेव्हां सुलतानाच्या एका हुषार वजिराने अब्दुल्लाच्या वहीत काही टिपून ठेवले आहे का चवकशी करून पहायला सुचविले.

सुलतानाला ते पटले व त्याने अब्दुल्लाची खतावणी घेऊन यायला शिपायांना पाठविले. शिपाई अब्दुल्लाला खतावणीसह बोलावून घेऊन आले. सुलतानाने खतावणी उघडून वाचून पाहिले. एका जागी "खंदकात उत्तरेकडे तीनदां डुबुक" असे लिहिले होते. सुलतानाने विचारले—"काय रे, हे 'तीनदां डुबुक' काय आहे?"

अब्दुल्ला म्हणाला—"सरकार! पाण्यात मोठी वस्तु पडली म्हणजे 'डुबक' असा आवाज होतो की नाही. अगदी तसाच आवाज काल रात्री खंदकाच्या उत्तरेकडच्या भागात तीनदां झाला."

लगेच शिपायांनी खंदकात उतरून बुडी मारून तीन पेट्या बाहेर काढल्या. सर्व माल, होता तसा सुरक्षित मिळाला.

सुलतान खुसरो खुश झाला व त्याने अब्दुल्लाला आपला खास सल्लागार म्हणून नेमले.





# विधि लिखित

विजयवर्मा एका लहानशा राज्याचा राजा होता. त्याला विजया नावाची एकुलती एक मुलगी होती. विजयाला सोळावे वर्ष लागले त्या दिवशी बापाने तिला एक अंगठी देऊन ती संभाळून ठेवायला सांगितले. ती अंगठी विजयाच्या आईची होती. राजाने मयत राणीची गोड आठवण म्हणून मोठ्या प्रेमाने ती अंगठी मुलीच्या बोटात घातली होती.

एक दिवशी विजया आपल्या एका दासीबरोबर नावेत बसून नौकाविहाराला गेली असतां ती अंगठी बोटातून निसटून नदीत पडली.

विजया ओरडली—"अगो बाई! अंगठी नदीत पडली." नावाड्याने लगेच पाण्यात बुडी मारली आणि तळापर्यंत जाऊन आला. पण अंगठी सापडली नाही. विजयवर्माला ती गोष्ट कळली. तसा तो तापट स्वभावाचा नव्हता. परंतु राणीची अंगठी इतक्या प्रेमाने तिची आठवण म्हणून मुलीच्या बोटात घातली आणि ती केवळ निष्काळजीपणामुळे जावी हे राजाला आवडले नाही. तो मुलीला म्हणाला—"मी तुझे सर्व अपराध पोटात घेतले असते, पण हा नाही. आता ही अंगठी आणून देईल त्या तरुणाशीच मी तुझा विवाह करून देईन." एवढे सांगून राजाने मुलीला विचारले—"कोणी महेश नावाचा मुलगा तुला मागणी घालायला आला होता."

"होय का, बाबा!" विजया म्हणाली.

"तुम्ही परस्परांना वचन दिले आहे का?" राजाने विचारले.

विजया म्हणाली—"होय, बाबा!"

"तरमग तुझे नशीब! त्याच्याशी तुझे लग्न कसे होणार? आता तूच विचार कर. तू ती अंगठी घालवून बसलीस

सौ. दमयंती लोकूर

आणि दोघे वचनबद्ध होऊन संकटात सापडला आहां. मी आज दवंडी पिटवायला आज्ञा केली आहे. जो कोणी अंगठी आणून देईल त्याच्याशी राजकन्येचा विवाह होईल !"

दवंडी ऐकून अनेक तरुणांनी नदीतून अंगठी काढण्याचा प्रयत्न करून पाहिला. पण कोणालाही अंगठी सापडली नाही. सर्व निराश झाले. विजयावर ज्याचे प्रेम होते त्या मुलाने अंगठी शोधण्याचा प्रयत्नदेखील केला नाही. कारण त्याशिवाय विजयाशी लग्न होणार नाही असे राजाने त्याला कळविले होते व तो एक फुकट प्रयत्न आहे असे त्याला वाटत होते.

एकदा तो शिकारीसाठी नदीकाठी गेला होता. त्याला नदीपलीकडे एक हरण दिसले. त्याने लगेच नेम धरून एक बाण मारला. त्याच वेळी एक मासा नदीतून वर उडी मारीत होता. तो बाण त्याला लागला. अर्थात महेशचा नेम चुकला आणि हरण वांचले. त्याने दुसरा नेम धरला आणि बाण सोडला. पण हरण सावध झाले होते. ते उडी मारून पळून गेले.

आपण हरणाची शिकार करायला गेलो व मासा हाती आला असा विचार करीत महेश पलीकडच्या तीरावर गेला आणि त्याने बाणाला अडकून राहलेला मासा काढून घेतला आणि घरी गेला.

महेशच्या आईने मासा कापला तर पोटातून अंगठी निघाली. तीच विजयाची हरवलेली अंगठी होती. माशाने ती गिळली होती म्हणून कोणाला सापडली नाही.

दुसऱ्या दिवशी महेशने ती अंगठी राजाला नेऊन दिली. विजयवर्माला विजयाने राजघराण्याच्या रीतीविरुद्ध एका तरुणाला वचन दिलेले आवडले नव्हते. पण आता तो स्वत: वचनबद्ध होता. म्हणून लग्न करून द्यावे लागले. दोघांचे भाग्य बलवत्तर होते. म्हणूनच ती अंगठी हरवली. अंगठी हरवली नसती व महेशचा बाण माशाला लागला नसता तर दोघांचे लग्न झाले नसते. "विधि लिखित !" म्हणतात ते यालाच नाहीं का ?





# भुतांचे घर

एका गावी एक ब्राह्मण रहात असे. तो पुराण प्रवचन करून आपला उदर-निर्वाह चालवी. त्याची ख्याती जवळपासच्या पंचक्रोशीत झाली होती. म्हणून त्याला प्रवचनाला बोलावीत.

एकदां दहा मैलावरच्या एका गावाहून त्याला बोलावणे आले. त्या दिवशी रात्री त्या गावी पुराणाचा कार्यक्रम ठरला होता. तो वेळेवर घरून निघाला आणि काळोख होण्यापूर्वी त्या गावाला पोचला ही असता. परंतु अचानक सोसाट्याचा वारा सुरु झाला आणि काही वेळाने मुसळधार पाऊस पडू लागला.

काळोखात वाट दिसेनाशी झाली आणि त्यात पावसाची झोड सुरू होती. आता गावात वेळेवर पोचणेच शक्य नाही हे ओळखून रात्रभर कोठे रहावयाचे हा प्रश्न त्याच्यासमोर उभा राहला. जवळच्या दुसऱ्या एखाद्या गावी ती रात्र काढावी असा त्याने विचार केला. परंतु त्याला कोठे वस्तीच दिसेना. त्याला वाटले की वाट चुकून तो कोठे भटकत असावा. तो थोडा घाबरला. आतां कोठे रहायचे आणि कशी रात्र काढायची त्याला कळेना. त्याच मन:स्थितीत त्याने एकदा चारीबाजूला नजर फिरवून पाहिले आणि सुदैवाने त्याला दूर एका जागी मिणमिणत असलेल्या दिव्याचा उजेड दिसला.

त्याला जिवात जीव आल्यासारखे वाटले. तो त्याच दिशेने एका जुनाट पडक्या घराजवळ येऊन पोचला. बराच वेळ दार बाजवल्यावर एका माणसाने येऊन दार उघडले आणि म्हणाला–"अरे अरे ! तुम्ही तर पार भिजून गेलां आहां ! या, आत, या !"

ब्राह्मण आत गेला. दारावर उत्तम नक्षी होती. म्हणजे कोणा श्रीमंताचे ते

कु. अरविंद खानोलकर

घर होते. परंतु ज्या माणसाने दार उघडले तो एक सामान्य स्थितीतलाच माणूस दिसला.

घराच्या मालकाने ब्राह्मणाच्या मनातले विचार ओळखले असावे. म्हणून तो म्हणाला–"घर तसे मोठे आहे, पण यात आम्हीच दोघे नवरा बायको राहतो. आम्हांला घराचे भाडे द्यावे लागत नाही. रात्र फार झाली आहे, आम्ही झोपायला जातो. तुम्ही वरच्या खोलीत जाऊन झोपा."

ब्राह्मण वरच्या खोलीत गेला. त्याने हरिणाजिनाच्या पिशवीत कोरडे कपडे होते ते काढून प्रथम कपडे बदलले व ओले कपडे वाऱ्यावर टाकून ठेवले. खोलीत एक खाट होती. तिच्यावर सतरंजी घालून तो झोपला. दमला होता म्हणून चटदिशी झोप लागली. परंतु ब्राह्मण उपाशी झोपला होता आणि त्यात भिजून दमून भागून आला होता. म्हणून भुकेमुळे शांत झोप लागेना. त्याला खालच्या मजल्यावर वरदळ असल्याचा भास झाला आणि [illegible] आला. थोड्या वेळाने "या हो, पाने वाढली, चला जेवायला." असे कोणी म्हटल्याचे त्याला ऐकू आले. आणखी थोड्या वेळाने "अहो, केशव भटजी, या खाली या, पाने वाढली." असे कोणी तरी बोलावल्याचा भास झाला.

ब्राह्मणाचे नाव केशवभट नव्हते. तरी जास्त विचार न करता तो खाली उतरून गेला. खाली पुष्कळ लोकांची येजा दिसली. बैठकीत स्त्रीपुरुष दिसत होते. एका बाजूला पाने वाढली होती. लोक पानावर येऊन बसत होते. ब्राह्मणदेखील एका पानावर येऊन बसला. त्याने पानाभोवती पाणी फिरवून चित्रावती घातल्या व आपोष्णी घेऊन संवयीप्रमाणे "उत्तिष्ठंतु भूत पिशाचाः" असे म्हणत पुन्हां पानाभोवती पाणी फिरविले.

दुसऱ्या क्षणाला सर्व लोक नाहीसे झाले. पाने व पानावरचे पदार्थ नाहीसे झाले आणि त्या पडक्या काळोख्या घरात ब्राह्मण थरथर कापत एकटा राहून गेला.





# शेंगदाण्यांचे गुपित

एका गावी दोन चोर रहात असत. ते आपल्या गावात कधी चोरी करीत नसत. नेहमी परगांवी चोरी करीत. दोघां पैकी एकाचे नाव होते धोंडू व दुसऱ्याचे नाव होते दगडू. धोंडू एक अट्टल चोर होता. धोंडू सांगे त्याप्रमाणे डोळे मिटून सर्व कामे करी. दगडू साधा भोळा होता. त्याला स्वतःची समजूत नव्हती.

एक दिवशी रात्री दोघे एका गावी चोरी करण्यासाठी निघाले. त्या दिवशी फक्त एक बकरा चोरून आणायचा त्यांनी ठरविले. मध्य रात्रीच्या सुमारास दोघे स्मशाना शेजारच्या एका शंकराच्या देवळात येऊन पोचले. धोंडूने दगडूला ध्वजस्तंभाच्या आड एका ओटयावर बसून तो येईपर्यंत वाट पहायला सांगितले आणि स्वतः एक बकरा चोरून आणायला निघून गेला.

दाट काळोख पडला होता आणि जवळपास मनुष्यवस्ती नव्हती. दगडू, बरोबर थोडया भुयमुगाच्या शेंगा घेऊन गेला होता. वेळ जाईना तेव्हां त्याने खिशातल्या शेंगा काढल्या आणि प्रत्येक शेंग जमिनीवर आपटून किंवा कधी दातांनी सोलून दाणे खाऊ लागला.

देवळातला नोकर सभामंडपाच्या गच्चीवर झोपला होता. एकदम त्याची झोप मोडली आणि दूर 'कट्‌कट्' व 'फट्‌फट्' असा आवाज ऐकू आला. रात्री भुते स्मशानात येऊन आपला कारभार सुरू करतात असे त्याने ऐकले होते. भुते फक्त स्मशानात राहतात अशी त्याची समजूत होती. भुते देवळात आल्याचे त्याने कधी ऐकले नव्हते.

देवळात शिरलेल्या भुतांना पळवून लावण्यासाठी पुजाऱ्याला बोलावून आणायला

श्री र. मु. आरोळे








तो पुजाऱ्याच्या घरी गेला. तो पुजाऱ्याला जागा करून म्हणाला—"देवळात भुते शिरून आपला कारभार करत आहेत, पहा चला, त्यांना पळवून लावा. नाहीतर देऊळ अपवित्र होईल."

भुताचे नाव ऐकूनच पुजाऱ्याला धडकी भरली. म्हणाला—"अरे, मला चालवत नाही रे, माझे गुढगे दुखत आहेत. एक पाऊल टाकणेदेखील शक्य नाही." पुजाऱ्याला संधीवात होता ही गोष्ट पण खरी होती. तसा पुजारी अंगाने लट्ठच होता.

"तुम्ही आलेच पाहिजे. मी तुम्हांला पाठुंगळीला नाहीतर खांद्यावर घेऊन जातो. चला!" नोकर म्हणाला. म्हणून अगदी नाइलाजाने नोकराच्या खांद्यावर बसून पुजाऱ्याला जावे लागले.

तोपर्यंत दगडूचे शेंगा खाणे संपले होते. कोणी येत असलेला पाहून त्याने दीपस्तंभाआडून वांकून पाहिले. कोणीतरी खांद्यावर काही तरी आणीत असलेला दिसला.

दगडूला वाटले धोंडू बकरा उचलून घेऊन येत असावा. म्हणून त्याने विचारले—"काय रे चांगला गलेलट्ठ आहे की."

ते ऐकून देवळाच्या नोकराला कांपरेच भरले. त्याने खाली वांकून पुजाऱ्याला खांद्यावरून उतरविले आणि धूम ठोकली.

पुजाऱ्याचे गुढगे दुखत होते. तरी तो जोराने पळू लागला व मागे वळून देखील पाहिले नाही. घरात पाऊल टाकतांच दार बंद करून घेतले.

थोडया वेळाने धोंडू एक बकरा घेऊन आला आणि दगडूबरोबर आपल्या गावी निघून गेला.

दुसऱ्या दिवशी सकाळी केर काढीत असतां दीपस्तंभाजवळ शेंगदाण्याची साले पडलेली पाहून तो थक्क झाला. 'कट्‌कट्' व 'फट्‌फट्'चे गुपित तेव्हां त्याच्या लक्षात आले. त्याने ती गोष्ट पुजाऱ्याला सांगितली. आणि ते गुपित पुजारी व नोकर दोघांशिवाय इतर कोणाला कळले नाही.





# वस्ताद बाई

एका गावी सुगुणा नावाची एक विधवा बाई रहात असे. वयाने ती पन्नाशीच्या आसपास असेल. तिला मूल बाळ नव्हते. ती आपल्या घराच्या व्हरांड्यातच एक दुकान काढून ते चालवीत असे. ती गरीब होती. परंतु गावात लोक सांगत, ती मोठी वस्ताद बाई आहे. तिची पेटी उघडून पाहिले की दागिने आणि सोन्याचांदीच्या वस्तू भरलेल्या दिसतील. तशा त्या गावात एक दोन चोऱ्या पण झाल्या होत्या. आसपासच्या गावात मात्र पुष्कळ चोऱ्या होत. तेव्हां गावातल्या तरुणांनी चोरांना पकडण्याचे ठरवून दवंडी पिटविली की जो कोणी चोरी पकडवून देईल त्याला मोठे इनाम दिले जाईल. शेजारच्या गावात एक चोर रहात होता. त्याला ती गोष्ट कळली नाही.

सुगुणाने घरात चोर शिरला तर काय करायचे हे मनात योजून ठेवले. आपली युक्ति यशस्वी झाली तर आपल्याला बक्षिस पण मिळेल असे तिला वाटले. म्हणून इतर गावकरी चोरांचे नाव घेतले तरी घाबरून जात तिथे सुगुणा चोर केव्हां येतो याची वाट पाहू लागली.

एक दिवशी रात्री चोर तिने इच्छिल्याप्रमाणे सुगुणाच्या घरात शिरला. सुगुणा त्यावेळी जागी होती. चोर आल्याची चाहूल लागताच ती मोठ्या प्रेमाचा आव आल्यासारखा दाखवून म्हणाली—"आलास का बाळा!"

चोर ते ऐकून थक्कच झाला. पण बोलला नाही.

"तू आपले ते पैसे घेऊन जा बाबा, दुप्पट तरी झाले असतील. मोजून घे, पाहिजे तर." सुगुणा म्हणाली.

सुगुणा हे सर्व काय म्हणते आहे, चोराला कळेना. म्हातारीला वेडबीड तर नाही












लागले, असे देखील त्याला वाटल्याशिवाय राहले नाही. सुगुणा खाटेवरून उठली आणि दिवा लावीत म्हणाली–"अरे, काल नव्हतास का आलास तू? तूच ना तो? तो तर सर्वांना माझ्या पेटीचे गुपित सांगत फिरतो आहे. गावकरी माझा जीव घ्यायला येणार नाहीत का?"

चोराला पळून जावेसे वाटले. परंतु पुन्हां त्याने विचार केला, या बाईच्या बरळण्याने आपले काही नुकसान होणार नाही. ती म्हणते ते पेटीचे गुपित तरी काय आहे, पाहून घेऊ या, असा देखील त्याने विचार केला.

दिव्याच्या उजेडात चोराला पाहून सुगुणा म्हणाली–"तू तो चोर नाहीस! त्याने माझ्या पेटीचे गुपित तुला सांगितले असणार."

"नाही, मला कोणी नाही सांगितले, बाई! काय गुपित आहे पेटीचे?" चोराने विचारले.

"चल दाखविते." असे सांगून सुगुणाने आपली लाकडी पेटी उघडून दागिने व पैसे काढले आणि हिशोब लावल्यासारखे करून म्हणाली–"पाहिलेस, काल त्याने या पेटीत जे पैसे ठेवले होते त्यांचे दुप्पट झाले. आज रात्री येऊन तो घेऊन जातो म्हणाला होता. तो कां नाही आला, कोणास ठाऊक? मला वाटले तूच तो असशील, म्हणून तुला सगळे सांगून टाकले. एक दोघे चोर माझ्या घरी येत जात राहले की गावाच्या अधि-



काऱ्यांना ती गोष्ट कळेल आणि मग मला फांशी होईल. म्हणून सांगते, कोणाला ही गोष्ट सांगू नकोस. तुला पुण्य लागेल. तू आल्या वाटेने निघून जा. तो चोर लहान लहान चोऱ्या करून आणून माझ्या या पेटीत चोरीचा माल ठेवतो. त्याचा माल दुप्पट होतो आणि मला थोडा वांटा मिळतो. म्हणून कोणाजवळ हे गुपित सांगू नकोस."

चोराचा लोभ वाढला. तो सुगुणाला म्हणाला–"काकू, मला पण मदत करा. माझे धन दुप्पट करून दिलेततर तुम्हांला तुमचा वांटा देईन. मी हे गुपित कोणाला कळू देणार नाही. मी उद्या आपले सर्व धन आणून तुमच्या पेटीत ठेवून देतो आणि तुम्हांला कोणत्याही प्रकारचा त्रास होणार नाही, याची पूर्ण काळजी बाळगतो. माझ्या-वर विश्वास ठेवा."

"बाबा! तुला मी पहिल्यानेच पाहते आहे. गावकरी चोराला पकडण्यासाठी डोळ्यात तेल घालून बसले आहेत. तू आता म्हणतोस म्हणून तुला मी एकच एक संधी देते. नंतर तुझा माझा काही संबंध नाही. तू उद्यां ठीक या वेळी येऊन माझ्या पेटीत आपल्या वस्तू ठेवून लगेच निघून जा." सुगुणा म्हणाली.

चोर आनंदाने निघून गेला.

उजाडल्यावर सुगुणाने रात्री चोर येणार असल्याची गोष्ट व तिने त्याला कसे फसविले हे गावाच्या प्रमुख अधिकाऱ्याला कळविले. चोराला पकडण्यासाठी त्या अधिकाऱ्याने सर्व व्यवस्था करून ठेवली.

रात्री चोर आपले सर्व धन घेऊन म्हातारीकडे आला आणि त्याला अधि-काऱ्याने कैद केले.

दुसऱ्या दिवशी चोराजवळचा चोरीचा माल ज्याचा त्याच्याकडे पोचविण्यात आला आणि चोराला कडक शिक्षा करून म्हाता-रीला मोठे इनाम देण्यात आले.

त्या दिवसापासून गावात चोऱ्या बंद झाल्या.



# विदूषकाची चलाखी

एका राजाला घोड्याच्या शर्यतींची फार आवड होती. तो नेहमी घोड्यांच्या शर्यती लावी व जो येई त्याला बक्षिसे देई.

एकदा विदूषक राजाला म्हणाला–"महाराज, या खेपेस आपण अगदी निराळ्या तऱ्हेची शर्यत लावू या. जो घोडा सर्वांत मागे राहील त्याला बक्षिस मिळेल."

"अरे, मग घोडे पळणारच नाहीत आणि त्यात गंमत काय राहणार ?" राजाने विचारले.

"तसे नाही महाराज; घोडे पळतील अन् खूप पळतील. त्याची जबाबदारी मी घेतो." विदूषक म्हणाला.

राजाने घोडेस्वारांना बोलावून पळायला सांगितले व म्हणाला–"तुम्ही पळवा आपापला घोडा, जो घोडा मागे राहील त्याला बक्षिस मिळेल."

नंतर विदूषकाने घोडेस्वारांना जवळ बोलावून त्यांच्या कानात काहीतरी सांगितले.

काही वेळाने दोघे घोडेस्वार घोड्यांवर बसून घोडे पळवू लागले. एका विशिष्ट झाडापर्यंत जाऊन परत यायचे ठरले होते.

दोघे झाडापर्यंत जाऊन परतू लागले.

राजाने चकित होऊन विदूषकाला विचारले–"काय रे, तू त्या स्वारांना कानात काय सांगितलेस ?"

"मी त्यांना घोड्याची अदला बदल करायला सांगितली होती, महाराज !" विदूषक म्हणाला.





# तीनदां फसगत

एका गावी एक श्रीमंत शेतकरी रहात असे. त्याच्याकडे शेतातली कामे करायला एक नोकर होता. त्या नोकराचा मुलगा दर शुक्रवारच्या बाजाराला जाऊन शेतकरी जे ताक देई ते विकून पैसे घरी आणून देई. म्हणून त्या मुलाचे नाव 'ताकवाला पोऱ्या' असे पडले.

शेतकरी आपली गाडी घेऊन शुक्रवारच्या बाजाराला जात असे. ताकवाला पोऱ्या त्याच गाडीत ताकाचे मडके घेऊन जात असे. सर्व ताक विकल्यावर संध्याकाळी त्याच गाडीत घरी परत येत असे.

एका शुक्रवारी तो बाजारात ताक विकत असता एका उंच म्हातारीने त्याला ताक द्यायला सांगितले. मुलगा म्हणाला–"आजी मोठा पेला भरून घेतलास तर एक पावली द्यावी लागेल आणि लहान घेतलास तर चवली द्यावी लागेल."

"अरे पावली चवली नाही, फुकट दे." म्हातारी म्हणाली.

"म्हातारे माझ्याकडे फुकटाचा माल नाही मिळणार." ताकवाला पोऱ्या म्हणाला.

म्हातारीने जवळ येऊन मडक्यालाच हात घातला. पण मुलाने पळीने मारले म्हणून म्हातारी शिव्या देत निघून गेली.

संध्याकाळपर्यंत सर्व ताकाची विक्री झाली. ताकवाला पोऱ्या गाडीत मडके व पळी ठेवून शेतकऱ्याला म्हणाला–"तुम्ही पुढे व्हा, मी गावात जाऊन एक काम आहे ते करून येईन." आणि निघून गेला.

थोड्या वेळाने मुलगा गावात फिरून आपल्या गावाच्या वाटेने चालू लागला. थोडा वेळ चालल्यावर त्याच्या पाठीमागून कोणी तरी चालत असल्याचा भास झाला. तो वळून पाहणार इतक्यात त्या म्हातारीने त्याच्या तोंडावरून उपडे पोते टाकले व

श्री गोपाळ, ग. गोठाटे



त्या मुलाला बळजबरीने पोत्यात घालून पोत्याचे तोंड दोरीने घट्ट आवळून बंद केले.

तितक्यात म्हातारीला एक काम आठवले व तिने ते पोते रस्त्याच्या बाजूला सारून ठेवले आणि निघून गेली.

मुलगा पोत्यात अडकला होता. पण त्याचे डोके वेगाने चालू होते. कोणी तरी शीळ वाजवीत त्या वाटेने चालला होता. शीळ ऐकून मुलगा पोत्यांतून ओरडून म्हणाला—"अहो, मला या पोत्यातून सोडवतां का ?"

त्या मनुष्याने पोत्याचे तोंड सोडून मुलाला सोडविले. तो एक शिपाई होता. त्याने सर्व गोष्ट ऐकून म्हटले—"म्हातारीची [illegible] मोडला पाहिजे." दोघांनी मिळून पोत्यात ओल्या मातीचे गोळे भरून पुष्कळशी कांटेरी झाडे आत कोंबली आणि पोत्याचे तोंड बंद करून दोघे निघून गेले.

तासाभराने म्हातारी परत आली. पोते उचलून घेऊन निघाली. पोत्यातले काटे बोचत होते. त्या पोराला उद्देशून म्हणाली—"लबाडा! तू सुया टोचतो आहेस का मला? घरी गेल्यावर पाहते. तुझी पाठ मऊ करते पहा." शिव्या देत म्हातारी घरी गेली. पोत्याचे तोंड सोडून तिने खाटेवर पोते उलटे केले. तिचे सर्व अंथरूण खराब झाले.

दुसरा शुक्रवार आला. ताकवाला पोऱ्या मालकाच्या गाडीत ताकाचे मडके घेऊन बाजाराला निघाला. ताक विकून संध्या-काळी घरी परत येत असता वाटेत गाडीचा कणाच मोडला. मालक म्हणाला—"मी गावात जाऊन कणा दुरुस्त करून घेऊन येतो. तू येथेच थांब !" असे सांगून मालक गावात निघाला. मुलगा गाडीबाहेर गंमत पहात हिंडत होता.

तितक्यात कोठून तरी म्हातारी आली आणि तिने त्याच्या तोंडावर उलटे पोते टाकून त्याला पोत्यात कोंबून पोते घट्ट आवळून बांधून घेतले व घरी निघाली.



अर्धी वाट चालून गेल्यावर तिला वाटेत एका जागी भाजीचा मळा असल्याचे आठवले. मळयाच्या चारीबाजूला कांटेरी कुंपण होते. पण एका जागी एका माणसाला आत शिरायला पुरेसे भोक होते. त्या भोकातून आत शिरून भाजी आणली तर कोणाला कळणार सुद्धा नाही असा विचार करून म्हातारीने पोते डोक्यावरून खाली उतरून ठेवले आणि मळयात शिरली.

मुलाच्या सुदैवाने त्याच वेळी वाटेने कोणी तरी चालत जात असल्याची चाहूल त्याला लागली. मुलगा ओरडून म्हणाला—"अहो, मी पोत्यात बंद आहे, मला सोडविता का ?"

तो मनुष्य एक चोर होता. त्या माणसाने पोत्याचे तोंड सोडले आणि मुलाला बाहेर काढून त्याला सर्व गोष्टी विचारून घेतल्या. म्हातारीची खोड मोडली पाहिजे असे चोराला देखील वाटले. तसा विचार करून त्याने ओली माती व काही लहान मोठे दगड पोत्यात भरले. पोत्याचे तोंड बंद करून दोघे आपापल्या वाटेने निघून गेले.

म्हातारी पाले भाजी उपटून शेंगा तोडून घेऊन आली आणि पोते डोक्यावर घेऊन घरी निघाली. दगड तिला बोचत होते. ती ओरडून म्हणाली—"ए पोरा! तू गुडघ्या कोपरांनी किती ढुशी दिल्यास



तरी मी भिणार नाही." घरी पोचताच तिने आपल्या खाटेवर पोते उलटे केले. या खेपेस ही आपण फसलो, हे तिला कळले.

तिसरा शुक्रवार आला. या खेपेस ताकवाल्या पोऱ्याचा मालक जरा आधीच घराकडे निघाला. मुलगा सुद्धा गाडीत बसून निघाला. या वेळी त्याने एक सुरा-बरोबर ठेवून घेतला होता. म्हातारीला अद्दल घडेल असे काही तरी करण्याचे त्याने ठरविले होते.

अर्ध्या वाटेवर चिंचेची झाडे पाहून व चिंचा खूप लोंबत असलेल्या पाहून मालक नोकराच्या पोऱ्याला म्हणाला—"चल रे, चिंचा जमा करून घेऊन जाऊ या."

तोपर्यंत काळोख पडला नव्हता. दोघे चिंचा गोळा करू लागले. मुलगा, जवळ सुरा असल्यामुळे बेफिकीर होऊन चिंचा गोळा करीत होता. म्हातारी दबा धरून एका झाडाआड लपून बसली होती. तिने संधी पाहून मुलाच्या तोंडावर हात ठेवला आणि त्याला धरून पोत्यात कोंबले. नंतर ती त्याला उचलून गावाकडे निघाली.

म्हातारी घरी पोचली व एक सुरी घेऊन सहाणेवर पाजळवू लागली. नेमका त्या वेळी चुलीतला विस्तव विझू लागला होता. म्हणून धावत जाऊन तिने चुलीवरच्या भांड्यात भात होता त्याला कढ आला का पाहिले. पण पाणी गार होते. लवकर काटक्या घातल्या नाहीत तर विस्तव विझेल असा विचार करून ती काटक्या गोळा करायला धावली. इकडे घरात विस्तव अर्धवट पेटत होता आणि बाजूला पोत्यात टाकलेला पोऱ्या बंद होता.

मुलाने दार बंद झाल्याचा आवाज ऐकला. आपली सुरी काढून आतूनच पोते काढून टाकले आणि बाहेर आला. त्याने पोत्यात म्हातारीची भांडी, मडकी जे मिळालें ते सामान कोंबले आणि पोते बंद करून घराबाहेर आला. त्याने चुलीतले दोन तीन निखारे काढून घेऊन म्हातारीच्या झोपडीवर एका कोपऱ्यात ठेवून दिले आणि पळून गेला.

थोड्या वेळाने म्हातारी आली. आंतून कडी लावून घेऊन पहिल्याने तिने चूल चांगली पेटविली आणि नंतर पोत्याचे तोंड उघडून हातातली सुरी दाखवीत म्हणाली– "आतां कोठे जाशील बेट्या!" तिने पोते उलटे केले. त्यातून भांडी व मडकी खाली पडली. मडकी फुटून गेली. झोपडीला आग लागत असल्याची गोष्ट म्हातारीच्या लक्षात आली नाही. परंतु जेव्हां लक्षात आलें तेव्हां तिने हातातले सर्व सामान टाकून दिले आणि झोपडीबाहेर पळण्यासाठी दाराची कडी काढली. इकडे कडी काढायला आणि झोपडे पेटायला गांठ पडली. त्या गर्दीत म्हातारी जळून मेली की वांचली ते त्या परमेश्वरालाच माहीत.






दुर्योधनाचा गंधर्वांच्या हाती पराभव झाल्यावर पांडवांनी त्याला सोडविले. त्याला त्यात त्याचा फार अपमान वाटला. तो त्या मन:स्थितीत हस्तिनापुरला परतला. वाटेत त्याने एका सरोवराच्या काठी एक रात्रभर मुक्काम केला.

कर्ण पहिल्यानेच रणांगणातून पळून गेला होता. तो दुर्योधनाला त्या मुक्कामाच्या जागी जाऊन भेटला. परंतु गंधर्वांनी त्याला कैद केले होते आणि पांडवांनी त्याला सोडून आणले होते हे कर्णाला माहीत नव्हते. म्हणून तो म्हणाला–"दुर्योधना! तुझ्या पराक्रमाची प्रशंसा मी कोणत्या शब्दात करू? त्या दुष्ट गंधर्वांचा पराभव करून तू राजधानीला परतत आहेस नाही का? त्यांच्यासमोर मी तरी उभा राहू शकलो नाही. विकर्णाच्या रथात बसून मला पळून जावे लागले. तुझ्यासारखे पराक्रमी या जगात मिळणे शक्य नाही."

कर्णाच्या तोंडून ही स्तुति ऐकून दुर्योधनाचे दु:ख कमी होण्याऐवजी वाढले. त्याने कांपऱ्या आवाजात त्याच्यावर जो प्रसंग गुजरला होता तो थोडक्यात सांगितला आणि म्हणाला–"मी युद्धात जय मिळवून आलो असतो तर माझी कीर्ति वाढली असती व मेलो असतो तर मला वीरगति मिळाली असती. परंतु दोन्ही गोष्टी घडल्या नाहीत. पांडवांनी मला वांचवावे या अपमानाहून मोठा अपमान आणखी काय असू शकेल! आतां मी कोणत्या तोंडाने

३४. कर्णाचा दिग्विजय



हस्तिनापूरला जाऊ? मी बाबांना, द्रोणाचार्य व कृपाचार्यांना आणि अश्वत्थाम्याला काय जाऊन सांगू? मी अन्नत्याग करून जीव जाईपर्यंत येथेच रहावे म्हणत आहे. तू जा, हस्तिनापूरला. दुःशासनाला गादीवर बसव आणि तूच राज्य व्यवस्था कर." असे सांगून दुर्योधन व दुःशासन परस्परांना भेटले आणि लहान मुलासारखे रडू लागले.

त्या दोघां भावांना रडत असलेले पाहून कर्ण थोडासा चिडून म्हणाला—"अरे तुम्हांला रडायला काय झाले? रडल्याने दुःख वाढते व मानसिक शांति मिळत नाही. पांडवांनी तुला सोडविले त्याबद्दल दुःखी होण्याचे कारणच काय? ते तुझी प्रजा आहेत व राजाचे रक्षण करणे प्रजेचे कर्तव्य आहे. ते त्यांनी बजावले. त्यात तुझा अपमान कसला? तू आत्महत्या करायला गेलास तर तुझे मांडलिक राजे तुला भितरा म्हणतील आणि हसतील. तू पांडवांचे राज्य बळकावलेस व त्यांना वनवास दिलास तर ते आत्महत्या करायला गेले का?"

शकुनी दुर्योधनाला म्हणाला—"मी द्यूतात पांडवांचे राज्य जिंकून तुला दिले ते उपभोगल्याशिवाय तू आत्महत्या करावीस यासाठीच का?" परंतु दुर्योधनाच्या मनावर कोणात्याही म्हणण्याचा परिमाण झाला नाही व त्याने वल्कल वस्त्रे धारण करून अनशन सुरू केले.

देवांच्या हातून पराभव झाल्यावर राक्षस पाताळ लोकात जाऊन राहू लागले होते. त्यांना दुर्योधन अनशन करू लागल्याचे कळले. त्यांनी दुर्योधनाला आपल्याकडे आणण्यासाठी अथर्ववेदातले मंत्र म्हणून यज्ञारंभ केला. तेव्हां होमातून कृत्या नामक एक शक्ति जांभया देत बाहेर आली आणि विचारू लागली—"बोला! तुम्ही कशासाठी माझे आवाहन केले होते?"

राक्षस म्हणाले—"भूलोकात दुर्योधन अनशन करीत आहे. त्याला पाताळ लोकात घेऊन ये." त्याप्रमाणे ती कृत्या दुर्योधनाला पाताळ लोकात घेऊन आली.



दानवांनी दुर्योधनाला रात्रभर अनेक प्रकारे समजावून सांगितले. म्हणाले—"दुर्योधना! तू क्षत्रिय वीर आहेस. तुझे मांडलिक राजे एकाहून एक शूर व साहसी आहेत. पण तू क्षत्रियधर्म सोडून अनशन करू लागलास हे का? त्यामुळे तुला विनाकारण आत्महत्येचे पाप मात्र लागेल. तुला सुख व कीर्तिपण मिळणार नाही. आतां आम्ही एक गुपित तुला सांगतो. आम्ही शंकराचा वर मिळवून वज्रासारखा तुझ्या देहाचा वरचा भाग आणि जगदंबेच्या कृपेने तुझ्या शरीराचा खालचा भाग निर्मिला. म्हणून तू सामान्य मानव नसून देवतुल्य आहेस. युद्धात तुझ्या बाजूने युद्धाला आलेले सर्व वीर आमचेच अंश आहेत. म्हणून तुला काळजी करण्याचे कारण नाही." अशा तऱ्हेने राक्षसांनी दुर्योधनाच्या मनाचे सांत्वन करून त्याला परत भूलोकात पोचते केले. कृत्या दुर्योधनाला पोचवून निघून गेली.

दुर्योधनाची झोप मोडली तेव्हां त्याला रात्री घडले ते सर्व स्वप्न असावेसे वाटले. पण तो त्याविषयी कोणाजवळ काही बोलला नाही. या खेपेस कर्णाने दुर्योधनाचे मन सहजी वळवून घेतले. नंतर दुर्योधन आपल्या अनुयायांसह, जणुंकाही रानात अशुभ असे काही घडलेच नाही, अशा तऱ्हेने आनंदाने हस्तिनापूरला परत आला.



हस्तिनापुरात दरबार भरला असता भीष्माचार्यांनी सर्वांसमक्ष दुर्योधनाला विचारले—"आम्ही तुला नको सांगितले असूनही तू घोषयात्रेला गेलास आणि काय मिळवून आलास? अपकीर्ति आणि अपमान! युधिष्ठिर होता म्हणून तुला सुटका मिळाली. त्याने औदार्य दाखविले म्हणून हे झाले. तू कर्णाच्या गप्पा ऐकून तू त्या थोरपुरुषाशी शत्रुत्व विकत घेतलेस. तू ज्या कर्णाला आपला मित्र समजतो आहेस तो तुला गंधर्वांच्या हातात सोपवून स्वतःचा जीव वांचविण्यासाठी पळून गेला होता. निदान आतां तरी पांडवांशी सख्य कर."



ते ऐकून दुर्योधन मोठ्याने हसला आणि दुःशासन, शकुनी व कर्णाला घेऊन राज्य सभेतून उठून निघून गेला. परंतु भीष्म म्हणाला ते ऐकून कर्णाला अपमान वाटला. तो दुर्योधनाला म्हणाला—"राजा, मला आता एक मोठें सैन्य दे. मी पांडवांनी जिंकलेली सर्व राज्ये जिंकून आपला पराक्रम दाखवितो. तेव्हां त्या म्हाताऱ्याला माझ्या पराक्रमाची थोडी फार कल्पना येईल." कर्ण म्हणाला ते दुर्योधनाने मान्य केले.

कर्ण दुर्योधनाने दिलेले चतुरंग सैन्य घेऊन दिग्विजयाला निघाला. सर्व प्रथम त्याने द्रुपदाला जिंकले व मोठी खंडणी वसूल केली. नंतर पूर्वेकडील अंग, वंग कलिंग, मत्स्य, कोशल इत्यादि राज्ये जिकीत दक्षिणेकडे वळला आणि दक्षिणेकडील सर्व राज्ये जिंकली. कंडिनपुरचा राजा रुक्मि व त्याचे मित्र राजें यांनी कर्णाशी सख्य करून पांडवांविरुद्ध सर्व प्रकारे मदत करण्यास वचन दिले. अशातऱ्हेने दिग्विजय करून व अपार संपत्ति घेऊन कर्ण हस्तिनापूरला परत आला.

दुर्योधनाने कर्णाचे अभिनंदन केले व म्हणाला—"तू मला जी मदत केलीस तेवढी मदत मला भीष्म, द्रोणादिकांकडून देखील मिळाली नाही. तुझ्यासारखा सखा मला या जगात दुसरा कोणी नाही."

कर्णाने दिग्विजय केल्यावर दुर्योधनाच्या मनात राजसूय यज्ञ करण्याची इच्छा उत्पन्न झाली. त्यासाठी आवश्यक सर्व तयारी त्याने सुरू केली. ऋत्विजांना बोलावून म्हणाला—"राजसूय यज्ञासाठी सर्व आवश्यक यज्ञसामुग्री तयार करा."

परंतु ऋत्विज म्हणाले—"तू पांडवांचा पराभव केलास तरच तुला हा यज्ञ करता येईल. या शिवाय वडील जिवंत असेपर्यंत तुला हा यज्ञ करण्याचा अधिकार नाही. ते असेपर्यंत तुला चक्रवर्ती पद कसे काय मिळेल? राजसूय यज्ञासारखा वैष्णव नामक दुसरा एक यज्ञ आहे. पाहिजे तर तू तो यज्ञ कर."

दुर्योधनाने ती गोष्ट [illegible] बंधु आणि कर्णशकुनी इत्यादिकांस सांगितली. त्यांनी ऋत्विजांच्या सल्ल्याप्रमाणे करावयास सांगितले. त्याप्रमाणे यज्ञाची सर्व तयारी झाली. राजधानीच्या बाहेर यज्ञवेदिका तयार करण्यात आली. पांडवांकडे निमंत्रण देण्यासाठी दुर्योधनाने एक दूत पाठविला.

युधिष्ठिर त्या दूताला म्हणाला—"दुर्योधनाने हा यज्ञ रचला आहे त्याबद्दल आम्हांला अपार आनंद होत आहे. तो यज्ञ पाहण्याची आमची फार इच्छा आहे, परंतु आम्ही यज्ञ पाहण्यासाठी हस्तिनापुरी आलों तर वनवासाचे व्रत भंग होईल. म्हणून आम्हांला इच्छा असूनही या यज्ञ-प्रसंगी हजर राहता येणार नाही."

त्यानंतर भीम म्हणाला—"आमचा वनवास संपल्यावर आम्ही एक महायज्ञ करणार आहो व त्यात दुर्योधनादिक कौरव व त्यांची मित्र मंडळी यांची आहुती देणार आहो. त्या यज्ञाला मी हजरराहणार आहे, एवढे तुम्ही आपल्या राजाला जाऊन सांगा."

दुर्योधनाचा वैष्णव यज्ञ यशस्वीपणे पार पडला. कर्ण दुर्योधनाचे अभिनंदन करून म्हणाला—"मी पुढल्या युद्धात पांडवांचा वध करून तुझ्या करवी राजसूय यज्ञ करवीन."

पांडव द्वैत वनात बरेच दिवस राहाले. ते नित्यमितपणे शिकार करीत. म्हणून



जंगलात रानटी श्वापदांची संख्या कमी होऊ लागली. हे पाहून युधिष्ठिर पांडवांना घेऊन पुन्हां काम्यक वनात येऊन राहू लागला. कंदमुळे व फळे हाच त्यांचा मुख्य आहार होता.

अशातऱ्हेने पांडवांच्या वनवासाची अकरा वर्षे संपली. युधिष्ठिराला आपल्या चुकीबद्दल फार पश्चात्ताप वाटू लागला. आपण द्यूत खेळलो नसतो तर वनवास भोगावा लागला नसता. द्रौपदी व आपली भावंडे यांना नाना प्रकारच्या यातना सहन कराव्या लागल्या. भविष्यकालासंबंधीपण युधिष्ठिराला आत्मविश्वास वाटत नाहींसा झाला. सर्व पांडवांचा वध करण्याची कर्णाने दुर्यो-



धनासमोर प्रतिज्ञा केली होती. या सर्व गोष्टींमुळे युधिष्ठिराला रात्री शांतपणे झोपसुद्धा येत नव्हती.

पांडव काम्यक वनात असतां व्यास मुनी त्यांना भेटण्यासाठी आले. पांडवांना वाळलेले व अशक्त झालेले पाहून महर्षींना फार वाईट वाटले. त्यांचे आवश्यक सांत्वन करून व्यासांनी पांडवांना धीर दिला आणि म्हणाले–"तेरा वर्षांचा वनवास व अज्ञातवास संपल्यावर पुन्हां तुम्हांला राज्यप्राप्ती होईल." असे सांगून व पांडवांना आशीर्वाद देऊन व्यासमुनींनी पांडवांचा निरोप घेतला.

तिकडे पांडवांना नाना प्रकारचे कष्ट रानात सहन करावे लागत होते व इकडे दुर्योधन, कर्ण व शकुनी पांडवांना जास्त जास्त त्रास देण्याच्या योजना करीत होते.

त्याच सुमारास दुर्वास ऋषी आपल्या दहा हजार शिष्यांसह हस्तिनापूरला आले. दुर्वास ऋषी स्वभावाने फार क्रोधी म्हणून प्रसिद्धच होते. त्यांच्या आतिथ्य सत्कारात थोडी उणीव जरी राहली तर ते शाप देत असत. म्हणून दुर्योधन व त्याच्या भावंडांनी दुर्वास ऋषींच्या आतिथ्य सत्काराची जबाबदारी जातीने आपल्यावर घेतली. दुर्वास ऋषींनी दुर्योधनाची अनेक प्रकारे परीक्षा घेऊन पाहिली. कधी ते अचानक म्हणत–"राजन्! मला फार भूक लागली आहे. लवकर जेवणाची तयारी करव. आम्ही स्नानादि आटोपून येतो." असे सांगून जात आणि पुष्कळ वेळ परत येत नसत. परत आल्यावर भूक नसल्याचे सांगत.

कधीकधी मध्य रात्रीच्या सुमारास उठून सांगत–"आम्हां सर्वांना फार भूक लागली आहे आणि जेवण वाढल्यावर 'भूक नाही' असे सांगत. कधी कधी दटावून सांगत–"हे काय खाणे झाले?" आणि पानावरून उठून निघून जात. इतका त्रास त्यांनी दिला तरी दुर्योधनाने सर्व शांतपणे सहन करून त्यांची सेवा केली. दुर्योधन परीक्षेत पूर्णपणे उतरल्यावर दुर्वास ऋषी प्रसन्न होऊन म्हणाले–"राजा! मी तुझी सेवावृत्ति

पाहून संतुष्ट झालो आहे. तुला काय वाटेल ते मागून घे."

दुर्योधनाला ते ऐकून परमानंद झाला. दुर्वास ऋषींनी शाप दिला नाही याबद्दल त्याच्या मनाचे फार समाधान झाले. नंतर त्याने दु:शासन, शकुनी व कर्ण यांचा सल्ला घेऊन मुनींजवळ आपली इच्छा प्रगट केली. म्हणाला—"मुनिवर्य! धर्मपरायण युधिष्ठिर काम्यक वनात वनवास करीत आहे. त्याच्या बरोबर त्याचे भाऊ, पत्नी द्रौपदी व ब्राह्मणपण रहात आहेत. आपण त्यांना दर्शन देण्यास जावे व पांडवांना अतिथि-सत्काराचा मान द्यावा. आपण सशिष्य काम्यक वनात जाऊन त्यांना दर्शन द्यावे."

दुर्वास दुर्योधनाच्या सांगण्याप्रमाणे काम्यक वनात जायला निघाले. पांडव दुर्वास ऋषींचा आतिथ्य सत्कार करू शकले नाहीत, म्हणजे त्यांना राग येईल व ते त्यांना चांगला शाप देतील असे दुर्योधनाला वाटले. कर्णाने दुर्योधनाला तसा वर मागण्यास सांगितले होते.

ज्या दिवशी दुर्वास ऋषी काम्यकवनात पांडवांकडे आले त्यादिवशी द्रौपदी सर्वांना जेवायला वाढून आणि स्वत: जेवून नुकतीच विश्रांति घेण्यासाठी थोडी आडवी झाली होती.

युधिष्ठिर आपल्या भावंडांबरोबर दुर्वास-ऋषींच्या स्वागतासाठी सामोरा गेला. ऋषींना नमस्कार करून तो म्हणाला—"मुनिवर्य! आपण सशिष्य आमचे आतिथ्य स्वीकारावे."

दुर्वास ऋषींनी, या वनात युधिष्ठिर आपल्या दहा हजार शिष्यांसह सर्वांचा सत्कार कसा काय करील या गोष्टीचा थोडा देखील विचार केला नाही व लगेच होकार दिला. पांडवांनी त्यांना गंगेवर स्नानादि आटोपून यांवयास विनंति केली.

दुर्वास ऋषी स्नानास निघून गेल्यावर इतक्या सर्व लोकांना जेवायला कसे वाढाव-याचे हे द्रौपदीला कळेना. तिने कृष्णाचा धावा केला.





# शिवपुराण

[ ११ ]

शंकर पार्वतीच्या विवाहाला आलेली सर्व पाहुणेमंडळी निरोप घेऊन आपापल्या गावी निघून गेली. नंतर शंकर नंदीला म्हणाला—"आम्ही दोघे विश्राम करणार आहों, म्हणून तू माझे निवास स्थान सजवून ठेवण्याची व्यवस्था कर.

नंदीने सर्व गणप्रमुखांबरोबर शंकराचे निवासस्थान स्वच्छ करून त्यात सुगंधी द्रव्यें शिंपडली. नंतर जागोजागी मोती हिरे यांचा चूर मिसळून रांगोळी घालविण्याची व्यवस्था केली. फुले, पाने व मोहोर आणून दारे खिडक्यांना तोरणे बांधविली. भितींवर सुरुचिपूर्ण चित्रें काढविली आणि निरनिराळी फळे व स्वास्थ्यकर पेयें यथास्थान ठेवून दिवाबत्तीची यथोचित व्यवस्था करून शयनगृह सजविले.

नंदीने शंकराला कळविले की शैयागृह सजवून तयार ठेवण्यात आले आहे. तेव्हां शंकर नंदीला व गणवृंदांना म्हणाला—"आतां आम्ही विश्रांति घ्या-यला जात आहों तेव्हां कोणाला आजूबाजूला किंवा आत येऊ देऊ नका, आमची झोप मोडतां कामा नये. चारी-बाजूला पाहरा ठेवा!" असे सांगून शंकर पार्वतीसह विश्राम करायला शयन-गृहात गेला.

तिकडे तारकासुर देवांना फार त्रास देऊं लागला. त्यांनी ब्रह्मदेवाकडे आपले गाऱ्हाणे नेले. म्हणाले—"हे देवाधिदेवा ब्रह्मदेवा! तू तारकासुराला जो वर दिला

शेवटच्या मलपृष्ठावरील चित्र



त्यामुळे आम्हांला निरनिराळ्या प्रकारे यातना सहन कराव्या लागत आहेत. त्याला ठार केल्याशिवाय आम्हांला शांति मिळणार नाही. तरी त्याला ठार करण्याचा काही तरी उपाय कर."

ब्रह्मदेव देवांना धीर देत म्हणाला–" मी तारकासुराला वर देऊन त्याला अजिंक्य केले हे खरे आहे. पण वर दिला नसता तरी भागले नसते. तप करणारा मग तो सुष्ट असो किंवा दुष्ट असो त्याला वर देणे भाग आहे. दुष्टाला वर दिला नाही तर तो तपश्चर्या करणे सोडील का? तपश्चर्येमुळे उत्पन्न होणारा ताप त्रिलोकाला भस्म करील. त्रिलोकाच्या रक्षणासाठीच वर द्यावा लागतो. वर मिळविणारा त्याचा दुरुपयोग करतो, तेव्हां त्याचे पारिपत्य करावे लागते. चला, विष्णूकडे जाऊन त्याचा सल्ला घेऊ या."

सर्व देव विष्णूकडे गेले व तारकासुराच्या अत्याचाराचे वर्णन करून त्याचे पारिपत्य करण्यास उपाय सुचविण्यास सांगितले. विष्णु म्हणाला–" पार्वती परमेश्वर विवाहित झाले आहेत. त्यांना मुलगा होईल तेव्हां तुमची इच्छा पूर्ण होईल."

" शंकर पार्वतीचा विवाह होऊन पुष्कळ काळ लोटला. त्यांना आमच्या स्थितीची कल्पना करून द्यावी." देव विष्णूला म्हणाले.

विष्णु ब्रह्मदेवाला व देवांनाबरोबर घेऊन कैलास लोकी गेला. शंकराच्या आज्ञेने नंदीकडे कडक पाहरा होता. विष्णु नंदीला म्हणाला–"आम्ही शंकराच्या दर्शनाला आलो आहो. आम्हांला आत जाऊ दे."

"पार्वती परमेश्वर एकांतात आहेत. आंत कोणाला प्रवेश देऊ नये अशी प्रभूची आज्ञा आहे. त्यांची आज्ञा मोडणे आम्हांला कसे शक्य होईल? तेव्हां क्षमा करावी." नंदी म्हणाला.

विष्णु व इतर देव ज्या कामासाठी आले होते त्यात विघ्न आले. म्हणून विष्णु देवांना म्हणाला–"तुम्ही शंकाराचे पार्थिव लिंग तयार करून पंचाक्षरी मंत्राचा जप करीत त्याची आराधना करा. शंकर प्रसन्न होऊन तुम्हांला दर्शन देईल. तेव्हां जे निवेदन करावयाचे असेल ते करतां येईल. तुम्हीं नक्कीच यशस्वी व्हाल, यात शंका नाही." विष्णू म्हणाला.

देवांनी पार्थिव लिंग तयार केले आणि सर्व मिळून "हर हर महादेव, शंभो!" असा जयघोष करू लागले.

शंकर भक्तांच्या हाकेला पावला. तो धावत बाहेर येऊन म्हणाला– "देव हो! तुम्ही कशासाठी माझे एवढे स्मरण केलेंत? बोला, काय पाहिजे?"

ब्रह्मदेवादिक देव म्हणाले–"हे शंकर! तारकासुराच्या वधासाठी तू स्वतःची एक सृष्टि कर."

ते ऐकून शंकराने आपले वीर्य अग्नि कुंडात सोडले. पार्वतीला राग आला व तिने देवांना अपत्य प्राप्ति न होणार, असा शाप दिला.

शंकराचे वीर्य पडल्याने अग्नि घाबरून गेला. तो ताप त्याला असह्य झाला. त्यात



सप्त ऋषींनी भक्तिपूर्वक होम करून पूर्णाहुति दिली.

त्या वेळी अग्नि सप्त ऋषींच्या पत्नींना पाहून त्यांच्या विरहाने दुःखी झाला. अग्नीची पत्नी स्वाहा हिला ती गोष्ट कळली. ती प्रत्येक मुनिपत्नीरूपें अग्नीस भेटली. परंतु तिला अरुंधतीचे रूप घेतां येईना. म्हणून स्वाहाने त्या वीर्याचे सहा भाग करून ते आपल्या पोटात धारण केले. तिला फार कळा सोसाव्या लागल्या. म्हणून तिने आपल्या गर्भातला अंश कैलास शिखरावर टाकला. तो अंश वायूने गंगेत सोडला. गंगेत तो अंश यथासमयीं पूर्ण वाढ झाल्यावर मार्गशीर्ष षष्ठीला

धनिष्ठा नक्षत्रावर एक शिशुरूपे प्रगट झाला. त्या मुलाला सहा तोंडे व बारा हात होते व वज्राचा देह होता.

सर्वत्र अशी किंवदंती पसरली की सहा मुनि पत्नींना अग्नीच्या कृपेने हा मुलगा झाला. ते ऐकून मुनींनी आपापल्या पत्नींचा त्याग करण्याचे ठरविले. तेव्हां स्वाहाने मुनींना वस्तुस्थिति समजावून सांगितली. तिच्या बोलण्याकडे दुर्लक्ष केले आणि मुनींनी मुनिपत्नींचा त्याग केला.

मुनिपत्नींनी गंगाकाठी जाऊन षण्मुख असलेला तो शिशु पाहिला. त्यांना पान्हा फुटला आणि त्या शिशूने सहा मुनिपत्नींचे स्तनपान केले.

ब्रह्मदेवाने स्वतः जाऊन त्या मुलाची जन्मकुंडली तयार केली आणि त्या मुलाचे नामकरण केले. तोच कुमारस्वामी, षण्मुख, स्कंध इत्यादि नावांनी प्रसिद्ध झाला.

मुनिपत्नींनी त्या मुलाला विचारले— "बाळा! आमच्या पतींनी आम्हांला घराबाहेर काढले आहे, आतां, आमचे कसे व्हायचे?"

कुमारस्वामी म्हणाला—"मी तुमचा मुलगा आहे! तुम्ही माझ्या माता आहांत. म्हणून तुम्ही माझ्या बरोबर रहा."

कुमारस्वामी दिवसेंदिवस वाढू लागला. तो डोंगराळ प्रदेशात हिंडे फिरे. वाघावर किंवा सिंहावर बसे व त्यांच्याशी खेळे. त्याला शंकराचे धनुष्य मिळाले. त्याने त्यावर बाण चढवून क्रौंच पर्वताचे शिखर तोडले. ते पाहून त्या पर्वतावर राहणारे राक्षस कुमारस्वामीला मारायला धावले. कुमारस्वामीने सर्वांचा संहार केला.

तिकडे शंकरपार्वतीस एकवीस मुले झाली. ते अन्यान्य गणांचे मूळपुरुष होऊन गणाधिपति झाले.





# १२१. प्राचीन ग्रीस देशांतील खेळ

ग्रीक लोकांनी व्यायाम व क्रीडांचा प्रारंभ केला असे सांगतात. खाली जे शिल्पकलेचे चित्र आहे त्यात मल्लयुद्ध, कुत्र्या मांजरांचे युद्ध, चेंडू व हॉकीचा खेळ कोरलेला आहे.





# अमरवाणी

अयं निज: परोवेति गणना लघुचेतसाम्,
उदार चरितानाम् तु वसुधैव कुटुंबकम् । ॥ १ ॥

[संकुचित विचार व वृत्तीच्या माणसांच्या मनात आप-पर हा भाव असतो. (परंतु) उदार हृदयाची जी माणसे असतात त्यांना सर्व जगच कुटुंबासारखे, "विश्वची माझे घर"—वाटते.]

प्रत्यहं प्रत्यवेक्षेत नरश्चरित मात्मन:,
किं नु मे पशुभि स्तुल्यं, किं नु सत्पुरुषै रिति ॥ २ ॥

[मनुष्याने दररोज त्याचे वागणे पशुसारखे आहे की सत्पुरुषासारखे हे आत्मनिरीक्षण करून पहावे.

सद्भि रेव सहासीत, सद्भि: कुर्वीत संगतिम्,
सद्भि विवादं मैत्री च; नासद्भि: किंचिदाचरेत् ॥ ३ ॥

[सज्जनांबरोबर उठावे बसावे, त्यांच्याशी मैत्री करावी, (पाहिजे तर) भांडावे; (परंतु) दुष्ट माणसाजवळ (त्याच्या वाऱ्याला देखील) जाऊ नये.]

गुणं पृच्छस्व, मा रूपं, शीलं पृच्छस्व, मा कुलम्
सिद्धिं पृच्छस्व, मा विद्यां; भोगं पृच्छस्व, मा धनम् ॥ ४ ॥

[माणसाच्या गुणाची पारख करावी, रूपाची नाही; त्याचा शील स्वभाव पहावा, जात विचारू नये; त्याची सिद्धी पहावी, विद्या नाही; धनाचा विनियोग कसा केला हे पहावे, किती धन आहे, हे पाहू नये.]



# नकलेचा परिणाम

एका गावी शिवरामशास्त्री नावाचे एक वैद्यबुवा होते. त्यांच्या हाताला गुण होता. रोग कितीही जुना मुरलेला असला तरी ते बरा करीत. म्हणून त्यांची कीर्ति जवळपासच्या पंचक्रोशीत होती.

शिवरामशास्त्र्यांच्या गावीच कामशास्त्री नावाचे एक गृहस्थ रहात असत. लोक शिवरामशास्त्र्यांना देवासारखे मानतात व ते मृत्यूच्या तोंडातून रोग्याची सुटका करतात हे कामशास्त्र्याने पाहिले होते. म्हणून आपण सुद्धा वैद्य व्हावे व कीर्ति मिळवावी असे त्याला वाटू लागले.

म्हणून कामशास्त्री एक दिवशी सकाळी उठला आणि शिवरामशास्त्र्यांच्या घरी गेला आणि त्यांना नमस्कार करून म्हणाला— "वैद्यबुवा, मलादेखील वैद्यकी शिकावीशी वाटते. मला आपला शिष्य करून घेऊन वैद्यकी शिकविण्याची कृपा करावी."

ते ऐकून शिवरामशास्त्री म्हणाले—"बरा आलास बुवा. मी तरी उतारवयामुळे सर्व काम करू शकत नाही. देवानेच तुला माझ्याकडे पाठविले." असे सांगून शिवरामशास्त्र्यांनी कामशास्त्रीला आपला शिष्य करून घेतले. त्या दिवसापासून कामशास्त्री वैद्यबुवांच्या घरीच राहू लागला.

शिवरामशास्त्री आपल्या रोग्यांना जी औषधे देत ती स्वत: तयार करून देत. त्या वेळी कामशास्त्री त्यांच्या मदतीला असे. हळूहळू शिवरामशास्त्री वैद्यक शास्त्राचे सर्व गुपित आपल्या शिष्याला सांगू लागले.

एक दिवशी शिवरामशास्त्री कामशास्त्र्याला बरोबर घेऊन एका रोग्याला पहायला गेले. वैद्यबुवांना पाहताच रोगी खाटेवर उठून बसला.

शास्त्रीबुवांनी रोग्याची नाडी पाहिली आणि विचारले—"तू मी सांगितल्याप्रमाणे










पथ्य पाळले नाहीस तर औषधाचा काय उपयोग होईल? तुला बरे व्हायचे आहे की नाही?"

"वैद्यबुवा! आपण दिलेले औषध मी नियमितपणे घेत आहे. आपण सांगितल्या-प्रमाणे पथ्य पण पाळीत आलो आहे." रोगी म्हणाला.

शिवरामशास्त्र्यांनी त्याला दटावून विचारले—"मी तुला ऊस खाऊ नकोस म्हणून सांगितले होते, तू कां खाल्लास?"

"चुकलो वैद्यबुवा! तोंड कडूकडू वाटू लागले म्हणून दोनतीन कर्वे खाल्ले." रोगी म्हणाला.

"सावध रहा अशा वस्तूंना हात लावू नकोस." असे सांगून वैद्यबुवा निघून गेले.

गुरुजींची हुशारी पाहून कामशास्त्री थक्क झाला. त्याने गुरुजींना विचारले—"गुरुजी! नुसती नाडी पाहून रोग्याने काय खाल्ले हे कळते कां?"

शिवरामशास्त्री स्मित करून म्हणाले—"अरे, वैद्याने रोग्यावर प्रभाव पाडण्या-साठी थोडा अनुभव लागतो. आपण रोग्याच्या घरी गेलो होतो तेव्हां त्याच्या खाटेखाली कर्व्यांचा चोथा दिसला. म्हणजे त्याने ऊस खाल्ला होता. या गोष्टी फक्त पुस्तके वाचून लक्षात येत नाहीत. समजले का?"

कामशास्त्र्याला वाटले की वैद्यकशास्त्राचे गुपित हाती लागले. दुसऱ्या दिवशी काम-शास्त्र्याला एका रोग्याच्या घरी जावे लागले तेव्हां रोगी गवताच्या एका ढिगाजवळ खाटेवर बसला होता.

कामशास्त्र्याने रोग्याच्या नाडीवर हात ठेवून रोग्याला दटावून विचारले—"काय रे तुला बरे व्हायचे आहे की नाही? गवत खाल्लेस तर बरा कसा काय होशील?"

रोग्याला राग आला आणि तो काठी घेऊन कामशास्त्र्याला मारायला धावला.

ती गोष्ट शिवरामशास्त्र्यांना कळली तेव्हां त्यांनी कामशास्त्र्याला रागावून कायमचा निरोप दिला.





# दैवी वीणा

एका गावी शंकरशास्त्री नावाचे एक गृहस्थ राहात असत. संगीत शास्त्राची त्यांना फार आवड होती. इतकी की काम करीत असतां देखील ते गात असत. परंतु ते गाऊ लागले की त्यांची बायको खदखदां हसू लागे. बायको हसली की शास्त्रीबुवांच्या मनाला फार वाईट वाटे. म्हणून घरात बायको असे त्या वेळी ते गात नसत.

एकदां शंकरशास्त्र्यांची बायको माहेरी गेली. संध्याकाळी शंकरशास्त्री सैंपाकाला लागले. सैंपाक करता करता ते तल्लीन होऊन गाणेपण गाऊ लागले. नेमके त्या वेळेला कोणी बाहेर आले आणि दरवाजा ठोठावला. शंकर शास्त्र्यांनी दार उघडून पाहिले. कोणी तिघे प्रवासी दारात उभे होते. खूप दमून गेलेले दिसत होते.

त्या तिघांपैकी एक जण म्हणाला—"हे पहा, आम्ही फार दुरून पायी प्रवास करीत आलो आहों. आम्हांला फार भूक लागली आहे. रात्री थोडे काही खायला व थोडी जागा झोपायला मिळाली तर आम्ही आपल्या वाटेने उजाडतांच निघून जाऊ."

"त्यात काय मोठेसे? या, आत या. थोडी अडचण आहे, मंडळी आज घरी नाहीत. मीच सैंपाक करून वाढतो. आपण तेच गोड करून घ्या म्हणजे झाले. मंडळी असती तर काही तरी गोड धोड करून वाढलेच असते." शंकरशास्त्री म्हणाले.

शास्त्रीबुवा सैंपाकाला लागले आणि पाहुणे मंडळी गप्पा मारायला बसली.

पाहुण्यांपैकी एकाने विचारले—"आपण काहीतरी गात होता. आम्ही आल्याने आपल्या गाण्यात विघ्न आले. म्हणा गाणे, आम्हांला आनंदच होईल."

शंकर शास्त्र्यांना आश्चर्य वाटले. त्यांचे गाणे ऐकून त्यांची बायको हसत होती

आणि या मंडळींना ते आवडले कसे? म्हणून म्हणाले–"नाही हो, असाच गुण-गुणत होतो. म्हणण्यासारखे आणि ऐकण्या-लायक गाणे मला येत नाही."

"असे काय म्हणतां? तुमचा आवाज काय सामान्य आहे? एक दोन गाणी म्हणाल तर खरे." पाहुणे म्हणाले.

ते ऐकून आनंदून जाऊन शास्त्रीबुवांनी एकच काय कित्येक गाणी म्हटली.

सैंपाक झाल्यावर चौघांनी जेवून घेतले. एक पाहुणा म्हणाला–"ही वेळ उपाशीच काढावी लागणार असे वाटले होते आम्हांला. पण आपल्या कृपेने पोटभर जेवायला मिळाले. आपल्या मनात अपूर्ण राहलेली अशी काही इच्छा असल्यास सांगावी.

प्रयत्न केले.

शंकरशास्त्री संकोच करीत म्हणाले–"संगीत शास्त्राची माहिती नसलेल्या माण-साने वाजविली तरी चांगली वाजेल अशी एखादी वीणा जवळ असावी असे कितीदां माझ्या मनात आले. परंतु अशी वीणा असणार कोठून आणि मिळणार कशी?" शास्त्रीबुवांनी असे म्हणत एक सुस्कारा सोडला.

"त्या भिंतीवर टांगलेली वीणा तुमचीच का?" प्रवाश्यांनी विचारले.

शंकरशास्त्र्यांनी चकित होऊन भिंतीकडे पाहिले तर खरोखरच एक वीणा भिंतीला टांगलेली दिसली. त्यांनी ती वीणा काढून

काम केलेले होते. शंकरशास्त्र्यांनी तिच्या तारांवर सहज बोट फिरवून वाजवून पाहिले तर 'ओंकार' ऐकू येऊ लागला.

शास्त्रीबुवा त्या वीणेच्या तारा वाजवून पाहण्यात तल्लीन होऊन गेले. प्रत्येक वेळी नवीन काहीतरी ऐकू येई. प्रवासी काही बोलल्याशिवाय निघून गेले, शास्त्रीबुवांना कळलेदेखील नाही.

एकदां शंकरशास्त्री वीणावादनात तल्लीन होऊन बसले असतां त्यांची मंडळी माहेरहून परतली. त्यांच्याबरोबर शेजार-पाजारची मंडळी पण आली. शास्त्रीबुवांचे वीणावादन ऐकून यावेळी त्यांची मंडळी

हसली नाहीत. सर्व तल्लीन होऊन गाणे ऐकू लागले.

शंकरशास्त्रांनी त्यांना ती वीणा कशी मिळाली, हे थोडक्यात सर्वांना सांगितले. गावकरी म्हणाले–"म्हणजे ती पाहुणेमंडळी सामान्य नव्हती. देवलोकातली मंडळी होती. ही दैवी वीणा तुम्हांला मिळाली आहे."

त्या दिवसापासून शंकरशास्त्री गाव-कऱ्यांनी नुसते विचारले की वीणा घेऊन वाजवायला बसत.

काही दिवसांनी गोविंदराव नावाचे एक गृहस्थ शंकरशास्त्र्यांकडे आले. त्यांना संगीत शास्त्राचे चांगले ज्ञान होते. ते इतरांसमोर शंकरशास्त्र्यांच्या गायन वादनाची टीका





करीत. म्हणत–"अहो, शंकरशास्त्र्यांना संगीतशास्त्र कशाशी खातात हे तरी माहीत आहे का? काही तरी गातात आणि काहीतरी वाजवतात. तालसुराच्या नावाने शून्य." म्हणून शास्त्रीबुवांना गोविंदरावांचा थोडा राग आला. एकदा गावकऱ्यांबरोबर गोविंदराव शास्त्रीबुवांची वीणा ऐकायला आले. तेव्हां शास्त्रीबुवांनी गोविंदरावांना विचारलेच–"काय हो, तुम्ही आमच्या घरी कशासाठी आला आहांत?"

"सर्वांनी तुमच्या संगीत विद्वत्तेची वाखाणणी केली म्हणून आलो होतो, तुमचे गाणे ऐकायला." गोविंदराव म्हणाले.

"अस्सं, बसा तर. मी गाणे म्हणतो आणि वाजवितो." असे सांगून शंकर-शास्त्र्यांनी वीणा घेऊन एक करुणरस प्रधान राग वाजविला. त्यांच्या वीणेतून तो राग निघाला म्हटले तर जास्त बरोबर होईल.

थोड्या वेळाने गोविंदरावांच्या डोळ्या-तून अश्रुधारा वाहू लागल्या व हळूहळू त्यांचे मन दु:खसागरात बुडी मारू लागले.

[illegible] शास्त्री-बुवांना ते जणुकाही ऐकूच आले नाही आणि ते गाणे गात वाजवीत राहिले. शेवटी गोविंदराव बेशुद्ध होऊन खाली पडले.

शंकरशास्त्र्यांनी जवळ येऊन तोंडावर पाणी शिपडले आणि गोविंदराव शुद्धीवर आल्यावर घरी निघून गेले. जाताना त्यांचा चेहरा उतरलेला होता.

ते निघून गेल्यावर शास्त्रीबुवांनी वीणा घेऊन आणखी जास्त उत्साहाने वाजवायला सुरवात केली. पण या वेळी सर्व अपस्वर निघू लागले.

दुसऱ्या दिवशी वीणा नाहीशी झालेली होती. सर्वांनी शास्त्रीबुवांना विचारले–"अहो, वीणा कोठे गेली?"

शास्त्रीबुवा पश्चात्ताप करीत म्हणाले–"ती एक दैवी वीणा होती. गोविंदरावांची खोड मोडण्यासाठी मी तिचा दुरुपयोग केला. म्हणून ती रागावून जशी आली तशी निघून गेली."





# शिलारथ

[१६]

[विघ्नेश्वर पुजाऱ्याने खड्गवर्मा व जीवदत्त दोघांना गुहेतल्या बंदीखान्यात टाकविले. जंगली लोकांच्या हल्ल्याला भिऊन राजा नित्यानंद पळून गेला. खड्गवर्मा व जीवदत्त दोघांनी मिळून पाहरेकऱ्यांना फसवून त्यांना बंदीखान्यात टाकले व स्वत:ची सुटका करून घेऊन डोंगराळ प्रदेशात निघून गेले. पुढे–]

डोंगरावरून जात असतां खड्गवर्मा व जीवदत्त दोघांना विघ्नेश्वर पुजारी आपल्या राक्षसी हत्तीवर बसून आपल्या रानटी अनुयायांसह आनंदपूरच्या वाटेने जात असलेला दिसला.

"जीवदत्त, आपण त्या दुष्ट पुजाऱ्याच्या हातून राजा नित्यानंदाचे रक्षण केले पाहिजे. त्या दुष्टाला ठार करता आले तर ते देखील केले पाहिजे. चल." खड्गवर्मा म्हणाला.

जीवदत्त स्मित करून म्हणाला–"राजा नित्यानंद भित्रा व पळपुटा आहे. अशा राजाला आपण आज वाचविले, समज. पण उद्यां दुसरा शत्रू येऊन त्याचे राज्य बळकावील. आपण व्यर्थ या भानडीत पडू नये."

"पण मला वाटते की त्या दुष्ट पुजाऱ्याने आपल्याला विनाकारण कैदेत टाकले आणि आपल्याला त्रास दिला. त्याबद्दल त्याच्यावर



अनुयायी मोठमोठे दगड घेऊन फाटकावर प्रहार करू लागले.

गर्दीत उभे राहून खड्गवर्मा व जीवदत्त दोघांना राजा आपल्या अंगरक्षकाशी बोलत असलेला दिसला. दोघे राजाकडे जाऊन राजधानीचे रक्षण करण्यास उपाय सुचविण्याच्या विचारात होते. परंतु नगराच्या सिंहद्वाराजवळ गलका वाढत चालला होता.

"खड्गवर्मा या वेळी राजाची भेट घेणे शक्य नाही. थोड्याच वेळात पुजारी दार तोडून आत शिरेल. म्हणून आपणच काही तरी उपाय योजून पुजारी व त्याचा हत्ती दोघांचा शेवट केला पाहिजे." जीवदत्त म्हणाला.

"मला पण तेंच वाटते. राजाचे काय वाटेल ते होवो, आपण पुजाऱ्याला यम-सदनास पाठवून देऊन मग आपल्या वाटेने निघून जाऊं या." खड्गवर्मा म्हणाला.

"पुजारी व त्याचा हत्ती दोघांना ठार करण्यासाठी आपल्याला काही शूर तरुणांची मदत लागेल. त्याच बरोबर रानटी लोक गावात निरुपद्रवी प्रजेची कत्तल करून लूटालूट सुरू करतील. त्यांना तसे करू देता कामा नये. पुजाऱ्याला ठार केल्यानंतर गरीब प्रजेचे रक्षण करण्याचा भारपण ओघाने आपल्यावरच येतो. ते पहा, सैन्य येऊ लागले आहे. पाठीमागून रथ येतो आहे. त्यात तो राजा नित्यानंदच आहे का?" जीवदत्तने विचारले.

"होय रे, तोच पळपुटा आहे! तो राजा नाही, भितरी भागुबाई आहे!" खड्गवर्मा म्हणाला.

तोंपर्यंत सेनापती ससैन्य किल्लयाच्या फाटकापर्यंत येऊन पोचला होता. हत्तीच्या प्रहारामुळे फाटकाला भोके पडली होती आणि त्या भोकातून रानटी लोक बाण सोडीत होते व भाले फेकीत होते. सेनापतीने आपल्या सैनिकांना फाटकापासून थोड्या अंतरावर उभे केले आणि हत्ती आत शिरला तर त्याच्यावर कसा हल्ला चढवायचा हे समजावून सांगू लागला.

आणि सैन्या पाठीमागे त्याने आपला रथ उभा केला. राजाचा पांढरा फटफटीत पडलेला चेहरा पाहून दोघांना त्याची कीव आली. त्याच्या शेजारी आणखी एक मनुष्य बसला होता. त्याच्या पोशाखावरून तो मंत्री असावा असे दोघांना वाटले.

"खड्गवर्मा! मी एक युक्ति करावी म्हणतो. राजाजवळ बोलायला हीच वेळ चांगली आहे. जमले तर आतांच जमेल. चल!" असे म्हणत तो रथाजवळ जाऊन उभा राहिला आणि राजाला ऐकू जाईल इतक्या मोठ्याने म्हणाला— "महाराज!"

जीवदत्ताचा आवाज ऐकून राजा नित्यानंदाने दोघांकडे चकित होऊन पाहिले. म्हणाला—"तुम्ही दोघे त्या दुष्टाच्या कैदेतून सुटका करून घेऊन आलात?"

"महाराज! ते सर्व आम्ही मागाहून सांगू! पुजाऱ्याचा हत्ती राजधानीत शिरला तर आपले सर्व अनुयायी तत्कीच पळून जातील आणि रानटी लोक जाळपोळ व लुटालूट सुरू करतील. म्हणून चातुर्याने त्या दुष्टाचा पराभव केला पाहिजे. आपणांस मान्य असेल तर मी युक्ति सुचवितो." जीवदत्त म्हणाला.



"हे शूर तरुणा! तू म्हणालास ते मला पण खरे वाटते आहे. त्या हत्तीला पाहल्यावर यमराजच आल्यासारखा आम्हांला वाटतो. बोला काय करू या?" राजा नित्यानंद विचारू लागला.

"ती युक्ति एकांतात सांगण्यासारखी आहे. मी रथावर चढून जवळ येऊ का?" जीवदत्तने विचारले.

"अरे, त्यात विचारायचे काय? तुम्हां दोघांना अशी परवानगी मागण्याची गरजच हे आमचे पंतप्रधान आहेत." असे म्हणत राजाने बाजूला बसलेल्या व्यक्तीकडे खूण केली.

"कळले, मोठे लोक आहेत हे सगळे!" खड्गवर्मा स्वतःशीच पुटपुटला.



जीवदत्त रथावर चढून राजाला म्हणाला–"महाराज! आपण ह्या रथात बसून राजोद्यानात जावे आणि कोठे तरी झाडी झुडपात लपून बसावे आणि रथ उद्यानाच्या फाटकाबाहेर उभा करावा, म्हणजे आपण उद्यानात आहां हे पुजाऱ्याला कळेल. त्या दुष्टाचा शेवट करण्याची जबाबदारी आपण माझ्यावर आणि प्रधानांवर सोडून द्यावी."

नित्यानंदने प्रधानाकडे सहेतुक नजरेने, त्याला काय वाटते अशा तऱ्हेने पाहिले. प्रधान म्हणाला–"महाराज! मी या दोघां तरुणांच्या शौर्याचे वर्णन ऐकले होते. यांचे चातुर्य पहावे, म्हणतो. चातुर्याशिवाय हे दुष्टांच्या तावडीतून सुटका करून घेऊन आलेच नसते."

"महाराज! आपण निश्चित होऊन उद्यानात जावे. आम्ही युक्ति करून त्या पुजाऱ्याला त्याच्या हत्तीबरोबर इकडे घेऊन येऊ आणि वाटेत दोघांचा शेवट करू." जीवदत्त म्हणाला.

त्यानंतर प्रधान व जीवदत्त रथातून खाली उतरले. राजाने रथ उद्यानाकडे नेण्यास सारथ्याला सांगितले. जीवदत्तने काही वेळ प्रधानाजवळ, त्याने योजलेल्या युक्तीविषयी विचारविनिमय केला आणि खड्गवर्माला बरोबर घेऊन दोघे नगराच्या फाटकाकडे निघाले. प्रधानाने सेनापतीला जवळ बोलावून दोघां तरुणांची ओळख करून दिली आणि म्हणाला–"हे दोघे तुमच्याकडून मागतील ती मदत त्यांना द्यावी. पुजाऱ्याचा शेवट करण्यासाठी दोघांनी एक उत्तम युक्ति योजली आहे. मी येथेच थांबून पुजाऱ्याला उद्यानाकडे नेण्याची खटपट करतो."

खड्गवर्मा व जीवदत्त दोघांनी सेनापतीला एका बाजूला नेऊन आपली युक्ति थोडक्यात समजावून सांगितली. सेनापति लगेच काही सैनिकांना बरोबर घेऊन तेल्यांच्या दुकानांकडे निघाला. खड्गवर्मा व जीवदत्त त्यांच्या पाठोपाठ निघाले.

कऱ्यांना म्हणाला– उघडा फाटक! पाहरेकऱ्यांना आश्चर्यच वाटले. परंतु प्रधानाचा हुकूम होता, मानणे भाग होते. म्हणून त्यांनी जंगी फाटक उघडले. त्यांना समोर राक्षसी हत्तीवर बसून पुजारी येत असलेला दिसला.

पुजाऱ्याचा हत्ती फाटकातून आत आला. प्रधान जवळ जाऊन पुजाऱ्याला म्हणाला– "विघ्नेश्वर पुजारी! कोणत्याही प्रकारचा रक्तपात केल्याशिवाय आपण आनंदपूरचे महाराज होणार आहां. आमच्या महाराजांना रात्री स्वप्नात विघ्नेश्वराने दर्शन देऊन आज्ञा केली की आपल्या मस्तकावर राजमुकुट ठेवावा. यावेळी आमचे महाराज उद्यानात एकटे आहेत. आपण निश्चितपणे आत प्रवेश करावा."

"अरे, यात काही डाव किंवा कट तर नाही?" पुजाऱ्याने चकित होऊन विचारले.

"आम्हांला तसे काही करावयाचे असते तर फाटक उघडायला मी स्वतः येथवर आलो असतो का? आपल्याला या हत्तीसह आत प्रवेश केल्यावर कोठून अटकाव होणार? आपल्याबरोबर हे सर्व अनुयायी पण आहेतच. आपल्याशी दोन हात करण्याचे साहस कोण करील? आपण आपल्या अनुयायांना राजवाड्याच्या आवारात जाऊन विश्रांति घ्यायला आज्ञा करावी. नाहीतर हे रानटी लोक लुटालूट व जाळपोळ करू लागतील. आतां ही राजधानी



आपली आहे." मंत्री नम्रपणाचा आव आणून म्हणाला.

प्रधानाच्या बोलण्यावर पुजाऱ्याचा विश्वास बसला. त्याने हत्तीच्या गंडस्थलावर एक बुक्का मारला व म्हणाला–"चल उद्यानाच्या बाजूला!"

राक्षसी हत्ती चालू लागला. तेव्हां प्रधान दोन्ही हात वर करून पुजाऱ्याला ऐकू जाईल इतक्या मोठ्याने म्हणाला–"अहो विघ्नेश्वर पुजारी! थोडे थांबा! प्रथम आपण आपल्या या अनुयायांना राजवाड्याच्या आवारात जायला सांगावे. तेथे मी सांगितल्याप्रमाणे त्यांच्या स्वागतासाठी उत्तमोत्तम पक्वान्ने व पेये ठेवलेली आहेत."

पुजाऱ्याने आपल्या अनुयायांना त्या प्रमाणे आज्ञा केली. रानटी लोक आनंदाने उड्या मारीत राजवाड्याच्या आवारात गेले. राजवाड्याचा चारीबाजूला उंच भिंत होती. त्या भिंतीवरचा भाग दहाबारा फूट रुंद होता आणि पाहरेकऱ्यांना हिंडण्या फिरण्यास सोईचे होते.

रात गेल्यावर प्रधान पुजाऱ्याला म्हणाला–"विघ्नेश्वर पुजारी! आपल्या गैर हजेरीत आपले अनुयायी कदाचित लुटालूट करण्याचा प्रयत्न करतील. म्हणून या आवाराचे दार बंद करून आपल्या काही विश्वासपात्र अनुयायांना पाहऱ्यावर ठेवावे."

पुजाऱ्याने, आपल्या डोक्याला केव्हां तो मुकुट लागतो या विचाराने उतावीळ झाला असल्यामुळे, मंत्री म्हणाला त्याच्या विषयी जास्त विचार केल्या शिवाय आपल्या अनुयायांना तसे करावयास सांगितले. त्यानंतर राक्षसी हत्तीच्या गंडस्थलावर एक बुक्का मारून म्हणाला–"चल, उद्यानाकडे!"

मंत्री चकित झाला, या हत्तीला माणसांची भाषा कळते वाटते? खड्गवर्मा व जीवदत्तने जी युक्ति योजली होती ती यशस्वी होणार असे त्याला वाटू लागले. लोभी पुजारी मंत्री म्हणेल तसे वागू लागला. मंत्र्याला त्यात आश्चर्य वाटण्यासारखे आता काही उरले नाही. (क्रमशः)



# प्रेमाचा त्याग

विक्रमादित्याने आपला हट्ट सोडला नाही. तो झाडाजवळ गेला, प्रेत खांद्यावर काढून घेतले आणि मौनपणे स्मशानाच्या दिशेने चालू लागला तेव्हां प्रेतात बसलेला वेताळ त्याला म्हणाला–"राजा, मनुष्य हा परिस्थितीचा गुलाम आहे. पण काही लोक विनाकारण त्याग करतात तो मात्र कां कळत नाही. चंद्रकला हिने आपल्या प्रेमाचा त्याग करून एका राजकुमाराशी लग्न केले होते. ती गोष्ट मी तुला सांगतो. लक्ष देऊन ऐक." असे सांगून वेताळ गोष्ट सांगू लागला.

फार प्राचीन काळी लक्ष्मीपुर नावाच्या राज्याचा राजेंद्रवर्मा नावाचा एक राजा होता. तो शूर व पराक्रमी होता. तो आपला मंत्री जयसिंह याच्या सल्ल्याप्रमाणे राज्य कारभार करीत असे. त्याची प्रजा फार सुखी होती व राज्यात सर्वत्र शांतता नांदत होती.



राजाला वीरवर्मा नावाचा एक मुलगा होता व मंत्र्याला तेजसिंह नावाचा एक मुलगा होता. दोघे समवयस्क होते. दोघे सुंदरपण होते. एकाच गुरुच्या आश्रमात त्यांनी विद्याभ्यास केला होता. दोघे एकाहून एक शूर व साहसी होते आणि दोघांचे परस्परांवर मित्रत्वाचें प्रेम होते.

एकदां राजकुमार व मंत्र्याचा मुलगा शिकारीला गेले. राज्याच्या सरहद्दीला लागूनच एक जंगल होते त्यांत वाघ, सिंह वगैरे रानटी पशू राहात. दुपारपर्यंत दोघे शिकार शोधीत हिंडले, परंतु त्यांना यश मिळाले नाही. तेव्हां दोघे एका झाडाखाली विश्रांतीसाठी बसले. राजकुमार तर झोपीच गेला व मंत्र्याचा मुलगा पाहरा देण्यासाठी शेजारी बसून राहला.

इतक्यात एका बाजूने सिंहगर्जना ऐकू आली व त्याच्या पाठोपाठ एका स्त्रीची किंकाळीपण त्याच दिशेने ऐकू आली. तेजसिंह आवाजाच्या अनुरोधाने गेला आणि त्याला एका अप्सरेसारख्या सुंदर स्त्रीवर एक सिंह उडी मारायला तयार असलेला दिसला. तेजसिंहाने पाठीमागून जाऊन सिंहाच्या पाठीत आपली तलवार खुपसली. एक मोठी डरकाळी फोडून सिंह जागच्या जागी ठार झाला.

ते दृश्य पाहून ती तरुण स्त्री चकित झाली. तिने तेजसिंहाकडे कृतज्ञतापूर्वक पाहिले. तेजसिंहपण तिचे सौंदर्य पाहून व चकित होऊन तिच्याकडे पहात उभा राहला.

दोघे परस्परांविषयी विचारपूस करू लागले, त्याच वेळी वीरवर्मा धावत तेथे आला. त्याने तेजसिंहाला विचारले—"काय रे तू केव्हां आलास? मला कां नाही उठविलेस? सिंहाची डरकाळी ऐकून माझी झोप मोडली आणि जवळ तू दिसला नाहीस, म्हणून मी धावत आलो. तुझ्यावर सिंहाने झडप तर घातली नाही ना, अशी मला भीति वाटली." नंतर त्या तरुण स्त्रीकडे पाहून त्याने तेजसिंहाला विचारले—"या कोण आणि इकडे कशा?"



राजाला वीरवर्मा नावाचा एक मुलगा होता व मंत्र्याला तेजसिंह नावाचा एक मुलगा होता. दोघे समवयस्क होते. दोघे सुंदरपण होते. एकाच गुरुच्या आश्रमात त्यांनी विद्याभ्यास केला होता. दोघे एकाहून एक शूर व साहसी होते आणि दोघांचे परस्परांवर मित्रत्वाचें प्रेम होते.

एकदां राजकुमार व मंत्र्याचा मुलगा शिकारीला गेले. राज्याच्या सरहद्दीला लागूनच एक जंगल होते त्यांत वाघ, सिंह वगैरे रानटी पशू राहात. दुपारपर्यंत दोघे शिकार शोधीत हिंडले, परंतु त्यांना यश मिळाले नाही. तेव्हां दोघे एका झाडाखाली विश्रांतीसाठी बसले. राजकुमार तर झोपीच गेला व मंत्र्याचा मुलगा पाहरा देण्यासाठी शेजारी बसून राहला.

इतक्यात एका बाजूने सिंहगर्जना ऐकू आली व त्याच्या पाठोपाठ एका स्त्रीची किंकाळीपण त्याच दिशेने ऐकू आली. तेजसिंह आवाजाच्या अनुरोधाने गेला आणि त्याला एका अप्सरेसारख्या सुंदर स्त्रीवर एक सिंह उडी मारायला तयार असलेला दिसला. तेजसिंहाने पाठीमागून जाऊन सिंहाच्या पाठीत आपली तलवार खुपसली. एक मोठी डरकाळी फोडून सिंह जागच्या जागी ठार झाला.

ते दृश्य पाहून ती तरुण स्त्री चकित झाली. तिने तेजसिंहाकडे कृतज्ञतापूर्वक पाहिले. तेजसिंहपण तिचे सौंदर्य पाहून व चकित होऊन तिच्याकडे पहात उभा राहला.

दोघे परस्परांविषयी विचारपूस करू लागले, त्याच वेळी वीरवर्मा धावत तेथे आला. त्याने तेजसिंहाला विचारले—"काय रे तू केव्हां आलास? मला कां नाही उठविलेस? सिंहाची डरकाळी ऐकून माझी झोप मोडली आणि जवळ तू दिसला नाहीस, म्हणून मी धावत आलो. तुझ्यावर सिंहाने झडप तर घातली नाही ना, अशी मला भीति वाटली." नंतर त्या तरुण स्त्रीकडे पाहून त्याने तेजसिंहाला विचारले—"या कोण आणि इकडे कशा?"



मानले आणि त्यांचे उत्तम प्रकारे स्वागत केले व म्हणाला–"आपण इतके जवळ राहतो, पण आपली कधी भेट ओळख झाली नाही. हा योग फार चांगला जमून आला." त्यानंतर राजाने राजाला शोभेल अशा तऱ्हेने त्यांचा सत्कार केला आणि आदरपूर्वक त्यांना निरोप दिला.

आपल्या राजधानीत पोचल्यानंतर वीर-वर्मा आपल्या वडिलांना म्हणाला–"बाबा! आपल्या शेजारचे महाराज नरेंद्रवर्मा यांची मुलगी चंद्रकला हिला आपण पाहिले आहे का? तिच्याशी माझा विवाह करून द्यावा. त्यासाठी आपण आवश्यक सर्व व्यवस्था करून द्यावी."

राजेंद्रवर्माने आनंदाने मंत्र्याला बोलावून चंद्रनगरच्या राजकन्येला युवराजांकरिता मागणी घालण्यासाठी दूत पाठविण्यास सांगि-तले. मंत्र्याने एका अधिकाऱ्याला राजाच्या वतीने पत्र लिहून चंद्रनगरच्या राजाकडे पाठविले. चंद्रनगरच्या राजाला पत्र वाचून आश्चर्यच वाटले व त्या बरोबर आनंदपण झाला. वीरवर्मासारखा एक शूर युवराज जांवई झाल्यास कोणत्या राजाला आनंद होणार नाही? त्याने स्वतः वीरवर्माला पाहिले होते व राजकन्येने पण पाहिले होते. परंतु चंद्रकलेला ती शुभवार्ता ऐकून आनंद झाला नाही. कारण तिने मंत्र्याचा मुलगा तेजसिंह याला मनाने वरले होते. राजकुमाराविषयी तर तिने कधी विचारच केला नव्हता.

म्हणून नरेंद्रवर्माने येऊन दूताला सांगितले की माझ्या मुलीची या संबंधाला संमती नाही. म्हणाला–"मुलीची संमती नसल्याची गोष्ट तुम्ही आपल्या राजाला जाऊन कळवावी." त्याप्रमाणे दूताने लक्ष्मीपूरला येऊन तो निरोप राजाला कळविला.

राजेंद्रवर्माला तो निरोप ऐकून अपमान वाटला. त्याला राग आला. तो आपल्या प्रधानाला म्हणाला–"हा मुलीचा अहंकार दिसतो. माझ्या मुलाचे सौंदर्य व शौर्य पराक्रम इतर कोणत्या राजकुमारात आहे? त्याच्यात तिला कोणता दोष दिसला? तिने असा अपमानजनक नकार का दिला? हा अपमान गप्प बसून सहन करण्याची माझी तयारी नाही. तरी चंद्रनगरावर स्वारी करण्याची तयारी करावी. मी नरेंद्रवर्माचा पराभव करून त्याच्या मुलीला हरण करून घेऊन येईन आणि तिला आपली सून करून घेईन."

प्रधान म्हणाला–"महाराज! आपण थोडा धीर धरावा. मी एक योग्य राजदूत आजच पुन्हां पाठवितो आणि त्याच्या-करवी शक्य झाल्यास मुलीची संमती पण मिळवितो. राजाने होकार दिल्यावर मंत्री आला व मुलाला बोलावून म्हणाला–"बाळ! आपल्या युवराजांबरोबर विवाहास चंद्र-नगरच्या राजकन्येने नकार दिला आहे. तू चंद्रनगरला जाऊन तिचे मन वळवून तिला या विवाहास तयार कर. नाहीतर दोन्ही देशांमध्ये युद्ध होऊन दोन्ही राज्यांची प्रजा दुःखी होईल."

तेजसिंह बापाच्या आज्ञेने चंद्रनगरला निघाला. राजा नरेंद्रवर्मा यास भेटून राजकन्येला भेटण्याची इच्छा असल्याचे कळविले व त्यासाठी राजाची परवानगी मागितली. नरेंद्रवर्माने परवानगी दिली.

चंद्रकला तेजसिंहाला पाहून चकित झाली व तिला परमानंद पण झाला. तेजसिंह राजकन्येला म्हणाला–"राजकन्या! मी



आपल्या युवराजांच्या वतीने मागणी घाला-यला आलो आहे. आपण असंमती दर्श-विल्याचे मी ऐकले आहे. ही असंमती दर्शविण्यास काही कारण असावे असे मला वाटत नाही. आमचे युवराज सुंदर व पराक्रमी आहेत. त्यांची बरोबरी करू शकणारा राजकुमार कदाचितच कोणी असू शकेल. त्यांचे आपल्यावर निस्सीम प्रेम आहे. ते माझे धनीच नव्हे तर प्राणाहून प्रिय असे मित्रपण आहेत. त्यांचा प्रेमभंग पाहून मला मानसिक दुःख झाल्याशिवाय राहणार नाहीं. म्हणून आपण युवराजांशी विवाहास संमती द्यावी अशी माझी मनापासून इच्छा आहे."

चंद्रकला काही वेळ विचार करून म्हणाली—"मी तुमच्या धन्याशी विवाहास तयार आहे. त्यांना तसे कळवावे."

तेजसिंह यशस्वी होऊन परत आल्याबद्दल राजाने त्याला शबासकी दिली आणि सुमुहूर्तावर चंद्रकला व वीरवर्मा यांचा थाटामाटाने विवाह झाला.

येथवर गोष्ट सांगून वेताळ म्हणाला—"राजा! माझ्या मनात अनेक शंका आहेत. मुलाला दूत म्हणून पाठविले तर तो यशस्वी होईल हे मंत्र्याला कसे काय वाटले? तेजसिंहावर प्रेम असूनही चंद्रकला युवराजाशी विवाहास कशी तयार झाली? तिचे प्रेम खरे नव्हते का? की तिने आपल्या प्रेमाचा त्याग केला? या शंकांचे समाधान माहीत असुन तू करून दिले नाहीस तर तुला परिणाम माहितच आहे. तुझ्या डोक्याची शंभर छकले होऊन तुझ्याच पायांवर लोळू लागतील."

राजा विक्रमादित्य म्हणाला—"मंत्र्याला कळले असावे किंवा त्याने अंदाजाने अ[illegible] मनाने वरले असल्यामुळे युवराजाशी विवाहास नकार दिला. म्हणून त्याने आपल्या मुलालाच दूत म्हणून पाठविले. त्याने योजलेला उपाय यशस्वी ठरला. चंद्रकलेला प्रेमाचा त्याग करावाच लागला नाही. कारण तिने ज्याला मनाने वरले होते तोच दूत होऊन आला होता. तेव्हां त्याचे सुद्धां तिच्यावर प्रेम आहे की नाही हे कळायला मार्गच उरला नाही. त्यामुळे तिला हेदेखील कळले कीं मंत्र्याच्या मुलाशी तिचा विवाह होणे शक्य नाही. म्हणून तिने युवराजाशी विवाहास संमती दिली. या प्रेमसंबंधात प्रेमाचा त्याग राजकुमारीने केला नसून तेजसिंहाने केला आहे. त्याला तो त्याग करावा लागला असे देखील म्हणता येईल. कारण त्याचा प्रतिस्पर्धी त्याचा एक मित्र व प्रत्यक्ष: युवराज होता."

अशा तऱ्हेने राजाचे मौन भंग होताच वेताळ प्रेतासह अदृश्य झाला व झाडाला जाऊन लोंबकळ लागला. (कल्पित)





# करणीचे फळ

एका गावी एक पुराणिक कुटुंब रहात असे. त्यांचे एक मोठे घर होते व पंधरावीस एकर जमीन पण त्यांच्या मालकीची होती. पुरोहिताला तीन मुलगे होते. त्यांना शेजारच्या जिल्ह्याच्या गावी नोकरी होती. ते सकाळी उजाडताच जेवणखाण आटोपून नोकरीवर जात व संध्याकाळी घरी परत येत.

त्या गावातल्या देवळात दररोज पुराण प्रवचन होई. पुराणिक बुवा व त्यांच्या वृद्ध पत्नी प्रवचनाला जात व संध्याकाळी मुले घरी परत येत त्या वेळी त्यांच्याबरोबरच घरी येत.

पुराणिक बुवांच्या तिघां मुलांची लग्ने जिल्ह्याच्या ठिकाणीच झाली होती. त्यांच्या सुना शहरातच वाढल्या होत्या. त्यांच्या नवऱ्यांना नोकरी पण शहरात होती, परंतु बायकांना खेडेगावात रहावे लागे. कारण सासर लहानशा खेडे गांवात होते. ते त्यांना आवडत नसे. त्या मन मारून कसे तरी आयुष्य कंठीत होत्या.

संध्याकाळी सासूसासरे आपल्या मुलांबरोबर घरी परत येत. ती दोघं पुराणाला गेली कीं सुनांना घरात मोकळे वाटे. तिघी गप्पा मारीत बसत व परस्परांच्या मनात येई ते मनमोकळेपणी बोलत बसत. मोठी सून एकदां म्हणाली—"या खेडेगावात आपल्याला नाही करमत बुवा!"

दुसरी म्हणाली—"वहिनी तुम्ही म्हणालां ते अगदी खरं आहे बघा! मी सांगते, या म्हाताऱ्या माणसांच्या मुळेच आपली पुरुषमंडळी गाव सोडून इतर कोठे जायला तयार होत नाहीत."

तिसरी म्हणाली—"माझ्या आईवडिलांनी, आमच्या यांना शहरात नोकरी आहे हे पाहून व हे शहरात राहतील असा विचार करूनच

श्री विन जोशी

माझे लग्न ह्यांच्याशी करून दिले. हे असे व्हायचे आहे, ह्याची त्यांना थोडी जरी कल्पना असती तर त्यांनी आमच्या लग्नाला होकार दिलाच नसता."

आतां तिघींनी काहीतरी करून, लागले तर भांडून शहरात रहायचा उपाय करण्याचे ठरविले. कारण सासूसासऱ्यांच्या परवानगी शिवाय शहरात जाऊन राहणे शक्य होणार नाही, हे त्या ओळखून होत्या.

"आपण त्यांची आज्ञा कधी मोडली आहे का ?" एक म्हणाली.

"म्हणून तर आपली कोणी पर्वा करीत नाही !" दुसरी म्हणाली.

"परंतु आपल्या आईवडिलांना कळलं की आपण आपल्या सासूसासऱ्यांची आज्ञा [illegible] का ?" धाकटी म्हणाली.

"आपण यापुढे सासूसासऱ्याची आज्ञा मोडायची तर नाही. पण सांगकाम्या-सारखं वागायचे. जेवढं सांगितलं असेल तेवढंच करायचे. मग ते काम अर्धवट राहो कि बिघडून जावो आपण तिकडे दुर्लक्ष करायचे. असं केलं की म्हातारे म्हातारी कंटाळून जातील आणि मग संधी पाहून निराळं रहायचं पुरुष मंडळीना सुचविता येईल." मोठीने ही युक्ति सुचविली व दोघी धाकट्यांनी तसे करायचे कबूल केले.

त्या दिवसापासून तिघी सुनांनी घरात बंडखोरी सुरू केली. सासूने केर काढायला सांगितला की त्या केर काढीत पण केर [illegible] सांचून राहू लागली.

सासूने कपडे धुवायला सांगितले की ते धुवून पिळे तसेच ठेवून देत. वाळत घाला-यला सांगितले की वाकडे तिकडे वाळत घालीत. वाळलेले कपडे काढून आणीत नव्हत्या. विचारले की म्हणत, "मला तर कपडे काढायला कोठे सांगितले होते ?" वगैरे.

भांडी घासायला सांगितली तर घाशीत पण स्वच्छ धुवून घरात आणून ठेवण्या-ऐवजी न्हाणी घरातच टाकून ठेवीत.

सासूने सासऱ्याला जेवायला वाढायला सांगितले की वाढीत. पण भात वाढला तर वरण नाही, वरण वाढलं तर तूप नाही. भाजी किंवा चटण्या कोशिंबिरी मागितल्या शिवाय वाढायच्या नाहीत.

सैंपाक करायला सांगितला की सैंपाक करायच्या. पण कधी भात करपायचा, तर कधी आमटीत मीठच नाही आणि भाजीत मीठ जास्त.

सुनांची ही वागणूक पाहून सासूसासरे बेजार झाले. सुनांच्या तोंडी किती लागायचे म्हणून जे घडे ते मुलांना सांगत. मुलांनी सर्व ऐकून घेतले व म्हणाले–"त्यांना वठणीवर आणण्याचा उपाय आम्ही करतो."

तिघा मुलांनी एक युक्ति योजली. दिवाळी जवळ आली. मोठ्याने बायकोला विचारले–"तुला काय आवडते ?"





"मला बनारसी शालू आवडतो." मोठी म्हणाली.

नवऱ्याने विचारल्यावर मधली म्हणाली– "मला सोन्याच्या बांगड्या आवडतात."

तिसरी म्हणाली–"लहानपणापासून मला चंद्रहाराची किती हौस होती. तोच यावेळी आणावा."

दिवाळी येईपर्यंत तिघी उत्सुकतेने आपापली मागणी कशी पुरी होते याची वाट पाहू लागल्या. मोठीने कोणत्या रंगाची साडी पाहिजे हे सांगितले नव्हते. मधलीने बांगड्यांचा घाट कसा हवा हे सांगितले नव्हते. धाकटीने चंद्रहाराविषयी सविस्तर काहीच सांगितले नव्हते.

दिवाळीच्या आदल्या दिवशी संध्याकाळी तिघे भाऊ पत्नींच्या इच्छेप्रमाणे वस्तू घेऊन आले. सर्व मंडळी काय आणलं आहे, पहायला माजघरात जमली. मोठ्याने बनारसी शालू काढून आईच्या हातात देत विचारले– "आई, तुला हा आवडला का? हा नेस. माझ्या बायकोला तो आवडतो."

नेसायला." आई म्हणाली.

"मी तिला विचारले तेव्हां ती म्हणाली, मला बनारसी शालू आवडतो. पण ती हे कोठे म्हणाली की तिला नेसायला हवा आहे." मोठा म्हणाला.

दुसऱ्या मुलाने बिलवर आईला हातात घालायला सांगितले. म्हणाला–"तुझ्या सुनेला ते आवडतात म्हणून आणले आहेत."

तिसऱ्या मुलाने आईच्या हातात चंद्रहार देत तेच सांगितले.

तिघां सुनांचा चेहरा एकदम उतरला. त्यांनी सासूसासऱ्यांचे पाय धरून क्षमा मागितली.

सासू म्हणाली–"अग, म्हातारपणी का मी हे सर्व घालणार आहे. तुमच्या साठीच हे सर्व आहे. आमच्या जवळ जे आहे ते सर्व तुमचेच आहे. घ्या आपापली वस्तु."

त्यानंतर सुनांनी सासूसासऱ्यांच्या आज्ञेबाहेर काही काम केले नाही व सांगकामेपणा सोडून दिला.





# स्वयंवर

फार जुनी गोष्ट आहे. देवगिरी नगरावर राजा सुदर्शन याचे राज्य होते. त्याच्या एकुलत्या एका मुलीचे नाव चंद्रसेना असे होते. तिच्या वयाबरोबर तिचे रूपलावण्य वाढत गेले. दूरदूरच्या राजकुमारांकडून तिला मागणी घालण्यासाठी दूत येऊ लागले. एक तर ती सुंदर होतीच, या शिवाय ती राजाची एकुलती एक मुलगी असल्यामुळे जांवईच गादीला वारस होणार होता.

परंतु राजासमोर चंद्रसेनेचे लग्न म्हणजे एक मोठा प्रश्न उभा राहला. तिचे लग्न कोणा एका विशिष्ट राजकुमाराशी करून दिले तर इतर राजकुमार रागावतील. त्यामुळे देवगिरीवर केव्हां कसे संकट येईल हे सांगणे कठीण होते. या संकटातून वांचण्यास एकच एक मार्ग होता, तो म्हणजे स्वयंवर. परंतु स्वयंवराचा निर्णय घेणे देखील तितकेसे सोपे नव्हते. चंद्रसेनेने आपल्या आवडीप्रमाणे वरमाला एकाद्या राजकुमाराला घातली तरी देखील इतर राजकुमार रागावणार नाहीत असेहि नव्हते.

राजा काय करावे या विचारात पडला असता एका जव्हेऱ्याने येऊन आणखी एक प्रश्न उभा केला.

ती समस्या अशी होती,–जव्हेऱ्याला व्यापारासाठी परदेशी जावयाचे होते. वाटेत चोरांची भीती होती. म्हणून व्यापारी एका पोकळ काठीत हिरे भरून घेऊन जायच्या विचारात होता. एका सुताराने तशी काठी करून द्यायचे कबूल केले. परंतु त्याने दोन अटी लावल्या. पहली अट ही होती की काठीत हिरे ठेवताना व्यापाऱ्याने पाहतां कामा नये. दुसरी अट अशी होती की व्यापाऱ्याने काठी नेल्यावर एक महिनाभर त्या हिऱ्याबद्दल जबाबदार सुतारच



राहील. म्हणजे या महिन्याभराच्या अवधीत व्यापाऱ्याने काठी तोडून पाहिली व हिरे सापडले नाहीत तर सुतार त्या हिऱ्यांची किमत देईल आणि काठीत हिरे सापडले तर त्यांची किमत व्यापाऱ्याने सुताराला द्यावयाची. एका महिन्यानंतर व्यापाऱ्याने काठी तोडून पाहिली आणि हिरे सापडले नाहीत तर त्याबद्दल सुतार जबाबदार राहणार नाही.

त्या दोन्ही अटींत ज्या अडचणी येण्याची शक्यता होती त्यांच्या विषयी व्यापाऱ्याने विचार केला नाही आणि दोन्ही अटी मान्य केल्या. सुताराने व्यापाऱ्याकडून हिरे मागून घेतले आणि काठी तयार करून व्यापाऱ्याला दिली. व्यापाऱ्याने फार सावधपणे काठीत हिरे आहेत की नाहीत हे पाहिले. परंतु काठीत हिरे आहेत की नाहीत हे त्याला कळले नाही. कारण काठीला कोठे सांधा दिसला नाही आणि वाजवून पाहिले तर कोठे पोकळी दिसली नाही. सुताराने हिरे गडप केले असावेत आणि एक साधी काठी तयार करून दिली असावी असे व्यापाऱ्याला वाटले. परंतु काठी मोडून पाहिली आणि आत हिरे सापडले तर पुरी किमत द्यावी लागेल. परंतु हिरे सापडले नाहीत तर सुताराकडून हिऱ्यांची किमत किंवा हिरे वसूल करता येतील. पण ते होणार कसे? एका महिन्यानंतर काठी तोडून पाहिली व त्यात हिरे सापडले नाहीत तर तो सुतार त्याला जबाबदार नाही. असे कोडे पडले होते त्याला.

हिऱ्याच्या व्यापाऱ्याने ते कोडे राजाला येऊन कळविले आणि म्हणाला—"महाराज, मला काठी मोडल्याशिवाय आत हिरे आहेत की नाही हे कळले पाहिजे."

राजकुमारीच्या स्वयंवरासाठी व्यापाऱ्याचे हे कोडे राजाला फार उपयोगी वाटले. राजाने दवंडी पिटविली की राजकन्येसाठी स्वयंवर रचण्यात आले आहे. राजकुमारीच्या रूपलावण्याची कीर्ति ऐकून दूरदुरून राजकुमार स्वयंवरास आले.

[illegible] साधी काठी आहे की या काठीत एखादी वस्तु लपवून ठेवण्यात आली आहे. ही गोष्ट सप्रमाणसिद्ध करून दाखवील त्याला राजकन्या स्वयंवराची वरमाला घालील."

काठी एका टेबलावर ठेवण्यात आली. एकेका राजकुमाराने काठी उचलून हलवून ठोकून निरनिराळ्या प्रकारे काठीची परीक्षा करून आत काही आहे का पाहिले. काठीला कोठे सांधा दिसला नाही. काठी छान गुळगुळीत होती.

"या काठीत काही नाही," असे सांगून एकेक राजकुमार काठीची परीक्षा करून घेऊन आपापल्या आसनावर जाऊन बसू लागले. ते दृश्य पाहून व्यापाऱ्याचे काळीज खालीवर होऊ लागले.

इतक्या सुवर्चल नगराचा युवराज आपल्या आसनावरून उठून पुढे आला. त्याने काठीचा मध्यभाग एका बोटावर ठेवून काठी आडवी करून पाहिली व म्हणाला—

"या काठीत खात्रीने काहीतरी आहे, पण पाणी भरून एक टब असेल तर मी ते सिद्ध करून दाखवू शकेन."

राजाच्या नोकरांनी पाण्याने भरलेला एक टब आणून समोर ठेवला. युवराजाने ती काठी पाण्यात टाकली. ती काठी पाण्यात सरळ उभी राहिली. काठीचा अर्धा भाग पाण्यात बुडलेला होता व बाकी भाग पाण्यावर होता.

"ही सामान्य काठी असती तर काठी पाण्यात आडवी तरंगत राहिली असती. काठीचा खालचा भाग पाण्यात बुडलेला आहे याचा अर्थ त्याचे वजन जास्त आहे. त्या भागात काहीतरी वजन असलेली वस्तू नक्कीच आहे." सुवर्चल युवराजने काठीत काही असल्याचे सिद्ध करून दाखविले.

त्यानंतर सुवर्चल युवराजाशी चंद्रसेनेचा विवाह सुमुहूर्तावर थाटामाटाने पार पडला. विवाह समारंभ संपल्यावर काही दिवसांनी जव्हेरी व्यापारासाठी परदेशी निघून गेला.



# दोन चिक्कू

एका गावी दोन भाऊ रहात होते. ते एकाहून एक चिक्कू होते. एकदा धाकटया भावाला कोणत्या तरी गावी जावयाचे होते. म्हणून तो पहाटेच उठून वहाणा घालून निघाला. थोडे अंतर चालून गेल्यावर त्याने विचार केला, घरून निघण्यापूर्वी दिवा विझविल्याशिवाय निघालो होतो. मोठा भाऊ घोरत पडला असेल. त्याला कोणी उचलून नेल तरी कळणार नाहीं. दिवा उजाडेपर्यंत जळत राहील, किती तेल जळून जाईल कोणाला ठाऊक? तो विझविलाच पाहिजे, असा विचार करून तो घरी परत आला.

तोपर्यंत मोठा भाऊ उठलेला होता. त्याने धाकटया भावाला परत आलेला पाहून विचारले–"कां रे, परत कां आलास?"

"काही नाही रे, दिवा विझवायचा विसरून गेलो होतो. तू झोपला होतास ते आठवले. विनाकारण तेल किती तरी जळेल, म्हणून दिवा विझवायला घरी परत आलो." धाकटा भाऊ आपला काट कसरीपणा दाखवीत म्हणाला.

"वेडया, तू हे थोडेसे तेल जळून जाईल म्हणून एवढी पायपीट केलीस, परंतु तुझ्या वाहणा किती घासून झिजून गेल्या याचा विचार केलास का?" मोठ्या भावाने विचारले.





# अबू-कीर सीर

कित्येक शतकांपूर्वी अलेक्झेंड्रिया या गावी अबू कीर नावाचा एक रंगारी आणि अबू सीर नावाचा एक न्हावी असे दोघे-जण रहात असत. त्यांची दुकाने शेजारी शेजारीच होती.

अबू कीर पहिल्या नंबरचा खोटे बोलणारा लबाड व लुच्चा होता. तो वाटेल ते वाईट काम करायला मागेपुढे पहात नसे. कोणी त्याच्याकडे कपडे रंगविण्यासाठी आला की रंग वगैरे विकत घेण्यासाठी सांगून तो गिऱ्हाइकाकडून पहिल्यानेच थोडे पैसे मागून घेत असे. गिऱ्हाइकाने दिलेले पैसे तो उडवून टाकी आणि पुढे गिऱ्हाइकाचे कपडे विकून टाकून ते पैसे देखील पिण्यात उडवून टाकी. गिऱ्हाइकाने येऊन विचारले की, 'काय रे कपडे तयार झाले का- की तो 'उद्यां किंवा परवां देतो' म्हणून सांगून त्यांना परत पाठवी. कधी अल्लाची शपथ घेऊन सांगे की 'बायको बाळंत झाली व त्यामुळे दम घ्यायला सुद्धा फुरसत मिळाली नाही. दोन चार दिवसांनंतर नक्की परत देतो?' असेच काही तरी खोटे सांगून गिऱ्हाइकाला परत पाठवून देई.

एखाद्या गिऱ्हाइकाने दटावून विचारले की "खरे सांग, आमचे कपडे तू काय केलेस? परत कर, आम्ही दुसऱ्या रंगाऱ्याकडे देऊ." तर तो उत्तर देई–"मालक! मी काय करू, माझे कर्म! मी आपले कपडे रंगवून बाहेर वाळत टाकले आणि जरा आत येऊन बसलो. थोडया वेळाने येऊन पाहतो तो कपडे नाहीसे झालेले."

गिऱ्हाईक भोळा असला तर म्हणे– "सर्व त्या अल्लाची मेहरबानी बाबा! तू तरी काय करणार?" रागीट किंवा तापट असला तर त्याच्याशी भांडायला तयार होई.

असे बरेच दिवस चालले होते. शेवटी अबू कीरच्या काही गिऱ्हाइकांनी शहराच्या काजीकडे आपले गाऱ्हाणे नेले. परंतु अबू कीरकडून आपल्या कपड्यांची किमत वसूल करणे एकाला देखील शक्य झाले नाही. कारण दुकानावर जप्ती आली तर दुकानात काही एक सांपडलेच नाही.

थोड्याच दिवसात लोकांना अबू कीरच्या लुच्चेगिरीची चांगली कल्पना झाली. तेव्हांपासून त्याच्याकडे गिऱ्हाईक येई-नासे झाले. त्याला आपले पोट भरणे देखील अशक्य होऊ लागले. म्हणून एक दिवशी तो अबू सीरच्या दुकानात जाऊन आपल्या स्थितीचे वर्णन करून रडू लागला.

[illegible] अबू कीरची कींव आली. तो त्याचे सांत्वन करीत म्हणाला–"मित्रा! शेजाऱ्याला मदत करणे माझे कर्तव्य आहे. मी जी भीठभाकर खाईन ती तुला पण वाढीन."

अबू कीर त्या दिवसापासून अबू सीरच्या घरी येऊन राहू लागला आणि त्याला जे लागे ते मागून घेऊन आपल्या गरजा भागवू लागला. एक दिवशी अबू सीर अबू कीरला म्हणाला–"मित्रा! मी हजामत करण्यात किंवा केस कापण्यात कमी हुशार आहे, असे मुळीच नाही. परंतु मी गरीब आहे, म्हणून माझ्याकडे कमी लोक येतात, माझी प्राप्ति तुझ्या व माझ्या कुटुंबाला पुरेल एवढी नाही. अल्लाची मेहरबानी [illegible]."

त्यावर अबू कीरने सुचविले–"मित्रा! या शहरात तुझा धंदा नीट चालत नाही व माझा व्यापार पण बंद पडला आहे. या गावातले लोक मूर्ख आहेत. तू इतकी मेहनत करतोस, तुझ्या हातात कसब आहे, तरी तुला कष्ट सहन करावे लागतच आहेत, हे नाही मला आवडत. आपण हा देश सोडून दुसरीकडे कोठे तरी जाऊ या. आपले नशीब नक्कीच चमकेल. आपण फावड्याने पैसे गोळा करू. तेव्हां चल, परदेशात कोठे तरी जाऊन भाग्याची परीक्षा करून पाहू या."

अबू कीर म्हणाला त्याचा अबू सीरच्या मनावर जादूसारखा परिणाम झाला. दोघे प्रवासाला निघाले. घरून निघण्यापूर्वी अबू कीर म्हणाला–"आजपासून आपण पर-स्परांना अल्लाची शपथ घेऊन वचन दिले पाहिजे की आपण परस्परांशी सख्ख्या भावा-सारखे वागू. दोघे जे मिळवू, दोघांची त्यावर मालकी राहील. दोघांपैकी कोणाला पहिल्याने काम मिळाले तर मिळकतीचा उपयोग दोघांनी करावयाचा."

अबू सीरने, अबू कीर म्हणाला ते मान्य केले. दोघांनी कुराण हातात घेऊन आणा-शपथा केल्या आणि दोघे बंदरावर गेले. तेथे एक जहाज प्रयाण करायला तयार उभे होते. दोघे जहाजात बसले.

त्यांचा प्रवास सुखाचा झाला. त्या जहाजात एकूण एकशे चाळीस प्रवासी होते. न्हावी होता तो एकटा अबू सीर. तो आपला







मित्र अबू कीरला म्हणाला—"मित्रा! आपल्याला खाण्यापिण्याची काहीतरी व्यवस्था केली पाहिजे. मी पाहतो, कोणी हजामत करवून घ्यायला तयार आहे का. जमले तर आपल्याला खायला प्यायला फुकटात मिळेल व वर पैसे पण मिळतील."

"ठीक, विचारून पहा." असे सांगून अबू कीरने ताणून दिली.

अबू सीर आपली धोपटी घेऊन जहाजावर यात्रेकरूंच्या मधून हिंडू लागला. एकाने त्याला बोलावून त्याच्याकडून हजामत करवून घेऊन त्याला पैसे दिले. ते घेऊन अबू सीरने त्याचे आभार मानले व म्हणाला—"हुजूर, या प्रवासात पैशाने का

... भरणार? मग व माझ्या मित्राला काही खायला द्याल तर आपले फार उपकार होतील आमच्यावर."

त्या यात्रेकरूने त्याला पाव रोटी आणि जे त्याला शक्य होते, खायला दिले. अबू सीर ते घेऊन जहाजाच्या वरच्या बाजूला गेला. अबू कीर घोरत पडला होता, त्याला जागे केले. अबू कीरने उठल्याबरोबर रोटी व भाजी सर्व घेतली आणि अबू सीरला काहीच उरले नाही.

अबू सीरने दिवसभर काम करून तीस रोटया, मांस, भाजी व इतर खाद्य पदार्थ त्यानंतर पंधरा दीनार रोखपण मिळविले. सर्व यात्रेकरू त्याचे काम पाहून खूष झाले.

एक दोन दिवसात जहाजावरच्या सर्व यात्रेकरूंना अबू सीरविषयी चांगली माहिती मिळाली. जहाजावरच्या कप्तानाच्या कानावर पण ती गोष्ट गेल्याशिवाय राहीली नाही. त्याने अबू सीरला बोलावून हजामत करवून घेतली. अबू सीरने हजामत करताना त्याच्या गरीबीविषयीचे व त्याच्यावर अबू कीर नांवाच्या रंगाऱ्याची जबाबदारी असल्याचे सांगितले. कप्तान स्वभावाने दयाळू होता. अबू सीरची त्याला कीव आली. तो अबू सीरला म्हणाला—"या प्रवासात तुम्ही जितके दिवस जहाजावर राहाल, तुम्ही दोघे माझ्याबरोबर जेवत जा."

... अबू कीर ढाराढूर झोपलेला होता. झोप मोडल्यावर त्याला जवळ पुष्कळ रोटया, फळफळावळ व इतर खाण्याचे पदार्थ दिसले. त्याने चकित होऊन विचारले—"अरे, हे सर्व कोठून मिळाले?"

"सर्व त्या अल्लाची मेहेरबानी आहे." अबू सीर म्हणाला.

अबू कीर भराभर हपापल्यासारखा खाऊ लागला. ते पाहून अबू सीर म्हणाला—"अरे एकदम एवढे खाऊ नकोस. उद्या करिता थोडे राहू दे. याशिवाय रात्री कप्तानाने आपल्याला दोघांना जेवायला बोलाविले आहे."

"नाही बुवा, मी नाही येणार. मला पित्ताचा विकार झाल्यासारखा वाटतो आहे. मला हेच खाऊ दे. तू कप्तानाबरोबर जाऊन जेव." असे सांगून अबू कीर खाऊ लागला. त्याचे खाणेपण कसे भयंकर वाटत होते. त्याच्या पोटात कसली आग उठली होती कोण जाणे? बोकाणे भरीत होता. पाणी पीत होता. नाकातोंडाचा खात असता मोठ्याने आवाज होत होता.

अबू कीर खातच होता, त्याच वेळी कप्तानाचा नोकर दोघांना जेवायला बोलवायला आला. अबू कीर म्हणाला, "मी नाही येत." तेव्हां अबू सीर एकटाच



आलेला पाहून कप्तानाने त्याला विचारले—"तुझा मित्र कोठे आहे?"

"त्याला मळमळते आहे व पित्ताचा विकार झाल्यासारखे वाटते आहे." अबू सीर म्हणाला.

"तो लवकर बरा होईल." असे सांगून त्याने अबू सीरला जवळ जेवायला बसविले.

जेवण झाल्यावर अबू सीर आभार मानून निघाला तेव्हां कप्तानाने एका ताटात सर्व खाद्य पदार्थ वाढून त्याच्या हातात देऊन म्हटले—"हे ताट तुझ्या मित्रासाठी आहे."

अबू सीर परत आल्यावर आपल्या मित्राला म्हणाला—"पाहिलेस, मी तुला

बरोबर चलायला किती सांगितले, पण तू ऐकले नाहीस आणि येथे शिळे व साधे खायला होते, त्यावरच हात मारलास! पण हे पहा, कप्तानाने तुझ्यासाठी काय पाठविले आहे? तू आयुष्यभरात असला कबाब खाल्ला नसशील."

"अरे, बघू!" असे म्हणत अबू कीरने ताट पुढे ओढून घेतले आणि बकाबका आधाशासारखा खाऊ लागला आणि पाहतां पाहतां त्याने सर्व ताट रिकामे केले. त्यानंतर दोघे झोपले.

वीस दिवस प्रयाण चालू होते. अबू सीर दररोज उठून प्रवासी लोकांच्या हजामती करून पैसे व खाद्य पदार्थ मिळवून आणी, रात्री कप्तानाबरोबर जेवी, परंतु अबू कीर खाणे पिणे व झोपणे याशिवाय काही एक करीत नसे.

एकविसाव्या दिवशी जहाज कोणत्या तरी अपरिचित नव्या बंदराला लागले. अबू कीर व अबू सीर दोघांनी गावात जाऊन एका धर्मशाळेत एक लहानशी [illegible] घेतल्या. किंमत वगैरे अबू सीरनेच दिली. अबू कीर इतके दिवस पित्तविकार झाल्याचे सांगत राहिला. म्हणून अबू सीर त्याला खोलीतच राहायला सांगून स्वतः गावात व बाजारपेठेत हिंडू लागला. त्याने एका गल्लीच्या कोपऱ्यावर सोईची जागा ठरवून घेतली व आपले काम सुरू केले. सुरवातीला त्याच्याकडे मजूर, गाढवे हाकणारे, केर काढणारे वगैरे लोक हजामत करवून घ्यायला येत. परंतु त्याच्या हाताचे कसब पाहून मोठमोठे व्यापारीपण येऊ लागले.

अबू सीर संध्याकाळपर्यंत काम करी आणि खाण्यापिण्याचे पदार्थ विकत घेऊन आपल्या खोलीवर परत येई. आल्यावर तो अबू कीरला उठवी. त्याला उठवायला तसा त्रास होत नसे. सागुतीचा वास आला की तो उठून बसे. नंतर दोघे बसून खाऊन पिऊन घेत.

(क्रमशः)





# लाखी हार

एका गावी एक इनामदार व एक जाहगीरदार शेजारी शेजारी रहात असत. दोन्ही कुटुंबांची परस्परांशी फार मैत्री होती. एकदा जहागीरदारांकडे इनामदारांना बोलवणे होते व ते सकुटुंब मेजवानीला गेले. बरोबर त्यांची मुलगी तारापण गेली होती. त्यांना यायला थोडा उशीर झाला. म्हणून नव्या सुनबाईसाठी जे दागिने तयार करविण्यात आले होते ते ताराला पाहता आले नाहीत.

इनामदारांनी एक लाख रुपयांचा हार करविल्याचे ताराने ऐकले होते. तो हार पाहण्याची ताराच्या मनात फार इच्छा होती.

ताराने इनामदारांची मुलगी सुवर्णाला तो हार दाखवितेस का विचारले. पण सुवर्णाने थोडयाशा तिरस्काराच्या आवाजातच नकार दिला. ताराला तो अपमान वाटला. तिकडे मेजवानी चालू होती. एका कोपऱ्यात एक म्हातारा मनुष्य बसलेला ताराला दिसला. परंतु त्याचे कपडे अगदीच जुने व फाटके होते. त्याला कोणी जेवायला बोलाविले नाही की त्याची विचारपूस केली नाही. तिला वाटले की तो कोणी घरातला जुना नोकर बिकर असेल, ताराला त्याची फार कींव आली. तिने त्याला विचारले– "आजोबा, तुम्हांला जेवायला येथेच आणून देऊ का?"

म्हाताऱ्याने मान हलवूनच होकार दिला. ताराने एका ताटात मिठाई वगैरे वाढून आणून त्याच्या समोर ताट ठेवले. त्या म्हाताऱ्याने ताराला विचारले–"मुली! तू हार दाखवायला विचारीत होतीस? तुला तो हार पहावयाचा आहे का?"

"त्याच्याविषयी मैत्रिणी विचारतील तर सांगता यावे यासाठी पाहण्याची फार इच्छा होती." तारा म्हणाली.

“चल माझ्याबरोबर मी दाखवितो.”

“तुम्ही दाखविणार? तो कसा काय?”

“तू ये तर. या घरात कोठे काय असते, मला सर्व चांगले माहीत आहे.”

हार पाहण्याची इच्छा मनात असल्यामुळे ती त्याच्या बरोबर गेली. म्हातारा तिला तिसऱ्या मजल्यावरच्या एका खोलीत घेऊन गेला. त्याने एका कपाटातून एक मखमली डबी काढली, त्या डबीत तो ‘लाखी हार’ होता. तो इतका सुंदर होता की तारा थक्क होऊन पहातच राहली.

तिला त्या स्थितीत पाहून म्हातारा म्हणाला—“तुला त्याचे एक चित्र काढून देतो, म्हणजे वाटले तर हे चित्र दाखवून आपल्या मैत्रिणींना हार कसा होता हे तु[illegible]” [illegible] एक [illegible] आणि त्यावर त्या लाखी हाराचे एक रेखाचित्र काढून दिले.

ताराला तेथे फार वेळ थांबावेसे वाटत नव्हते. म्हणून तो म्हातारा तो हार कपाटात ठेवू लागला त्याच वेळी ती आपल्या घरी निघून गेली.

जहागीरदाराकडच्या लग्नाला आणखी एक आठवडा उरला होता. तारा आपल्या खोलीत बसून वाचीत होती, तेव्हां जहागीरदारांच्या घरून तिला निरोप आला. जहागीरदारांच्या घरी ती गेली तेव्हां त्यांच्या घरी गोंधळ उडून गेलेला तिला दिसला. जहागीरदारणीने ताराला विचारले—“काय ग तारा, मेजवानीच्या दिवशी तू लाखी [illegible] पाहिल्याचे तिला सांगितले होतेस?”

ताराने आपल्या मैत्रिणीला खरोखरच सांगितले होते, आणि तिला तो हार कसा पहायला मिळाला होता हेदेखील सांगितले होते. उषा ताराची मैत्रीण होती तशी सुवर्णाचीपण होती. म्हणून तारा म्हणाली—“होय, पाहिला होता.”

तिच्या तोंडी सर्व ऐकून घेतल्यावर जहागीरदारीण म्हणाली—“म्हणून मी म्हणत होते, त्या म्हाताऱ्याला बोलावू नका. म्हातारपणी पैशाचा एवढा मोह! म्हणूनच ते फाटके कपडे घालून आला होता.”

“ते तर म्हणाले की ते याच घरचे आहेत.” तारा भीत भीत म्हणाली.

“घरातलेच आहेत, नाहीतर त्या कपाटात आहे हे त्यांना कसे कळले असते? ते त्याच दिवशी निघून गेले. पोलिसात वर्दी करविली आहे, परंतु अद्याप पत्ता लागला नाही.” जहागीरदारीण म्हणाली.

ताराला आश्चर्यच वाटले. त्याने चोरी केली असेल, हे तिला खरेच वाटेना. तिच्या जवळ त्या म्हाताऱ्याने त्या लाखी हाराचे काढून दिलेले चित्र होते. त्या चित्रावर लिहिले होते, गाव नारायणपुर, जिल्हा गोंडा, उ. प्र.

ताराला वाटले की म्हातारा आपल्या गावी गेला असावा. म्हाताऱ्याचे नाव शिवशंकर सिंह होते. कोणाला तो पत्ता वगैरे कळविण्याच्या आधी त्याला भेटावे.







म्हातारा चोर असणे शक्यच नाही. तो हार उचलून नेण्यामागे काही तरी गुपित असले पाहिजे, असे ताराला वाटले.

ताराने सर्व काही आपल्या भावाला सांगितले आणि दोघे आईवडिलांच्या परवानगीने नारायणपूरला निघाले. तेथे गेल्यावर शिवशंकर सिंह आला नाही असे कळले.

म्हातारा अशा तऱ्हेने नाहींसा झाला आहे तर नक्कीच त्यामागे काहीतरी गुपित असले पाहिजे. कोठे अपघात तर झाला नसेल? जवळपासच्या इस्पितळात चवकशी करून पहावी. दोघांनी नारायणपूरच्या आसपासच्या इस्पितळात चवकशी करून

नावाचा नाही, परंतु शिवसिंह नांवाचा एक म्हातारा मनुष्य असल्याचे कळले. म्हणून दोघांनी भीत भीतच त्या इस्पितळात प्रवेश केला. समोरच एका खाटेवर त्या म्हाताऱ्याला पाहून ताराला आनंद झाला. म्हाताऱ्याने ताराला पाहताच ओळखले.

ताराने सुरवातीला त्याच्या तब्येती विषयी व इकडच्या तिकडच्या गोष्टींची चवकशी केली. नंतर तिने तो हार चोरीला गेल्याचे आणि घरची सर्व मंडळी घाबरून गेल्याचे सांगितले. ते ऐकून म्हातारा 'खो खो' करून मोठ्याने हंसू लागला. म्हणाला–"मी त्या दिवशी या गावी एका सायकिलीचा धक्का लागून पडलो आणि जखमी झाल्यामुळे इस्पितळात येऊन पडलो आहे. त्या घमेंडखोर मंडळींना त्रास व्हावा व ती मंडळी घाबरून जावी, हेच मला हवे होते."

"तू काळजीत पडल्यासारखी दिसते आहेस म्हणून सांगतो, नाहींतर मी त्या लोकांना पुष्कळ त्रास द्यायचे ठरविले होते. त्यांनी माझा एवढा अपमान कां केला? मला त्यांनी जेवायला बोलाविले, नंतर मी जुने कपडे घालून गेलो म्हणून कोणी माझी विचारपूस केली नाही की मला जेवायला बसायला सांगितले नाही. मी त्यांची परीक्षा घेण्यासाठीच तसे कपडे घालून गेलो होतो.

माझा मान त्यांनीं राखायला पाहिजे होता." म्हातारा म्हणाला.

"आम्ही तुम्हांला कधी यापूर्वी त्यांच्या घरी पाहिले नव्हते?" ताराने विचारले.

"मी फार पूर्वी मुंबईला निघून गेलो होतो. व्यापार करून पुष्कळ पैसे मिळविले. जगात एकटा आहे. म्हणून बँकेत पुष्कळ पैसे जमा झाले तेव्हां व्यापारधंदा सोडून तीर्थयात्रा करीत किंवा प्रवास करीत हिंडत असतो. परोपकारासाठी मिळविलेले पैसे खर्च करतो. माझ्या भावाला किंवा इतर नातेवाइकांना माझ्या नावावर बँकेत दहा लाख रुपये आहेत हे माहीत नाही. बरे तर मुली, तू इतक्या दुरून आली आहेस आणि मला पोलीसांच्या कचाट्यातून वांचविण्याचा हेतूने आली आहेस. म्हणून मी हे सर्व तुला सांगितले. आणखी पुढे सांगतो, मी तो हार त्या कपाटातून काढून दुसऱ्या कपाटात ठेवला आहे. मी त्यांना त्यांच्या गैरवर्तणुकीबद्दल शिक्षा देण्यासाठी तसे केले.

पोलीस कचेरीत तक्रार गेली आहे तर मी तुला तो हार कोणत्या कपाटात कोठे ठेवला आहे, हे नकाशा काढून दाखवितो. तू तो त्यांना दाखव, त्यांना सर्व कळेल." म्हाताऱ्याने आपली पूर्वकथा सांगून नकाशा दिला.

काही वेळाने तारा व तिचा भाऊ तेथून निघाले. जातांना त्यांनी नर्सला सांगून ठेवले कीं पैशाची गरज असल्यास त्यांना कळवावे. त्यांनी आपले नाव व पत्ता लिहून ठेवला.

नर्स स्मित करून म्हणाली–"नाही हो, हा म्हातारा दिसायला असा आहे. कालच त्याच्या नावाने पाच हजार रुपये आले. जाणून बुजून जनरल वार्ड मध्ये त्याने स्वत:ला ठेवायला सांगितले. तो स्वत: खर्च करून इतर गरीब रोग्यांना फळांचा रस वगैरे देतो."

तिसऱ्या दिवशी नारायणपूरच्या जहागीरदाराच्या घरातच हार सापडल्याचे वृत्त वर्तमानपत्रात निघाले.



# सोन्याची तलवार

एक दिवशी अकबर बादशाह आपल्या वजिरांबरोबर घोड्यावर बसून राजधानीत फिरायला निघाला. एका गल्लीत एक म्हातारी रस्त्याच्या बाजूला उभी होती. तिच्या हातात एक तलवार होती., बादशाहने जवळ जाऊन तिला विचारले–"आजी! तुम्ही ही तलवार हातात घेऊन अशा येथे उभ्या कशासाठी आहा?"

"मी एक गरीब बाई आहे, बाबा! म्हणून ही तलवार विकायला आणली आहे." म्हातारी म्हणाली.

अकबर बादशाहने तलवार घेऊन उलटून पालटून पाहिली. तलवार गंजलेली होती. बादशाहने तलवार परत केली. म्हातारीने निराश होऊन बादशाहकडे पाहिले.

"तुझ्या म्हणण्याचा अर्थ मला कळला नाही. तू अशी निराश कां दिसतेस?" बादशाहने विचारले.

"तसे काही नाही, मी ऐकले होते की बादशाह अकबर ज्या वस्तूला हात लावतो ती सोन्याची होऊन जाते. परंतु माझे नशीबच फुटके. म्हणून ही तलवार बदलली नाही." म्हातारी म्हणाली.

म्हातारीच्या हुशारीवर खूष होऊन बादशाहने सोन्याची दोन नाणी तिला दिली व पुढे गेला.





# दरबारी पंडित

प्राचीन काळातील ही गोष्ट आहे. वंग देशाच्या गादीवर श्रीकेतु नावाचा राजा राज्य करीत होता. अंग देशाशी वंग देशाचे वैर होते. अंग देशाच्या राजाला वंग देश युद्ध करून जिंकणे अशक्य होते. म्हणून त्याने वंग देशाच्या राजधानीत शिरायला गुप्तमार्ग व चोरवाटा कोठे कोठे आहेत यांची चांगली माहिती काढून अचानक छापा मारून ते राज्य जिंकण्याचे ठरविले. त्यासाठी त्याने आपले काही हेर वंग देशात पाठविले. परंतु एकाही हेराला यश मिळाले नाही.

त्याच सुमारास वंगदेशाचा दरबारी पंडित वारला. म्हणून वंगदेशाच्या राजाने एका योग्य विद्वान व्यक्तीला आपल्या दरबारी पंडित म्हणून नेमण्याचे ठरविले. अंग राजाने त्या संधीचा उपयोग करून घेण्याचे योजले. त्याने आपल्या अनुयायांपैकी अंगशास्त्री नावाच्या पंडिताला वंग देशाच्या दरबारात पाठविले.

श्रीकेतूने अनेक पंडितांची परीक्षा घेऊन दोघांची निवड केली. त्यांपैकी एक अंगशास्त्री होता व दुसरा होता रामशास्त्री. रामशास्त्री वंगदेशाचा राहणारा होता. राजाने दोघांपैकी कोणाला दरबारी पंडित म्हणून नेमणार, उद्यां त्याची घोषणा करीन असे सांगून दोघांना निरोप दिला. त्या दिवशी संध्याकाळी श्रीकेतु आपल्या राजवाड्याच्या गच्चीवर फिरत होता. त्या वेळी तेथे एक कबूतर उडत आले. त्याच्या पायाला एक चिठ्ठी बांधलेली होती. चिठ्ठीत हा मजकूर होता–"दरबारी पंडित म्हणून रामशास्त्री यांस नेमावे. नाहीतर शत्रूचा धोका सोसावा लागेल. सावध रहावे!"

सावध करून देणारी ती चिठ्ठी वाचून राजाला राग आला. रामशास्त्रीनेच ही



चिट्ठी लिहून पाठविली असावी, असे राजाला वाटले. राजाने आपले शिपाई पाठवून रामशास्त्रीला अटक करविली. ती बातमी 'हा हा' म्हणता राजधानीभर पसरली. अंगशास्त्रीची युक्ति यशस्वी झाली. म्हणून त्याला आनंद झाला.

त्याला अटक कां झाली हे रामशास्त्रीला मात्र मुळीच कळले नाही. त्याने राजाला भेटण्यासाठी परवानगी मागितली. त्या दिवशी रात्री राजा श्रीकेतु रामशास्त्रीला तुरुंगात जाऊन भेटला. कबूतराद्वारे मिळा-लेली चिट्ठी रामशास्त्रीला दाखवून राजा म्हणाला—"तुला कैद करण्याचे कारण ही चिट्ठी आहे."

रामशास्त्रीने ती चिट्ठी एक दोनदा लक्षपूर्वक वाचली आणि म्हणाला—"महा-राज, या चिट्ठीमागे फार मोठा कट आहे, अशी मला शंका आहे. मला अशी चिट्ठी लिहिण्याचे कारणच काय? अंग शास्त्री खरा पंडितच नाही. प्रति स्पर्धा बरोबरीच्या माणसाशीच होते. म्हणून हे पद मलाच मिळणार, यात मला थोडी देखील शंका नव्हती व मला आतां ही नाही. परंतु मला हे पद मिळू नये यासाठी कोणीतरी केलेला हा कट आहे. ती गरज अंगशास्त्रीशिवाय आणखी कोणाची असेलसे मला वाटत नाही. अंगशास्त्री दरबारी पंडित होण्यासाठी इतका प्रयत्न कां करीत आहे, या गोष्टीची चवकशी आपण करून पहावी. तो आपल्या देशाचा राहणारा पण नाही." रामशास्त्री म्हणाला ते ऐकल्यावर राजाचे डोळे उघडले. रामशास्त्रीला लगेच सुटका देण्याचा राजाने विचार केला.

परंतु रामशास्त्री म्हणाला—"महाराज, मला आणखी काही काळ तुरुंगातच राहू द्यावे. कारण अंगशास्त्रीला शंका येण्याची शक्यता आहे. आपण त्याला उद्या दरबारी पंडित म्हणून नेमावे. त्याच्यावर रात्रंदिवस नजर ठेवण्यासाठी आपण हुशार हेर नेमावे. हा शत्रूचा हेर असावा, अशी मला एक शंका वाटत आहे." रामशास्त्रीला कैदेत

[illegible] क्षमा मागून राजा आपल्या राजवाड्यात परतला.

दुसऱ्या दिवशी राजाने अंगशास्त्रीला दरबारी पंडित म्हणून नेमले. त्याला राह-ण्यासाठी एक वाडा देऊन त्याच्या सेवेला नोकरचाकर नेमले. त्यांच्यापैकी त्याला आवश्यक अशा दोघांतिघां स्वैपाक्यांना व इतर नोकरांना निवडून अंगशास्त्रीने त्यांच्याबरोबर एका बलदंड व्यक्तीला आपला स्वतःचा सेवक म्हणून निवडले. तो बलदंड मनुष्य पूर्णपणे बहिरा होता. अशा माणसाला आपल्याजवळ ठेवून घेणे अंग शास्त्रीला आवश्यक वाटले.

ज्या दिवशी अंगशास्त्रीला दरबारी पंडिताच्या पदावर नेमले, त्याच दिवशी त्याला भेटायला अंग देशाचे काही हेर आले. अंगशास्त्रीने त्या बहिऱ्या नोकराला सोडून इतरांना काही तरी कामाच्या निमित्ताने बाहेर जायला सांगितले. नंतर त्या हेरांना म्हणाला—"तुम्ही जाऊन आपल्या महाराजांना मी राजाच्या बाले-किल्लयात शिरलो असल्याचे कळवा."

तो बलदंड मनुष्य खरोखरी बहिरा नव्हता. तो वंग देशाच्या हेरखात्याचा प्रमुख होता. तो थोडा वेळ बाहेर गेला आणि त्याने ती बातमी एका हेराकरवी महाराजांपर्यंत पोचती केली.

अंगशास्त्रीला भेटायला आलेले हेर परत जाण्यापूर्वीच राजाच्या शिपायांनी त्यांना व अंगशास्त्रीला कैद केले.

त्या दिवशी राजाने रामशास्त्रीला कैदेतून सोडून आदरपूर्वक दरबारात बोला-विले. त्याचा सत्कार करून त्याने, कशा तऱ्हेने राज्यावर आलेल्या एका मोठ्या संकटांतून राज्याचे रक्षण केले, हे दरबारी लोकांस सांगितले आणि त्याला आपल्या दरबारी पंडिताच्या पदावर नेमले.

अंगशास्त्री व त्याच्या साथीदारांनी ते अंग देशाचे हेर असल्याचे कबूल केल्यावर त्यांना योग्य शिक्षा देऊन तुरुंगात टाकण्यात आले.












# मूर्ख मुले

एका गावी एका श्रीमंत माणसाला एकाहून एक दोन मूर्ख मुलगे होते. एकदा शेजारच्या गावात एक जमीनदार मरण पावला. त्या श्रीमंत मनुष्याची स्वतःची तब्येत बरी नव्हती. म्हणून त्याने आपल्या मुलांना बोलाविले व म्हणाला–"तुम्ही दोघे शेजार गावच्या जमीनदाराच्या घरी जाऊन त्याच्या कुटुंबियांजवळ सहानुभूति व्यक्त करून या !"

धाकटा म्हणाला–"बाबा, मी जातो. सहानुभूति कशी व्यक्त करावयाची हे सांगा."

"अरे तेथे चार माणसे बोलतील ते बोल." श्रीमंत माणूस म्हणाला.

धाकटा मुलगा जमिनदाराच्या गावी गेला. तेव्हां चारपांच जण बाहेर बोलत होते– "बरं झालं, गावावरची पीडा कायमची टळली."

त्यानंतर धाकटा मुलगा घरात गेला आणि जमीनदाराच्या बायकोला म्हणाला– "काकू ! बरं झालं, गावावरची पीडा कायमची टळली."

हे ऐकून जमीनदाराच्या मुलांनी त्याला घराबाहेर ओढून नेऊन खूप बडविले.

धाकट्या भावाची अशी दुर्गत झालेली ऐकून मोठा भाऊ जमीनदाराच्या घरी जाऊन त्याच्या बायकोला म्हणाला–"काकू ! माझा धाकटा भाऊ आहे मूर्ख ! त्याला क्षमा करा. पुन्हा कोणी मेलं तर सहानुभूति व्यक्त करायला मी स्वतः येईन." ते ऐकून जमीनदाराच्या मुलांनी त्याची पाठ देखील छान मऊ करून त्याला हाकलून लावले.





# चतुर चोर

वैशाली नगरीत गजेंद्र नावाचा एक अट्टल चोर रहात असे. त्याच्या युक्तीच्या दंतकथा लोक सांगत. तो श्रीमंताची घरे लुटून चोरीचा माल गोरगरीबांमध्ये वाटत असे. म्हणून तो स्वतः श्रीमंत झाला नाही. पुढे तो चांगला श्रीमंत झाला, परंतु चोरीचा धंदा करून नव्हे.

एकदा गजेंद्र चुना करायला कोठून तरी शिंपले व शंख गोळा करून घेऊन घोड्यावर बसून येत होता. गजेंद्राचा घोडा म्हातारा होता. म्हणून तो दमला होता. जंगलातल्या एका वळणावर येताच झाडीतून दुसरा एक अट्टल चोर आपल्या घोड्यावर गजेंद्रासमोर आला व त्याला त्याने द्वंद्वयुद्धास आव्हान केले. म्हणाला–"ती पिशवी मला देतोस की मरायला तयार होतोस ?"

गजेंद्र त्या लुटेऱ्याला पायापासून डोक्यापर्यंत एकदा पाहून म्हणाला–"ही पिशवी मला माझ्या जिवापेक्षा का जास्त किमतीची वाटणार ?" असे म्हणत त्याने ती पिशवी एका निवडुंगाच्या झुडपात टाकून दिली.

"इतका गर्व का ? तुझी खोड मोडतो." असे म्हणत तो लुटेरा त्या काटेरी झाडीतून ती पिशवी काढून घेण्याचा प्रयत्न करू लागला. इकडे गजेंद्र आपल्या घोड्यावरून उतरला आणि लुटेऱ्याच्या घोड्यावर बसला. तो घोडा चांगल्या जातीचा होता. लवकरच गजेंद्र त्याच्या घरी पोचला. त्या घोड्याच्या खोगिराखाली सोने सापडले. लुटेरा शिंपल्यांच्या पिशवीसाठी घोडा व खोगिराखालचे सोने घालवून बसल्याबद्दल पश्चात्ताप करू लागला.

आणखी एकदा असाच गजेंद्र राजधानीतल्या एका गबरू दुकानदाराच्या दुकानात गेला आणि त्याने दुकानदाराला विचारले– "मला एक तपेले पाहिजे, दे !"

दुकानदाराने एक तपेले दाखविले. गजेंद्र ते पाहून म्हणाला–"याला तर भोक दिसते आहे!" दुकानदाराने तपेले हातात घेऊन लक्षपूर्वक पाहिले व म्हणाला–"नाही हो, याला कोठे भोक आहे?"

"जरा बाहेर उजेडात जाऊन पहा." गजेंद्र म्हणाला.

दुकानदार तपेले घेऊन दुकानाबाहेर गेला आणि उलटे करून पाहू लागला. गजेंद्राने लगेच ते तपेले दुकानदाराच्या तोंडावर टाकले व दुकानातले पैसे व इतर वस्तु उचलून घेऊन निघतांना म्हणाला–"भोक नाही म्हणतोस तर तुझे तोंड त्याच्यात कसे काय अडकले रे?"

एकदां गजेंद्राने एका श्रीमंताच्या मुलीला चोरांच्या हातातून वांचविले. त्या मुलीने गजेंद्राचे आभार मानून विचारले–"मी आपल्या या उपकाराची फेड कशी काय करू शकेन?"

"त्यात काय? तू माझ्याशी लग्न करायला तयार हो. होईल उपकाराची फेड."

ग[illegible] फसवितो हे त्या मुलीला माहीत होते. त्याचबरोबर तो श्रीमंतांच्या घरीच चोरी करतो हेदेखील तिनें ऐकले होते. म्हणून ती नकार देत म्हणाली–"ते शक्य नाही."

"तुला मी सामान्य मनुष्य आहे, असे वाटले वाटते? मी आयुष्यभरात पुरी केली नाहीत किंवा करू शकलो नाही अशी वचने कधी दिली नाहीत. म्हणून तुझ्याबरोबर विवाह करणे मला अपमानास्पदच वाटेल." असे सांगून गजेंद्राने त्या श्रीमंताच्या मुलीला निरोप दिला.

ती गोष्ट त्या मुलीच्या बापाला जेव्हां कळली तेव्हां तो मुलीला रागावला आणि गजेंद्राशींच तिचा विवाह करून दिला.

लग्न झाल्यावर गजेंद्राने चोरी करण्याचा धंदा सोडून दिला. त्याच्या न्यायप्रियतेची लोक वाखाणणी करू लागले. ती गोष्ट कळल्यावर वैशालीच्या राजाने गजेंद्राला आपल्या राज्याचा न्यायाधीश नेमले.





# महाभारत

दुर्वास ऋषींना व त्यांच्या सहस्र शिष्यांना अवेळी सैपाक करून कसे वाढावयाचे हे द्रौपदीला कळेना. तिने कृष्णाचे स्मरण करतांच कृष्ण उपस्थित झाला.

द्रौपदी कृष्णाच्या पायां पडून नमस्कार करून म्हणाली–"दुर्वास ऋषि गंगेवर शिष्यांसह स्नानाला गेले आहेत. त्यांना जेवायला मी काय वाढू? अक्षय पात्रात एक शीत देखील उरलेले नाही."

"दुर्वास ऋषी आल्यावर काय करायचे ते त्या देवाला माहीत. मला पहिल्याने भूक लागली आहे. मला काही तरी खायला दे. त्यानंतर तुझ्यासमोर जो प्रश्न उभा आहे त्याविषयीं मी विचार करीन." कृष्ण म्हणाला.

द्रौपदी लाजून म्हणाली–"मी जेवायला बसेपर्यंत अक्षयपात्र भरलेले असते. पण माझे जेवणखाण झालेले आहे आणि अक्षयपात्रात आतां काही एक उरलेले नाही. आतां तूच माझी सत्वपरीक्षा घ्यायला निघालास तर मी तरी काय करू?"

"मला भूक लागली आहे आणि तुला थट्टा सुचते आहे. पहा, तुझे अक्षयपात्र आणि त्यात असेल ते दे मला खायला." कृष्ण म्हणाला.

द्रौपदी अक्षयपात्र उचलून घेऊन आली. त्याच्या कोपऱ्यात कोठें तरी एक शीत चिकटलेले होते. कृष्णाने ते शीत तोंडात टाकले आणि म्हणाला–"आपले पोट भरले, बुवा!"

## ३५. जयद्रथाचा पराभव



नंतर कृष्णाने भीमाला बोलाविले आणि म्हणाला–"तू गंगेवर जा आणि दुर्वास ऋषि व त्यांच्या शिष्यांना लवकर जेवायला चला म्हणून सांग."

भीम तेथे पोचला त्यापूर्वीच दुर्वास ऋषि व त्यांच्या शिष्यांना पोट भरल्यासारखे वाटले व ते ढेकरा देऊ लागले होते. शिष्य दुर्वास ऋषींना म्हणाले–"गुरुवर्य! पोट एकाएकी भरल्यासारखे वाटते आहे. आपण युधिष्ठिराला जेवायला येतों म्हणून सांगून आलो होतो. आतां एक घासभर अन्न देखील पोटात जाईल की नाही शंकाच!"

दुर्वास ऋषि आपल्या शिष्यांना म्हणाले–"आपण युधिष्ठिराला छळण्यासाठी आलों होता. पण तो सामान्य मनुष्य नाही. त्याने आपल्याकडे कोप दृष्टीने पाहिले तर आपण सर्व भस्म होऊन जाऊ. पूर्वी अंबरीष राजाला त्रास दिल्याचे फळ मला मिळाले आहे. आता आपण युधिष्ठिराला भेटल्या शिवाय परस्पर निघून जाण्यातच शहाणपण आहे." त्याप्रमाणे दुर्वास ऋषि युधिष्ठिराला भेटल्याशिवाय निघून गेले.

दुर्वास ऋषींनी अंबरीष राजाला त्रास दिल्याचे फळ त्यांना कसे भोगावे लागले त्याची कथा अशी आहे,–एकदा अंबरीष राजा एकादशीचे पारणे फेडण्यासाठी जेवा-यला बसणार इतक्यात दुर्वास ऋषी आले. राजाने त्यांना स्नान करून जेवायला येण्यास विनंती केली. परंतु दुर्वास ऋषींना नदीवरून स्नानसंध्यादि आटोपून यायला बराच उशीर झाला. पारणे फिटण्याची वेळ टळत होती आणि अतिथीपूर्वी अन्न ग्रहण करणे पण बरोबर नव्हते. म्हणून अंबरीष राजाने फक्त एक तुळशी दल खाऊन पारणे फेडले. परंतु दुर्वास मुनींना अंतर्ज्ञानाने ते कळले. ते रागावले आणि त्यांनी आपल्या डोक्यातल्या एका केसातून एक कृत्या नावाची राक्षसीण उत्पन्न करून तिला राजावर सोडले. परंतु भक्ताचा कैवारी विष्णु, त्याला राग आला व त्याने आपले सुदर्शन चक्र सोडले. ते कृत्येचा वध करून दुर्वास ऋषींच्या पाठीस लागले. दुर्वास ऋषि ब्रह्मा, विष्णु व महेश यांच्याकडे मदतीस धावले. पण त्यांच्या मदतीस कोणी आला नाही. तेव्हां दुर्वास ऋषींनी शेवटी स्वत: अंबरीष राजाची क्षमा मागून प्राणाची भीक मागितली.

भीमाला गंगेकाठी कोणीच दिसले नाही. स्नान करणाऱ्या एका ब्राह्मणाकडून त्याला, दुर्वास ऋषि शिष्यांसह परस्पर निघून गेल्याचे कळले. भीमाने परत येऊन युधिष्ठिराला ते वृत्त सांगितले.

त्यानंतर कृष्ण सर्वांचा निरोप घेऊन द्वारकेला परतला. कृष्णाच्या कृपेने पांडवां-वरचे ते संकट टळले.

आणखी काही दिवसांनी पाचही पांडव शिकारीला रानात गेले होते. परत येईपर्यंत द्रौपदीला व धौम्य ऋषींना त्यांनी तृणबिंदु नामक ऋषींच्या आश्रमात रहायला सांगितले.

त्याच दिवशी जयद्रथ सालव राजाच्या राजकन्येशी विवाह करून तृणबिंदु ऋषींच्या आश्रमाशेजारून जात असतां त्याला लता-मंडपात द्रौपदी दिसली. आश्रम निर्जन होता.

द्रौपदीला पाहताच जयद्रथ देहभान विसरला. कोटिकास्य नामक राजकुमाराला जवळ बोलावून म्हणाला–"ती सुंदर स्त्री तुला दिसते आहे ना. तिला घेऊन जावे



आणि सालव राजकुमारीचा परित्याग करावा, म्हणतो. तू चवकशी करून ये, ती कोणाची मुलगी की बायको आहे?"

कोटिकास्य स्वत: सुद्धा दुष्ट स्वभावाचा होता. म्हणून तो नि:संकोचपणे द्रौपदी उभी होती तिथे गेला आणि विचारू लागला–"हे सुंदरी! कोण तू? कोणत्या जातीची? तुझे नाव काय? तू या जंगलात एकटी कशी काय? तू आमची ओळख विचारली नाहीस. म्हणून मी स्वत:च देतो. मी सुरथ देशाचा राजकुमार आहे. माझे नाव कोटिकास्य असे आहे. समोर आहेत ते त्रिगर्तचे महाराज, कुलिंद महाराज आणि राजकुमार सुबल आहेत. बारा राजांच्या



मध्यभागी रथात बसलेले सिंधु व सौवीर देशांचे महाराज जयद्रथ आहेत. त्यांनीच तुझ्याविषयी चवकशी करून यायला मला पाठविले आहे."

द्रौपदी त्या राजकुमाराला म्हणाली– "तू कोण, हे मला माहीत आहे. माझ्या सारख्या कुलीन स्त्रीनी तुझ्या सारख्या तरुण राजकुमाराशी बोलणे कुळमर्यादेबाहेर आहे. परंतु तू विचारलेल्या प्रश्नांची उत्तरे देणारा यावेळी येथे कोणी नाही. म्हणून मीच उत्तर देते आहे. मी द्रुपद राजाची मुलगी कृष्णा आहे. पंचपांडव माझे पति आहेत. ते यावेळी शिकारीला गेले आहेत. लवकरच परत येतील. ते येईपर्यंत तुम्ही करवून घेऊन जावे. त्यांना पण त्याबद्दल आनंद होईल."

त्यानंतर त्या सर्वांचे आतिथ्य करण्यासाठी आवश्यक तयारी करायला ती कुटीत गेली. काटिकास्यने, द्रौपदीने सांगितलेले वृत्त जयद्रथला सांगितले.

"ती कोणी मानवी जातीची स्त्री दिसत नाही. ज्या डोळ्यांनी मी तिला पाहिले त्या डोळ्यांनी इतर स्त्रियांकडे पाहणार देखील नाही." जयद्रथ म्हणाला.

तरमग तिला रथात बसवून घेऊन आपल्या राजधानीला जा." काटिकास्यने सुचविले.

जयद्रथ रथातून उतरला. सहा राजांना बरोबर घेऊन तो कुटीत शिरला व द्रौपदीला म्हणाला–"तू व तुझे पति खुशाल आहेत ना?"

द्रौपदीने त्याची विचार पूस करून अर्घ्यपाद्य वगैरे देऊन आसनावर बसायला सांगितले व म्हणाली–"पांडव परत येण्याची वेळ झालीच आहे. आल्यावर मी पंच मांस भोजन करून आपणांस वाढीन."

"आम्ही आतिथ्य घेण्यासाठी आलो नाही. आमच्या बरोबर रथात बसून चल. तुला आपली राणी करून घेईन. तू या रानात राहणे शोभत नाही. पांडव स्वतःच्या मूर्खपणामुळे कष्ट सहन करीत आहेत. त्यांच्या बरोबर तू कष्ट सहन करण्याची गरजच काय? सिंधु व सौवीर देशांचे महीषीपद मी तुला देत आहे." जयद्रथ म्हणाला.

ते ऐकून द्रौपदीला राग आला. तरी पति परत येईपर्यंत त्यांना गप्पात रंगवून ठेवण्याचे ठरवून म्हणाली–"तू तरी किती मूर्ख दिसतो आहेस. माझ्या पतींचा प्रताप तुला माहीत नाही वाटते? इंद्रासारखे पांच ही जण पराक्रमी आहेत. त्यांच्या कोप तुझ्यावर झाला तर ते तुला जड जाईल."

"पांचाली तू पांडवांच्या प्रतापाची गोष्ट नव्याने सांगण्याची गरज नाही. जगात एकंदर सतरा क्षत्रिय कुळे प्रमुख व मान्य आहेत. त्यांपैकी आमचे एक कूळ. उगाच गप्पा मारण्यात वेळ घालवू नकोस, माझ्या बरोबर चल. मी पांडवांच्या भीतीने तुला सोडून जाईन असे मात्र समजू नकोस." जयद्रथ म्हणाला.

द्रौपदीला आतां मात्र फारच राग आला. ती म्हणाली–"दुष्टा! पांडवांची बायको अशी सहजी तुझ्याबरोबर चालू लागेल असे वाटले होय तुला? तुझ्या पाठीमागून अर्जुन तुझ्या समाचाराला येणार नाही होय? मी तुला वरमाळा घालीन हा तुझा भ्रम आहे. मी एक पतिव्रता स्त्री आहे. पांडवांशिवाय माझे मन इतरत्र जाणे शक्य नाही."



त्यानंतर जयद्रथाबरोबर आलेले लोक द्रौपदीला उचलून घेऊन जायला तयार झाले. द्रौपदी आपला बचाव करून धौम्य मुनींना ऐकू जाईल इतक्या मोठ्याने ओरडली. परंतु जयद्रथ तिला दोन्ही हातांनी उचलून घेऊन पळून जाऊ लागला. द्रौपदीचा आवाज ओळखून धौम्यमुनि ओरडत मागे जाऊ लागले. परंतु त्यांच्या ओरडण्याकडे दुर्लक्ष करून जयद्रथ द्रौपदीला रथात बसवून घेऊन निघाला.

धौम्य ऋषी जयद्रथाला म्हणाले–"या नीचपणाची फळे तुला भोगावी लागतील. तुझी हिंमत असेल तर पांडवांचा पराभव करून द्रौपदीला घेऊन जा. पर स्त्रीला असे पळवून नेणे महापाप आहे." परंतु



जयद्रथाने त्यांच्या बोलण्याकडे दुर्लक्ष केले. धौम्य ऋषि रथामागे धावू लागले.

तिकडे पांडव शिकार करून आश्रमाकडे निघाले. त्यांनी आश्रमात जाऊन पाहिले, द्रौपदी नव्हती. इंद्रसेन नावाच्या सारथ्याला धात्रेयिका नामक दासी रडत असलेली दिसली. तिने, थोड्याच वेळा पूर्वी जयद्रथ द्रौपदीला उचलून घेऊन पळून गेल्याचे सांगितले.

युधिष्ठिराने धात्रेयिकेला शांत केले व जयद्रथाची खोड मोडून द्रौपदीला सोडवून आणण्यांसाठी त्याने आपल्या भावंडांस सांगितले. पांडव रथात बसून जयद्रथाचा रथ ज्या वाटेने गेला होता त्याच वाटेने त्याचा पाठलाग करीत निघाले. काही वेळाने त्यांना दूर रथ असल्याचे आकाशात धुळीचे लोट पाहून कळले. थोड्या वेळाने रथा-मागे पळत असलेले धौम्य ऋषि भेटले. त्यांना थांबायला सांगून पांडव जास्त वेगाने पुढे निघाले आणि घार जशी कोंबड्यांच्या पिल्लांवर झडप मारते तसे ते जयद्रथाच्या सैन्यावर तुटून पडले.

सैन्याच्या मध्यभागी जयद्रथाच्या रथात द्रौपदीला पाहून पांडवांचा क्रोध द्विगुणित झाला. ते ओरडून जयद्रथाला आव्हान करीत म्हणाले–"दुष्टा! थांब!" आणि त्यांनी आपला रथ जयद्रथाच्या रथाजवळ नेला. पांडवांना आलेले पाहून जयद्रथाचे सर्व साथी राजे व राजकुमार यांची गाळण उडाली व ते पळून गेले.

द्रौपदी जयद्रथाला म्हणाली–"ते पहा माझे पति पंच पांडव तुझ्या 'सत्काराला' आले आहेत. यावेळी तुझे सर्व सैन्य व तू आणि तुझे सर्व साथीमित्र त्यांच्या कोपाग्नीत भस्म झाल्याशिवाय राहणार नाहीत. या संकटातून जिवंत सुटलास तर तुझा पुनर्जन्मच झाला असे समज."

पांडवांनी बाणवृष्टि करून जयद्रथाच्या सैन्याला पळवून लावले. सैन्य वाट फुटेल तिकडे पळू लागले. भीम गदा हाती घेऊन जयद्रथावर तुटून पडला. परंतु कोटिकास्य

मध्ये आला आणि त्याच्याबरोबर अनेक योध्दे जयद्रथाच्या मदतीला धावले. त्यांनी पांडवांवर शस्त्रप्रहार करायचा प्रयत्न करून पाहिला. अर्जुन जयद्रथाच्या रथाकडे वळला तेव्हां त्याला पंधरा शूर राजकुमारांनी अडविले. अर्जुनाने त्या सर्वांचा वध केला. युधिष्ठिराने शंभर सौवीरांना यमसदनी पाठविले. त्याच्या हाती त्रिगर्त राजा ठार झाला. नकुल रथातून सैनिकाची डोकी उडवू लागला. सहदेवाने हत्तीवर बसलेल्या सर्व वीरांना ठार केले.

अशा तऱ्हेने एका मागून एक जयद्रथाचे साथी रणांगणावर पडू लागले. कोटिकास्य पळून गेला. शेवटी नाइलाज होऊन जयद्रथ द्रौपदीला रथात सोडून पळाला. अर्जुनाने ती गोष्ट भीमाला सांगितली. भीमाने सैनिकाचा वध करण्याचे सोडले व युधिष्ठिराला म्हणाला—"दादा! तुम्ही द्रौपदीला व धौम्य मुनींना रथात बसवून घेऊन आश्रमाकडे परत जा. मी व अर्जुन जयद्रथाच्या समाचाराला जातो."

[illegible] आहे व तो आहे पण दुष्टच. पण त्याचा वध करू नकोस. कारण दुश्शलेला वैधव्य येईल असे काही तू करू नकोस. कारण त्यामुळे गांधारीला फार दुःख होईल." युधिष्ठिराने भीमाला थोडे समजावून सांगितले. परंतु द्रौपदी म्हणाली—"जयद्रथाला जिवंत सोडतां कामा नये!" त्यानंतर युधिष्ठिर रथात बसून आश्रमाकडे परतला.

भीमार्जुनांनी एका कोसावर जयद्रथाला धरले. त्याचे मुंडन केले आणि आपल्या रथात त्याला व आपल्या दोघां भावांना बसवून घेऊन आश्रमात आले. त्यांनी जयद्रथाला युधिष्ठिराच्या पायांसमोर ढकलले.

"आजपासून तू पांडवांचा दास म्हणून वाटेल तिकडे रहा." असे सांगून द्रौपदीच्या परवानगीने भीमाने त्याला सोडले.

"या पुढे तू असले दुष्ट कृत्य करू नकोस," असे सांगून युधिष्ठिराने जयद्रथाला परत पाठविले.





# शिवपुराण

[१२]

शंकराच्या आज्ञेप्रमाणे नंदी ब्रह्मदेव, विष्णु आणि इंद्रादिक देवांना आणि गंगा काठी जाऊन षण्मुखाला बोलावून घेऊन आला. षण्मुख कुमारस्वामी आपल्या साही मातांबरोबर पुष्पक विमानात बसून आला. पार्वती व परमेश्वर दोघे प्रेमाने कुमारस्वामीला भेटली आणि त्याला आपल्या जवळ बसविले.

त्या वेळी ब्रह्मदेव कुमारस्वामीजवळ उभा राहून म्हणाला—"आज कुमारस्वामीने कैलास पर्वतावर पदार्पण केले आहे. उद्यां देवांचा सेनापति म्हणून त्याचा अभिषेक करणे बरे होईल."

ते ऐकून सर्वांना आनंद झाला. पार्वती व परमेश्वर दोघांनी कुमारस्वामीचा उपनयन संस्कार केला. त्यानंतर ब्रह्मदेवाने पौरोहित्य स्वीकारुन कुमारस्वामीचा सेनापति म्हणून अभिषेक केला.

त्यानंतर पार्वतीपरमेश्वर कुमारस्वामीला म्हणाली—"बाळा! तू आतां देवसेनापति झालास आहेस. तू देवेंद्राला साहाय्य कर आणि त्रिलोकाचे रक्षण कर. दुष्टांचा संहार कर आणि पापीजनांना दंड दे. तुझी कीर्ति अजरामर होवो."

पार्वतीने कुमारस्वामीला आशीर्वाद दिला. देवांनी त्याला अनेक वर दिले आणि शास्त्रास्त्रे देऊन, त्याच्या हाती तारकासुराचा वध होवो, असा आशीर्वाद दिला.

त्यानंतर कुमारस्वामीने पार्वती परमेश्वर ब्रह्मा, विष्णु व इंद्रादिक देवांना प्रणाम केला आणि आपल्या गणांना आज्ञा केली की तुम्ही तारकासुराच्या राजधानीला वेढा

शेवटच्या मलपृष्ठावरील चित्र



घालण्यासाठी सर्व तयारी करा." नंतर कुमारस्वामीने, स्वर्गात त्याच्यासाठी निर्मिलेल्या भवनात प्रवेश केला.

तिकडे शोणितपुर नगरीं तारकासुराला, कुमारस्वामी देवांचा सेनापती होऊन शोणितपुरावर चालून येत असल्याचे कळले. तारकासुराने आपला मंत्री व इतर प्रमुख सल्लागारांना बोलाविले व म्हणाला–"मला माझ्या हेरांकडून कुमारस्वामी आपल्या राजधानीवर चालून येत असल्याचे कळले आहे. तरी तुम्ही त्या स्वारीला तोंड देण्यास सज्ज रहावे."

त्यानंतर शिवभक्त तारकासुराने एक पार्थिव लिंग तयार केले आणि पुजेसाठी अनेक सुगंधी द्रव्ये मागवून विधिवत् पूजा केली. धूप दीप दाखवून नैवेद्य दाखविला व देवाला नमस्कार करून प्रार्थना केली–"हे शंकरा! मी तुझी पूजा केली आहे. तू त्याचे फळ मला देण्याची कृपा कर."

तिकडे कुमारस्वामीने स्वर्ग लोकाचा गुरु बृहस्पति याने ठरविलेल्या मुहूर्तावर युद्धाचे शिंग फुकले आणि देव, रुद्र, वीरभद्र व देवीगण यांना बरोबर घेऊन युद्धाला निघाला. त्याला वाटेत शुभ शकुन होऊ लागले. कुमारस्वामी बरोबर देवेंद्र इत्यादिक देव सुद्धा या स्वारीवर गेले.

कुमारस्वामीने शोणितपूरला पोचल्यावर प्रथम नगराला वेढा घातला आणि सर्वांना उतरण्यासाठी राहुट्या उभ्या केल्या. तो शिबिरात बसून म्हणाला–"थोरामोठ्यांची रीत आहे की युद्ध सुरू करण्यापूर्वी सामोपचाराने काम भागेल का पाहून घ्यावे. म्हणून आपण एक दूत पाठवू या. तुम्हां सर्वांना काय वाटते?"

देवेंद्र आदिकांना ती सूचना मान्य झाली. तेव्हां कुमारस्वामीने आपल्या वक्षस्थलातून जन्मलेल्या विशाखाला म्हटले–"विशाखा! तू तारकासुराच्या दरबारात जाऊन माझा संदेश सांग आणि त्याचे जे उत्तर असेल ते घेऊन परत ये. त्यानंतर कुमारस्वामीने



तो नीट समजावून सांगून पाठवून दिले.

विशाखा तारकासुराच्या दरबारात गेला तेव्हां तो आपल्या नगराच्या चारीबाजूला पडलेल्या वेढ्यासंबंधीच आपल्या मंत्र्यांशी बोलत होता. त्याने विशाखाला आलेला पाहून विचारले–"कोण रे तू? कशासाठी आला आहेस?"

विशाख म्हणाला–"हे तारकासुरा! तू शिवभक्त आहेस. शंकराचा मुलगा व देवसेनापति कुमारस्वामी याने मला तुझ्याकडे आपला दूत म्हणून पाठविले आहे."

तारकासुराने आनंदित होऊन विशाखाला बसायला आसन दिले आणि म्हणाला–"कुमारस्वामीने कोणता संदेश देऊन तुला पाठविले आहे? माझे वैर देवांशी आहे, कुमारस्वामीशी नाही."

"तारकासुरा! तू दीर्घ काळ त्रिलोकावर राज्य केलेस. परंतु तुझ्या कारकीर्दीत प्रजा सुखी झाली नाही. म्हणून तू स्वर्गाचे राज्य परत इंद्राला देऊन टाक आणि भोगवतीपुरीं निघून जा. ते तुला मान्य झाले नाही तर कुमारस्वामी तुझा व तुझ्या अनुयायांचा वध करून तुझे सर्व अधिकार इंद्राला देऊन टाकतील. तरी तू काय तो विचार कर. हाच संदेश कुमारस्वामींनी तुझ्याकडे पाठविला आहे." विशाख म्हणाला.



तारकासुराला तो संदेश ऐकून अपमान वाटला. रागाने म्हणाला–"मी अशा धमक्या ऐकून भिऊन जाईन असे वाटले का तुम्हाला? उद्यां सकाळी रणांगणावर आपण भेटू असे कुमारस्वामीला सांग." तारकासुराच्या मंत्र्यांनीपण संधी किंवा समेट करण्याचा सल्ला दिला नाही.

दुसऱ्या दिवशी उजाडण्याच्या सुमारास दोघांची सैन्ये समोरासमोर सज्ज होऊन उभी राहली. दोन्ही बाजूंच्या शूर वीर योद्ध्यांनी जिवाची पर्वा केल्याशिवाय युद्ध केले. तारकासुराच्या बाजूने, बाणासुर, प्रलंबासुर, जंभासुर, अतिबल, शंभासुर, कुंभासुर वगैरे वीर योद्धे होते. कुमार-

स्वामीच्या बाजूने वीरभद्र, अग्नि, यमे, सूर्य, चंद्र इत्यादिक योद्धे होते.

कित्येक दिवस घोर युद्ध चालू होते. परंतु तारकासुराचा पराभव होण्याची लक्षणे दिसत नव्हती. देव माघार घेऊ लागल्या-सारखे वाटले. तेव्हां कुमारस्वामीने पाशुपतास्त्राचा प्रयोग केला. ते अस्त्र तारकासुराच्या सैन्यावर सहस्रावधि विजा पडाव्या तसे जाऊन पडले. त्यामुळे तारकासुराच्या सैन्याची पळापळ सुरू झाली. जे राक्षस रणांगणावरच राहिले ते भस्म होऊन गेले.

ताराकासुर रागारागाने आपल्या घरी गेला. शिवपंचाक्षरी मंत्राचा जप करून त्याने ध्यान धरले. त्या वेळी आकाशवाणी झाली–"तारकासुरा! तू काळजी करू नकोस तुला मोक्षप्राप्ती होईल." तारकासुराने पूजा आटोपली आणि गळयात शिवलिंग धारण करून दुसऱ्या दिवशी पुन्हां युद्धाला निघाला.

कुमारस्वामीने तारकासुरावर अनेक अस्त्रांचा प्रयोग केला. पण त्यांचा काही [illegible] होत आहे कुमारस्वामीला कळेना. तेव्हां नारदाने कुमारस्वामीला त्याचे कारण सांगितले. म्हणाला–"जोंपर्यंत तारकासुराच्या गळयात शिवलिंग असेल तोंपर्यंत त्याच्या केसाला ही धक्का लागणार नाही."

ते लक्षात ठेवून कुमारस्वामीने युद्धभूमीवर पोचताच तारकासुराच्या गळयात जे जे शिवलिंग होते त्याचाच नेम धरून आग्नेयास्त्र सोडले. लिंगाचे पाच तुकडे होऊन ते जमिनीवर पडले. सूर्य, विश्वकर्मा इत्यादिकांनी लगेच ते तुकडे उचलून नेऊन त्यांची पांच स्थानी स्थापना केली. तेच पंचभीम लिंगेश्वर होत.

तारसुकाराच्या गळयातले शिवलिंग पडल्यानंतर त्याने तारकासुरावर ब्रह्मास्त्राचा प्रयोग करून त्याचा संहार केला. भूत पिशाच गण तारकासुराच्या सैन्याचा ध्वंस करीत त्यांचे रक्त मांस खात नृत्य करू लागले. देवांनी पुष्पवृष्टी केली.



# १२२. होवर बांध

कोला राडो नदीवर बांधलेल्या या बांधाची उंची ७२६ फुट आहे. (चित्रात पाढऱ्या शिंपल्यासारखी दिसते आहे) याच्या डाव्या तीरावर निवाडा राज्य आहे व उजव्या तीरावर आरिजोना आहे. बांधावर जी सडक बांधलेली आहे ती या दोन्ही राज्यांना जोडते. बांधाच्या खाली लहान दिसणारी इमारत विद्युत केंद्र आहे. याची उंची वीस मजली इमारती एवढी आहे.





# अमरवाणी

कोन्धो? यो कार्यरतः को बधिरो?
यः श्रुणोति नहितानि
को मूको? यः काले प्रियाणि
वक्तुं न जानाति । ॥ १ ॥

[ (वाईट) काम करण्यात निमग्न असणारा आंधळा कोण आहे? हिताची गोष्ट न ऐकणारा बहिरा कोण आहे? वेळ प्रसंगी गोड न बोलणारा मुका कोण आहे? ]

को धर्मो? भूतदया
किं सौख्य? मरोगिता जगति
कः स्नेहः? सद्भावः
किं पांडित्यं? परिच्छेदः । ॥ २ ॥

[ धर्म कोण (काय) भूतदया हाच; सुख काय? निरोगी राहणे हेच; प्रेम व स्नेह काय? सद्भाव हाच; पांडित्य काय? निर्णय घेण्याची शक्ति हेच ]

कृत शत मसत्सु नष्टं
सुभाषित शतं च नष्ट मबुधेषु
वचनशत मवचन करे
बुद्धिशत मचेतने नष्टं । ॥ ३ ॥

[ दुर्जनाला शंभर वेळां सहाय्य केले तरी ते व्यर्थच! मूर्खांना शंभर सुभाषिते सांगणे फुकट! जो चांगल्या गोष्टी ऐकतच नाही त्याला शंभरदा सांगणे फुकटच! ]

विवेक



# महाज्ञानी

फार जुनी गोष्ट आहे. एका गावी एक मनुष्य रहात असे. त्याची महाज्ञानी म्हणून ख्याती होती. लोक तो म्हणेल त्यावर विश्वास करीत.

त्या गावी एक शेतकऱ्याचे घर होते. दोघे नवराबायको सुस्त आणि आळशी होती. उन्हें चांगली वर येईपर्यंत घोरत पडून असत. अक्कल नावाची वस्तू त्यांच्या गावी ही नव्हती.

एकदा एकाने त्यांना सल्ला दिला की कोंबडा नावाचा एक पक्षी आहे. तुम्ही तो पक्षी विकत घेऊन या. तो पहाटे आरवतो. तो आरवल्याबरोबर उठलात तर तुमची सर्व कामे वेळेवर होतील. त्याप्रमाणे दोघे आठवड्याच्या बाजाराला गेले आणि एक बदक विकत घेऊन आले. झोपतांना त्यांनी ते बदक खाटेखाली ठेवून दिले. पहाटे ते आरवेल असे त्यांना वाटले.

दुसऱ्या दिवशी त्यांच्या झोपा मोडल्या तेव्हां सूर्य डोक्यावर आला होता. त्यांनी चकित होऊन खाटेखाली पाहिले तर बदक दबकून बसले होते. बदक कां आरवले नाही, याची माहिती विचारण्यासाठी दोघे नवराबायको बदकाला बरोबर घेऊन त्या महाज्ञान्याकडे गेले.

त्या महाज्ञान्याने बदकाकडे लक्षपूर्वक पाहल्यासारखे केले व म्हणाला—"अरे, हे कसे रे आरवेल? कोणी तरी ह्याच्या चोंचीवर पाय दिला आहे. पहा चोच ह्याची!"

दोघे नवराबायको त्या महाज्ञान्याच्या चातुर्याचे कौतुक करीत घरी परतली. आणखी काही दिवस लोटले. त्यांच्याजवळ एक बकरी होती. एकदा ती गळ्यातली दोरी तोडून पळाली आणि पाला खात खूप हिंडली. तिला एका मडक्यात काही

श्री स. वि. काकोडकर

तरी खाण्यासारखे दिसले. तिने तोंड आत घातले व आणि तिचे तोंड आत अडकले. म्हणून बकरी घाबरून जाऊन पळू लागली. दोघांनी तिला धरले. एकाने मडके धरले एकाने तिची शेपटी धरून ओढली. पण मडक्यातून तोंड बाहेर येईना. तेव्हां दोघे महाज्ञान्याकडे गेली. त्याने बराच वेळ विचार केल्यासारखे केले व म्हणाला– "मडके काढायचे असेल तर बकरीचे डोके कापले पाहिजे."

दोघे कौतुक करीत म्हणाली–"काय पण युक्ति सांगितलीत!" आणि दोघांनी बकरीचे मुंडके धडापासून उडविले. मुंडक्यासह मडके निराळे झाले.

"अहो पण, डोके मडक्यातच राहले की?" दोघे म्हणाले.

"अरे, त्यात काय मोठेसे? मडके फोडून टाका म्हणजे डोके बाहेर येईल." ज्ञानी म्हणाला.

"ही तरी काय पण छान युक्ति सांगितलीत!" असे म्हणत शेतकऱ्याने मडके जमिनीवर आपटले. मडके फुटले व मुंडके बाहेर आले.

"आज आपण आमच्यावर जे उपकार केलेत ते आम्ही आयुष्यभर विसरणार नाही. आज आपण आमच्या घरी येऊन जेऊन जाण्याची कृपा करावी." दोघां नवराबायकोंनी विनंती केली.

ज्ञान्याने होकार दिला आणि जेवायला त्यांच्या घरी गेला. जेवताना म्हणाला– "पण पुढे काय होईल ते त्या परमेश्वरालाच माहीत!"

"काय हो, असे कां म्हणालात?" दोघांनी विचारले.

"तसे काही नाही, मी विचार करीत होतो, मला हे जग सोडून जावे लागले तर तुमच्या सारख्या भोळ्याभाबड्यांचे कसे चालणार?" ज्ञानी म्हणाला.

परंतु ज्ञान्यासारखी चतुर माणसे नेहमीच या जगात रहात आली आहेत. तो मेल्यावर त्याची जागा घेणारा कोणी तरी निघालाच असणार.





# सोन्याचे अंडे

एका गावी घनश्याम नावाचा एक गरीब मनुष्य रहात असे. त्याला जवळचा असा या जगात कोणी नव्हता. तो एका झोपडीत रहात असे. त्याच्याजवळ एक कोंबडी होती. तो दिवसभर काबाड कष्ट करी आणि जी थोडीफार मजुरी मिळे त्यावर त्याचा उदरनिर्वाह छान चाले. परंतु कधी कधी त्याला कामच मिळत नसे तेव्हां कोंबडीने दिलेल्या एका अंड्यावर त्याला भागवून घ्यावे लागे.

घनश्यामच्या शेजारीं धनराज नावाचा एक श्रीमंत मनुष्य रहात असे. धनराज जवळ खूप पैसा होता. पण तो फार लोभी होता. कोणाची चांगली स्थिति पाहून त्याला आनंद होण्याऐवजी हेवा वाटे. घनश्यामजवळ एक कवडीदेखील नव्हती, पण त्याच्याजवळ जी कोंबडी होती ती पाहून देखील त्याला हेवा वाटे.

एकदां घनश्याम कोठेतरी बाहेर गेला असता धनराजने ती कोंबडी चोरून आणली आणि तिला मारून तिचा खुरमा करून खाल्ला. घनश्यामने घरी आल्यावर कोंबडी दिसली नाही तेव्हां तपास केला आणि त्याला कोंबडीची पिसे धनराजच्या परसात दिसली. म्हणून त्याने धनराजला त्या विषयी विचारले.

धनराज म्हणाला–"अरे बाबा! तुला काय सांगू? आमची भाटी कोठून तरी एक कोंबडी धरून घेऊन आली. तिची मानगुटी ती खाणार इतक्यात मी आलों. परंतु कोंबडी मेलेली होती. म्हणून नाइलाजाने कापून खुरमा केला. ती कोंबडी तुझी होती, हे मला नव्हते माहीत."

ते ऐकून घनश्यामला राग आला. म्हणाला–"आतां तरी तुला ती माझी आहे हे कळले ना? फुकटाची कोंबडी खायला

श्री भि. ना. सावंत



तुला काही वाटले का? तिची किंमत दे, नाहीतर मी राजाकडे फिर्याद करीन."

धनराज घाबरला. कारण राजा न्यायी होता. कदाचित तुरुंगातसुद्धा टाकील किंवा दंड तर करीलच. म्हणून त्याने घनश्यामशी भांडण वाढविण्याऐवजी समेट करून घ्यायचे ठरविले. तो घरातून एक एक बदक घेऊन आला आणि म्हणाला– "बाबारे, आता तुझी कोंबडी जिवंत करून देणे काही शक्य नाही. तिच्याऐवजी हे बदक ठेवून घे."

एका चांगल्या कोंबडीऐवजी बदक मिळालेले पाहून घनश्याम थोडा रागावलाच, पण संन्याश्याच्या हातची लंगोटी बरी, असा

बदक अंडे देत असे. कोंबडीच्या अंड्या-ऐवजी बदकाचे अंडे घनश्यामला मिळू लागले.

पुढे काही दिवसांनी पावसाळा सुरू झाला. एकदां रात्री मुसळधार पाऊस पडत होता. तेवढ्यात एका मुसलमान फकिराने येऊन धनराजच्या दाराची कडी वाजविली.

धनराजने दार उघडल्याशिवायच विचारले–"कोण रे तू, अपरात्री दार ठोठावणारा? चालता हो!"

फकीर शेजारच्या घनश्यामकडे गेला आणि झोपडीचे दार वाजवले. घनश्यामने दार उघडून प्रेमाने त्या फकिराला आत बोलावून त्याला कोरडे कपडे दिले व शेकायला शेकोटी करून दिली. नंतर एक दोन अंडी उकडून खायला दिली.

"बेटा, बदकाची ही अंडी बरी आहेत की रे! पाहू तुझे बदक!" फकीर घन-श्यामाला म्हणाला. घनश्यामने टोपली खालून बदक काढून दाखविले.

"बेटा, अल्ला तेरा भला करेगा!" असे सांगून फकिराने बदकाचा अंगावर हात फिरविला. तोंपर्यंत पाऊस चांगला थांबला होता. म्हणून घनश्यामने आग्रह करून राहायला सांगितले तरी तो फकीर त्याचा निरोप घेऊन काळोखातून निघून गेला.

अंडे देऊ लागले. त्यामुळे घनश्यामची गरीबी दूर होऊ लागली. त्याने मजूरी करायचे सोडले आणि सुखासमाधानाने राहून, त्याच्याकडे जे उरे ते दान करू लागला. परंतु तो त्या जुन्या झोपडीतच रहात असे.

एकदां धनराजने घनश्यामला टोपल्या-खालून सोन्याचे अंडे काढताना पाहिले. त्याच्या पोटात ईर्ष्याग्नीने पेट घेतला. कारण ते बदक त्यानेच दिलेले होते.

त्याने बदक परत करायला सांगितले तर घनश्याम देणार नाही हे धनराज ओळखून होता. म्हणून धनराज आपल्या दोघां नोकरांना बरोबर घेऊन सरळ राजाच्या दरबारात गेला आणि म्हणाला– "महाराज! माझा शेजारी माझ्याकडची बदके चोरून नेतो. आजपर्यंत मांजर धरून नेत असेल असे मला वाटत होते. पण काल माझ्या दोघां नोकरांनी त्याला एक बदक उचलून नेताना प्रत्यक्ष पाहिले. म्हणून मी महाराजांकडे गाऱ्हाणे घेऊन आलो आहे. माझे बदक परत करवावे."

राजाने शिपायांना पाठवून घनश्यामला बदक घेऊन दरबारात हजर करण्यास सांगितले.



घनश्याम आल्यावर राजाने त्याला विचारले–"काय रे तू काल रात्री धन-राजच्या घरून एक बदक चोरून नेलेस हे खरे आहे का?"

धनराजला बदक सोन्याचे अंडे देऊ लागल्याचे कळले असावे, व म्हणूनच त्याने हा डाव टाकला असावा हे घनश्यामने ओळखले. तो राजाला म्हणाला–"महा-राज! मी चोरी केलेली नाही. हे बदक धनराजचेच आहे व ते त्याने स्वतः माझ्या कोंबडीबद्दल दिले आहे. त्याने माझी कोंबडी मारून खाल्ली होती."

"महाराज! हा खोटे बोलतो आहे. काल चोरी करतांना माझ्या दोघां नोकरांनी

याला पाहिले होते. तो म्हणाला त्या गोष्टीला कोणी साक्षी आहे का? विचारा त्याला!" धनराज म्हणाला.

राजाने बदक आपल्याजवळ ठेवून घेतले आणि दोघांना दुसऱ्या दिवशी यायला सांगून पाठवून दिले.

त्या दिवशींपण बदकाने एक सोन्याचे अंडे दिले. राजाला स्वतःच्या डोळ्यावर विश्वास होईना. त्या दोघांना ही गोष्ट माहीत असावी, पण त्यांच्याच तोंडी ती गोष्ट काढून घेण्याच्या हेतुने राजाने दुसऱ्या दिवशी दोघे दरबारात आल्यावर धनराजला बदकाचे एक साधे अंडे दाखवून विचारले– "तुझे बदक या अंड्याएवढे अंडे देते का रे?"

"नाही महाराज! याहून मोठे देते.' धनराज म्हणाला. राजाने तोच प्रश्न घनश्यामला विचारले.

तो म्हणाला–"महाराज! माझे बदक साधे अंडे घालीतच नाही. ते दररोज एक सोन्याचे अंडे घालते."

हे स्वच्छ खोटे आहे. बदक कधी सोन्याचे अंडे घालील का? वास्तविक त्याचे हे बदकच नाही."

"होय, तू म्हणतोस ते खरे आहे. हे तुझेच बदक आहे!" असे सांगून राजाने एक दुसरेच साधे बदक देऊन त्याला पाठवून दिले.

घनश्याम विचारात पडला. तेव्हां राजा त्याला म्हणाला–"घनश्याम! कां रे विचार कसला चालू आहे? तुझे बदक माझ्याकडे आहे. हे सोन्याचे अंडे कसे काय घालू लागले?"

घनश्यामने त्याच्या घरी फकिराने येऊन त्याला जी मदत केली ते सांगितले. राजाने चकित होऊन त्याला त्याचे बदक परत केले आणि त्याला आपल्या पदरी नोकरी दिली.

दुसऱ्या दिवशी धनराजला त्याचे बदक साधे अंडेच देत असल्याचे व घनश्यामला दरबारात नोकरी मिळाल्याचे कळले तेव्हां फार वाईट वाटले.





# शिलारथ

[ १७ ]

[ राजा नित्यानंद आपल्या राजधानीच्या दिशेने पळाला, तेव्हां विघ्नेश्वर पुजारी अनुयायांसह नित्यानंदाच्या राजधानीवर चालून गेला. ते नगरद्वार तोडणार होते. तेव्हां जीवदत्त आणि खड्गवर्मा दोघांनी राजाला एक गोष्ट सुचविली. त्याप्रमाणे मंत्र्याने नगराचे प्रवेशद्वार उघडले आणि पुजारी राजधानीकडे निघाले. पुढे–]

उद्यानाकडे जाणाऱ्या रस्त्यावर दुतर्फा उंच उंच वृक्ष होते. झाडाच्या फांद्या परस्परांना चिकटत होत्या. पुजारी थोडेच अंतर चालून गेला असेल, झाडावरुन कोणीतरी ओरडून म्हणाले–"पुजाऱ्यावर 'गुलाब पाण्याचा' वर्षाव करा."

त्याच्या पाठोपाठ पुजाऱ्यावर 'गुलाब पाण्याचा' छिडकाव सुरु झाला. त्याचा सुवास त्याला चांगला माहीत होता तरी पुजारी रागाने ओरडून म्हणाला–"झाडावर कोण बसला आहे? तो माझा अपमान करतो आहे. त्याचे मी डोके उडवीन."

"पुजाऱ्याचे स्नान संपलेले दिसते आहे. त्याला बदलायला कपडे द्या." दुसरा आवाज ऐकू आला.

दुसऱ्या क्षणाला काही जळत असलेले कपडे विघ्नेश्वराच्या अंगावर व हत्तीवर पडू लागले. पुजाऱ्याच्या व हत्तीच्या अंगा-



वर पहिल्यानेच गुलाब पाण्याऐवजी योजल्याप्रमाणे तेल पडले होते. त्यामुळे हत्तीवरच्या आणि पुजाऱ्याच्या अंगावरची सर्व वस्त्रें तेलाने छान भिजलेली होती. त्यामुळे जळत असलेली फडकी पडताच एकदम हत्तीवरची व पुजाऱ्याची वस्त्रे जळू लागल्यामुळे दोघे होरपळून निघाले.

"ही लबाडी आहे! भावी राजाची ही फसवणूक आहे." पुजारी ओरडत हत्तीच्या पाठीवरच उभा राहून आपल्या अंगावरची वस्त्रे फेकू लागला व शेवटी त्याने डोक्यावरचा किरीटपण फेकला. त्याच वेळी हत्तीच्या पोटातून कित्येक आवाज ऐकू आले. हत्तीचे चारही पाय चार दिशांना ओतू लागले. वरून अग्निवृष्टी चालूच होती.

खड्गवर्मा! पाहिलेस, आपल्याला शंका होती, अगदी तसेच झाले. हत्ती खरा नव्हताच. कोणी तरी हुशार माणसाने हत्तीचा आकार घडवून आत माणसांना बसवून ठेवले होते. पुजारी याच हत्तीच्या बळावर नित्यानंद राजाला सळो की पळो करीत होता." जीवदत्त म्हणाला.

"पहा, एका मागून एक रानटी तरुण हत्तीच्या पोटातून बाहेर पटापट उड्या मारीत आहेत आणि हत्ती एका बाजूला कलू लागला आहे. मरणापूर्वी पुजाऱ्याला बाहेर ओढले पाहिजे." असे म्हणत झाडावरून खड्गवर्माने एक फांस टाकला आणि त्याच्या कंबरेला आवळून त्याला वर ओढले. पुजारी हवेत हातपाय हलवीत ओरडू लागला—"मेलो हो! वांचवा, कोणी तरी मला वांचवा!"

तिकडे हत्ती भस्म होऊन खाली आदळला. कित्येक रानटी तरुण त्यापूर्वीच त्याच्या पोटातून बाहेर येऊन सैरावैरा पळू लागले. त्याच वेळी नित्यानंद राजाचा सेनापति आपल्या सैनिकांसह तेथे आला व त्याने सर्व रानटी तरुणांना आपल्या सैनिकांकरवी एकत्र जमा केले. खड्गवर्माने पुजाऱ्याला झाडावरून खाली सोडले. कपड्यांना लागलेली आग विझविण्यासाठी पुजारी जमिनीवर लोळू लागला.

खड्गवर्मा व जीवदत्त दोघे झाडावरून खाली उतरून आले व त्यांनी पुजाऱ्याच्या अंगावर माती टाकून आग विझविली. नंतर त्याची मानगुटी धरून त्याला उभा केला. खड्गवर्माने तलवारीचे टोक त्याच्या गळयावर ठेवून त्याला विचारले—"दुष्टा! तू आमचा जीव घ्यायला निघाला होतास नाहीं का? आतां तुझी पाळी आहे!"

पुजारी हात जोडून कांपऱ्या आवाजात म्हणाला—"क्षमा करा, माझा वध करू नका. माझ्या कुळदैवताने मला स्वप्नात दर्शन देऊन माझ्या मनात राज्यलोभ उत्पन्न केला. त्या हत्तीचा शोध माझा नाही. त्याची कल्पना स्वर्णाचारीची आहे."

जीवदत्तने त्याला विचारले—"आहे कोठे तो स्वर्णाचारी?"

पुजारी कण्हत म्हणाला—"तो हत्तीच्या गंडस्थलात लपून बसला आहे. तेथे बसून तो रानटी युवकांच्या मदतीने हत्तीचे यंत्र चालवीत होता. तो अद्याप बाहेर आला नाही का?"

ते ऐकताच जीवदत्त जळत असलेल्या हत्तीजवळ धावत गेला. सैनिकांकरवी हत्तीच्या डोक्यावर पाणी ओतून आग विझविण्यात आली. आग विझल्यावर




हत्तीची सोंडवर उचलली. तेव्हां एक मनुष्य दगडासारखा जमिनीवर आदळला. तो बेशुद्धावस्थेत होता.

"हाच तो स्वर्णाचारी! याच्यामुळेच माझा जीव या धोक्यात सापडला." पुजारी म्हणाला.

"तू स्वतःच्या लोभाला बळी पडलास. उगीच दुसऱ्याला कशाला नावे ठेवतोस?" जीवदत्तने पुजाऱ्याला दरडावून विचारले. त्यानंतर होरपळून निघालेल्या स्वर्णाचाऱ्याच्या उपचाराला लागले. थोड्या वेळाने त्याने डोळे उघडून पाहिले आणि वेड्यासारखा ओरडू लागला—"मी कोठे आहे? पुजारी महाराज झाले का?"



"होय, तो वध, तुझा राजा होरपळून निघाला आहे आणि त्याचा मंत्री तू राज्याभिषेक करण्याची तयारी करायला आला आहेस ना? थोड्या वेळाने राजा नित्यानंद तुम्हांला स्वर्गाच्या सिंहासनाची वाट दाखविणार आहे." खड्गवर्मा म्हणाला.

खड्गवर्मा म्हणाला ते ऐकून स्वर्णाचारी उठून बसला व पुजाऱ्याकडे पाहून म्हणाला– "मी तुला किती सांगितले, पण तू ऐकलेस का? अरे आपल्या हत्तीचे गुपित राजधानीत पाऊल टाकताच बाहेर येईल हे मी तुला किती बजावून सांगितले होते. परंतु तुला ऐरावतावर बसताच इंद्र आहेस असे वाटू [illegible] होते, नाही का? आता भोग त्याची फळे!"

"तुम्हांला सुळावर चढविण्याची किंवा फाशीची शिक्षा नाही देणार मी. तुम्हांला योग्य अशी दुसरीच शिक्षा देणार आहे, मी! तुमचे हाडमास तुकडे करून कोल्ह्या कुत्र्यांसमोर टाकणार आहे!" राजा नित्यानंद म्हणाला आणि एका झुडपाआडून बाहेर आला. नंतर तो खड्गवर्मा व जीवदत्त दोघांना उद्देशून म्हणाला–"तुम्ही वीर आहां. सर्व श्रेय तुम्हांला आहे. तुम्ही दोघांनी मिळून माझे व माझ्या राज्याचे आज रक्षण केले आहे. तुम्ही काय वाटेल ते मागून घ्या."

"आम्ही कोणत्याही प्रकारच्या पारितोषिकाची अपेक्षा ठेवून हे केले नाही. तुम्ही एका फार मोठ्या संकटातून वाचला आहां. आता सुखासमाधानाने राज्य करा व प्रजेला सुखी करा. आम्ही या पुजाऱ्याला, स्वर्णाचारीला व त्यांच्या रानटी अनुयायांना बरोबर घेऊन आपला निरोप घेऊन जातो." जीवदत्त म्हणाला.

"तरमग या दोघांना मी जिवंत सोडून देऊ म्हणता? या सर्व रानटी तरुणांवर उकळते तेल ओतून यांना ठार करण्याचा मी विचार करतो आहे. तुम्ही या राक्षसी हत्तीवर व पुजाऱ्यावर जो अस्त्रप्रयोग केलात [illegible] करणार आहे." राजा नित्यानंद म्हणाला.

"महाराज, शत्रु किती भयंकर असला तरी त्याचा क्रूरपणे वध करणे बरोबर नाही. झाले गेले विसरून जाणे, मनुष्य धर्म आहे. मी या पुजाऱ्याला व त्याच्या सर्व अनुयायांना आपल्या राज्याच्या हद्दीपलीकडे घेऊन जाऊन, पुढे आपल्याला यांच्याकडून कोणत्याहि प्रकारचा त्रास होऊ नये याची व्यवस्था करतो." जीवदत्त म्हणाला. नंतर विघ्नेश्वर पुजाऱ्याला म्हणाला–"अरे भित्र्या! असा घाबरतोस कां आता? तुझ्या जिवाला आता धोका नाही. चल, आमच्या बरोबर! तुझ्या सर्व रानटी अनुयायांचे रक्षण करावयाचे आहे." असे सांगून जीवदत्त निघाला.

"हे वीरपुरुषा! मग माझी आज्ञा?" राजा नित्यानंद म्हणाला. त्याबरोबर खड्गवर्मा तलवार उपसून म्हणाला–"येथे आज्ञा फक्त जीवदत्तची!"

राजा नित्यानंद तो अपमान सहन न झाल्याने क्रुद्ध होऊन ओरडला–"माझ्या राज्यात...माझ्या वाड्यात...माझ्यासमोर" असेच तो आणखी पुढे काही बोलणार तितक्यात मंत्री पुढे होऊन राजाची समजूत घालून त्याला बाजूला घेऊन गेला. राजा नित्यानंद आतां शांत झाला आणि जीवदत्त,



खड्गवर्मा व दोघे हाडवैरी निघून जात होते त्यांच्याकडे दातओठ चावून पहात उभा राहिला.

खड्गवर्मा व जीवदत्त रानटी तरुणांना ज्या जागी बसवून ठेवले होते त्या जागी पोचले तेव्हां आवाराच्या भिंतीवरून सैनिक त्या बिचाऱ्यांवर उकळते तेल ओतीत असलेले दिसले. ते पाहून खड्गवर्मा व जीवदत्त जोराने ओरडले–"थांबा!"

सैनिक ओरडून म्हणाले–"आमच्या सेनापतींची आज्ञा आहे, या सर्वांना आम्ही जिवंत जाळणार आहोत."

खड्गवर्मा व जीवदत्त लगेच भिंतीवर चढून गेले. सैनिक मोठमोठ्याने ओरडत




तेल ओतीत होते रानटी तरुण घाबरून जाऊन स्वत:चा जीव वांचविण्यासाठी आवाराचा दरवाजा तोडण्याचा प्रयत्न करीत होते.

"तुम्हांला आमची आज्ञा ऐकू आली नाही वाटते?" असे दरडावून विचारीत खड्गवर्मा व जीवदत्त दोघे सैनिकांवर तुटून पडले. त्यांना लाथा बुक्के मारून खाली रानटी युवकांमध्ये ढकलून पाडू लागले. आतां रानटी युवकांना जिवात जीव आल्या-सारखे वाटले.

"आम्हांला वांचवा हो! हा दरवाजा उघडा हो! आम्ही आपल्या रानात निघून जाऊ. या बाजूला कधी फिरकणार देखील नाही." असे म्हणत रानटी तरुणांनी जीवदत्त व दोघांना नमस्कार केला.

थोड्या वेळाने जे सैनिक खाली पडले होते त्यांच्याशिवाय इतर सैनिक पळून गेले. खड्गवर्मा व जीवदत्त दोघे आवाराच्या मुख्य दाराजवळ आले. दारावर दोघे पाहरेदार उभे होते. ते म्हणाले–"आमच्या सेनापतींची आज्ञा आहे..." ते पुढे काही बोलणार त्या आधी जीवदत्तने आपल्या कुबडीने त्या दोघांचा वध केला. इतर पाहरेदार पुढे होण्याच्या विचारात होते ते देखील भयभीत होऊन पळून गेले. तेव्हां खड्गवर्माने दाराला बांधलेले मोठमोठे दोरखंड तलवारीने तोडून टाकले आणि दार उघडले. सर्व रानटी तरुण भराभर आवाराबाहेर आले. काही जणांनी खड्गवर्मा व जीवदत्त दोघांना साष्टांग नमस्कारच केला.

"आतां तुमच्या जिवाला धोका नाही. तुम्ही खुशाल आपल्या वनप्रांतात जाऊन रहा. परंतु एक गोष्ट लक्षात ठेवा, यापुढे विघ्नेश्वर पुजाऱ्याच्या जाळ्यात सांपडू नका." जीव-दत्तने त्यांना समजावून सांगितले.

"अहो, पण तो दुष्ट पुजारी व स्वर्णा-चारी कोठे आहेत? त्यांनी आम्हांला फसविले आणि आमचा जीव धोक्यात पडला. आम्ही त्यांना धरून घेऊन काली-

समोर त्यांना बळी देऊ." एक रानटी तरुण त्वेषाने म्हणाला.

खड्गवर्मा व जीवदत्तने चारीबाजूला नजर फिरवून एकदा पाहिले. दूर स्वर्णाचारी व पुजारी एका झाडाखाली उभे राहून बोलत होते. थोड्या अंतरावर राजा नित्यानंद, मंत्री व सेनापती दुसऱ्या झाडाखाली उभे राहून आपसांत काहीतरी सल्ला मसलत करीत होते. त्यांच्या मागे सैनिक रांगेने उभे होते.

"खड्गवर्मा! मला वाटते, हा मूर्ख राजा पुजारी स्वर्णाचारी व रानटी लोक सर्वांचा वध करण्यासाठी काहीतरी दुष्ट विचार करीत आहे, असे मला वाटते." जीवदत्त म्हणाला.

"त्या दोघां दुष्टाचे काय वाटेल ते होवो, पण या गरीब निरपराध रानटी तरुणांना वांचविलेच पाहिजे. यांना त्यांच्या वनप्रांतात पोचते करण्याची जबाबदारी आपण आपल्यावर घेतली आहे. या बिचाऱ्यांना त्या दोघां दुष्टांनी वाटेल तसे नाचवले." खड्गवर्मा म्हणाला.

जीवदत्त त्याचे काही उत्तर देणार होता. त्याच वेळी राजा नित्यानंद घाईघाईने सैनिक उभे होते तिकडे गेला. सेनापति राजाच्या मागे जाऊन उभा राहिला. मंत्री आगच्या जागी उभा राहून एकदा सैनिकांकडे व एकदा खड्गवर्मा आणि जीवदत्तकडे वारंवार पहात होता.

"खड्गवर्मा! काहीतरी धोका येण्याची सूचना आहे. राजा नित्यानंद आपल्या सैनिकांना बिचाऱ्या रानटी तरुणांवर हल्ला करायला पाठविणार असावा." असे खड्गवर्माला सांगितल्यावर जीवदत्त रानटी तरुणांना उद्देशून म्हणाला—"तुम्ही आपापली शस्त्रास्त्रे घेऊन सज्ज व्हा. पण, प्रथम हे सांगा, तुमचा पुढारी कोण आहे?"

रानटी तरुणांपैकी एक उंच धिप्पाड मनुष्य पुढे आला आणि जीवदत्त व खड्गवर्मा दोघांना लवून नमस्कार करून म्हणाला—"मीच आपण विचारलेला सेवक!"

(क्रमशः)



# परस्पर सहाय्य

विक्रमादित्याने आपला हट्ट सोडला नाही. तो झाडाजवळ गेला, प्रेत खांद्यावर काढून घेतले आणि नेहमीप्रमाणे मौनपणे स्मशानाच्या दिशेने चालू लागला. तेव्हां प्रेतात बसलेला वेताळ त्याला म्हणाला—"राजा! अशक्य कामात यशस्वी व्हायचे असेल तर योग्य व समर्थ व्यक्तींनादेखील इतरांची मदत घ्यावी लागते. पण तू फक्त स्वतःच्या हिंमतीवर काम करतो आहेस, म्हणून तुला यश मिळत नाही. परस्परांस मदत केल्यामुळेच नाहीं का देवगुप्त अशक्य कार्य पण शक्य करू शकला. मी त्याची गोष्ट तुला सांगतो, लक्ष देऊन ऐक." असे सांगून वेताळ गोष्ट सांगू लागला.

फार पूर्वी कृष्णा नदीच्या काठी धान्यकटक नगरी विष्णुगुप्त नावाचा एक कोट्याधीश व्यापारी रहात असे. त्याला कमलाक्षी नावाची एकुलती एक मुलगी



होती. ती लग्नाला योग्य झाली तेव्हां तिला पुष्कळ मागण्या येऊ लागल्या. परंतु काही तरुण स्वतः कोट्याधीश असले तरी दूर परप्रांतात रहात असत. विष्णुगुप्ताने म्हणून त्या तरुणांना नकार दिला.

धान्यकटक नगरीतच काही वैश्य तरुण होते व त्यांनी कमलाक्षीला मागणी घातली होती. परंतु विष्णुगुप्तला त्यांपैकी एक-देखील त्याचा जांवई होण्यालायक दिसला नाही. कारण त्यांच्यापैकी काही गरीब होते तर काही श्रीमंत होते तर रूपवान नव्हते आणखी काही कुलीन नव्हते.

धान्यकटक येथेच देवगुप्त नावाचा एक प्रतिष्ठित वैश्यप्रमुख रहात असे. तो विष्णु-गुप्ताच्या घराण्यापेक्षा ही ज्यास्त उच्च घराण्यात जन्मला होता. देवगुप्ताच्या वडीलांचा व आजोबांचा कोट्यावधी रुप-यांचा व्यापारधंदा होता. परंतु देवगुप्ताच्या वडिलांनी बौद्धधर्म स्वीकारला व आपली सर्व संपत्ति बौद्धधर्माच्या प्रसारार्थ व बौद्ध-भिक्षूंच्या सेवेत खर्च करुन टाकली. त्या-मुळे त्यांच्या घरात गरीबी आली.

त्यानंतर देवगुप्त लहानमोठा व्यापार करुन आपल्या मोठ्या कुटुंबाचा सर्व खर्च भागवीत असे. त्याला दोन मुलगे होते. त्यांच्यापैकी मोठ्याचे नाव दानगुप्त होते व धाकट्याचे धनगुप्त. दोघांच्या वयात फक्त एकाच वर्षाचे अंतर होते. दोघे सुंदर होते व दोघांचे परस्परांवर फार प्रेम होते. त्या दोघांना कमलाक्षीशी लग्न करावेसे वाटत होते. तिच्या वडिलांच्या मदतीने मोठा व्या-पार करता येईल असेदेखील त्यांना वाटत होतें. त्यांनी आपल्या मनातली गोष्ट आपल्या वडिलांना सांगून त्यांचा सल्ला घेतला.

त्यांचे वडील म्हणाले–" विष्णुगुप्ताने आपल्याहून मोठमोठ्या श्रीमंतांना नकार दिला आहे. तरी प्रयत्न करुन पाहण्यास हरकत नाही. तुम्ही दोघे विष्णुगुप्ताच्या घरी जाऊन त्याला भेटा. दोघांपैकी कोणाशी मुलीचे लग्न करुन द्यायला तो तयार झाला तर आनंदच आहे."

दोघे भाऊ विष्णुगुप्ताच्या घरी गेले इकडच्या तिकडच्या गोष्टी झाल्यावर मुख्य मुद्दयाची गोष्ट दोघांनी काढली. परंतु विष्णुगुप्ताला दोघांपैकी एकालादेखील आपला जांवई करुन घेण्याची इच्छा दिसली नाही. परंतु एकदम नकार देण्यास ही विष्णुगुप्ताचे मन सांगेना. कारण दोघे कुलीन व सुशील मुलगे दिसले. त्यांच्या वडिलांचा विष्णुगुप्त फार आदर करी. दोघे भाऊ हुशार व सुंदर दिसत होते. परंतु दोघे गरीब होते हा मुख्य दोष होता.

म्हणून त्यांना निराळ्या तऱ्हेने नकार देण्याच्या उद्देश्याने विष्णुगुप्त म्हणाला– "हे पहा, मी आपल्या मुलीचे लग्न श्रीमंत तरुण मुलाशी करण्याचे ठरविले आहे. म्हणून मी कित्येक गरीब मुलांना साफ नकार दिला. आतां मी तुमच्या पैकी कोणाशीं आपल्या मुलीचे लग्न करुन दिले तर लोक मला हसतील. या शिवाय माझ्या मागून माझा एवढा व्याप माझ्या जावयालाच पहावा लागणार आहे. म्हणून व्यापारधंद्यात हुशार असेल त्यालाच मी आपला जांवई करुन घ्यायचे ठरविले आहे."

परंतु ते उत्तर ऐकून दोघे निराश झाले नाहीत. म्हणाले–" व्यापार केल्याशिवाय व्यापारात हुशारी आहे की नाही हे कसे काय कळणार ?"

विष्णुगुप्ताला मुले हुशार दिसली. दोघे शब्दांत सापडणारे दिसत नाहीत, हे त्याने ओळखले. पण त्यांची पीडा टाळण्यासाठी तो





विचार करून म्हणाला–" मी तुम्हां दोघांना प्रत्येकी एकेक हजार रुपये देतो. या भांडवलावर एका वर्षाच्या आत दोघांपैकी जो कोणी एक लाख रुपये मिळवून आणील त्याच्याशी मी मुलीचे लग्न करून देईन."

एका वर्षाच्या आत हजाराचे एक लाख मिळवून आणणे अशक्य आहे हे ओळखूनच विष्णुगुप्तने ती अट घातली होती. दोन हजारच गेले तरी हरकत नाही, पण गरीबाशी मुलीचे लग्न करून दिल्याचे कोणी म्हणायला नको, या विचाराने त्याने ती युक्ति केली होती.

परंतु दानगुप्त व धनगुप्त कमलाक्षीचा विवाह निदान एक वर्ष तरी इतर कोणाशी होणार नाही व आपण आपली योग्यता सिद्ध करून दाखविली तर तिच्याशी नक्की आपला विवाह होऊ शकेल ही आशा मनात बाळगून घरी परतले. वडिलांचा निरोप घेऊन दोघे व्यापारासाठी परदेशी निघाले. दोघांनी एक वर्ष पुरे होताच कोठे भेटायचे, हे परस्परांशी ठरवून घेतले आणि दोघे परस्पर विरुद्ध दिशेने निघून गेले.

एक वर्ष पुरे झाल्यावर दोघे ठरल्या जागी येऊन भेटले. परंतु दोघांच्या चेहऱ्यावर आनंदाचे लक्षण दिसले नाही.

दानगुप्तने धनगुप्तला विचारले–"तुला किती प्राप्ती झाली?"

"मी फक्त तीस हजारच मिळवू शकलो. तू मिळविलेस का एक लाख?" धनगुप्ताने मोठ्या भावाला विचारले.

"नाही रे, मोठ्या कष्टाने ऐंशी हजार जमले आहेत." दानगुप्त म्हणाला.

"तर मग विष्णुगुप्ताकडे जाण्याची गरजच उरली नाही. सर्व मेहनत फुकट गेली." धनगुप्त म्हणाला.

"कां? मी सांगतो ते कर! तुझ्याजवळ तीस हजार आहेत ना? मी तुला सत्तर हजार देतो. तू एक लाख रुपये विष्णुगुप्ताला नेऊन दे आणि कमलाक्षीशी लग्न करून घे." दानगुप्त म्हणाला.

"तू काय करणार?" धनगुप्तने विचारले.

"मी नाही घरी जात. मी परत त्या देशात जाऊन व्यापारधंदा करतो. निघेल मार्ग, मला विश्वास वाटतो." दानगुप्त म्हणाला आणि त्याने धनगुप्ताला सत्तर हजार रुपये देऊन विष्णुगुप्तकडे पाठविले व स्वतः परत निघून गेला.

धनगुप्त एक लाख रुपये घेऊन आल्यावर वचन दिल्याप्रमाणे विष्णुगुप्तने त्याच्याशी आपल्या मुलीचे लग्न करून दिले.

येथवर गोष्ट सांगून वेताळ म्हणाला–"राजा, दानगुप्तने जास्त पैसे मिळविले होते तरी त्याने स्वतः कमलाक्षीशी लग्न न करतां आपल्या धाकट्या भावाला कां मदत केली? भ्रातृप्रेमाने का? हा त्याग त्याने कां केला? या प्रश्नांची उत्तरे माहीत असून तू दिली नाहीस तर परिणाम तुला माहीतच आहे, तुझ्या डोक्याची शंभर शकले होऊन तुझ्याच पायांवर लोळू लागतील."

ते ऐकून विक्रमादित्य म्हणाला–"देवगुप्तच्या दोघां मुलांनी विष्णुगुप्तच्या मदतीने कोट्याधीश होता येईल या हेतूने तिच्याशी विवाह करण्याचा विचार केला होता. परंतु विष्णुगुप्तने त्यांच्या व्यापारधंद्यातल्या कौशल्याची परीक्षा घेण्याचे ठरविले. त्यात मोठाच थोडा जास्त यशस्वी ठरला. यावरून हे स्पष्ट झाले की मोठा व्यापारधंद्यात जास्त कुशल होता व त्याला कोणाच्या मदतीची तितकी आवश्यकता नव्हती. या उलट धाकट्यालाच विष्णुगुप्तासारख्याची जास्त गरज होती हे सिद्ध झाले. मोठा स्वतःच्या पायावर कोट्याधीश होणे शक्य होते. धाकट्याला दुसऱ्याच्या मदतीनेच कोट्याधीश होता येईल हे दिसले. म्हणून मोठ्याने धाकट्याला आपल्या मिळकतीतला वांटा देऊन त्याची वाट मोकळी केली!"

अशा तऱ्हेने राजाचे मौन भंग होताच वेताळ प्रेतासह अदृश्य झाला व झाडाच्या फांदीला जाऊन लोंबकळू लागला. (कल्पित)



# खरा संन्यासी कोण

एक राजा होता. तो संन्याश्यांना फार आदर करी. संन्यासी सर्वसंगपरित्याग करून ईशचिंतनात आपले आयुष्य खर्ची करतात, तेव्हां तेच मोठे व आदर करण्यासारखे आहेत. अशा संन्याश्यांना भीक मागावी लागावी, हे राजाला मुळीच आवडत नसे. म्हणून त्याने पुष्कळ विचार करून मंत्र्याला बोलाविले व म्हणाला—"आपल्या राज्यातल्या प्रत्येक संन्याश्याला दहादहा हजार रुपये देऊन त्यांचे दारिद्रय नाहीसे करण्यात यावे."

देशात संन्याश्यांना काय तोटा? प्रत्येक संन्याश्याला दहा हजार रुपये दिले तर राज्याचा खजिनादेखील पुरावयाचा नाही, हे मंत्र्याला कळत होते. परंतु तो उघड काहीच बोलला नाही. होकार देऊन गप्प बसला.

दुसऱ्या दिवशी राजाने भर दरबारात मंत्र्याला विचारले—"काल मी आज्ञा केली होती त्याचे पालन झाले का?"

मंत्री म्हणाला—"महाराज, क्षमा करा. मला कोणी संन्यासी भेटलाच नाही!"

राजा चकित होऊन मंत्र्याकडे पहात राहला.

"होय महाराज! खरा संन्यासी धन तुच्छ लेखतो. संन्यास याचा अर्थच सर्वस्वाचा त्याग आहे. मग धन घेणारा मनुष्य संन्यासी कसा काय होईल?" मंत्री म्हणाला.





# अबू-कीर सीर

[२]

अबू कीर व अबू सीर यांची मैत्री अशीच चाळीस दिवस निर्विघ्न चालू राहली. अबू कीर नेहमी पित्त झाल्याचे सांगून पडून राही आणि अबू सीर त्याला पैसे मिळवून फुकट जेवायला आणून देई. अबू कीरची एकूण चंगळ होती. अबू सीरने म्हटले—"कायपण सुंदर शहर आहे हे. तू हे पाहिले नाहीस तर तुझे जिणे व्यर्थ आहे!" की अबू कीर पित्ताचा विकार जास्त वाढल्याचे सांगून पडून राही.

त्या चाळीस दिवसात अबू सीरशी एका शब्दाने अबू कीर कांही बोलला नाही.

एकदा अबू सीर आजारी पडला आणि खोलीबाहेर पडणेदेखील त्याला अशक्य झाले. तरी तो धर्मशाळेच्या व्यवस्थापकाला सांगून अबू कीरच्या खाण्यापिण्याची काही तरी व्यवस्था करून ठेवी.

काही दिवसांनी अबू सीरचा आजार वाढला. तो मढ्यासारखा बेशुद्ध होऊन पडून होता. अबू कीरला भुकेमुळे झोप येईना. तो अंथरुणावर उठून बसला. त्याने खायला काही मिळेल म्हणून सर्व खोली हुडकून पाहिली. परंतु त्याला काही एक मिळाले नाही. शेवटी अबू सीरच्या कपड्यात काही आहे का, त्याने पाहिले. तर त्यात त्याला दीनार ठेवले होते ती पिशवी सापडली. अबू सीरने किती मेहनत करून ते पैसे जमा करून ठेवले होते. अबू कीरने ती पैशांची पिशवी काढून आपल्या कनवटीला खोंचून ठेवली. ती पिशवी उचलून नेल्यामुळे अबू सीरला काय वाटेल याची त्याने फिकीर केली नाही. त्याने हळूच खोलीचे दार उघडले आणि बाहेरून कडी लावून घेऊन कोठेतरी निघून गेला. तो



बाहेर गेला तेव्हां धर्मशाळेच्या पाहरेकऱ्याने त्याला पाहिले नाही.

अबू कीर सरळ पावरोटीच्या दुकानात गेला, पोटभर खाऊन घेतले आणि कपड्यांच्या दुकानात जाऊन त्याने त्याला हवे ते कपडे विकत घेतले. नंतर ते कपडे घालून बाजारपेठेत गंमत पहात हिंडू फिरू लागला. त्या गावातले लोक निळ्या किंवा पांढऱ्या रंगाचे कपडेच घालून हिंडत होते. दुकानातदेखील फक्त दोनच रंगाचे कपडे मिळत. त्याला एक रंगाऱ्याचे दुकान दिसले. सर्व हौद निळ्या रंगानेच भरलेले होते.

अबू कीरने त्या दुकानात जाऊन आपला पांढरा हात रुमाल दाखविला व विचारले– "साहेब! हा हातरुमाल रंगवायला काय घ्याल? कोणता रंग द्याल याला?"

"कां, निळा रंग. आमच्याकडे दुसरा रंगच नाही. याला वीस दीनार द्यावे लागतील." दुकानदार म्हणाला.

"काय म्हणालात? हा एवढासा रुमाल रंगवायला वीस दीनार? आमच्या गावी याला अर्धा दीनारदेखील द्यावा लागत नाही." अबू कीर आश्चर्य चकित होऊन म्हणाला.

"अस्सं! मग तू आपल्या देशात जाऊनच कां नाही रंगवून घेत? आमच्या देशात वीस दीनारहून कमी किमतीत होणार नाही." दुकानदार म्हणाला.

"ठीक, वीस दिनारच देतो, पण तांबडा रंग दे!" अबू कीर म्हणाला.

"तांबडा रंग? तो कसा काय असतो बुवा? असा रंग असतो का?" दुकानदाराने विचारले.

"तरमग हिरवा रंग दे!" अबू कीर म्हणाला.

"हिरवा रंग कसा काय असतो बुवा? मी नाही कधी ते नाव ऐकले." दुकानदार म्हणाला.

अबू कीर एका मागून एक रंगाची नांवे सांगत गेला, पण दुकानदाराला त्यातल्या एकाही रंगाचे नाव माहीत नव्हते व तो



पाहिले नव्हते. शेवटी तो म्हणाला–"क्षमा करा, मी या एका रंगाशिवाय दुसरा रंग पाहिला नाही की त्याचे नाव ऐकले नाही. कसा असतो तो रंग?"

"तरमग या निळ्या रंगाशिवाय इतर रंग देणारा कोणी रंगारी असेल तर त्याचे नाव सांग." अबू कीर म्हणाला.

"या गावात रंगाऱ्यांची चाळीस दुकाने आहेत. आम्ही सर्वांनी आमची एक समिती नेमली आहे. आम्हांला सोडून इतर कोणी रंगाऱ्याचे काम या गावात करणार नाही असे आम्ही ठरविले आहे. आम्ही हा धंदा पिढ्यान् पिढ्या करीत आलो आहो. आम्ही धंदा इतर कोणाला शिकवीत नाही. आम्ही फक्त निळा रंगच देतो. आमच्या देशात लोक फक्त पांढरा व निळा रंगच वापरतात." दुकानदार म्हणाला.

ते ऐकून अबू कीर म्हणाला–"हे पहा, मी स्वत: एक रंगारी आहे. तू मला आपल्या दुकानात नोकरी दे. कपड्याला निरनिराळे रंग देण्याची कला मी तुला शिकवीन. तुला इतर रंगाऱ्यापेक्षा पुष्कळ जास्त पैसे मिळू लागतील. थोड्याच दिवसांत तू फार मोठा श्रीमंत होशील."

"आम्ही नव्या लोकांना कामावर ठेवीत नाही." दुकानदार म्हणाला.



"मीच एक दुकान काढले तर?" अबू कीरने त्याला विचारले.

"ते तर अशक्यच! तुला ते शक्य होणार नाही. तू नवे दुकान काढलेस तर तुझ्यावर मोठेच संकट ओढवेल?" दुकानदार म्हणाला.

अबू कीर तेथून निघाला. तो आणखी अनेक दुकानदारांना जाऊन भेटला. पण कोणी त्याला कामावर ठेवून घ्यायला तयार झाला नाही. शेवटी रंगाऱ्यांच्या समितीच्या अध्यक्षाला तो भेटला.

"मी काय करू बुवा? नव्या माणसाला आमच्या धंद्यात घेणे आमच्या नियमाविरुद्ध आहे." अध्यक्ष म्हणाला.

दुकानाबाहेर वाळत टाकले. ते कपडे उन्हात पाहून पाहणाऱ्यांचे डोळे दिपून गेले.

ते दृश्य पाहण्यासाठी सर्व शहर लोटले. दुकानासमोर फार मोठी गर्दी जमा झाली. रंगारी आपापली दुकाने बंद करून हे विचित्र रंग पाहायला धावले. बायका मुले चित्र विचित्र रंग पाहून भुरळून गेली. लोक रंगांची नावे विचारू लागले. प्रत्येकाला आपल्यासाठी त्यातला एखादा रंग निवडून कपडे रंगवायला टाकावे, असे वाटू लागले.

लोकांच्या तोंडी अबू कीरच्या निरनिराळ्या रंगांचे वर्णन ऐकून सुलतान स्वतः दुकान पहायला आला. दुकानासमोर उन्हात चमकणारे रंग पाहून सुलतान थक्क होऊन पहात उभा राहिला. अशा कसबी कर्तबगार रंगाऱ्याचे कौतुक कसे करावे हेच सुलतानाला कळेना. सुलतानाने आपल्या वजिराला घोड्यावरून उतरायला सांगून त्या घोड्यावर अबू कीरला बसायला सांगितले. त्यानंतर निरनिराळ्या रंगाचे कपडे निवडून घेऊन अबू कीरला बरोबर घेऊन आपल्या महालात निघून गेला. अबू कीरला पुष्कळसे सोने देऊन काही विशेष अधिकार बहाल केले. अबू कीरला निरोप दिल्यावर सुलतानाने उत्तमोत्तम रंगाचे कापड निवडून स्वतःसाठी, बेगमांसाठी व दरबारी अधिकाऱ्यांसाठी पोशाख करवून घ्यायला हुकूम दिला. नंतर एक हजार ठाणे रंगविण्यासाठी अबू कीरकडे पाठवून दिली.

हळूहळू शहरातल्या सर्व जहागीरदार व दरबारी लोकांच्या अंतःपुरातील स्त्रियांनी आपले कपडे अबू कीरकडे रंगवायला पाठविले. शहरातल्या लोकांचे रंगरूपच बदलले. काहीं दिवसांनी रंगारी अबू कीर गावातला सर्वात श्रीमंत नागरिक झाला. गावातल्या चाळीस रंगारी कुटुंबांनी अबू कीरची क्षमा मागितली आणि त्यांना मोफत शिक्षण देण्याची विनंती केली. पण अबू कीरने आपल्याच घमेंडीत सर्वांचा अपमान करून सर्वांना हाकलून लावले. पण शहरात जिकडे पहावे तिकडे नवनवे रंग दृष्टीस पडू लागले. (क्रमशः)





# विचित्र घटना

मणिपूरचा राजा चंद्रसेन याच्या एकुलत्या एका मुलीचे नाव चंद्रमुखी होते. लहानपणीच चंद्रमुखीची आई वारली. म्हणून राजालाच मुलीचे कोडकौतुक करावे लागे. ती मुलगी जसजशी मोठी होऊ लागली, राजा तिच्या लग्नाची स्वप्ने पाहू लागला. मुलगी निरनिराळ्या कलात प्रवीण होती. राजाने मुलीच्या लग्नासाठी तयारी सुरू केली व योग्य वर शोधू लागला. पण मुलगी लग्नाला तयार नव्हती.

चंद्रमुखी आपल्या मैत्रिणींबरोबर नेहमी शिकारीला जात असे. एकदा शिकार खेळत असता ती एकटीच दूर निघून गेली आणि तिच्या मैत्रिणी व दासदासी तिला हुडकत मागे कोठे तरी राहून गेले. त्यांनी पुष्कळ शोधले. परंतु त्यांना चंद्रमुखी कोठे दिसली नाही. कदाचित ती कोठे तरी हिंस्र जनावरांच्या तावडीत सापडून प्राणास मुकली असेल, अशी मनाची निराशा करून घेऊन सर्व राजधानीला परतले आणि ते वर्तमान राजाला जाऊन सांगितले.

परंतु चंद्रमुखी त्या सर्वांच्या आधी घरी पोंचली होती आणि काळोख पडण्यापूर्वीच आपल्या खोलीत जाऊन विश्रांती घेत पडली होती. उजाडण्यापूर्वी कोणी तिला उठवू नये असे तिने सर्वांना सांगून ठेवले होते. त्या दिवसापासून राजकुमारी विचित्रच वागू लागली होती. परंतु कोणाला त्याचे कारण मात्र कळले नाही. दररोज सकाळी ती सूर्यास्तापूर्वीच आपल्या खोलीत जाई आणि छान उजाडल्यावर उठून बाहेर येई.

आतां मात्र मुलीचे लग्न लवकर उरकून टाकले पाहिजे असे राजाला वाटू लागले. राजकन्या पण त्या गोष्टीस कबूल झाली. राजाने आनंदाने राजकन्येच्या स्वयंवराची

रा. म. मराठे



व्यवस्था केली. राजकन्या सुंदर होती, म्हणून तिला राजकुमारांकडून मागण्यापण येऊ लागल्या. स्वयंवरासाठी राजकुमारांची गर्दी मणिपूरला जमा झाली.

ठरल्या वेळी चंद्रमुखी घूंगट तोंडावर ओढून हातात वरमाळ, घेऊन स्वयंवर मंडपात आली. तिने कोणत्याही राज-कुमाराकडे लक्षपूर्वक पाहिले नाही. पुढे जात जात एका जागी ती एकदम थांबली आणि एका राजकुमाराच्या गळ्यात वरमाळा घालून अंतःपुरात निघून गेली. तोंपर्यंत सूर्यास्त झालेला होता.

राजकुमारीचे ते विचित्र वागणे पाहून सर्वांना आश्चर्य वाटले. असले स्वयंवर [illegible] संपले होते, म्हणून ज्याच्या गळ्यात वर-माळा पडली होती त्या चेदी राज्याचा युवराज चक्रसेन एकटा मंडपात बसून राहिला आणि इतर राजकुमार उठून निघून गेले. युवराज चक्रसेनने त्या दिवशी चंद्रसेन राजाचे आतिथ्य स्वीकारले. दुसऱ्या दिवशी राजा चंद्रसेनने आपल्या भावी जांवयाची तलवार ठेवून घेऊन त्याला आदरपूर्वक त्याच्या बरोबर आलेल्या नोकरांबरोबर चेदी राज्यात पाठवून दिले. मणिपुर राज्यात तलवारी बरोबर लग्न करुन देण्याचा प्रघात होता.

त्यानंतर चंद्रमुखी व चक्रसेनची तल-वार यांचा सुमुहूर्तावर थाटामाटाने विवाह समारंभ झाला. विवाह झाल्यानंतर सुद्धां चंद्रमुखीच्या वागण्यात काही फरक पडला नाही. महिनाभर आपल्या मुलीला आपल्या राज्यात ठेवून घेऊन एका शुभमुहूर्तावर चंद्रसेन राजाने आपल्या मुलीला दासदासीं-बरोबर सासरी पाठविले.

चंद्रमुखी ज्या दिवशी चेदीच्या राज-धानीत पोचली तेव्हां तिच्या स्वागताची फार उत्तम तयारी केलेली होती. त्या-दिवशी वधुवरांची पहिली भेट होणार होती. परंतु चंद्रमुखी सूर्यास्तापूर्वीच जेवून घेऊन आपल्या दासींबरोबर शैयागृहात निघून गेली आणि काळोख पडण्यापूर्वी सर्वांना बाहेर पाठवून देऊन ती खोलीत एकटीच राहिली.

चक्रसेन दोन प्रहर रात्र उलटल्यावर शयनगृहात गेला. पण तेथे चंद्रमुखी नव्हती. त्याची बायको एक अपूर्वसुंदरी असल्याचे त्याने ऐकले होते. परंतु त्याने तिला स्वतःच्या डोळ्यांनी पाहिले मात्र नव्हते. तेथें आपल्या बायकोला न पाहून त्याला आश्चर्य वाटले. त्याने चवकशी करुन पाहिली, पण कोणीच समाधानकारक उत्तर देऊ शकले नाही. तेव्हां मात्र त्याला काळजी वाटली आणि थोडी निराशा पण वाटली. सर्व राजवाडा हुडकून पाहिला पण ती कोठे सापडली नाही.

चक्रसेन त्याच दिवशी रात्री आपल्या बायकोच्या शोधार्थ घोड्यावर बसून निघाला. राजधानीबाहेर पडल्यावर चांद-ण्यात त्याला एक म्हातारी दिसली. त्याने जवळ जाऊन म्हातारीला विचारले–"आजी, तुम्ही इकडून एखाद्या तरुण स्त्रीला जाताना पाहिले का?"

म्हातारी तोंडातल्या तोंडात काही तरी बडबडत म्हणाली–"तू कोण रे बाळ? काय पाहिजे तुला?"

चक्रसेनने तिला घडलेली गोष्ट सांगितली तेव्हां म्हातारी म्हणाली–"बरोबर, तीच



मुलगी असणार, थोड्या वेळेपूर्वीच इकडून पळत गेलेली दिसली. कां बरं पळाली? विचित्रच बाई! मला तू घोड्यावर बसवून घेतलेस तर दोघं मिळून शोधता येईल."

दोघे घोड्यावर बसून बराच वेळ चंद्र-मुखीला शोधीत राहिले. दोघे दमून गेले, पण चंद्रमुखी त्यांना सापडली नाही.

"बाळ, आपण बरेच दूर आलो! थोड्या वेळाने उजाडेल. आपण या झाडाखाली थोडी विश्रांती घेऊ या." म्हातारी म्हणाली. तोंपर्यंत अंधुक चांदणे होते ते देखील उरले नव्हते व चांगला काळोख पडला होता. म्हणून चक्रसेन म्हातारीच्या सल्ल्याप्रमाणे एका झाडाखाली झोपला.












दुसऱ्या दिवशी त्याची झोप मोडली तेव्हां त्याला म्हातारी कोठे दिसली नाही. उठून तो आजूबाजूला पहात थोडा फिरला. त्याला एका जागी एक ओढा दिसला. त्याच्या काठी एक झोपडी होती. झोपडी-समोर एक स्त्री उभी होती. ती म्हातारी नव्हती. एक तरुण व सुंदर स्त्री होती. परंतु तिचे कपडे म्हातारीच्या कपड्यां-सारखेच दिसत होते.

"बाई, तुम्ही कोण? येथे तुम्हांला म्हाताऱ्या आजी दिसल्या का?" चक्रसेनाने त्या स्त्रीला विचारले.

"माझे नाव चंपा आहे. ती म्हातारी माझी आजीच असेल. ती एक जादुगारीण आहे. ती कदाचित वनस्पती किंवा मुळ्या आणायला गेली असेल. आम्ही दोघी याच झोपडीत राहतो." ती बाई म्हणाली.

चक्रसेनच्या मनात त्या तरुण स्त्रीला सोडून जाण्याची इच्छा होईना. त्याला त्या स्त्रीची ओढ वाटत होती. तो बराच वेळ तिच्याशी बोलत बसला आणि त्या झोपडीतच राहिला. तीसुद्धां मोकळेपणी त्याच्याशी बोलली. नंतर तिला आपली आठवण म्हणून अंगठी देऊन पुन्हां भेटण्याचे वचन देऊन आपल्या राजवाड्यात परत गेला.

चक्रसेनच्या आईवडिलांनी चंद्रमुखीचा पुष्कळ शोध केला. परंतु बराच शोध केल्यानंतर सुद्धा जेव्हां ती सापडली नाही तेव्हां आता तिचा शोध करणे फुकट समजून व पुढे दिसली तरी सून म्हणून तिला न स्वीकारण्याचे त्यांनी ठरविले. चक्रसेन दररोज चंपाकडे जाऊ लागला व संध्या-काळपर्यंत तिच्याकडे राहून घरी परत येऊ लागला. हळूहळू चक्रसेनच्या मनात चंपाशीच बोलत बसावेसे वाटू लागले. एक घटका-भरदेखील तिला सोडून राहणे त्याला अशक्य वाटू लागले.

एक दिवशी तो चंपाला म्हणाला—"तू माझ्याबरोबर चल. आपण दोघे लग्न करून घेऊ. माझ्या आईवडिलांची संमती मी मिळवून घेईन."

"परंतु हे आतांच शक्य होणार नाही. एक दिवशी माझी आजी मला सोडून जाईल. त्याला फार दिवस लागणार नाहीत. तेव्हां मी आपल्याबरोबर अवश्य येईन. आपण गांधर्व विवाहाने बद्ध झालोच आहो. आणखी काही काळ धीर धरा." चंपा म्हणाली.

चंपा गरोदर होती व हळूहळू तिला नववां महिनापण लागला. तेव्हां चक्रसेन म्हणाला—"या ठिकाणी तुला बाळंतपणात फार त्रास होईल. म्हणून तू माझ्याबरोबर चल. मी तुझ्या बाळंतपणाची सर्व व्यवस्था करून देतो."

परंतु चंपा त्या गोष्टीस तयार झाली नाही.

"बरं तर मी तुझ्या मदतीला सुईण दासी वगैरे पाठवून देतो. निदान ही गोष्ट तरी तू मान्य कर." चक्रसेन म्हणाला.

चंपा त्या गोष्टीस देखील कबूल झाली नाही. ती म्हणाली—"तुम्ही कोणाला इकडे



घेऊन येऊ नका. माझी आजी शंभर सुईणी-दासींच्या सारखी आहे. म्हणून तुम्ही माझ्या बाळंतपणाची मुळीच काळजी करू नका."

चक्रसेन दररोज येऊन चंपाची चवकशी करून जाई. एक दिवशी रात्री त्याला मुळीच झोप आली नाही. त्याला त्या दिवशी शंका वाटू लागली की त्या रात्री चंपा नक्कीच बाळंत होणार. त्या वेळी आपण जवळ असावे असे त्याला वाटत होते. म्हणून तो चंपाची एक मैत्रीण मालती नावाची होती तिला बरोबर घेऊन कोणाला काही सांगितल्याशिवाय चंपाच्या झोपडीजवळ आला.

झोपडीतून चंपाच्या कण्हण्याचा आवाज ऐकू येत होता. चक्रसेनने चंपाला मदत करण्यासाठी मालतीला आत पाठवून दिले. मालती आत गेली खरी, परंतु दुसऱ्या क्षणाला मोठ्याने ओरडत बाहेर आली. चक्रसेन घाबरला. त्याने आत जाऊन जे दृश्य पाहिले त्यामुळे तो आश्चर्य चकितच झाला.

झोपडीत कण्हणारी स्त्री चंपा नसून म्हातारी आजी होती. ते दृश्य पाहून चक्रसेनाला घेरी येईलसे वाटले. त्याने म्हातारीला विचारले–"आजी, हे काय? आणि चंपा कोठे आहे?"

कळा सोसत नव्हत्या म्हणून म्हातारी कण्हतच म्हणाली–"मला मदतीला कोणी आले तर हवे आहे. मालतीला आत पाठवा."

नाइलाजाने चक्रसेन बाहेर आला व त्याने मालतीला आत पाठविले. परंतु चक्रसेनाच्या मनात शंका आली की म्हातारीला मालतीचे नाव कसे कळले?

मालती आत पोचल्यावर थोड्याच वेळाने म्हातारी बाळंत झाली व तिला एक सुंदर मुलगा झाला आणि त्यानंतर थोड्याच वेळाने ती म्हातारी एक तरुण स्त्री झाली.

"चंद्रमुखी, तू?" मालती ओरडली. बाहेर चक्रसेनाला ते ऐकू आले. त्याने आत जाऊन चंपाला व मुलाला पाहिले.

[illegible] म्हातारी कोठे आहे?" चक्रसेनने विचारले.

"मीच ती म्हातारी, मीच चंपा! चुकून एक अपराध माझ्या हातून घडला. *शाप होता म्हणून मला हे सर्व कष्ट सहन करावे लागले. या मुलाच्या जन्माबरोबर मी शापमुक्त झाले." असें सांगून चंद्रमुखीने आपली पूर्वकथा सांगितली. म्हणाली,–

"मी त्या दिवशी शिकारीला गेले होते तेव्हां एकटीच एका निर्जन स्थानी जाऊन पोचले. सर्व बरोबरचे लोक मागे राहून गेले. एका झाडीआड मला हरणासारखे कांही तरी दिसले. मी बाण मारला, तो एका ऋषीला जाऊन लागला. त्या ऋषीने मला शाप दिला की 'म्हातारी हो!' मी त्यांच्या पायां पडून क्षमा मागितली व शाप परत घेण्यास विनंती केली. ऋषीने शाप परत न घेता एवढेच सांगितले की एक मुलगा होईपर्यंत मला दिवसां तारुण्य व रात्री म्हातारपण राहील. म्हणून मी रात्री कोणाला भेटत नसे. मी लग्नाला कबूल झाले, ते देखील शापमुक्ति व्हावी म्हणून. आतां माझे होणारे पति कोण हा माझ्या-समोर प्रश्न होता. परंतु विवाह झाल्याने प्रश्न सुटेल असे नव्हते. रात्रीच्या वेळी मी म्हातारी होऊन आपल्यासमोर कशी काय येणार? भाग्यवश तुमची त्या दिवशी रात्री भेट झाली व तुम्ही मला दररोज दिवसां भेटायला येत होता. मला एक वर्षभर एकटीने रहावे लागले पण दिवसां तुमचा सहवास लाभल्याने मी ते कष्ट सहन केले व मला पुत्रप्राप्ती पण झाली." चंद्रमुखीने असे सांगून आपली गोष्ट संपविली.

चंद्रमुखीची पूर्व कथा ऐकल्यावर चक्रसेनाने तिचे शापमुक्त झाल्याबद्दल अभिनंदन केले. तो आपल्या बायकोला व मुलाला राजधानीत घेऊन गेला. चंद्रमुखीने आपली पूर्व कथा व पतीची भेट कशी झाली हे आपल्या आईवडिलांना सांगितले. पुढे चक्रसेन व चंद्रमुखीचा संसार सुखाचा झाला.



# थोरपणाची ओळख

एक राजा शिकारीला गेला असता दमून भागून एका झाडाखाली विश्रांति घेण्यासाठी बसला होता. त्याला तहान लागली होती. म्हणून त्याने नोकराला पाणी आणायला सांगितले. नोकर पाणी आणायला गेला तेव्हां त्याला एक विहीर दिसली. परंतु पाणी काढायला विहिरीवर दोरी नव्हती. विहिरीपासून जवळच एका झोपडीत एक आंधळा साधु रहात असे. त्याच्याकडे जाऊन नोकर म्हणाला–"ए जोगड्या, तुझ्याजवळची दोरी दे विहिरीतून पाणी काढायला."

साधु म्हणाला–"माझ्याजवळ दोरी नाही."

तेव्हां राजाने आपल्या मंत्र्याला साधूकडे पाठविले. त्याने जाऊन साधूला विचारले–"बैरागीबुवा, तुमच्याजवळ नक्कीच दोरी आहे. तेवढी मला द्या. विहिरीतून पाणी काढून झाल्यावर परत देईन."

पण साधू म्हणाला–"माझ्याजवळ आतां खरेच दोरी नाही."

आता राजा स्वतः झोपडीजवळ गेला आणि साधूला म्हणाला–"योगिराज! तहानेने माझा जीव कासावीस झाला आहे. पाणी काढायला जरा दोरी देता का?"

"महाराज, मी आपल्याला पाणीच प्यायला देतो. थांबा!" असे सांगून साधू पाणी घेऊन आला.

राजाने चकित होऊन विचारले–"योगिराज! मी राजा आहे हे आपल्याला कसे काय कळले?"

साधू म्हणाला–"महाराज! थोरपणाची ओळख माणसाच्या बोलण्यावरून कळते!"





# धाडसाचे फळ

एका गावी एक ब्राह्मण राहात असे. त्या गावी कोणाचा अंत्यसंस्कार असे तेव्हां लोक त्याच ब्राह्मणाला बोलावीत. अंत्यसंस्कारासारख्या अशुभ कार्याला कोणी भट यायला तयार नसे. कोणी अपघाताने मरो, आत्महत्या करून मरो, की फांशी झाल्याने मरो, अशा लोकांच्या अंत्यसंस्कारालादेखील तोच ब्राह्मण जाई. मेलेला मनुष्य भूत होऊन मानेवर बसतो, असे इतर भटांना वाटे. परंतु हा ब्राह्मण असल्या खुळचा समजुतींकडे कधीच लक्ष देत नसे. म्हणून शेजारच्या गावाहूनसुद्धा लोक त्यालाच बोलावीत.

एकदा त्या ब्राह्मणाला त्याच्या गावापासून तीन चार कोस दूरच्या गावी जावे लागले होते. तो आपले काम संपवून परत आपल्या गावी जायला निघाला तोंपर्यंत काळोख पडू लागला होता.

गावकऱ्यांनी त्यांना अनेक प्रकारे समजावून सांगितले की तुम्ही अवेळी जाऊ नका. रात्रभर आमच्याच गावी रहा व उजाडल्यावर आपल्या गावी जा.

परंतु तो ब्राह्मण म्हणाला–"कशाला हो, एकदोन तासात मी आपल्या गावी जाऊन पोचेन."

"आम्ही उगाच सांगत नाही, लोक सांगतात की तुमच्या व आमच्या गावांच्या मध्ये जे स्मशान आहे, त्यात भुते आहेत. रात्री आडवी येतात आणि उगाच त्रास देतात." गावकरी म्हणाले.

ब्राह्मण मोठ्याने हसला व म्हणाला–"भूत प्रेत म्हणता? मला त्यांच्याशी काय करायचे आहे? मला रात्री घरी पोचलेच पाहिजे." असे सांगून ब्राह्मण निघाला.

आकाश निरभ्र होते व दुधासारखे शुभ्र चांदणे पडले होते. म्हणून ब्राह्मण



बेफिकीरपणे चालत होता. अर्ध्या वाटवर त्याला एक झोपडे दिसले. पहिल्याने त्याला वाटले झोपडीत कोणी तरी रहात असावे. परंतु बाहेरच झोपडीच्या सावलीत एक स्त्री उभी असलेली दिसली. ती पाठमोरी उभी होती, म्हणून तो किंवा ती कोणी जवळ येईपर्यंत कांही बोलला नाही. ब्राह्मणाला वाटले, ही बाई आपल्या नवऱ्याशी किंवा सासूशी भांडून पळून आली असावी. उजाडण्यापूर्वी नदीत किंवा विहिरीत जीव देईल. अशा आत्महत्या करणाऱ्या स्त्रियांचा दाहसंस्कार मी करविला आहे. या बाईची समजूत घालून हिला हिच्या घरी पोचते केले पाहिजे.

असा विचार करून ब्राह्मण त्या स्त्रीला म्हणाला–"कोण हो बाई तुम्ही? रात्रीच्या वेळी या निर्जन अरण्यात तुम्ही एकट्या कशा काय? तुम्हांला काही दुःख कष्ट असेल तर सांगा. मी कोणाला काही सांगणार नाही. तुम्हांला पाहिजे तर तुमच्या घरापर्यंत येऊन पोचवीन."

ती बाई जशीच्या तशीच उभी होती. परंतु जरा रागाच्या आवाजात म्हणाली–"इतरांच्या भानगडीत पडायला कोण रे तू? आल्या वाटेने निघून जा."

त्याला वाटले की ती बाई थोडी हट्टी व भांडखोर दिसते आहे, म्हणून म्हणाला–"अहो, पण असा रागावतां कां? तुम्हांला अवेळी रात्री या रानात सोडून जायला मी नाही तयार. निदान कोणत्या गावच्या तुम्ही, एवढे तरी सांगाल? नाही तर नाव तरी? नाव सांगायचे नसेल तर आपल्या घरचा पत्ता तरी? म्हणजे त्यांना जाऊन कळविता येईल. ते लोक येऊन तुम्हांला बोलावून घेऊन जातील."

"तुला मी थोडक्यात सांगितले ते तुला पटले नाही, व तू आपल्या वाटेने गेला नाहीस. बरे तर मी तुझ्याच अंगात शिरते." असे म्हणत ती तोंड फिरवून उभी राहली. तिचा भयंकर चेहरा पाहून ब्राह्मणाने ती कोणी तरी पिशाचीण असणार हे ओळखले.



परंतु तो धीट म्हणून गावात प्रसिद्ध होता. आपला धीटपणा खरा ठरविण्यासाठी तो स्वतःला सावरून म्हणाला–"माझ्या अंगात प्रवेश करणार? पाहतो कशी शिरतेस ती. मी याच गोष्टीची वाट पहात होतो, कित्येक दिवसांपासून."

पिशाचिणीने आपले केस सोडून झाडले व जीभ बाहेर काढून उभी राहली.

ब्राह्मण मुळीच भ्याला नाही. तो त्या पिशाचिणीला म्हणाला–"भुतांप्रेतांच्या याहून मोठमोठ्या जिभा मी पाहिल्या आहेत, समजले?"

ते ऐकून पिशाचीण लाजल्यासारखी होऊन आपली जीभ आत ओढून घेऊन तोंडा, नाकातून रक्त गाळू लागली.

"हे बघ माझ्याजवळ तुझ्या गमजा नाही चालायच्या. तुझ्याहून जास्त रक्त सांडणाऱ्या प्रेतांना व भुतांना मी पाहिले आहे व त्यांची खोड मोडली आहे. तू कोणी तरी मूर्ख पिशाचीण दिसते आहेस." ब्राह्मण म्हणाला.

ती निराश होऊन म्हणाली–"बरं तर, मी तुम्हांला खरे काय ते सांगते. मला या सर्वांचा तितकासा अनुभव नाही. कालच आत्महत्या करून मी भूत झाले आहे. पण ही आत्महत्या केल्यावर व भूत झाल्यावर



काय करायचे याचा मी विचार करीत होते. तुम्ही आपल्या वाटेने निघून गेलात तर मी निश्चितपणे विचार करून काही तरी ठरवीन."

ब्राह्मणाला आत्महत्या करणाऱ्या त्या बाईची दया आली. उघडपणे त्या पिशाचिणीच्या दुःखाविषयी सहानुभूति दाखवीत तो म्हणाला–"अहो, मी आजपर्यंत जिवंत भूत पाहिले नाही. ती बाई कोण हो?"

"समोर ते गाव दिसते आहे ना त्या गावातला एक सुतार आहे तिचा नवरा." पिशाचीण म्हणाली.

"ओहो, पण असा कोणता प्रसंग आला तिच्यावर?" ब्राह्मणाने विचारले.



"ती सासू आहे ना कैदाशीण, तिच्यामुळे तर तिला 'नको जीव' झाले होते." पिशाचीण म्हणाली.

"नाही तर काय, जे व्हायचे ते सासूकडून तर होते?" ब्राह्मणाने विचारले.

"तुम्ही हे काय म्हणतां? मी समजून उमजून एक युक्ति योजली आहे." पिशाचीण म्हणाली.

"मग तुला वाटते की तुझी युक्ति यशस्वी होईल?" ब्राह्मणाने विचारले.

"उद्यां सासूचे उपोषण व्रत आहे. एक टोपलेभरून केळी आणून ठेवली आहेत. सौभाग्यवती स्त्रियांना बोलावून हळदीकुंकवाबरोबर पानसुपारी व फळे द्यायची [illegible] मी त्या घरात [illegible] केळ्यांचे टोपले वर माळ्यावर लपवून ठेवणार आहे. तेव्हां सासू आपल्या सुनेला शिव्या देईल व मारहाण करील. त्या वेळी ती बिचारी सून जिवाचा कंटाळा वाटून आत्महत्या करील." असे सांगून त्या पिशाचिणीने तिच्या मनातले गुपित सांगून टाकले.

ब्राह्मणाने मनातल्या मनात त्या पिशाचिणीला शिव्या दिल्या. परंतु उघड म्हणाला—"छान, काय पण गंमत करणार आहेस तू? बरं पण मला आता गेले पाहिजे. फार उशीर झाला, घरी जायला." असे सांगून ब्राह्मण निघाला.

ब्राह्मणाने घरी गेल्यावर खाऊन पिऊन घेतले आणि झोपला. उजाडल्यावर दुसऱ्या दिवशी पिशाचिणीने सांगितले होते त्या गावी निघाला. सुताऱ्याच्या घराजवळ तो पोचला त्याच वेळी त्याला घरातून ओरडा ऐकू आला.

त्याने आत जाऊन पाहिले. सासू रागावून सुनेला बोलत होती आणि सून कोपऱ्यात बसून रडत होती. त्याने विचारले— "काय हो, काय झाले काय असे?"

"अहो भटजी, काय सांगू, हात टेकले या सुनेसमोर! मी केळ्यांचे टोपले येथे ठेवले होते ते रात्रीच्या रात्री नाहीसे झाले. हिने [illegible] सारखी [illegible] फळे खाऊन टाकली. आता, तुम्हीच सांगा, हे किती दिवस पहात रहायचे?" सासू म्हणाली.

"अहो ताई, तुम्ही उगीच सुनेला रागावतां आहां. फळांचे टोपले वर माळ्यावर आहे. पहा वर!" ब्राह्मण म्हणाला.

"अहो भटजी, पण वर ते जाईलच कसे? मी खाली ठेवले होते टोपले? हिनेच वर ठेवले असेल किंवा ठेवविले असेल." असे म्हणत सासूने सुनेकडे जरा करड्या नजरेने पाहिले.

"पहिल्याने तुम्ही वर चढून पहा तर. निदान मी म्हटले ते खरे आहे की नाही, मला तरी कळेल." ब्राह्मण म्हणाला.

वर चढून पाहिल्यावर माळ्यावर टोपले सांपडले. "तरमग ते भूत म्हणाले ते खरे झाले." ब्राह्मण चकित होऊन म्हणाला.

"भूत म्हणाले? ते कसे काय?" सासूने विचारले.

ब्राह्मणाने तो त्या पिशाचिणीला कसा भेटला व तिच्याकडून त्याला त्या भुताटकीची कथा कशी कळली हे सांगितले. ब्राह्मणाच्या धीटपणाचे सासूला आश्चर्य वाटले आणि सून रडतारडता एकदम हसू लागली.

तेव्हां ब्राह्मण सासूला म्हणाला—"हे पहा ताई! उगाच सुनेवर असे रागावू नये. उद्या या सुनेने आत्महत्या केली असती आणि येऊन तुमच्या मानगुटीला बसली असती म्हणजे? यापुढे तरी नीट वागवा सुनेला. नाहीतर आज ना उद्या त्या पिशाचिणीने केले ते होईल व तुम्हांला पश्चात्ताप करावा लागेल."

सासूने सुनेला म्हटले—"मुली! आजपर्यंत केल्या त्या चुकांबद्दल कान धरते. पण यापुढे असे मी कधी काही करणार नाही. तू 'चांदोबा' आणून द्या म्हणालीस तर तो सुद्धा आणून देऊन तुझे लाड पुरवीन."

आता या सुनेला सासूकडून काही त्रास होणार नाही हे पाहून ब्राह्मण निश्चिंतपणे आपल्या गांवी निघून गेला.



# नोकर कोणाचा?

एकदां अकबर बादशाहा बिरबलबरोबर फिरायला गेला असता, एका मळयात वांगी लावलेली दिसली. वांग्यांचा रंग बादशाहच्या डोळयात भरला. म्हणाला "किती सुंदर वांगी आहेत?"

"जी, सरकार! वांगे म्हणजे भाज्यांचा राजा आहे." बिरबल म्हणाला.

"वांगी दिसायला चांगली असतात, पण चवीला काही तरीच–तुरट वाशीळी. जरा पिकली की इतक्या बिया निघतात की खाणे कठीण!" बादशाह म्हणाला.

"जी सरकार! वांग्यांची भाजी तब्येतीला वातूळ. म्हणून आजारपणात वैद्य हकीम पथ्य म्हणून वांगी खाऊ देत नाहीत. दुसऱ्या भाज्या काय जगात कमी आहेत. त्या पत्करल्या!" बिरबल म्हणाला.

"अरे, आतां तर तू वांग्याची वाखाणणी करीत होतास? आणि आतां विरुद्ध बोलतो आहेस!" अकबराने चकित होऊन विचारले.

"सरकार, मी वांग्याचा नोकर नाही, आपला नोकर आहे!" बिरबल म्हणाला.





# कायपण गोड उत्तर

एका गावी एका तलावाच्या काठी एक म्हातारी झोपडी बांधून रहात असे. तिला एक तरुण मुलगा होता. उतारवयामुळे म्हातारीला काम होत नव्हते, म्हणून ती काम करीत नसे. परंतु तिचा मुलगा चांगला धडधाकट होता. तो खूप मेहनत करीत असे, तरी त्यांची गरीबी कमी व्हायच्या ऐवजी वाढतच गेली.

मुलगा खंडावर शेत घेई. मेहनत करून चांगले पीक काढी. परंतु खंड दिल्यावर वर्षाच्या शेवटी त्याच्याकडे फारच थोडे धान्य उरे. म्हणून दोघांना अर्धपोटी दिवस काढावे लागत. तो विचार करू लागला, मी इतकी मेहनत रात्रंदिवस करतो, पण आपली गरीबी जाण्याचे नाव घेत नाही. असे कां? परंतु त्याच्या प्रश्नाचे उत्तर कधी त्याला मिळाले नाही. हळूहळू तोच प्रश्न त्याच्या मनात सारखा घोळू लागला. त्या प्रश्नाचे उत्तर मिळाले तरच त्याला चैन पडेल, असे त्याला वाटू लागले.

त्याच सुमारास त्याला कोणी सांगितले की गांवाच्या पश्चिमेकडील दूर डोंगराळ प्रदेशात एक साधू येऊन राहू लागला आहे. त्याला ज्योतिष् शास्त्राची चांगली माहिती आहे. कोणी विचारलेल्या प्रश्नाचे बरोबर व समाधानकारक उत्तर तो देतो. म्हणून त्या साधूकडे जाऊन आपल्या प्रश्नाचे उत्तर विचारून येण्याचे त्याने ठरविले. तो आपल्या आईला मनातली गोष्ट सांगून तो डोंगर चढू लागला.

सात दिवस पायी प्रवास केल्यावर त्याला रस्त्याच्या बाजूला एक झोपडी दिसली. त्याने जवळ जाऊन झोपडीचे दार वाजवून पाहिले. एक म्हातारी बाई दार उघडून पुढे आली आणि अन् त्याला विचारले–"कोण रे बाबा तू? कोठून

सौ. सुशील ना. करमेळकर



आलास, काय पाहिजे तुला?" त्याने खरे ते कारण सांगितले.

म्हातारीने त्या मुलाला जेवायला वाढले आणि त्याला झोपायला जागा वगैरे दाखविली. दुसऱ्या दिवशी उठल्यावर ती त्याला म्हणाली–"मुला, तू आपला प्रश्न विचारशील तेव्हां मी सांगते, तोसुद्धा प्रश्न विचार आणि त्याचे उत्तर मला येऊन सांग. माझी मुलगी फार सुंदर आहे. पण ती कधी बोलत नाही. तिचा मुकेपणा कसा जाईल, हे विचार त्या साधूला."

"बरं, मी या प्रश्नाचे उत्तर विचारून येऊन सांगेन." मुलगा म्हणाला आणि पुढे निघाला.

तो एक आठवडाभर चालत राहिल्यावर दमून गेला. रस्त्याच्या बाजूला एक घर होते. त्याने त्याचे दार वाजविले. एका म्हाताऱ्याने दार उघडून त्याला आत बोलावून खायला प्यायला दिले आणि येण्याचे कारण विचारले, तेव्हां त्याने खरे तेच कारण सांगितले.

रात्रभर त्या म्हाताऱ्याकडे झोपल्यावर तो मुलगा पुढे निघाला तेव्हां म्हातारा त्याला म्हणाला–"बाळ, मी एक प्रश्न सांगतो, त्याचे उत्तर विचारून मला येऊन सांग. माझ्या परसात एक लिंबाचे झाड आहे. त्याला फुले येतात, पण फळे लागत नाहीत. काय केले म्हणजे फळे येतील? विचार त्याला."

तरुण मुलगा होकार देऊन पुढे प्रवासाला निघाला. तो पश्चिमेकडेच जात असता त्याला एक मोठा डोंगर दिसला. एक नदीवजा ओढा बाजूला वहात होता. तो ओलांडून पलीकडे कसे जायचे, त्याला कळेना. कोठे पूलबील दिसत नव्हता. तेव्हां तो एका खडकावर विचार करीत बसला. त्याच वेळी नदीतून एका मोठ्या नागाची फडा वर आलेली दिसली. ते पाहून मुलगा थोडा घाबरून गेला आणि मागे सरकला.

"मला पाहून भितोस कां बाबा? मी कोणाला चावत नाही. तू येथे काय करतो आहेस?" सांपाने विचारले.

माणसांच्या भाषेत बोलणाऱ्या त्या सांपाकडे चकित होऊन पहात मुलाने त्याच्या प्रवासाचे कारण सांगितले.

"होय का, तरमग तू त्या साधूला माझ्या एका प्रश्नाचे उत्तर विचारून ये. मी आजपर्यंत कोणाला चावलो नाही की कसली ही इजा केली नाही आणि एक हजार वर्षे झाली तरी या नदीतून माझी सुटका होत नाही. मला मुक्ति कां मिळत नाही, त्या साधूला विचारून ये." सांप म्हणाला.

"तू मला ही नदी पार करून घेऊन गेलास तर मी नक्की त्या साधूला तुझ्या प्रश्नाचे उत्तर विचारून येईन." मुलगा म्हणाला.

सांपाने त्याला आपल्या पाठीवर बसवून घेतले आणि नदीपलीकडे पोचते केले. तो डोंगर चढू लागला. डोंगरावर त्याला एक जुनाट ओसाड गावाचे अवशेष दिसले. गावाच्या मध्यभागी एक मोठी हवेली होती त्याने पुढे जाऊन पाहिले तेव्हां त्याच हवेलीत तो साधू रहात असल्याचे त्याला समजले. सहजी त्या साधूचे दर्शनपण घडले.

त्याने त्या साधूला साष्टांग नमस्कार केला आणि म्हणाला–"साधूबुवा! मी तुम्हांला आपल्या वतीने एक व इतरांच्या वतीने तीन असे एकंदर चार प्रश्न विचार-



णार आहे. त्यांचे उत्तर मिळावे म्हणून मी इतका दुरून आलो आहे."

"अरे पण मी फक्त तीनच प्रश्नांची उत्तरे देतो. म्हणून तू पाहिजे त्याच्या वतीने प्रश्न कर. मी फक्त तीनच प्रश्नांची उत्तरे देईन." साधू म्हणाला.

तो मुलगा थोडा वेळ विचार करीत राहला आणि आपला प्रश्न सोडून बाकी तिघांचे प्रश्न विचारले. साधूने तिघांच्या प्रश्नांची उत्तरे सांगितली. त्या तरुणाने साधूला नमस्कार केला व त्याचे आभार मानून परतला.

तो ओढ्याच्या काठी पोचला तेव्हां त्याला तो साप त्याची वाट पहात फडा



काढून तयार असलेला दिसला. "माझ्या प्रश्नाचे उत्तर आणलेस का?" नागाने विचारले.

"होय आणले आहे. तू कोणतीहि दोन पुण्यकार्यं केलीस तर तुला मुक्ति मिळेल!" मुलगा म्हणाला.

"कोणती दोन कामं होऊ शकतील?" नागाने आनंदित होऊन विचारले.

"मला नदीपलीकडे घेऊन जा हे एक काम!" मुलगा म्हणाला.

त्याला नदीपलीकडे पोचल्यावर सापाने विचारले—"अन् दुसरे?"

"तुझ्या डोक्यात मणी असतो असे मी ऐकले आहे, आणि त्याच्या मदतीने तुला काळोखात सुद्धा दिसते. तो मणी तू सोडला पाहिजेस." मुलगा म्हणाला.

नाग फडा खाली करून म्हणाला—"घे, तूच काढून." मुलाने सापाच्या डोक्यांतला मणी काढून घेतला.

नागाला एकदम गंधर्व रूप मिळाले. तो आकाशात उडत म्हणाला—"हा मणी तूच ठेवून घे!" असे सांगून तो गंधर्व लोकात निघून गेला.

काही दिवसांनी मुलगा म्हाताऱ्याच्या घरी पोचला व म्हणाला—"आजोबा! तुमच्या लिंबाच्या झाडाच्या मुळात पुष्कळसे सोने व चांदी आहे. ते तुम्ही काढून टाकलेत तर लिंबाला फळे लागतील. त्या साधूने तुमच्या प्रश्नाचे हेच उत्तर सांगितले आहे."

लगेच म्हातारा व त्याचा मुलगा दोघे कुदळ फावडे घेऊन झाडाच्या बुंधात खणू लागले आणि खरोखरच पुष्कळसे सोने व चांदी त्यांना सापडली. परंतु तो ठेवा ते दोघे बाहेर काढू शकले नाहीत. म्हणून त्या तरुण मुलाने त्यांना मदत केली. तेव्हां सर्व चांदी व सोने बाहेर निघाले.

म्हातारा त्या मुलाचे आभार मानून म्हणाला—"मुला, तुझे आभार मानावे तेवढे थोडे आहेत, बाबा! तुला जितके सोने व चांदी उचलून नेता येईल तेवढे उचलून घेऊन जा!"

जेवढे [illegible] उचलून [illegible] तेवढे सोने व थोडी चांदी उचलून घेऊन मुलगा काही दिवसांनी त्या म्हातारीकडे आला व तिला म्हणाला—"आजी! तो साधू म्हणाला—"तुझी मुलगी ज्याच्याशी लग्न करील त्याला पाहतांच त्याच्याशी बोलू लागेल."

तो तरुण मुलगा एवढे सांगून निघणार, तेवढ्यात म्हातारीची मुलगी बाहेर आली व म्हणाली—"आई! हे कोण?"

म्हातारी आपल्या मुलीला बोलतांना पाहून चकित होऊन म्हणाली—"मुला! तूच हिचा होणारा पति! हिच्याशी लग्न करून घे!"

त्या मुलीशी लग्न करून तो तरुण मुलगा घरी आला तेव्हां त्याच्या आईची तब्येत फारच बिघडली होती. मुलगा बरेच दिवस परत न आलेला पाहून म्हातारी रडत होती व त्यामुळे तिला दिसेनासे झाले. अगदी आंधळी झाली होती." मुलगा आई-जवळ जाऊन म्हणाला—"आई! मी तुला एक चांगली सुनबाई घेऊन आलो आहे."

म्हातारीने आपल्या सुनेला व मुलाला 'शतायुषी व्हा' असा गोड आशीर्वाद दिला.

"आणि आई! मी एक मणीपण घेऊन आलो आहे." असे सांगून त्याने तो मणी आईसमोर ठेवला.

"बाळ! तुझी वाट पाहून पाहून मी इतकी रडले की माझे डोळेच गेले." म्हातारी म्हणाली.

"अग आई! तुला दिसत असते तर मी आणलेले एवढे थोरले सोने व चांदीपण तुला दिसली असती! तुझी सुनबाई किती सुंदर आहे हेदेखील पाहतां आले असते." मुलगा म्हणाला.

मुलगा तेवढे वाक्य म्हणाला असेल तेवढ्यात त्याच्या आईला चांगले दिसूपण लागले. त्या मण्यात जी शक्ति होती तीमुळे आईला दिसू लागले.

त्या पुढे म्हातारी व तिचा मुलगा आणि सून यांचे पुढील आयुष्य सुखी झाले.



# परनिंदा कां?

एका गावी एक साधू आला. तो कोणाशी बोलत नसे. नेहमी मौन असे. कोणी काही खायला दिले तर खात नसे व उपाशी राही.

त्या गावी रामदास नावाचा एक मनुष्य राहात असे. साधूची ती त्यागवृत्ती पाहून रामदासच्या मनात त्याच्याविषयीं फार श्रद्धा उत्पन्न झाली. साधूला उपाशी राहू लागू नये म्हणून तो फळे, दुध किंवा इतर खायचे पदार्थ आणून देत असे आणि साधू मौनपणे खात असे.

त्याच गावी नीळकंठशास्त्री नावाचा एक विद्वान पंडित रहात असे. त्याची शिष्य-मंडळी पण मोठी होती. रामदासाची साधूविषयी श्रद्धाभक्ती पाहून शास्त्रीबुवांना हेवा वाटू लागला,–रामदास आपला शिष्य होऊन आपल्याला फळफळावळ कां आणून देत नाही?

शेवटी शास्त्रीबुवांना राहवले नाही. ते रामदासला म्हणाले–"अरे खुळ्या त्या वेड्यापिराच्या मागे काय लागला आहेस? त्याने वेदाभ्यास केला आहे की षड्शास्त्रे शिकला? तो निव्वळ मूर्ख आहे! तो लबाड असावा, अशी मला शंका आहे!"

"शास्त्रीबुवा! ते सर्व मला काही माहीत नाहीं. त्या साधूपुरुषाविषयीं मला जास्त काही माहीत नाही. पण एक गोष्ट मात्र खरी. मी त्याला कधीं दुसऱ्याची निंदा करतांना ऐकले नाही." असे सांगून रामदास निघून गेला.






पांडवांनी जयद्रथाचा पराभव करून त्याला सर्व गोष्टींची नीट जाणीव करून देऊन निरोप दिला.

काम्यकवनात एकदां पांडवांना भेटायला मार्कंडेय मुनी आले. युधिष्ठिराने प्रणाम करून त्यांना विचारले–"मुनिवर्य! द्रौपदीने ज्या तऱ्हेचे कष्ट सहन करून आपले पातिव्रत्य राखले आहे, तसे पूर्वी कोणी केल्याचे आपणांस माहीत असल्यास त्या साध्वी पतिव्रतेची कथा सांगण्याची कृपा करावी." तेव्हां मार्कंडेय मुनींनी सावित्रीची गोष्ट सांगितली.

फार पूर्वी मद्र देशात अश्वपती नावाचा राजा राज्य करीत असे. त्याला मूल बाळ नव्हते. म्हणून त्याने घोर तपश्चर्या करून सावित्री नामक देवीला प्रसन्न केले. देवीने दर्शन देऊन विचारले–"राजा! तू माझे स्मरण कशासाठी केले आहेस?"

तेव्हां अश्वपति म्हणाला–"देवी! माझा वंशवृक्ष पुढे चालू रहावा, अशी इच्छा आहे."

"राजा! ती इच्छा मला माहीत आहे. मी ब्रह्मदेवाजवळ तशी विनंती केली होती. परंतु ब्रह्मदेवाने तुला कन्यारत्न होईल असे, सांगितले आहे. म्हणून तुला तेवढ्याबरच मनाचे समाधान करून घेणे भाग आहे." असे सांगून देवी अंतर्धान पावली.

राजा अश्वपति आपल्या राजधानीस परतला आणि राज्यकारभार पाहू लागला. यथासमयी त्याची राणी मालवी गरोदर



होऊन तिला एका सुमुहूर्तावर कन्यारत्न झाले. राजाला फार आनंद झाला. सावित्री-च्या कृपेने मुलगी झाली होती म्हणून राजाने तिचे नाव सावित्रीच ठेवले.

सावित्री नवसाला पावलेली मुलगी होती. दिसायला पण फार सुंदर, म्हणून ती आईवडिलांची फार लाडकी होती.

सावित्री विवाह योग्य झाली तेव्हां तिचे आईवडील तिला म्हणाले–"मुली! तू राजकन्या आहेस. व विवाह योग्य झाली आहेस. कन्यादान करून पितृधर्म पाळला पाहिजे. पण आम्ही तुझ्या पतीची निवड करण्यापेक्षां तूच आपल्या पतीची निवड कर. त्याच्याशी तुझा विवाह करून देऊ."

सावित्री माता पित्यांच्या इच्छेप्रमाण वरशोधनार्थ रथात बसून निघाली. ती मुख्य करून राजर्षींच्या आश्रमातच गेली.

सावित्री वरशोधनार्थ निघून गेली आणि काही दिवसांनी अश्वपती राजाकडे नारद-मुनी आले आणि त्याच वेळी सावित्री आपली वरशोधन यात्रा संपवून परतली. तिने नारदमुनींस व वडिलांस नमस्कार केला आणि नम्रपणे एका बाजूला उभी राहली. तेव्हां नारदाने राजाला विचारले–"महाराज! आपली कन्या आतां कोठे जाऊन आली? ही तर आतां विवाहास योग्य झाली आहे!"

"मुनिवर्य, मी हिला स्वत: पतीची निवड करून यायलाच पाठविले होते. तिला आपल्या समक्षच तिने कोणाची निवड केली आहे, हे विचारतो." असे नारदमुनींना उत्तर देऊन अश्वपतीने आपल्या मुलीला विचारले–"मुली! ज्या कामासाठी म्हणून गेली होतीस ते पुरे झाले का?"

सावित्री वडिलांना म्हणाली–"बाबा! साल्वदेशाचा राजा द्युमत्सेन याला फार वार्धक्यकाळी एक मुलगा झाला आणि दुर्दैवाने राजाला पुत्रमुख पाहल्यानंतर अंधत्व आले. म्हणून शत्रूने राज्यावर स्वारी केली व राज्य बळकावले. म्हणून राजा व राणी आपल्या एकुलत्या एका



मुलाला घेऊन वनवास करीत आहेत. द्युमत्सेनाचा मुलगा लहानपणापासून वन-वास करीत असल्यामुळे मुनिकुमार झाला आहे. तो स्वभावाने कोमल व सत्यनिष्ठ आहे. सत्यवचनी असल्यामुळे त्याला सत्यवानच नाव प्राप्त झाले आहे. मी सत्यवानाला वरण करण्याचे ठरविले आहे."

ते ऐकून नारदमुनी म्हणाले–"सावित्रीने आज्ञानाने त्या मुलाचे वरण केले आहे."

तेव्हां अश्वपति राजाने नारदमुनींना विचारले–"मुनिवर्य! आपण त्रिकालज्ञानी आहां. आपण सत्यवाना संबंधी आपणांस जी माहिती असेल ती सांगण्याची कृपा करावी. त्याचे रूप, गुणशील सर्व!"

"राजा, द्युमत्सेनाचा मुलगा आपल्या बापासारखाच सत्यव्रती आहे. त्याला घोड्याची चित्रे उत्तम कांढता येतात म्हणून त्याला चित्राश्व पण म्हणतात. तो अश्विनी-कुमारांसारखा रूपवान आहे. तो सदाचरणी आहे, परंतु तो अल्पायु आहे. फक्त एकच वर्षाचे आयुष्य उरले आहे. आजपासून एका वर्षाने त्याचे आयुष्य संपुष्टात येईल." नारद म्हणाला.

ते ऐकून राजा अश्वपति फार दु:खी झाला व काळजीत पडला. मुलीला म्हणाला–"मुली, त्या अल्पायु मुलाशी



लग्नाचा हट्ट करू नकोस व दुसऱ्या एखाद्या तरुण मुलाशी लग्नाचा विचार कर."

सावित्री म्हणाली–"बाबा, मी एकदा एका पुरुषाला मनाने वरले आहे, तो मग अल्पायु असो की दीर्घायु, गुणवान असो की दुर्गुणी, चरित्रवान असो की दुश्चरित्र, मला कोणत्याही गोष्टीचा विचार करतां येणार नाही. सत्यवानाला सोडून इतर कोणाशीही मी लग्नास तयार नाही."

नारदमुनी पण अश्वपतीला म्हणाले–"राजा! तुझी मुलगी निश्चयी आहे व ही गोष्ट कौतुकास्पद आहे. तिचा विचार आतां बदलणे तुला किंवा इतर कोणालाही शक्य नाही. सत्यवानाशीच तू सावित्रीचा



विवाह करून दे. मुलीचे भाग्य असेल तर सत्यवानाला दीर्घायु प्राप्त होईल. तुम्हां सर्वांचे शुभ होवो!" असा आशीर्वाद देऊन नारदमुनी निघून गेले.

नारदमुनींच्या सांगण्याप्रमाणे अश्वपतीने सावित्रीचा विवाह सत्यवानाशींच करून देण्याचे ठरविले. सावित्रीला व आपल्या बंधुबांधवांना बरोबर घेऊन तो द्युमत्सेनाच्या आश्रमात आला.

वृद्ध द्युमत्सेन एका सालवृक्षाखाली बसला होता. अश्वपतीने त्याला नमस्कार केला व म्हणाला—"महाराज, माझी मुलगी सावित्री हिचा विवाह आपला मुलगा सत्यवान याच्याशी व्हावा या हेतूने विनंती करण्यास आपणाकडे आलो आहे. आपण माझ्या मुलीला आपली सुनबाई म्हणून स्वीकारावी."

द्युमत्सेन म्हणाला—"राजा, आपले राज्य घालवून मी येथे जंगलात निवास करीत आहे, आपली मुलगी आमच्या या दारिद्र्यावस्थेत सुखी होईल का?"

"महाराज, सुख व दुःख हे सर्व दैवाधीन आहे! ही गोष्ट माझ्या मुलीला चांगली माहीत आहे. आम्ही सर्व गोष्टींचा विचार करूनच आलो आहोत. माझी मुलगी व आपला मुलगा हे परस्परास योग्य असेच आहेत. म्हणून आपल्या दोन्ही घराण्यांचा संबंध जोडला जाणे इष्ट आहे." अश्वपती म्हणाला.

ते ऐकून द्युमत्सेनाला परमानंद झाला. आश्रमांतील इतर मुनींना बोलावून घेऊन त्याने सावित्रीसत्यवानांचा विवाह करून दिला. त्यानंतर अश्वपति आपल्या गावी परतला.

वडील निघून गेल्यावर सावित्रीने आपली मूल्यवान वस्त्रे बदलून तिच्या नव्या घराला शोभतील अशीच वस्त्रे परिधान केली. स्वतः घरातली सर्व कामे करू लागली. ती रात्रंदिवस सासूसासऱ्याच्या व पतीच्या सेवेस हजर राहू लागली.

पतीचे आयुष्य दररोज एकेक दिवस कमी होत असल्याचे सावित्रीला कळले होते. नारदमुनींनी सांगितल्याप्रमाणे एक वर्ष पुरे व्हायला फक्त चारच दिवस उरले. त्या दिवसापासून तिने तीन दिवस उपवास व्रत सुरू केले.

द्युमत्सेनाला ती गोष्ट कळली तेव्हां त्याने मुलीला समजावून सांगितले की मुली, तू लहान आहेस, तू असे कठीण व्रत घ्यायला नको होतेस. पण तू हे व्रत मोडावेस असे तरी मी कसे काय सांगू?"

सावित्री म्हणाली—"मनाचा निर्धार असेल तर किती कठीण काम असले तरी ते पूर्णपणे यशस्वी होते. मी मनाचा निश्चय करूनच हे व्रत घेतले आहे. तेव्हां आपण ही गोष्ट मनाला लावून घेऊ नये."

सावित्रीला तिच्या स्वतःच्या देहकष्टापेक्षां पतीच्या जवळ येत चाललेल्या मृत्यूची काळजी जास्तजास्त वाटू लागली. तीन रात्री अशाच काळजीत गेल्या. सत्यवानाच्या आयुष्यातला शेवटचा दिवस उजाडला.

त्या दिवशी सावित्रीने पहाटे उठून स्नान केले आणि आपले सासूसासरे व इतर थोर मंडळी सर्वांना नमस्कार करून यज्ञ आरंभिला. तिला सर्वांनी "सौभाग्यवती भव!" असा आशीर्वाद दिला. त्यानंतर ती आपल्या पतीच्या आसन्न मृत्यूविषयी विचार करीत बसली.



सासूसासरे तिला म्हणाले—"मुली! तुझे व्रत संपले आहे, आतां तू थोडे खाऊन कां घेत नाहीस?"

"या व्रताप्रमाणे सूर्यास्तानंतरच जेवायला अनुमति आहे." सावित्री म्हणाली.

सत्यवान नित्याप्रमाणे समिधा, कंदमुळेफळे आणण्यासाठी खांद्यावर कुऱ्हाड टाकून रानात निघाला. तेव्हां सावित्रीने बरोबर येण्यास त्याची परवानगी मागितली. म्हणाली—"आज मी आपणांस एकटयाने कोठे जाऊ देणार नाही. मी बरोबर येते."

"अग, पण जंगल म्हणजे तुला राजोद्यान वाटले का? वाटेत काटे व झाडेझुडपे असतात व रानटी श्वापदे पण असतात.



याशिवाय तू तीन दिवस उपास करुन दमली आहेस." सत्यवान तिची समजूत घालू लागला.

"मला उपासाचा मुळीच त्रास झाला नाही. आज रानात हिंडावेसे मला वाटत आहे. म्हणून आपण नाहीं म्हणू नये." सावित्री म्हणाली.

"तुझी इच्छा! माझ्या आईवडिलांनी परवानगी दिली तर तू बरोबर चल. नंतर ते मला विचारतील म्हणून सांगतो." सत्यवान म्हणाला.

सावित्रीने त्याप्रमाणे सासूसासऱ्यांची परवानगी विचारली. म्हणाली–"मला या घरी येऊन बरोबर एक वर्ष झाले आहे. परंतु कधी मी जंगल कसे असते, हे पाहिले नाही. आज मला पतीबरोबर जाण्याची परवानगी द्यावी." सावित्रीने त्यापूर्वी आपल्या सासूसासऱ्यांजवळ काही एक मागितले नव्हते. म्हणून त्यांनी नकार दिला नाही.

सासूसासऱ्यांच्या अनुमतीने सावित्री पतीबरोबर निघाली. मनातली खरी व्यथा तिने कोणाला सांगितली नाही आणि पती-बरोबर जंगलात जावयास मिळाल्याबद्दल उघडपणे आनंद व्यक्त करून ती निघाली. सत्यवान जंगलातली दृश्ये दाखवीत पुढे जात होता. परंतु सावित्रीला वाटत होते की पती स्वर्गाच्या वाटेवरच चालत आहे.

सत्यवानाने फुले व फळे गोळा केली आणि लाकडे तोडू लागला. थोड्या वेळाने त्याला दम लागला. तो घामाघूम झाला. त्याने कुऱ्हाड दूर फेकून दिली आणि जवळ जाऊन सावित्रीला म्हणाला–"माझे डोके दुःखू लागले आहे. सर्व अंग थरथर कापत आहे. थोडा वेळ विश्रांती घ्यावी म्हणतो."

सावित्रीने सत्यवानाचे डोके मांडीवर ठेवून घेऊन त्याला स्वस्थ पडून रहायला सांगितले. त्याप्रमाणे सत्यवान पडून राहिल्या-वर थोड्या वेळाने सावित्रीला समोर एक विचित्र आकृति दिसली. तो कोणी काळा कभिन्न मनुष्य होता. डोळे लालभडक गरगर करीत होते. त्याच्या अंगावर निळ्या रंगाचे वस्त्र होते आणि हातात दोरी होती. त्याचे सर्व रूपच भयंकर होते.



त्याला पाहतांच सावित्रीने सत्यवानाचे डोके मांडीवरून हळूच खाली ठेवले आणि उभी राहून हात जोडून तिने विचारले–"आपण कोण? काय पाहिजे आपल्याला?"

"मुली! मी काळ आहे, यमराज आहे. तू पतिव्रता आहेस. म्हणून तू मला पाहू शकलीस. सत्यवानाची आयुर्मर्यादा संपली आहे. तो मोठा धर्मभीरु आहे. म्हणून मी स्वतः त्याला न्यायला आलो आहे. मी आपले दूत नाही पाठविले." असे सांगून यमाने आपला पाश टाकला व सत्यवानाच्या देहातील प्राण काढून घेऊन दक्षिणेकडे निघाला.

सावित्रीने पतिदेह सुरक्षितपणे झाकून ठेवला आणि यमाच्या पाठीमागून जाऊ लागली. यमाने तिला परत फिरण्यास सांगितले. परंतु सावित्री त्याला म्हणाली–"जिकडे पति जाईल तिकडे पत्नी जाणार हाच पतिव्रता धर्म आहे."

यम ते उत्तर ऐकून खूप झाला. म्हणाला–"तू आपल्या पतीच्या प्राणांव्यतिरिक्त काय वाटेल ते मागून घे!"

"माझे सासू व सासरे वृद्ध आहेत. त्यांना दृष्टि व शक्ति देण्याची कृपा करावी." सावित्रीने विनंती केली. यमाने ते





मान्य केले. तरी सावित्री यमाच्या पाठोपाठ जात राहिली. तिला परत फिरविण्याच्या हेतूने यमाने तिला आणखी एक वर मागून घ्यायला सांगितले. या खेपेस सावित्रीने तिच्या सासऱ्याला त्याचे राज्य परत मिळावे असा वर मागितला. यम 'तथास्तु' म्हणाला आणि पुढे जाऊ लागला.

तिच्या इच्छेप्रमाणे दुसरा वर दिला तरीदेखील सावित्रीला पाठीमागून येत असलेली पाहून यमाने आणखी एकवर मागून घ्यायला सांगितले. सावित्रीने तिच्या वडिलांना पुत्रप्राप्ति व्हावी असा वर मागितला. यमाने 'त्याला शंभर पुत्र होतील' असा वर दिला.

यावेळी देखील सावित्री परत न फिरलेली पाहून यमाने चवथा वर मागायला सांगितले. सावित्रीने तिला शंभर पुत्रप्राप्ति होण्याचा वर मागितला.

यमाने तो वर देखील दिला आणि म्हणाला–"आतां तरी परत जा!"

तेव्हां सावित्री म्हणाली–"आतां तरी मला माझ्या पतिचे पंचप्राण परत करावे."

सावित्रीने शंभर पुत्र प्राप्तीचा वर मागितला होता व यमाने तो दिला होता. तेव्हां पतीशिवाय तिला पुत्रप्राप्ती कशी होईल असा विचार करून यमाने हार मानून सत्यवानाचे पंचप्राण परत केले. सावित्री परत आली व आपल्या पतीचे डोके आपल्या मांडीवर घेऊन बसली. थोड्या वेळाने सत्यवान डोळे उघडून म्हणाला–"किती वेळ झाला? मी निश्चित पणे झोपलो होता. मला स्वप्नात एक काळाकभिन्न मनुष्य दूर कोठे तरी घेऊन गेला होता."

"ते सर्व मी आपणांला नंतर सांगेन. काळोख पडू लागला आहे. आपण प्रथम [illegible] म्हणाली.

सत्यवानाला घेऊन सावित्री परत आली. तिकडे द्युमत्सेनाला दृष्टी प्राप्त झाली होती. काळोखातून मुलगा व सुनबाई परत येत असलेले त्याला दिसले. तो पत्नीला घेऊन सत्यवान व सावित्री दोघांना हाक मारीत रानात शिरला.

इतक्यात सावित्रीसत्यवान परत आले. तोंपर्यंत आश्रमात पुष्कळ लोक जमले होते. सावित्रीने सर्वांना घडलेली गोष्ट सांगितली.

यमाने दिलेले वर व्यर्थ नव्हते. द्युमत्सेनाला त्याचे राज्य परत मिळाले. अश्वपतीला शंभर मुलगे झाले व सावित्री सत्यवानांना शंभर पुत्र झाले.

येथवर गोष्ट सांगून मार्कंडेय मुनी पांडवांस म्हणाले–"अशाच तऱ्हेने द्रौपदीच्या पातिव्रत्यामुळे तुमचा हा संकटकाळ पण यथावेळी टळेल." त्यानंतर मार्कंडेय मुनी आपल्या आश्रमात निघून गेले.





# शिवपुराण

[ १३ ]

कुमारस्वामीने तारकासुराबरोबरच अनेक राक्षसांचा वध केला आणि काही काळ स्वर्गातच राहिला. नंतर पार्वती-परमेश्वरांची सेवा करावी, असे त्याला वाटले. म्हणून तो तेथून कैलास लोकी येऊन राहू लागला.

एकदा त्याच्या भेटीला नारद आला. कुमारस्वामीने नारदाचा विधिवत सत्कार करून विचारले–"मुनीश्वर! आपण त्रिभुवनाची यात्रा करून आला आहां. काही विशेष असेल तर सांगण्याची कृपा करावी."

"तुझ्या कृपेने त्रिभुवनात शांतता नांदत आहे. तू राक्षसांचा संहार केलास, म्हणून यज्ञकार्यात आता कोणी विघ्न घालीत नाही. पण एक गोष्ट माझ्या नजरेसमोर आली ती सांगावी म्हणतो. येथून जवळच भिल्लपूर नावाचे भिल्लांचे एक गाव आहे. तेथे पुलिंद नावाचा एक भिल्ल राजा राज्य करीत आहे. तो शंकराचा भक्त आहे. त्याला बरेच दिवस मूलबाळ झाले नाहीं. परंतु त्याला जंगलात एका जागी लहान तान्ही मुलगी दिसली. तिलाच त्याने स्वतःची मुलगी म्हणून वाढविले. पुलिंदाच्या बायकोने त्या मुलीचे सर्व लाड पुरविले. त्यांनी तिचे नाव वल्ली असे ठेविले. ती आता मोठी झाली आहे. तिचे रूप वर्णन आता मी काय करू? सहज बोलत असताना ब्रह्मदेव तुझा संदर्भ आला तेव्हां म्हणाला की वल्लीच तुझी होणारी बायको आहे. म्हणून माझ्या मते, तू तिच्याशी विवाह करून घ्यावास!" नारदाने कुमारस्वामीला सुचविले.

चवथ्या मलपृष्ठावरील गोष्ट



त्यानंतर नारद भिल्ल राजा मिलिंद याच्याकडे गेला. पुलिंदने आदरपूर्वक नारदाची पाद्यपूजा करून बसायला आसन दिले आणि विचारले–"आपण वल्लीला पाहिलेच आहे. आतां तिला योग्य वर तुम्हीच सुचवावा."

"अरे, तुझ्या मुलीला योग्य वर म्हणशील तर शिवपुत्र कुमारस्वामी आहे. त्याच्याशी विवाह व्हावा म्हणूनच वल्ली जन्मली आहे, असे समज. सुदैवाने कुमारस्वामी याच बाजूला वनविहारास येणार आहे आणि त्याने वल्लीला पाहिले तर नक्कीच तिच्याशी विवाहास तयार होईल. त्याच्यासारखा तुला जावई मिळाला तर आणखी काय पाहिजे?" असे सांगून नारद निघून गेला.

नारदाच्या तोंडून वल्लीचे सौंदर्य वर्णन ऐकल्यापासून कुमारस्वामीच्या मनात तिला पाहण्याची व तिच्याशी विवाह करण्याची इच्छा उत्पन्न झाली. भिल्ल राजा तिचा विवाह आपल्याशी करून द्यायला तयार होईल का नाही, अशी एक शंकापण त्याच्या मनात आली. तरी एकदां त्या मुलीला पाहून तर घ्यावे असे त्याने ठरविले. म्हणून तो आपल्या अनुयायांबरोबर भिल्लपूर नजीकच्या जंगलात वनविहारासाठी निघाला.

कुमारस्वामीच्या मनात वल्लीला पाहण्याची उत्सुकता वाढली तशी अर्थातच वल्लीच्या मनातपण नारदाने सांगितल्यानंतर उत्सुकता वाढली. ती आपल्या सखींबरोबर वनविहारास निघाली. आपल्यासारख्या भिल्लाच्या मुलीशी कुमारस्वामी विवाह कसा काय करील, अशी शंका वल्लीच्या मनातपण येऊन गेली. याशिवाय दुसरी शंका होती की तिच्या भिल्ल आईवडिलांनी तिचे फक्त पालन पोषण केले होते. खरे आईवडील कोण होते ते त्या परमेश्वरालाच माहीत. म्हणून कुळगोत्र नसलेल्या मुलीशी कुमारस्वामी लग्नाला तयारच झाला नाही तर! तसे झाले तर देहत्याग करण्याचे तिने ठरविले.



ती आपल्या सखींबरोबर एका आंब्याच्या झाडाखाली बसून होती. त्याच वेळी कुमारस्वामी आपल्या अनुयायांबरोबर दुसऱ्या एका झाडाखाली येऊन बसला.

वल्लीची एक सखी कुमारस्वामीजवळ आली व तिने विचारले–"आपण कोण, कोठून आलात? आपणांस कदाचित माहीत नसेल, हे वन भिल्लराजाची कन्या वल्लीचे विहार उद्यान आहे. यात पुरुषांना प्रवेश वर्ज्य आहे!"

ते ऐकून कुमारस्वामीने आनंदाने विचारले–"असे का? माझे नाव कुमारस्वामी! माझ्या आईवडिलांचे नाव पार्वती परमेश्वर! आम्ही कैलास पर्वतावर राहतो. तू वल्लीविषयी तुला बोलायाचे किंवा सांगावयाचे असल्यास खुशाल सांग."

"राजा पुलिंद हा भिल्लांचा राजा आहे. भिल्लपूरला त्याची राजधानी आहे. तो शिवभक्त आहे. याच जंगलात वल्ली आमच्या महाराजांना सांपडली व महाराणीने तिला स्वतःच्या मुलीसारखे प्रेमाने वाढवले." वल्लीची सखी म्हणाली.

"तुझ्या सखीचा विवाह झाला आहे का?" कुमारस्वामीने विचारले.

"लग्न ठरले आहे, व्हायचे उरले आहे." सखी म्हणाली.



कुमारस्वामीने जास्त उत्सुकतेने विचारले–"कोठे, वर कोण?"

"कालच आमच्या महाराजांकडे नारदमुनी आले होते. त्यांनी शिवपुत्र कुमारस्वामीशी वल्लीचा विवाह होईल असे सांगितले आहे. तेव्हांपासून आमची सखी कुमारस्वामींच्या दर्शनासाठी आतुर झाली आहे. एकेक क्षण तिला युगासारखा वाटत आहे. तिच्या मनाला विरंगुळा व्हावा म्हणून आम्ही सखी तिला वनविहारास घेऊन आलो. ती समोर आंब्याच्या झाडाखाली बसली आहे. आपण येथेच बसावे, मी तिला बोलावून घेऊन येते." असे सांगून ती सखी निघून गेली आणि थोड्या









वेळाने वल्लीला तिचा हात धरून बोलावून घेऊन आली.

वल्लीला पाहतांच कुमारस्वामी वल्लीला तिचा हात धरून म्हणाला–"वल्ली! चल आपण विवाह् करून घेऊ."

"माझ्याशी विवाह् करावयाचा असेल तर त्यापूर्वी माझ्या मातापित्यांची अनुमती घ्यावी लागेल. आपण येथेच थांबावे, मी त्यांची अनुमती विचारून येते." असे सांगून वल्ली कुमारस्वामीचा निरोप घेऊन आपल्या सखींबरोबर घरी आली.

वल्लीकडून सर्व वर्तमान ऐकून पुलिंद आपल्या अनुयायांसह् कुमास्वामीच्या दर्शनास आला व म्हणाला–"उजाडतांच चांगला मुहूर्त आहे!"

नंतर कुमारस्वामीला, त्याच्या अनुयायांसह् आदरपूर्वक बोलावून घेऊन एका जागी त्यांची उतरण्याची व्यवस्था केली. शुभवार्ता ऐकून शिवपार्वतीदेखील आले. यथासमयी कुमारस्वामी व वल्लीचा विवाह् संपन्न झाला आणि शिवपार्वती

परतले.

आणखी काही काळ लोटल्यावर शोणितपुर येथे गजासुराचा जन्म झाला. त्याने ब्रह्मदेवाचे स्मरण करून घोर तपश्चर्या केली व अनेक वर प्राप्त केले. त्रिलोक जिंकून तो आपली सत्ता गाजवू लागला. शिवभक्त गजासुराच्या कारकीर्दीत प्रजा फार सुखी होती. प्रजेला कोणताही कष्ट किंवा त्रास नव्हता.

एकदा नारद गजासुराकडे गेला व म्हणाला–"अरे गजासुरा! तू एवढा मोठा शिवभक्त! तू, शंकराने सर्वदा तुझ्या हृदयात वसावे, असा वर त्याच्याकडून कां मागून घेत नाहीस?" गजासुराला पण ती सूचना मान्य झाली. त्याने शंकराची आराधना करून त्याला प्रसन्न केले आणि त्याने सर्वदा हृदयात वसावे अशी विनंती केली. शंकर 'तथास्तु' म्हणून लिंगरूपे गजासुराच्या हृदयात वास करू लागला. गजासुर शंकराची मानस पूजा करू लागला.





# १२३. स्वयंभूनाथ मंदिर, नेपाल

नेपाळची राजधानी काटमांडू येथे हा एक बौद्ध चैत्य आहे. येथे स्वयंभूनाथ नामक एका सिद्धपुरुषाच्या अस्थी ठेवलेल्या आहेत. त्याच्या छत्रावर सोन्याचे पाणी चढविलेले आहे.





# अमरवाणी

अतिथि, बालिकश्चैव, स्त्रीजनो, नृपति स्तथा
ए ते वित्तं न जानंति, जामाता चैव पंचमः ॥ १ ॥

[पाहुणा, मूल, स्त्री, राजा आणि जांवई या पांच जणांस पैशाची किंमत वाटत नाही.]

राजा राष्ट्रकृतं पापं,
राजपापं पुरोहितः,
भर्ता च स्त्रीकृतं पापं,
शिष्यपापं गुरु र्भवेत् । ॥ २ ॥

[राष्ट्राचे पाप राजाचे असते, राजा जे पाप करतो ते पुरोहिताचे असते ; बायको जे पाप करते ते नवऱ्याचे असते आणि शिष्य जे पाप करतो ते गुरूचे असते.]

वृश्चिकस्य विषं पुच्छं,
मक्षिकस्य विषं शिरः,
तक्षकस्य विषं दंष्ट्रा,
सर्वांगं दुर्जने विषं । ॥ ३ ॥

[विंचवाच्या शेपटीत विष असते तर ते माशीच्या डोक्यात असते आणि सापाच्या दातात. परंतु तेच विष दुर्जनाच्या सर्व अंगात, रोमारोमात असते.]

सावधगिरीच्या सूचना



# भोपळ्या चोर

एका गावी एक भाजीचा व्यापारी होता. तो शेतकऱ्यांकडून भोपळे विकत घेऊन दूरदूरच्या बाजार पेठात नेऊन विकत असे. हाच त्याचा मुख्य व्यापार होता.

एकदा तो एका बैलगाडीत भोपळे भरून दूरच्या एका बाजारपेठेत विकायला निघाला. वाटेत उदयगिरी नावाच्या गावानजिक संध्याकाळ झाली आणि काळोख पडू लागला. तेव्हां त्याने त्या गावात रात्र काढायचे मनाशी ठरविले.

गावात गाडी येताच रस्त्यालगतच्या एका घरासमोर भद्रसेन नावाचा एक मनुष्य उभा होता. त्याने व्यापाऱ्याला विचारले— "कोठून आलात हो? या गावचे तुम्ही दिसत नाही, म्हणून विचारतो. काय नाव तुमचे?"

व्यापाऱ्याने आपली ओळख दिली आणि रात्रभर गावात उतरायला कोठेतरी सोईची धर्मशाळेत किंवा आणखी कोठे थोडी जागा मिळेल का, विचारले.

भद्रसेन म्हणाला—"अहो एवढ्याशा कामासाठी इतके विचारता काय? रात्रभर खुशाल रहा आमच्या घरी. सकाळी उठून जा पुढे!"

त्यानंतर भद्रसेनने गाडीचे बैल सोडले, त्यांच्यासमोर गवत टाकले व घराच्या पडवीत भोपळे रचून ठेवले. व्यापाऱ्यासाठी जेवणाची उत्तम व्यवस्था करून दिली आणि एका खोलीत त्याला अंथरूण घालून झोपायला सांगितले.

व्यापाऱ्याने भद्रसेनाच्या औदार्याची स्तुती केली. दमून गेला होता म्हणून अंथरुणावर आडवा झाल्याबरोबर त्याला झोप लागली.

दुसऱ्या दिवशी उजाडताच व्यापाऱ्याने भद्रसेनाचे आभार मानले आणि गाडीत भोपळे भरण्यासाठी भोपळ्यांच्या ढिगा-

श्री ना. आ. सुर्वे



जवळ गेला. त्यातले दोनतीन भोपळे भद्रसेनाला द्यावे असेदेखील त्याच्या मनात होते. परंतु भोपळ्याच्या ढिगाजवळ जाऊन पाहिले तेव्हां त्याला अर्धेच भोपळे दिसले. भद्रसेनानेच भोपळे चोरले असावेत असा त्याला संशय आला. म्हणून तो भद्रसेनाला म्हणाला–"तुम्ही माझे अर्धे भोपळे उडवलेले दिसत आहेत!"

भद्रसेन चोरीचा आळ लावल्याबद्दल रागावून म्हणाला–"डोके ठिकाणावर आहे का? मी केलेल्या उपकाराची फेड अशी करतो आहेस का? रात्री राहायची खाण्या-पिण्याची व्यवस्था केली हे माझेच चुकले म्हणायचे?"

"हे पहा, मला या गप्पा नको आहेत. निमूटपणे माझे भोपळे परत दे, नाहीतर..." व्यापारी म्हणाला.

"तू पहिल्याने घराबाहेर हो, नाहीतर मी नोकराकडून धक्के देऊन बाहेर काढवीन." भद्रसेन म्हणाला.

व्यापाऱ्याने भद्रसेनाशी बोलणे व्यर्थ आहे, असा विचार करून उरलेले भोपळे गाडीत भरले आणि सरळ न्यायाधिशाकडे जाऊन भोपळे चोरीला गेल्याची व भद्र-सेनावर संशय असल्याची तक्रार केली. न्यायाधीश म्हणाला–"भद्रसेनानेच चोरी केली असेल तर त्याची चोरी बाहेर काढणे तितकेसे कठीण नाही." असे सांगून भद्र-सेनाला बोलावून आणायला न्यायाधिशाने व्यापाऱ्यालाच सांगितले.

भद्रसेन न्यायाधिशाने विचारल्यावर म्हणाला–"न्यायमूर्ती! माझ्यावर हा खोटा आरोप करतो आहे. मी याला आपल्या घरी उतरायला सांगितले हीच माझी चूक झाली. म्हणून भोपळ्यांच्या चोरीचा आरोप करायला हा धजला. मला याच्या भोपळ्यांची चोरी करण्याची गरजच काय? माझ्या परसात पुष्कळ भोपळे लागतात."

"तू म्हणतोस ते खरे असू शकेल. पण ते साबीत करून दाखविले पाहिजेस. तेव्हां तू आपल्या परसातला एक भोपळा आणून दाखव." न्यायाधीश म्हणाला.

भद्रसेन भोपळा आणायला गेला. तो परत येण्यापूर्वी न्यायाधिशाने एका माण-साला व वैद्याला बोलावून काय करायचे ते दोघांना समजावून सांगून ठेवले.

भद्रसेन थोड्या वेळाने एक भोपळा घेऊन आला. व्यापाऱ्याच्या गाडीतला एक भोपळा काढून न्यायाधिशाने त्या माणसाला विचारले–"पहा रे, हे दोन्ही भोपळे एकाच जातीचे आहेत की निरनिराळ्या जातीचे?"

"ते खाल्ल्याशिवाय नाही कळायचे मालक!" तो मनुष्य म्हणाला आणि एक चाकू घेऊन भद्रसेनने आणलेल्या भोपळ्याचा एक तुकडा काढून तोंडात टाकला आणि क्षणार्धात पोट धरून मोठ्याने ओरडत जमिनीवर लोळू लागला. वैद्याने त्याला तपासून विषबाधा झाली असल्याचे सांगितले. त्याने तोच भोपळा लक्षपूर्वक पाहिला आणि म्हणाला–"भोपळाच विषारी दिसतो आहे. जो खाईल तो नक्कीच मरेल."

न्यायाधीश भद्रसेनाला म्हणाला–"काय रे बुवा! तू हे विषारी बियाणे कोठून आणलेस? हे खाऊन गावकरी मरतील त्याची काय वाट? याबद्दल तुला मी कोणता दंड देऊ, तूच सांग."

"न्यायमूर्ती! हा भोपळा माझ्या पर-सातला नाही हो! ह्याचे भोपळे विषारी आहेत हे माहीत असते तर मी ह्यांना हातच लावला नसता. हे सर्व याच लबाडाचे आहेत. यानेच आपल्या गाव-कऱ्यांना लुबाडण्यासाठी हा घाट घातला होता. यालाच दंड करावा." अशातऱ्हेने भद्रसेनाने नकळत आपली चोरी कबूल केली.

"म्हणजे तू चोरी केलीस, हे स्वतःच कबूल करीत आहेस! सर्व भोपळे त्याचे त्याला परत दे आणि चोरी केल्याबद्दल दंडाचे शंभर रुपये संध्याकाळच्या आत सरकारी खजिन्यात जमा कर."

व्यापारी न्यायाधिशाचे आभार मानून आपल्या वाटेने निघून गेला.





जवळ गेला. त्यातले दोनतीन भोपळे भद्रसेनाला द्यावे असेदेखील त्याच्या मनात होते. परंतु भोपळ्याच्या ढिगाजवळ जाऊन पाहिले तेव्हां त्याला अर्धेच भोपळे दिसले. भद्रसेनानेच भोपळे चोरले असावेत असा त्याला संशय आला. म्हणून तो भद्रसेनाला म्हणाला–"तुम्ही माझे अर्धे भोपळे उडवलेले दिसत आहेत!"

भद्रसेन चोरीचा आळ लावल्याबद्दल रागावून म्हणाला–"डोके ठिकाणावर आहे का? मी केलेल्या उपकाराची फेड अशी करतो आहेस का? रात्री राहायची खाण्यापिण्याची व्यवस्था केली हे माझेच चुकले म्हणायचे?"

"हे पहा, मला या [illegible] नको आहेत. निमूटपणे माझे भोपळे परत दे, नाहीतर..." व्यापारी म्हणाला.

"तू पहिल्याने घराबाहेर हो, नाहीतर मी नोकराकडून धक्के देऊन बाहेर काढवीन." भद्रसेन म्हणाला.

व्यापाऱ्याने भद्रसेनाशी बोलणे व्यर्थ आहे, असा विचार करून उरलेले भोपळे गाडीत भरले आणि सरळ न्यायाधिशाकडे जाऊन भोपळे चोरीला गेल्याची व भद्रसेनावर संशय असल्याची तक्रार केली. न्यायाधीश म्हणाला–"भद्रसेनानेच चोरी केली असेल तर त्याची चोरी बाहेर काढणे तितकेसे कठीण नाही." असे सांगून भद्रसेनाला बोलावून आणायला न्यायाधिशाने व्यापाऱ्यालाच सांगितले.

भद्रसेन न्यायाधिशाने विचारल्यावर म्हणाला–"न्यायमूर्ती! माझ्यावर हा खोटा आरोप करतो आहे. मी याला आपल्या घरी उतरायला सांगितले हीच माझी चूक झाली. म्हणून भोपळ्यांच्या चोरीचा आरोप करायला हा धजला. मला याच्या भोपळ्यांची चोरी करण्याची गरजच काय? माझ्या परसात पुष्कळ भोपळे लागतात."

"तू म्हणतोस ते खरे असू शकेल. पण ते साबीत करून दाखविले पाहिजेस. तेव्हां



करीत चालली आहे. आता तर ती माझ्याशी लग्नाला मुळीच तयार होणार नाही. परंतु तिचे मन पालटवून तिला सामान्य स्त्री करण्याचा प्रयत्न करावयाचा, असा त्याने मनाशी पक्का विचार केला. म्हणून तो सीमंतिनीवर दुरूनच नजर ठेवी व ती काय करते, कोठे कोठे फिरते या गोष्टीवर नजर ठेवू लागला.

दिवसांमागून दिवस व महिन्यांमागून महिने लोटले. सीमंतिनीचे मन पालटवण्याची इच्छा गणदेवच्या मनात वाढत गेली. शेवटी त्याने पिंगला नावाच्या एका मांत्रिक बाईची मदत घेतली.

पिंगलाला अत्यद्भुत मंत्रशक्ती प्राप्त होत्या. याशिवाय तिला अनेक वनस्पती औषधांची पण चांगली माहिती होती. तिने गणदेवला काय हवे आहे त्याची विचारपूस करून घेऊन विचारले–"सीमंतिनीला कापालिनी व्हायचे आहे तर आपण त्यात कां विघ्न आणायचे?"

"मला ते आवडत नाही. म्हणून तू पाहिजे ते इनाम मागून घे, मी द्यायला तयार आहे. पण तिला एक सामान्य स्त्री करणे तुला शक्य असेल तर कर. अशा हुशार व सुंदर तरुणीला कापालिनीचे जीवन व्यतीत करून आयुष्य घालविणे बरोबर नाही." गणदेव म्हणाला.



"कापालिनीच्या जीवनात आनंद नाही असे का वाटते तुला?" पिंगलाने विचारले.

"आनंद मिळत असेल, पण सुख मिळतच असेल, असे नाही मला वाटत." गणदेव म्हणाला.

"तुझी गृहिणी झाली तर ती नक्कीच सुखी होईल, एवढे मात्र खरे!" पिंगला म्हणाली.

"म्हणून माझ्याशी विवाह करून गृहसौख्य भोगण्यास तिच्या मनाची तयारी करून दे." गणदेव म्हणाला.

"मी करते मदत माझ्याकडून होईल तितकी, तू पुढल्या अमावास्येला शिकारी कुत्री बरोबर घेऊन जंगलात जा. एक

पांढरे हरण दिसेल ते, त्याच्या जिवाला काही अपाय झाल्याशिवाय धरून आपल्या घरात आणून ठेव. बाकी काय करायचे ते मी पाहून घेईन." पिंगला म्हणाली.

पिंगला गणदेवला आपल्या बागेतून बाहेर जाईपर्यंत पोंचवायला गेली. परत येत असतांना ती डाव्या पायाने थोडी लंगडत असलेली दिसली.

पिंगलाने सांगितल्याप्रमाणे गणदेव अमावास्येच्या दिवशी शिकारी कुत्री घेऊन जंगलात आला. त्याला एका जागी एक पांढरे हरण दिसले. त्याला धरायला गणदेवने आपली शिकारी कुत्री सोडली. हरण जोराने पळू लागले.

थोड्या वेळाने त्याला एकच कुत्रे पुढे धावत असलेले व बाकी सर्व कुत्री मागे पडलेली दिसली. परंतु हरणाजवळ पोचलेले कुत्रे त्याचे नव्हते, हे त्याने ओळखले. ते कुत्रे लंगडत होते. त्या कुत्र्याने थोड्याच वेळात हरणाचा मागचा पाय धरला. गणदेवने घोड्यावरून येऊन हरणाच्या गळ्यात फास टाकला. हरणाने स्वतःची सोडवणूक करून घेण्याचा प्रयत्न केला नाही आणि ओढाताण केल्याशिवाय गणदेव बरोबर चालू लागले. हरणाला धरणारे कुत्रे कोठे गेले या गोष्टीकडे गणदेवाचे लक्ष गेले नाही.

गणदेवने हरणाला एका खोलीत बंद करून ठेवले आणि दुसऱ्या खोलीत जाऊन झोपला. सकाळी त्याची झोप मोडली तेव्हां त्याला सर्व जमीन पालथी होणार की काय असे वाटू लागले. बाहेर तुफान तरी सुरू झाले आहे किंवा भूकंप होणार आहे. परंतु तसे काहीच नव्हते. तोंपर्यंत सीमंतिनीने ज्या भुतां पिशाच्च्यांना वश करून घेतले होते ती सर्व तिला सोडून निघून गेली.

गणदेवने सीमंतिनी होती त्या खोलीचे दार उघडून पाहिले, आत सीमंतिनी होती. तिने गणदेवशी विवाह करण्यास मान्य केले. त्यानंतर दोघं विवाहबद्ध होऊन सुखी झाली.





# शिलारथ

[ १८ ]

[राजोद्यानाकडे जाणाऱ्या वाटेवर विघ्नेश्वर पुजाऱ्याच्या राक्षसी हत्तीवर तेल टाकून जीवदत्तने त्याला आग लावली. पुजाऱ्याचे रानटी अनुयायी घाबरून गेले. त्यांची कत्तल करायला नित्यानंदाने आपल्या सैनिकांना प्रोत्साहित केले. रानटी तरुणांपैकी एकाने पुढे येऊन तो रानटी लोकांचा नायक असल्याचे जीवदत्तला सांगितले. पुढे...]

जीवदत्तने त्या जंगली जातीच्या तरुणाकडे जरा खोल दृष्टीने पाहिले. त्याची उभे राहण्याची ढब व तेजस्वी डोळे पाहून जीवदत्तला तो हुशार व कर्तबगार तरुण असावा याची खात्री पटली.

"ठीक, तरमग तू जरूर पडल्यास नित्यानंद राजाच्या सैनिकांशी दोन हात करायला आपल्या साथीमित्रांना तयार ठेव. पण एका गोष्टीची सावधगिरी बाळग. तुम्ही स्वत: आगळीक काढू नका." जीवदत्त त्याला म्हणाला. नंतर त्याने विघ्नेश्वर पुजारी व स्वर्णाचारी दोघांना जवळ बोलावून घेतले व म्हणाला–"तुम्ही दोघे आमच्या बरोबरच रहा, नाही तर तुम्हांलाच पहिल्याने बळी जावे लागेल, समजले!"

"तिकडे नित्यानंद राजा आणि इकडे हे रानटी लोक आम्हांला ठार करायला उभे आहेत. आतां आमचा बचाव कसा



व्हायचा?" विघ्नेश्वर पुजारी जवळजवळ रडतच म्हणाला.

"जोंपर्यंत तुम्ही दोघे आमच्या बरोबर आहां तोंपर्यंत रानटी लोकांकडून तुमच्या जिवाला धोका नाही. राजाला आम्ही पाहून घेऊ." जीवदत्तने त्याला धीर दिला.

त्याच वेळी राजा नित्यानंद जीवदत्त व खड्गवर्माला संबोधन करून म्हणाला– "वीर हो! तुम्ही त्या रानटी लोकांना शस्त्रे खाली ठेवायला सांगा. कमीत कमी तुम्ही बाजूला व्हा. त्यांच्याकडून ते काम आमचे सैनिक करून घेतील."

"महाराज! या रानटी लोकांनी शस्त्रे खाली ठेवली की तुम्ही त्यांची कत्तल कर‌ार, हे आम्ही ओळखले आहे. पण ते आम्ही होऊ देणार नाही. तुम्ही पाहिजे तर नगराबाहेर आपले सैन्य पाठवा जंगली लोक तेथे जातील. मग होऊं द्या दोन्ही सैन्यांची शक्तिपरीक्षा. आम्ही प्रेक्षक म्हणून बाजूला उभे राहून गंमत पाहू!" जीवदत्त म्हणाला.

"माझ्या राजधानीत मलाच दमदाटी देण्याची तुझी हिंमत अजब दिसते आहे!" राजा नित्यानंद एवढेच म्हणाला, इतक्यात खड्गवर्मा तलवार उपसून म्हणाला–"तुझ्या या गप्पा ऐकायला आम्ही येथे आलो नाही. तुझ्या राज्याचे व प्रजेचे रक्षण करायला आम्ही आलो होतो. आतां आम्ही सांगू तीच पूर्व दिशा!" नंतर रानटी तरुणांकडे वळून म्हणाला–"तुम्ही सर्व नगराबाहेर निघून जा."

ते जंगली लोक राजधानीच्या मुख्य द्वाराकडे निघाले. जीवदत्तने विघ्नेश्वर पुजारी व स्वर्णाचारी दोघांना त्यांच्या पाठोपाठ नगराबाहेर चालू लागायला सांगितले. नंतर राजाकडे वळून म्हणाला–"महाराज! मी पूर्वी सांगितल्याप्रमाणे नगराबाहेर या जंगली लोकांशी युद्ध करावयाचे असेल तर खुशाल करावे. आपले सैन्य घेऊन चला. कोणाला जय मिळतो तो पाहून आम्ही आपल्या वाटेने निघून जाऊ."

नित्यानंदाने आपल्या सैनिकांना नगराबाहेर चलायला आज्ञा केली. नगराबाहेरच्या मैदानात राजा नित्यानंदाचे सैन्य व रानटी लोक समोरासमोर युद्धाला सज्ज उभे राहिले. खड्गवर्मा, जीवदत्त, विघ्नेश्वर पुजारी आणि स्वर्णाचारी दोन्ही सैन्यांच्या मध्ये उभे राहिले.

नित्यानंदाने एकदा आपल्या मंत्र्याकडे व सेनापतीकडे पाहिले आणि "ठीक!" या अर्थी मुंडी हलविली. नंतर खड्गवर्मा व जीवदत्त दोघांना उद्देशून म्हणाला– "वीर हो! आतां तुम्ही बाजूला व्हा. मी आपल्या सैनिकांना या रानटी लोकांवर हल्ला करायला हुकूम करणार आहे."

जीवदत्त जंगली लोकांच्या नायकाला म्हणाला–"ऐकलंस? राजा काय म्हणाला ते? महाराज क्षणार्धात तुमचा फडशा उडवणार आहेत!" नंतर राजाकडे वळून म्हणाला–"महाराज! विचार तरी करून काय ते ठरवा! हे रानटी लोक हारले तर यांच्यापैकी काही मरतील व उरलेले पळून जातील. परंतु जर तुम्ही हारलात तर आपली गादी घालवून बसाल!"

ते ऐकून राजाचा चेहरा एकदम उतरला, मंत्र्याने ते ओळखले व म्हणाला–"महाराज! मी मागे एकदां आपल्याला सांगितले होते, आपल्या वडिलांनी मला बजावून



ठेवले आहे की नगरद्वाराबाहेर रक्त सांडले तर आपल्या कैलासवासी वडिलांच्या आत्म्याला फार फार दुःख होईल."

"अरे होय, मी ती गोष्टच विसरून गेलो होतो. बरं झालं, तुम्ही आठवण करून दिलीत. नाहीं तर बाबांची शेवटची इच्छा पुरी न करून त्यांच्या आत्म्याला दुःखी करण्याचे पाप करणार होतो. सैनिक हो! तुम्ही सर्व राजधानीत चला!" अशी आज्ञा करून नित्यानंद स्वतः सर्वांत आधी नगरद्वाराकडे निघाला.

"या भित्र्याला ऐन वेळी मंत्र्याने बरी आठवण करून दिली!" असे म्हणत खड्गवर्मा मोठ्याने हसला.



जंगली लोकांचा नायक पुढे येऊन म्हणाला–"प्रभो! आतां आम्हांला काय आज्ञा आहे? या बडबड्या राजाला व त्याच्या सैन्याला नगरद्वारासमोरच ठार करून समाधी द्यायची का?"

"वीर क्षत्रिय हो! आज्ञा करावी! हा राजा मेला तर विघ्नेश्वर गणरायाला आनंदच होईल!" पुजारी आनंदाने म्हणाला.

"आपली बडबड बंद कर! तुला बळी दिला तरी त्या गणाधीश विघ्नेश्वराला आनंदच होईल!" खड्गवर्मा त्याला दटावून म्हणाला आणि नगरद्वाराकडे त्याने पाहिले.

नित्यानंद द्वारापलीकडे उभा राहून दात ओठ चावीत डोळे वटारून जीवदत्त व खड्गवर्माकडे पहात होता. दोघांना वाटले की हा राजा मूर्खच आहे, काय नेम आपल्या सैनिकांना अचानक आपल्यावर हल्ला करायला सांगायचा. विचार करून जीवदत्त म्हणाला–"खड्गवर्मा! हा राजा भित्रा तर आहेच, त्याच बरोबर हट्टी व मूर्ख पण दिसतो आहे. रक्तपात झाल्याशिवाय त्याला चैन पडणार नाही."

"बरोबरीच्या लोकांचे युद्ध होऊन रक्त सांडले तर त्याला रक्तपात म्हणता येणार नाही, येथे समजूत व नमतेपणा दिसत नाही. जो जिंकेल तोच शक्तिशाली व बुद्धिमान ठरणार. आतां यांच्या युद्धाची गंमत पाहण्यात आपला वेळ कां फुकट घालायचा? युद्ध होणार की नाहीं हे मी आता ठरवून येतो." असे म्हणत खड्गवर्मा एका रानटी तरुणाच्या हातातला भाला घेऊन राजासमोर जाऊन उभा राहला आणि म्हणाला–"महाराज! आपण या रानटी लोकांशी युद्धाचे स्वप्न पहात आहां, असे दिसते! बरे तर, मी एक, दोन, तीन असे अंक मोजतो; तीन म्हणण्याच्या आत आपण बाहेर तरी ससैन्य येऊन युद्ध करावे किंवा नगरात प्रवेश करून द्वार बंद करून घ्यावे." असे म्हणत खड्गवर्मा 'एक', 'दोन', 'तीन' म्हणू लागला. 'तीन' म्हणण्यापूर्वीच राजाने ससैन्य नगरात प्रवेश



करून द्वार बंद करविले. रानटी लोक 'जयजयकार' करू लागले.

"राजाला अक्कल आलेली दिसते आहे. आता आपण आपल्या वाटेने जाऊ या.' जीवदत्त म्हणाला. त्याप्रमाणे सर्व लोक निघाले. रानटी लोकांनी जीवदत्त व खड्गवर्माला एक मोठी मेजवानी दिली. रानटी स्त्रीपुरुषांनी त्यांच्या पद्धतीचे नृत्य करून दोघांची करमणूक केली. सूर्यास्तापूर्वी तास दीड तास खड्गवर्मा व जीवदत्त त्या जंगली जातीच्या लोकांचा निरोप घेऊन निघाले.

विघ्नेश्वर पुजारी व स्वर्णाचारी त्यांच्या पाठोपाठ निघाले. त्यांना मागे राहल्यास स्वत:च्या जिवाची शाश्वती वाटत नव्हती. म्हणाले–"प्रभो! आम्हां दोघांना या रानटी लोकांच्या हाती सोंपवून निघालात? सूर्यास्तापूर्वीच आम्हांला बळी देऊन हे लोक आनंदाने नाचू व गाऊ लागतील!"

"खड्गवर्मा! या दोघांविषयी काय करू या?" जीवदत्तने विचारले.

"आपण पुढे जाऊन विचार करू. येथे नको. समोरचा डोंगर चढून गेल्यावर काय ते ठरवू. विन्ध्य पर्वतापर्यंत या रानमांजरांना बरोबर घेऊन जायची गरज नाही." खड्गवर्मा म्हणाला.

"प्रभो! आम्हांला तुम्ही रानमांजरे म्हणाला. पण आम्ही खरोखरच रानमांजरे



असतो तर किती बरे झाले असते. निदान काही लहान मोठे प्राणी खाऊन पोट भरले असते. परंतु दुर्दैवाने आम्ही आहों माणसे. त्या विघ्नेश्वराने स्वप्नात येऊन उगाच मला या भानगडीत फसविले." असे म्हणत पुजारी रडू लागला.

"अजून तसे काही बिघडले नाही. तुम्ही दोघे माणसे आहां, म्हणून तुम्हांला डोके पण आहे. तेव्हां या जंगलात स्वत:चा बचाव करून जगणे तुम्हांला तसे कठीण नाही! नाही तर आणखी एखादा राक्षसी हत्ती तयार करून दुसऱ्या राज्यावर हल्ला करा!" खड्गवर्मा स्मित करीत म्हणाला.



"बरे तर, तुम्ही तूर्त आमच्या बरोबर चला. नंतर काय करायचे ते ठरवू." जीवदत्त म्हणाला.

त्यानंतर ते उत्तरेकडे निघाले आणि सूर्यास्ताच्या सुमारास जंगलाच्या डोंगराळ प्रदेशात येऊन पोचले. त्या दिवशी रात्री त्यांनी तेथे सैपाक केला आणि खाऊन पिऊन झाडावर चढून बसले. दुसऱ्या दिवशी सकाळी जेव्हां खड्गवर्मा व जीवदत्त पुन्हां निघाले तेव्हां पुजाऱ्याने व स्वर्णाचाऱ्याने बरोबर चलायला परवानगी मागितली.

"तुम्ही आमच्या बरोबर आणखी किती दूर येणार? आम्ही विंध्य पर्वताकडे जात आहो. वाटेत कोणकोणते धोके व संकटे येतात नकळे. स्वतःचा जीव वाचविणेच आम्हांला जड जाणार आहे आणि वर तुमची दोघांची जबाबदारी कोण घेणार?" जीवदत्त म्हणाला.

"प्रभो, आम्हांला आपल्याबरोबर येऊ द्या. वाटेत सोईचे गाव किंवा शहर दिसले की आम्ही तेथे राहू. पण आम्हांला तुम्ही या जंगलात सोडून गेलात तर हे जंगली लोक नक्कीच आम्हांला जिवंत जाळतील." विघ्नेश्वर पुजारी म्हणाला.

दोघांना भ्यालेले पाहून खड्गवर्मा व जीवदत्त दोघांनी त्यांना बरोबर यायला सांगितले. त्यानंतर दोन दिवस कोणत्याही प्रकारचे विघ्न आले नाही. आणि त्यांचा पायी प्रवास चालू राहला. तिसऱ्या दिवशी पहाटे जीवदत्त व खड्गवर्मा दोघे उठून पुढे निघण्याच्या विचारात असतां त्यांना दुरून कोणाचा तरी आवाज ऐकू आला. त्याच्या पाठोपाठ वाघाची डरकाळी पण ऐकू आली. दोघे ज्या दिशेने आवाज आला होता त्या बाजूला झाडावर बसूनच पाहू लागले. पुजारी व स्वर्णाचारी घाबरून जाऊन थरथर कापत होते.

"जीवदत्त! काय रे, तो मनुष्य वेडा-विडा आहे की काय? त्याच्याजवळ तल-वार भाला काही नाही आणि वाघाच्या पिल्लांना खाकेत धरून तो असा ओरडतो



का आहे? तो ओरडतो आहे व वाघ पुढे पुढे येतो आहे. तू वाघाची डरकाळी ऐकलीस का?" खड्गवर्माने विचारले.

जीवदत्तने समोर पाहिले, एक तरुण युवक फाटके कपडे घातलेला होता व त्याच्या खाकेत वाघाचे दोन छावे होते. तो पळत जात ओरडत होता—"वाघोबा! ये रे! ये, पाहू तर!"

"खड्गवर्मा! आपण त्या वेडया पीराला वांचविले पाहिजे. त्यानंतर काय करायचे ते ठरवू!" असे सांगून जीवदत्त झाडावरून खाली उतरू लागला. त्याच वेळी वाघाची डरकाळी अगदी जवळ ऐकू आली.

"हा कोणीतरी स्वतः वाघाच्या तोंडात उडी घ्यायला निघालेला वेडा पीर दिसतो आहे." असे म्हणत खड्गवर्मा तलवार उपसून झाडावरून उडी मारून खाली आला आणि त्या वेडयाकडे पळत निघाला.

"त्या वाघिणीला बिचारीला मारू नकोस बरं का! ती आपल्या छाव्यांना वांचवायला जात आहे." जीवदत्तने खड्ग-वर्माला सावध केले आणि झाडावरून उतरून त्या युवकाकडे धावत गेला. खड्ग-वर्मा व जीवदत्त त्याच्याजवळ येऊन पोचले, तेवढ्यात ती वाघीण एक उडी मारून जवळ येऊन पोचली. तिला जवळ आलेली पाहून तो युवक ओरडून म्हणाला—"ये,



आलीस एका घासात मला खाऊन टाक!" असे म्हणत तो वाघिणीच्याकडे धावू लागला.

अनपेक्षितपणे त्याला आपल्याकडे येत असलेला पाहून वाघीण जागच्या जागी थबकली. ती चकित झाली असावी किंवा भ्याली असावी. आपण उडी मारावी की नाही या विचारात ती पडली असावी. त्याच वेळी जीवदत्त जवळ आला. वाघाचे छावे आपली सुटका करून घेऊन आईकडे पळण्यासाठी धडपड करीत होते.

ते दृश्य पाहून वाघीण चवताळली व जोराने डरकाळी फोडून तिने त्या युवका-वर उडी मारली. त्याच वेळी जीवदत्तने

आपल्या कुबडीचा प्रहार वाघिणीवर केला व तिला बाजूला पाडले. "खड्गवर्मा! वाघीण बेशुद्ध होऊन पडल्यासारखी दिसते आहे. ती शुद्धीवर येण्यापूर्वी तिला बांधून टाकले पाहिजे." जीवदत्त म्हणाला.

खड्गवर्माने काही रानटी वेली तलवारीने तोडल्या व त्यांचा दोरखंड करून त्याने दोरीचे एक टोक वाघिणीच्या गळयाला बांधले व दुसरे झाडाला बांधून ठेवले.

"अहो, तुम्ही मला या वाघिणीच्या जबड्यातून वांचविलेत खरे, पण याहून मोठ्या संकटात ढकललेत!" तो युवक रडतच म्हणाला.

"अरे वेड्या! मरायला निरनिराळे मार्ग आहेत. तुला मरायचेच असेल तर गळयाला फांस लावून झाडाच्या फांदीला लोंबकळत कां नाही रहात?" खड्गवर्मा रागाने म्हणाला.

"थोरामोठ्यांचे सांगणे आहे की आत्महत्या हे एक फार मोठे पाप आहे. म्हणून वाघिणीचा आहार होऊन..." तो बोलत असतांच खड्गवर्मा म्हणाला–

"मग आतां तू जे करीत होतास ती आत्महत्या नाही, असे का थोरामोठ्यांचे म्हणणे आहे? तू कोण रे, वेडा आहेस की काय?" खड्गवर्माने त्या युवकाला विचारले.

"खड्गवर्मा! जरा थांब, अरे हे त्याला काय विचारतोस?" असे खड्गवर्माला म्हणत जीवदत्तने त्या युवकाला विचारले– "बरं, तू हे सांग, तुझ्यावर असे कोणते मोठे संकट एकाएकी येऊन पडले? कोणाच्या हाती तुला मरणाची भीती वाटते आहे?"

उत्तर देण्यापूर्वी त्याने भयभीत नजरेने एकदां चारी बाजूला पाहिले आणि पुढे तो उत्तर द्यायच्या विचारात होता, त्याच वेळी झाडीतून एक मनुष्य गेंड्यावर बसून पुढे आला व सर्वांना दरडावून म्हणाला– "अरण्यपूरच्या गणाचारीच्या हाती या तरुणाला मरण निश्चित आहे!" पुढे तो म्हणाला–"यारे, या सर्वांना पकडा यांच्या मुसक्या बांधा!"

(क्रमशः)



विक्रमादित्याने हट्ट सोडला नाही. तो झाडाजवळ गेला, प्रेत खांद्यावर काढून घेतले आणि नेहमीप्रमाणे मौनपणे स्मशानाच्या दिशेने निघाला. तेव्हां प्रेतात बसलेला वेताळ त्याला म्हणाला–"राजा! तू एवढा प्रयत्न करून जे साध्य करून घेण्याच्या विचारात आहेस, तशा तऱ्हेच्या इष्ट वस्तूची प्राप्ती जयंत सारख्यांना सहजी होत असलेली पाहून तुलासुद्धा त्याच्यासारखे व्हावे, असे वाटल्यास नवल नाही. मी त्याची गोष्ट तुला सांगतो. लक्ष देऊन ऐक." असे सांगून वेताळ गोष्ट सांगू लागला.

अरवली पर्वताच्या डोंगराळ प्रदेशात अलकापुरी नामक राज्याच्या गादीवर चित्रसेन नांवाचा राजा राज्य करीत होता. त्याला जगन्मोहिनी नावाची एक रूपवती कन्या होती. तिच्या अप्रतिम सौंदर्याची ख्याती ऐकून अनेक राजकुमारांनी तिला मागणी

**वेताळाच्या गोष्टी**



घातली. परंतु चित्रसेन राजाने मुलीने स्वतः आपल्या पतीची निवड करावी या हेतूने स्वयंवर रचले आणि राजेरजवाड्यां-कडे निमंत्रणे पाठविली.

स्वयंवराचा मुहूर्त ज्या दिवशी ठेवण्यात आला होता त्याच्या आदल्या दिवशी जगन्मोहिनी आपल्या सखींबरोबर एका सरोवरात जलविहारासाठी गेली. तिच्या सखींनी तिला किती बजावले की लवकर घरी परतले पाहिजे. परंतु तिने त्यांच्या बोलण्याकडे दुर्लक्ष केले आणि सरोवरात तीनदा बुडी मारून बाहेर आली तेव्हां त्यावेळी तिचे जे रूप होते ते पाहून तिच्या सखी मोठ्याने ओरडल्या. जगन्मोहिनीला स्वतःचे ते रूप पाहून भीती वाटू लागली. प्रथम तिचे सर्व अंग सोन्यासारखे नितळ गोरे होते, ते बदलून लोखंडासारखे काळे झाले होते. आपल्या सखींबरोबर ती रडत घरी परत आली.

राजकन्येचे आईवडील किंकर्तव्यविमूढ होऊन तिच्याकडे पाहू लागले. दुसऱ्या दिवशी स्वयंवरासाठी कुलीन राजकुमार येणार होते. आतां हे स्वयंवर कसे होणार? राजा काळजीत पडला.

राजाने मंत्र्याचा सल्ला घेतला. मंत्र्याने राजवैद्यांना बोलावून औषधोपचार करावयास सांगितले. राजवैद्यांनी सर्व गोष्टींची चवकशी केली आणि म्हणाले–"प्रधान, हा आजार नसून, काहीतरी शाप दिसतो आहे."

परंतु एक मोठा वैद्य होता. तो म्हणाला–"महाराज! मला वाटते, हा शापाचा परिणाम नसून आजारच आहे. सर्व प्रकारच्या शारीरिक रोगांसाठी प्राचीन वैद्यशास्त्रांत एका औषधांचा उल्लेख आहे. एक औषध आहे, पंचवर्ण संजीविनी नामक सरोवराचे पाणी. ते सरोवर कोठे आहे, मला माहीत नाही." ते ऐकून राजा हताश होऊन बसला.

दुसऱ्या दिवशी ठरल्या मुहूर्तावर निर-निराळ्या देशांचे राजकुमार सभाभवनात आपापल्या जागी येऊन बसले आणि



जगन्मोहिनीची वाट पाहू लागले. प्रधानाने सर्व राजकुमारांस संबोधन करून आदल्या दिवशी घडलेल्या दुर्घटनेचा उल्लेख केला आणि म्हणाला–"राजकुमारीचे आज जे रूप आहे ते पाहून कोणी राजकुमार तिच्याशी विवाहास तयार होणार नाही. तिला पूर्वरूप मिळावे यासाठी एका औष-धाची माहिती राजवैद्याकडून आम्हांला मिळाली आहे. पंचवर्ण संजीविनी नावाचे एक सरोवर कोठे तरी आहे. त्याचे पाणी प्याल्यास पूर्वरूप प्राप्त होते. आपल्या पैकी जो कोणी त्या सरोवराचे पवित्र तीर्थ घेऊन येईल त्याच्याशी राजकन्येचा विवाह करून देऊन महाराज त्याला आपल्या गादीचा वारस म्हणून नेमतील."

ते ऐकून फक्त दोन राजकुमार थांबले व बाकी सर्व उठून आपापल्या राजधानीस निघून गेले. त्या दोघांपैकी एकाचे नाव जयंत असे होते. तो मालव देशाचा युवराज होता. त्याने ते सरोवर शोधून त्याचे पवित्र तीर्थ आणण्याची प्रतिज्ञा केली. "विवाह करीन तर जगन्मोहिनीशीच करीन," अशी प्रतिज्ञापण त्याने केली.

दुसरा राजकुमार विजयपुरीचा युवराज विजय होता. त्याने विचार केला की ज्या सरोवराच्या पाण्यात आंघोळ केल्याने राज-कन्येचे रूप बदलले आहे, त्याच सरोवरा-



जवळ तिचे रूप बदलण्याचे कारण पण कळेल. असा विचार करून तो त्या सरोवरावर गेला.

तिकडे जयंत पंचवर्ण सरोवराचा शोध काढीत निघाला आणि रात्रीच्या सुमारास एका दाट अरण्यात एक कालीचे देऊळ होते त्या देवळात येऊन पोचला. त्याने जंगलातली फळे खाऊन आपली भूक भाग-विली आणि त्याच देवळात रात्र काढायचे त्याने ठरविले. जयंत जमिनीवर पडून झोपण्याच्या प्रयत्नात असता एक अस्वल देवळात शिरले व त्याने जयंतला धरले. परंतु जयंतने चटकन आपला बचाव करून स्वतःला सोडवून घेतले व तलवारीचा वार



करून त्या अस्वलाला ठार केले. अस्वल मेल्याबरोबर अदृश्य झाले व त्याच्या जागी जयंतला एक ऋषी दिसला. मुनी म्हणाला–"मुला! मला माझ्या गुरुवर्यांच्या शापामुळे हे रूप मिळाले होते. तूच मला शापमुक्त केलेस. तू काय वाटेल ते माझ्याकडून मागून घे."

जयंत म्हणाला–"मुनिवर्य! मी पंचवर्ण संजीवनी सरोवराच्या शोधार्थ निघालो आहे. ते सरोवर कोठे आहे व त्या सरोवरापर्यंत जाण्याची वाट कोठून कशी जाते, सांगण्याची कृपा करावी."

"मुला! ते सरोवर फार दूर मेरु पर्वतावर आहे. तेथे पोंचणे तितके सोपे नाही आणि तेथे पोचायला तुला सर्व आयुष्य खर्ची घालावे लागेल." मुनी म्हणाला.

"मुनिवर्य! मी त्यासाठी आपले सर्व आयुष्यसुद्धा खर्ची घालायला तयार आहे. परंतु मी आपला प्रयत्न चालू ठेवणार!" जयंत म्हणाला.

मुनी जयंतचा दृढ निश्चय पाहून आनंदित होऊन म्हणाला–"मुला! मी आपल्या पादुका तुला देतो. तू त्या पादुका घालून आकाशमार्गे त्या सरोवरपर्यंत जा. तुला तसा जास्त वेळ लागणार नाही. तुझे काम झाले की माझ्या या पादुका मी असेन तेथे आपोआप परत येतील. परंतु एक गोष्ट लक्षात ठेव, तू या पादुकांचा उपयोग दुसऱ्या कोणत्याही कामासाठी करता कामा नये." असे सांगून मुनी अदृश्य झाला.

जयंतने त्या पादुका घातल्याबरोबर तो आकाशमार्गे मेरु पर्वताकडे उडू लागला.

तिकडे विजय त्या सरोवराचा शोध काढीत दुसऱ्याच एका जंगलात पोचला. तेथे एक सरोवर होते. तो जवळपासचा प्रदेश पहात बराच वेळ हिंडला आणि उजाडल्यावर त्याला त्या सरोवराच्या काठी एक मुनी सरोवरात स्नान करून बाहेर आलेला दिसला. स्नान करून मुनी निघाले, पण त्यांचे रूप न बदललेले पाहून विजयला आश्चर्य वाटले. मुनीजवळ जाऊन तो म्हणाला–"मुनिवर्य! मला आशीर्वाद द्या!" आणि त्याने मुनीचे पाय घट्ट धरले.

"मुला! भिऊ नकोस. कोण तू? असे कोणते संकट एकाएकी तुझ्यावर येऊन पडले?" मुनीने विजयला विचारले.

"मुनिवर्य! याच सरोवरात स्नान केल्यामुळे एक सुंदर गोरीपान राजकन्या कोळशासारखी काळी दिसू लागली आहे आणि आता आपण या सरोवरात स्नान केलेत. परंतु आपले रूप बदलले नाही. त्या राजकन्येला तिचे पूर्वरूप मिळायला काही उपाय आहे का, या गोष्टीच्या शोधार्थ मी येथे आलो आहे. आपण मला ते गुपित सांगण्याची कृपा करावी." विजय म्हणाला.

"तू बरोबर म्हणालास, मुला! मी आपल्या तपोबलाने या सरोवराची सृष्टी केली आहे. या सरोवरात जो स्नान करील त्याचे रूप विकृत होऊन जाईल अशी सृष्टी मी या हेतूने केली की प्रत्येकजण येऊन स्नान करू लागला तर पाणी घाण होऊन जाईल. तू आपले रूप दान करायला तयार असशील तर कर, राजकन्येला त्याबद्दल तिचे मूळ रूप मिळेल. तू या सरोवरात स्नान कर. तुझे रूप विकृत होईल. आहे का तुला ते मान्य?" मुनीने विचारले.

"मला मान्य आहे, मुनिवर्य!" असे सांगून विजय स्नानास सरोवरात उतरला.





सरोवरात स्नान करून व रूपदान करून तो राजवाड्याकडे निघाला.

तिकडे राजकुमारीला स्वतःचे रूप पुन्हां मिळाल्याबद्दल तिला व तिच्या आई-वडिलांना आश्चर्याबरोबर फार आनंद झाला. त्याच वेळी विकृत रूप झालेला विजय आला व त्याने घडलेले वृत्त सांगितले.

इतक्यात जयंत पंचवर्ण संजीवनी सरोवराचे तीर्थ घेऊन आला आणि म्हणाला—"मी आपली प्रतिज्ञा पुरी केली आहे. हे तीर्थ पिऊन राजकन्येला पूर्वरूप मिळाल्यावर तिच्याशी मी विवाह करीन व गादीला वारस होईन."

राजकुमारी जयंतजवळ येऊन म्हणाली—"आपला सर्व प्रयत्न व्यर्थ झाला. मला आपले रूप पूर्वीच मिळाले आहे."

त्यानंतर जगन्मोहिनीचा विवाह कोणाशी करून द्यावयाचा हा प्रश्न राजासमोर उभा राहिला. परंतु जगन्मोहिनीनेच तो प्रश्न सोडविला. ती म्हणाली—"जयंत एवढे कष्ट सहन करून पंचवर्ण संजीवनी सरोवराचे तीर्थ घेऊन आला आहे. म्हणून त्याला सोडून विजयशी लग्न करणे बरोबर दिसणार नाही, हे खरे असले तरी मी विजयशींच विवाह करणार आहे."

"ते ऐकून मंत्री म्हणाला—"जयंत! तूच सांग पंचवर्ण संजीवनी सरोवर कोठे आहे. त्या सरोवराचा शोध लावणें कठीण आहे, असे तूच म्हणाला होतास, आणि आज तीन दिवसात तू त्या सरोवराचा शोध काढून हे तीर्थ कसे काय घेऊन आलास?"

"प्रधान! राजकन्येचा विवाह माझ्याशी होवो किंवा न होवो, परंतु आपण असे बोलून माझ्या प्रामणिकपणावर अविश्वास करीत आहां. हा माझ्यावर अन्याय आहे. असे सांगून जयंत जे तीर्थ घेऊन आला होता ते त्याने विजयला दिले. तीर्थ प्राशन केल्या-बरोबर विजयला त्याचे मूळ रूप मिळाले. तेव्हां त्याला आनंद झाला व तोच यशस्वी झाला असे दर्शवीत जयंत स्वदेशी निघून गेला.

त्यानंतर जगन्मोहिनीचा विवाह थाटा-माटाने विजयबरोबर झाला.

येथवर गोष्ट सांगून वेताळ म्हणाला—"राजा! जयंतच्या या विचित्र व्यवहाराचे काय कारण असावे? तो जे तीर्थ घेऊन आला होता ते पंचवर्ण संजीवनी सरोवराचेच पाणी आहे हे त्याला सिद्ध करून दाखविता आले. मग त्याने जगन्मोहिनीने तरी विजयशीच लग्न करण्याचा हट्ट कां धरावा? या प्रश्नांची समाधानकारक उत्तरे माहीत असून तू दिली नाहीस तर परिणाम तुला माहीतच आहे, तुझ्या डोक्याची शंभर शकले होऊन तुझ्याच पायावर लोळू लागतील."

ते ऐकून विक्रमादित्य म्हणाला—"राज-कन्येने विजयशी विवाह करण्याचे ठरविले तेच बरोबर आहे. तीर्थ राजकन्येला मूळ रूप मिळावे यासाठी होते व ते तिला विज-यने स्वतःचे रूप दान करून मिळवून दिले. एकाला थोडा त्रास झाला असला तरी तसा मोठा त्याग करावा लागला नाही. त्याला जगन्मोहिनीपेक्षां त्याच्या प्रामा-णिकपणावर अविश्वास केल्याची फिकीर जास्त वाटली व आपला प्रामाणिकपणा सिद्ध करण्यासाठी त्याने विजयला ते तीर्थ दिले. विजयला स्वतःचे रूप मिळतांच जयंत विजयगर्वाने निघून गेला. राजकन्या विजयचा त्याग ओळखून तो कुरूप होता तरी त्याच्याशी विवाहास तयार झाली. यात तिची कर्तव्य परायणता दिसून येते. राजकन्येने विकृत रूपातच विजयचा स्वीकार केला होता तर त्याला मूळ रूप मिळाल्यास त्याचा अस्वीकार नक्कीच करणार नाही, हे जयंतला माहीत होते. विजयने राजकन्येला मूळ रूप देवविण्यासाठी मुनीचे पाय धरले आणि रूपदान करण्यास तयार झाला. तेव्हां तोच राजकन्येला योग्य वर होता यात शंका राहण्यास कारणच नाही."

अशा तऱ्हेने राजाचे मौन भंग होताच वेताळ प्रेताबरोबर अदृश्य झाला आणि पुन्हां झाडाला जाऊन लोंबकळू लागला.

(कल्पित)











# खरा आस्तिक

एकदा मोठा दुष्काळ पडला. कित्येक दिवस पाऊसच पडला नाही. लोकांनी वरुण देवाची आराधना करण्यासाठी यज्ञयागादींना सुरवात केली.

सर्व गांवकरी होम होता, त्या दिवशी पहाटे उठून देवळात गेले. त्यांच्याबरोबर एक मुलगा लहानशी छत्री घेऊन निघाला.

"अरे, तू छत्री घेऊन कशाला आला आहेस? आकाशात ढग सुद्धा नाहीत?" मोठ्या माणसांनी विचारले.

"अहो, तुम्ही म्हणालात ते खरे आहे. पण हा जो यज्ञहोम होणार आहे त्यामुळे मुसळधार पाऊस पडू लागला तर छत्रीशिवाय घरी कसे काय परत यायचे?" मुलाने उत्तर दिले.

त्या गावकऱ्यात यज्ञहोमादींवर पूर्ण विश्वास असणारा तो एकटाच होता, असेच नाही का!





# मूर्खाहून मूर्ख

हंगेरी देशातल्या एका गांवी एक शेतकरी रहात असे. त्याची बायको मूर्ख होती. नवऱ्यापेक्षां प्रत्येक काम तिलाच चांगले करता येते असे तिला वाटे. एका वर्षी कापणी झाल्यावर शेतकरी आठवड्याच्या बाजारात धान्य विकायला घेऊन चालला होता. बायको म्हणाली—"तुम्हांला मालाच्या विक्रीची कल्पना नाही. मला घेऊन चला बरोबर!"

"तरमग तू जा, बाजारात, मी येयची गरजच काय?" शेतकरी म्हणाला. म्हणून शेतकऱ्याच्या बायकोने धान्याची पोती गाडीत भरली आणि नवऱ्याला विचारले—"काय भाव मागू?"

"जो बाजारभाव असेल तो!" शेतकरी म्हणाला.

शेतकऱ्याची बायको धान्य घेऊन बाजारात गेली. एका माणसाने येऊन विचारले—"काय हो बाई? गहू कसे दिले?"

"जो बाजारभाव तोच भाव." शेतकऱ्याची बायको म्हणाली.

"बरे तर मी विचारून येतो बाजार भाव." व्यापारी म्हणाला आणि थोड्या वेळाने पुन्हां येऊन म्हणाला—"बाजारभाव अर्धे गहू उधार आहेत व अर्धे हप्त्याने फेडायचे आहेत."

"ठीक, मी तसेच विकणार आहे. पण रुपये माझ्या हातात केव्हां येतील?" शेतकऱ्याच्या बायकोने विचारले.

"पुढल्या आठवड्यात तुम्ही पुन्हां बाजाराला याल तेव्हां." व्यापारी म्हणाला.

"पण त्यादिवशी तुम्हाला ओळखायचे कसे?" शेतकऱ्याच्या बायकोने विचारले.

"तुम्ही असे करा, माझा जुना कोट ठेवून घ्या आणि आपली नवी शाल मला द्या, म्हणजे परस्परांना ओळखतां येईल!" व्यापारी म्हणाला.

हंगेरी देशातली लोक कथा

       



शेतकऱ्याची बायको त्या गोष्टीस कबूल झाली. तिने आपली शाल व गहू त्या व्यापाऱ्याला दिले आणि त्याचा जुना कोट घेऊन ऐटीत घरी परत येऊन नवऱ्यासमोर आपल्या पराक्रमाच्या बढाया मारू लागली.

शेतकऱ्याला बायकोच्या मूर्खपणाचा संताप आला. म्हणाला–"मूर्ख! तुझ्यासारख्या मूर्ख बाईला पुन्हां पाहीपर्यंत मी घरी येणार नाही." असे सांगून शेतकरी घरून निघाला. आपल्या बायकोसारखी मूर्ख बाई जगात आणखी कोणी असू शकेल या गोष्टीवर त्याचा विश्वासच बसेना. चालत जात असता तो एका दाट जंगलात पोचला. तेथे त्याला एक झोपडी दिसली. त्याने झोपडीचे दार वाजविले. एका मोठ्या चाळीस पन्नाशीतल्या बाईने येऊन दार उघडले आणि विचारले–"कोण रे बुवा तू? काय हवे तुला? कोठून आलास?"

शेतकरी त्या बाईच्या अकलेची परीक्षा करण्याच्या हेतूने म्हणाला–"आजी! मी आतां स्वर्गातून परत आलो हो!"

ते ऐकून त्या बाईला आनंद झाल्यासारखे दिसले. तिने उत्सुकतेने त्याला विचारले–"अरे तरमग तू माझ्या मुलाला नक्कीच भेटून आला असशील?"

ते ऐकून शेतकरी म्हणाला–"हो भेटलो होतो. बिचारा फाटके कपडे घालून गाडी ओढीत होता. गाडी ओढता ओढता घामाघूम झाला होता."

"अरेरे, तू पुन्हा केव्हा जाणार परत?" त्या म्हातारीने विचारले.

"उद्या सकाळीच मला तिकडे परत पोचायचे आहे." शेतकरी म्हणाला.

"तरमग, माझे एक काम करतोस का? मी मागच्या ख्रिसमसला केक केले होते ते अजून जपून ठेवले आहेत. नवऱ्याला कळू दिल्याशिवाय पैसे पण जमा करून बाजूला काढून ठेवले आहेत. तू ते पैसे व केक माझ्या मुलाकडे पोचते कर. अरे, आणखी एक गोष्ट मी विसरूनच गेले. माझा नवरा कोणाला तरी फसवून एक नवी कोरी शाल घेऊन आला आहे. तू ती माझ्या मुलाला नेऊन दे." ती म्हातारी म्हणाली.

शेतकऱ्याने विचार केला, तो ज्या विचाराने घरातून निघाला होता तो विचार पूर्ण झाला, त्याच्या बायकोहून मूर्ख बाई त्याला पहायला मिळाली. त्या बाईने त्याला जेवायला वाढले आणि तो निघाला तेव्हां त्याला आपला घोडा दिला.

घोड्यावर बसून शेतकरी निघून गेल्यावर तिचा नवरा घरी परत आला. म्हातारीने आपला पराक्रम वर्णन करून आपल्या नवऱ्याला सांगितला. व्यापारी कपाळावर हात ठेवून म्हणाला–"तुझ्यासारखी मूर्ख बाई मी जगात पाहिली नाही. एकील पाहिले होते. पण तू तिच्याहून मूर्ख निघालीस." बायकोला चार शिव्या हासडून तो घरातून निघून गेला.





कोणीतरी पाठीमागून धावत पळत येत असल्याची चाहूल शेतकऱ्याला लागली. तो एका दाट झाडीत शिरला. घोड्यावरून उतरून त्याने घोडा एका झाडाला बांधून ठेवला आणि तो स्वत: सरळ रस्त्यावर येऊन एक झाड रस्त्यावर वांकलेले होते त्याला आपला खांदा देऊन, खाली पड-णाऱ्या झाडाला वांचविण्यासाठीच जणू काय तो धरून आहे असा उभा राहला. थोड्या वेळाने तो मनुष्य तेथे आला आणि त्याने शेतकऱ्याला विचारले—"काय रे, या वाटेने कोणी घोडेस्वार गेलेला पाहिलास का?"

"गेला खरा, पण तू त्याच्याशी भांडा-यला जाऊ नकोस. कारण तो तुझ्याहून जास्त बलवान आहे." शेतकरी म्हणाला.

"तो तुझ्याहून जास्त बलवान आहे का?" त्या मनुष्याने विचारले.

"नाही!" शेतकरी म्हणाला.

"तू जाऊन त्याला धरून घेऊन ये. मी तुला पैसे देतो." व्यापारी म्हणाला.

"अहो, मी कसा काय जाऊ? आमच्या कुटुंबाच्या कपाळी हा शाप आहे ना, मी हे झाड खाली पडून दिले तर माझ्या सर्व कुटुंबाचा सर्वनाश होऊन जाईल." शेतकरी म्हणाला.

"तू परत येईपर्यंत मी हे झाड आपल्या खांद्यावर घेऊन उभा राहतो. पण तू काय वाटेल ते करून त्या माणसाला पकडून घेऊन ये. त्याने माझ्या बायकोला फसविले आहे." असे सांगून तो मनुष्य शेतकऱ्याच्या खांद्यावरच्या झाडाला खांदा देऊन उभा राहला.

त्यानंतर शेतकरी घोड्यावर बसून घरी गेला आणि बायकोला म्हणाला—"तुझ्याहून मूर्ख बायका या जगात आहेत, हे मी पाहून परत घरी आलो आहे."

"मी तेव्हांच नाही का तुला सांगितले? तुला काय वाटले, मी मूर्ख आहे?" शेत-कऱ्याच्या बायकोने विचारले.

"होय, होय! तुला अक्कल आहे म्हणून तर तू हे बोललीस!" असे सांगून शेतकरी कपाळावर हात ठेवून स्वस्थ बसून राहला.





# अबू-कीर सीर

[ ३ ]

रंगारी अबू कीर अबू सीरचे सर्व पैसे चोरून पळून गेल्यावर तीन दिवस अबू सीर आजारात बेशुद्धच होता. त्या तीन दिवसात त्या खोलीतून कोणी बाहेर आला नाही की कोणी बाहेरून आत गेला नाही. ते पाहून धर्मशाळेच्या द्वारपालकाला शंका आली की या खोलीतले प्रवासी भाड्याचे पैसे दिल्याशिवाय पळून गेले की काय? म्हणून त्याने दार उघडून आत वाकून पाहिले. तेव्हां अबू सीर अशक्त मरायला टेकलेला अंथरुणावर पडून कण्हत होता.

"काय हो! तुमचा तो मित्र कोठे आहे? तुम्हांला बरं नाही वाटते?" दरबानाने विचारले.

"मला काय झाले आहे ते त्या खुदा-बन्द करीमला माहीत. मी आत्तांच शुद्धीवर आलो. बेशुद्ध होऊन किती दिवस झाले, माझे मलाच माहीत नाहीं. मला तहान लागली आहे. थोडे पाणी द्या प्यायला आणि माझ्या खिशात पैशाची पिशवी आहे, त्यातले थोडे पैसे काढून काहीतरी खायला घेऊन या. माझ्यावर तुमची मोठी मेहरबानी होईल." अबू सीर मोठ्या कष्टाने म्हणाला.

दरबानाने पैशाची पिशवी चाचपून पाहिली, पण पिशवीत एक सुटा पैसादेखील नव्हता. तेव्हां या बिचाऱ्याला त्याच्या मित्राने बहुतेक लुबाडले असावे असे त्याला वाटले. म्हणून सहानुभूती दाखवीत म्हणाला—"तू खाण्यापिण्याची काळजी करू नकोस. मी करतो व्यवस्था!" नंतर त्याने गव्हाची कांजी अबू सीरला प्यायला देऊन त्याला पडून रहायला सांगितले.



अशा तऱ्हेने दरबानाने अबू सीरला काय हवे नको ते विचारून सर्व खर्च स्वतःच केला. अबू सीर चांगला बरा झाल्यावर म्हणाला–"अल्लाची मेहरबानी असेल तर मी तुझ्या उपकाराची फेड अवश्य करीन. परंतु तुझ्या उपकाराची पूर्ण फेड तो अल्ला करीमच करू शकेल." अबू सीर दरबानाला नम्रपणे म्हणाला.

"तू या मोठ्या आजारातून वाचलास अल्लाची हीच केवढी मोठी मेहरबानी आहे!" दरवान म्हणाला.

त्यानंतर अबू सीर आपली घोपटी घेऊन गावात निघाला. हिंडतहिंडत तो अबू कीरच्या रंगाच्या दुकानासमोर आला. बाहेर निरनिराळ्या रंगाचे कपडे वाळत टाकलेले होते आणि दुकानासमोर मोठी गर्दी होती.

"इतके लोक कशासाठी जमा झाले आहेत हो? काही विशेष आहे का?" अबू सीरने गर्दीतल्या एका माणसाला विचारले.

"हे दुकान दरबारी रंगारी अबू कीर यांचे आहे. येथे ते गमतीदार रंग कपड्यांना देतात." एक जण म्हणाला.

ते पाहून व आपल्या मित्राचे दिवस पालटलेले ओळखून अबू सीरला फार आनंद झाला. त्याने विचार केला. अल्लाच्या कृपेने आज त्याला पुन्हां चांगले दिवस पहायला मिळाले. मी उगीच गैरसमज करून घेतला. बिचारा कामाच्या गर्दीत मला सोडून आला आणि विसरून गेला असावा. माझे पैसेच त्याला हे रंग विकत घ्यायला व कामाची सुरवात करायला उपयोगी पडले असतील. मी भेटल्यावर त्याला किती आनंद होईल व माझे घेतलेले पैसे तो दहापट करून देईल.

असा विचार करून अबू सीर गर्दीतून वाट काढीत पुढे गेला. दार उघडून त्याने आंत डोकावून पाहिले. अबू कीर एका लोडाला टेकून बसलेला होता. त्याचा सर्व पोषाख राजसी थाटाचा होता. त्याच्या पाठीमागे चार काळे व चार गोरे गुलाम [illegible] हुकूम बजावायला तयार उभे होते. दोघे जण रंग तयार करीत होते. अबू कीर त्यांना पाणी किती, रंग किती व इतर वस्तू किती प्रमाणात घालायच्या हे गादीवर बसल्याच सांगत होता.

अबू सीर आत गेला आणि आपल्या मित्रासमोर जाऊन उभा राहिला. त्यावेळी अबू कीरचे लक्ष दुसरीकडे होते. त्याने आपल्याकडे पाहिले व प्रेमाने विचारपूस केली म्हणजे बरे, या विचाराने अबू सीर काही बोलला नाही. आपल्याला पाहल्याबरोबर आपला मित्र धावत पुढे येऊन घट्ट मिठी मारील असे अबू सीरला वाटत होते.

परंतु अबू कीर अबू सीरला पाहून एकदम दचकला आणि शिवीगाळ करू लागला. म्हणाला–"काय रे भिकारड्या! तुला कितीदा सांगितले माझ्या दुकानासमोर येऊ नकोस. धरा रे याला, खूप बडवून काढा दुकानाबाहेर! बदमाश!

तो तेवढे म्हणण्याची खोटी, त्याचे काळे व गोरे गुलाम धावून आले. त्यांनी अबू सीरला धरून खूप बडविले. अबू सीर तोल जाऊन खाली पडला तेव्हां अबू कीर पुढे आला. त्याने अबू सीरच्या पोटावर उभे राहून त्याला खूप लाथा मारल्या आणि शिव्या देत म्हणाला–"पहा, पुन्हां



इकडे कधी फिरकलास तर तुला सुलतानाकडे घेऊन जाऊन त्यांच्या कडून तुझी चामडीच लोळवीन."

अशा तऱ्हेने मार खाऊन अबू सीर रडत दुकानाबाहेर पडला. बाहेर उभे काही लोक होते त्यांनीदेखील "कसला भिकारी मनुष्य आहे, कोठून आला कोण जाणे!" असे म्हणत त्याला जायला वाट दिली.

अबू सीर आपल्या खोलीत परत आला. चटईवर पडून घडलेल्या गोष्टीबद्दल विचार करू लागला. त्याला खाणे पिणे काहीच सुचले नाही. रात्रभर झोप आली नाही. परंतु पडून राहिल्यामुळे हलके वाटले. त्याने विचार केला, छान आंघोळ करावी म्हणजे

बरे वाटेल. त्याने कोठे 'हमाम' म्हणजे सार्वजनिक स्नान घर आहे का, चवकशी केली. तेव्हां लोकांनीच त्याला उलट विचारले—"हमाम म्हणजे काय हो?"

त्याला आश्चर्य वाटले म्हणाला—"तुम्हांला हमाम माहीत नाही? अहो आंघोळ करायची जागा! आमच्या देशात प्रत्येक गावात ऊन पाणी आंघोळीला हमाम मध्ये मिळते. मालिश करायची व्यवस्था असते. अंगाला चोळायला निरनिराळ्या तेलाच्या बाटल्या ठेवलेल्या असतात," अबू सीरने हमामचे वर्णन केले.

"छे! आमच्या देशात नाही, तुझे हमाम-बिमाम काही. समुद्रात जाऊन बुडी मारली की झालं!" एक मनुष्य म्हणाला.

तेव्हां अबू सीरला त्या देशात हमामची व्यवस्था नाही हे कळले. तो सरळ सुलतानाच्या महालाकडे निघाला. त्याला सहजी सुलतानाचे दर्शन घडले. तो सुलतानाला वाकून सलाम करून म्हणाला—"गरीब परवर! मी परदेशी आहे. जातीने हज्जाम म्हणजे न्हावी आहे. मला मालिश करता येते, हाडे बसविता येतात व कशी आंघोळ केली म्हणजे अंगाचा शीण जाऊन ते फुला-सारखे हलके होते हे मला माहीत आहे. पण या गावच्या लोकांना हमाम म्हणजे काय हेच माहीत नाही. आपल्या राज-धानीत हमाम असू नये ही एक आश्चर्याची गोष्ट आहे."

सुलतान म्हणाला—"तू म्हणतोस तो हमाम मी सुद्धा पाहिला नाही. त्याचे नावदेखील मला माहीत नाही."

अबू सीरने हमाम म्हणजे काय व त्याचा फायदा काय हे नीट समजावून सांगितले व म्हणाला—"सरकार, मी किती वर्णन केले तरी ते पुरे लक्षात येणार नाही. हमाम प्रत्यक्ष अनुभव घेण्याची वस्तू आहे. हमाम असेल तर आपल्या राजधानीला एक निराळीच शोभा येईल."

ते ऐकून सुलतान खूष झाला आणि म्हणाला—"तू म्हणतोस तसा एक हमाम आमच्या राजधानीत तयार करण्याचे काम तुलाच करावे लागेल. तू म्हणशील ती जागा निवड आणि मागशील तेवढे पैसे व सामान मी द्यायला तयार आहे." असे सांगून सुल-तानाने अबू सीरला एक शाल देऊन त्याचा सत्कार केला. नंतर दोन तरुण व चार तरुण दासी देऊन एक घोडा दिला. राहण्यासाठी एका महालाची व्यवस्था करून दिली आणि असा हुकूम दिला की अबू सीर सांगेल तेथे व मागील तेवढी जागा हमाम निर्मितीसाठी द्यावी. त्याने आपल्या वजिराला सांगून गवंडी सुतार व इतर मजूर आणि बांध-कामाला लागणारे सर्व सामानपण देवविले.

अबू सीरने एका मध्यवर्ती जागेची निवड केली आणि तेथे जगातील अद्वितीय असा हमाम बनविला. या हमाममध्ये संगमरवरी दगडावर नक्षीचे कोरीव काम करण्यात आले होते.



हमाम तयार झाल्यावर अबू सीरने सुलतानाकडे जाऊन निवेदन केले–"सरकार! हमाम तयार आहे. आता फक्त आवश्यक वस्तू नेऊन ठेवण्याची व्यवस्थाच काय ती करावयाची राहली आहे."

सुलतानाने त्यासाठी दहा दीनार मंजूर केले. अबू सीरने निरनिराळी तेले, अत्तरे, उटणी, निरनिराळ्या रंगाचे टावेल, रेशमी व सुती कापड वगैरे विकत घेऊन सर्व वस्तू यथास्थानी ठेवल्या.

त्यानंतर अबू सीरने मालिश करण्यासाठी दहा तरुण नोकर पाठविण्याची विनंती केली. सुलतानाने वीस तरुण नोकर पाठविले. अबू सीरने त्यांना मालिश कशी करावयाची व आंघोळ कशी घालावयाची हे शिकवून दिले. अबू सीरने स्वत: त्यांना आपसात मालिश करून स्नान करायला शिकविले. अशा तऱ्हेने त्या नोकरांचे शिक्षण संपले.

सर्व तयारी झाल्यावर हमाम सुरू करण्यासाठी मुहूर्त ठरविला आणि प्रारंभोत्सव करण्यास त्याने स्वत: सुलतानास येण्याची विनंती केली.

त्या दिवशी हमामच्या आत व बाहेर चारीबाजूला सुगंधी द्रव्यांचा सडा घालण्यात आला. पाणी तापवून मोठमोठे हौद भरून ठेवण्यात आले. सुलतानाच्या स्नानासाठी सर्व तयारी पूर्ण झाली. सर्व हमाम हिऱ्यासारखा चकाकत होता. सुलतान आपल्या वजिराबरोबर जेव्हां स्नानासाठी आला तेव्हां ती सर्व व्यवस्था पाहून त्याचे डोळेच दिपून गेले. जिकडे पहावे तिकडे स्वच्छ संगमरवरी जमीन, भिंती व खांब चकाकत होते आणि सुवास सुटला होता.

"अरे यह सब तो बहिश्त है! स्वर्गातले नंदनवन आहे." सुलतान म्हणाला.

"सुलतान! अजून आपण बाहेरच उभे आहां, प्रवेश करावा!" अबू सीर नम्रपणे म्हणाला आणि सुलतानाला आतल्या एका दालनात घेऊन गेला. एका उंच जागी सुलतानाला बसायला सांगून त्यांना एक टावेल गुंडाळून घ्यायला सांगितले. गुलामांनी सुलतानाचे कपडे काढायला मदत केली व सुलतान टॉवेल गुंडाळून आंघोळीला तयार झाला. नंतर सुलतानाला मालिश करण्याच्या खोलीत नेऊन शिकवून तयार झालेल्या तरुण नोकराकरवी उत्तमोत्तम तेले लावून मालिश करविली. नंतर सुगंधी द्रव्ये व उटणे लावून सुलतानाला गरम पाण्याच्या टबात बसवून स्नान करविले. सुलतान अंग पुसून बाहेर आल्यावर सुगंधी तेल लावून धूप देण्याची व्यवस्था करविली.

हमाम झाल्यावर सुलतान बाहेर आला तेव्हां त्याला सर्व अंग फुलासारखे हलके झाल्यासारखे व आकाशात आता उडता येईल असे वाटू लागले. त्याच बरोबर अंगात हत्तीची शक्ती आल्यासारखे पण वाटले.

"या अल्ला! तुम्हारा बहिश्त क्या इससे अच्छा होगा? तुझा स्वर्ग याहून चांगला असेल का?" सुलतानाच्या तोंडून हे शब्द निघाले. पुढे म्हणाला–"आज माझी राजधानी खरी राजधानी झाली!"

अबू सीरने सुलतानासाठी प्यायला उत्तम सरबत मागविले. सरबत पीत असता सुलतानाने विचारले–"या एका हमामाची मजुरी काय?"

"आपकी मेहरबानी!" अबू सीर म्हणाला.



"तरमग वजीर एक हजार दीनार द्या याला. किती विनम्र आहे!" त्यानंतर अबू सीरला एक हजार दीनार देत म्हणाला–"हे घे! आणि हे पहा, एका हमामाला एका हजाराहून कमी घेत जाऊ नकोस!"

"माफ करा सुलतान! मी असा नियम केला तर फक्त श्रीमंतच स्नानाला येतील. गरीब बिचारे इकडे फिरकणारदेखील नाहीत आणि हमाम बन्द करावा लागेल." अबू सीर नम्रपणे म्हणाला.

"पण मजुरी कमीत कमी किती हे तरी ठरविलंच पाहिजे?" सुलतानाने विचारले.

"तसे नाही सुलतान? लोक आपापल्या ऐपतीप्रमाणे खुष होऊन जे देतील त्यात

माझे पोट भरेल. गरीब बिचारे काही देऊ शकले नाहीत तर मी त्यांना नकार देणार नाही!" अबूसिर नम्रपणे म्हणाला.

सुलतान अबू सीरचा नम्रपणा पाहून जास्तच खूष झाला. वजीर व इतर दरबारी म्हणाले–"अबू सीर म्हणाला ते बरोबर आहे सरकार!"

"ते सर्व खरे आहे! पण हा परदेशी आहे. तो स्वदेशी जाईल तेव्हां श्रीमंत झाला पाहिजे. आपल्या राजधानीची शोभा याने वाढविली आहे. तुम्ही सर्व एकेका-स्नानासाठी एकेक हजार दीनार द्या आणि दोन दोन गुलाम पण द्या. त्यानंतर अबू सीर दुसरांकडून त्यांच्या ऐपतीप्रमाणे हजार हजार किंवा त्याला वाटेल तितके कमी दीनार घेईल, अगर फुकट स्नान करवील!" सुलतान म्हणाला व अबू सीरचा निरोप घेऊन महालात परतला.

दरबारातल्या अमीर उमरावांनी पाळी पाळीने येऊन अबू सीरच्या हमाममध्ये स्नान केले. प्रत्येकाने सुलतानाच्या आज्ञे-प्र[illegible] एकेक हजार दीनार व दोन दोन गुलाम दिले. आता अबू सीरकडे चाळीस गोरे गुलाम, चाळीस गोऱ्या दासी व चाळीस काळे गुलाम झाले व अलोट संपत्ति जमा झाली.

अबू सीरने नम्रतापूर्वक सुलतानाला विचारले–"सरकार! या इतक्या गुलामांना मी कोठे ठेवू?"

"तुला अमीर श्रीमंत करण्यासाठी या दासदासी आहेत. ही सर्व तुझी संपत्ती आहे. तू स्वदेशी जाशील तेव्हां तू ठेव अगर विकून टाक." सुलतान म्हणाला.

परंतु सुलतान पुन्हां विचार करून म्हणाला–"बरे तर मी या सर्वांना प्रत्येकी एकेकशे दीनार देऊन विकत घेतो." असे सांगून सुलतानाने सर्व गुलामांची किमत देऊन टाकण्यास खजिनदाराला सांगितले.

सुलतान निघून गेल्यावर अबू सीर ते सर्व धन मोठमोठ्या थैल्या भरून घेऊन आपल्या महालात गेला आणि गुप्त स्थानी ते लपवून ठेवून दिले. (क्रमश:)





# कुलदेवी

**ची**न देशात चँग नावाचा एक तरुण युवक होता. त्याच्या लहानपणीच त्याचे आईवडील वारले. वडिलोपार्जित इस्टेटीच्या नावाने त्याला रहायला फक्त एक झोपडी होती. चँगच्या घराजवळच एक व्यापारी रहात असे. त्या व्यापाऱ्याने विचार केला की चँगला आपल्या घरी नोकर म्हणून ठेवून घेऊन पोटापुरते खायला वाढले की दिवसभर काम करील. खरी गोष्ट अशी होती की त्याची नजर चँगच्या झोपडीवर होती. चँगला व्यापाऱ्याच्या लोभीपणाची माहिती होती. म्हणून त्याने त्याच्या घरी नोकरी करण्याचे नाकारले.

चँगच्या कुळदेवीचे नाव टोंगो होते. ती चीनी लोकात न्यायदेवता म्हणून प्रसिद्ध होती. चँग दररोज कामाला जाण्यापूर्वी त्या देवीला नमस्कार करी.

हळूहळू चँगजवळ चार पैसे जमा झाले. चँग तसा लहान मुलगा राहला नव्हता. त्याला मजेत रहात असलेला पाहून व्यापाऱ्याच्या मनात शंका आली, हा गरीब असून इतका आनंदी कसा? याच्या आनंदाच्या मुळाशी काहीतरी कारण असले पाहिजे. म्हणून त्याने एकदा रात्री चँगच्या झोपडीजवळ जाऊन खिडकीतून डोकावून पाहिले तेव्हां तो चकितच झाला.

चँग एक पेटी उघडून सोन्याची नाणी एकेक करून मोजीत आत टाकीत होता. त्यानंतर त्याने आपल्या खिशातून काही सुटे पैसे काढले आणि तेदेखील पेटीत टाकले. नंतर त्याने ती पेटी जमिनीतल्या खड्डयात ठेवली आणि वर लाकडाचे एक झाकण ठेवून दिले. लाकडी झाकणावर त्याने टोंगो देवाची मूर्ती ठेवून दिली. मूर्ती समोर पुजेचे सामान ठेवून देऊन

चीन देशातील गोष्ट



तो स्वतः बाजूला बिछाना अंथरून झोपला.

व्यापारी ते दृश्य पाहून चकितच झाला आणि त्याच मनःस्थितीत घरी परतला. त्या दिवशी रात्री त्याला झोप आली नाही. त्याने विचार केला, या लबाडाने गरीब गरीब म्हणून पुष्कळ पैसे जमविले आहेत! ते काहीतरी करून लुबाडलेच पाहिजेत.

दुसऱ्या दिवशी चँग कामाला निघून गेला तेव्हां व्यापारी चँगच्या घरात शिरला. त्याने टोंगो देवीची मूर्ती बाजूला उचलून ठेवून झाकण काढले आणि पेटी उघडून आत होती ती सर्व सोन्याची नाणी उचलून आपल्या पिशवीत ठेवली. नंतर त्याने पेटी पहिल्यासारखी ठेवून झाकण ठेवले आणि वर टोंगोची मूर्ती जशीच्या तशी ठेवून देऊन आपल्या घरी निघून गेला.

त्या दिवशी संध्याकाळी चँगने घरी परत आल्यावर पेटी उघडून पाहिली तर आतली सोन्याची नाणी त्याला दिसली नाहीत. चँगला फार वाईट वाटले. बराच वेळ विचार केल्यावर चोरी करणारा मनुष्य त्याच्या ओळखीचाच असला पाहिजे असे त्याला वाटले.

उजाडताच चँगने न्यायाधिशाकडे जाऊन चोरी झाल्याचे कळविले व चोराचा शोध काढून त्याचे पैसे परत मिळवून देण्यास विनंती केली.

न्यायाधिशाने चँगला त्याची समजूत घालून मेहनतीचा पैसा नक्कीच परत मिळेल, घरी पाठवून दिले. त्याने चँगला घराच्या जवळपास कोणकोण राहतो याची चवकशी केली, तेव्हां त्याला सुद्धा त्या व्यापाऱ्याचाच संशय आला. त्याने त्या दिवशी गुप्तपणे चँगच्या घरावर नजर ठेवण्यासाठी एका माणसाला नेमले.

दोन दिवस चँगच्या घराकडे कोणी फिरकला नाही. परंतु तिसऱ्या दिवशी रात्री व्यापारी चँगच्या घरानजिक जाऊन खिडकीतून डोकावून पाहू लागला. गुप्तहेराने ते पाहिले व न्यायाधिशाला ती गोष्ट कळविली. न्यायाधिशाच्या मनात पहिल्यापासून संशय होता. तो आता पक्का झाला.

आता त्या व्यापाऱ्याला मुद्देमालासकट पकडणे तेवढे उरले होते. त्यासाठी न्यायाधिशाने एक युक्ती योजली व चँगला पहिल्यानेच त्याची सूचना देऊन ठेवली.

चवथ्या दिवशी रात्री व्यापाऱ्याने चँगच्या घराच्या खिडकीतून डोकावून पाहिले तेव्हां त्याला जास्तच चकित करून सोडणारे दृश्य दिसले.

झोपडीत खिडकीकडे पाठ करून एक बाई बसलेली होती. तिच्यासमोर गुडघे टेकून चँग तिला नमस्कार करीत होता. ती स्त्री चँगला म्हणत होती—"बाळ! मी तुझी भक्ती पाहून प्रसन्न झाले आहे. तुझे वाडवडील पिढ्यान् पिढ्या माझी पूजा करीत आले आहेत. तुझ्यावर फार मोठा अन्याय झाला आहे. मला ते सहन होणार नाही. तुझी सोन्याची नाणी कोणी चोरून नेली ती मला माहीत आहे. त्याने चोरलेली एक हजार सोन्याची नाणी मी परत करवीन!"

त्या बाईचे बोलणे खिडकीतून ऐकणारा व्यापारी स्वतःचे भान न राहल्यामुळे एकदम म्हणाला—"एक हजार नव्हती, शंभरच तर होती. मी छान मोजली होती." असे म्हणत तो आपल्या घराकडे पळत गेला. घरात जाऊन तो सोन्याची नाणी मोजू लागला.

त्याच वेळी न्यायाधिशाने दहा शिपायांना बरोबर घेऊन जाऊन व्यापाऱ्याला कैद करविले. त्याला तीन महिन्यांची शिक्षा करून त्याच्याकडून चँगची सोन्याची नाणी परत करविली.

ही गोष्ट घडल्यामुळे न्यायाधिशाचा नावलौकिक वाढला. टोंगोदेवी न्यायाधिशासमोर प्रत्यक्ष उभी राहून त्याला मदत करते अशी चीनी लोकांची समजूत होती. परंतु अशा न्यायाधिशाला कोणी पाहिले नाही की न्यायाधिशाने अशा देवीला पाहल्याचे सांगितले नाही. परंतु त्या एका न्यायाधिशाला नक्कीच टोंगो देवीचे दर्शन घडले होते असा चीनी लोकांचा विश्वास आहे.



# भिकाऱ्याचा वेष

एका गावी एक भिकारी रहात असे. तो गावभर फिरून भीक मागत असे व त्याला भीक मागूनच पोटभर खायला मिळे.

एकदा तो एका दयाळू माणसाच्या घरी भीक मागायला गेला असता त्या दयाळू माणसाला भिकाऱ्याचा मळका वेष पाहून त्याची दया आली. त्याने त्याला आंघोळ करायला सांगितले व अंगात घालायला स्वच्छ कपडे दिले. त्या दिवशी त्याला पोटभर खायला पण मिळाले.

दुसऱ्या दिवशी तो ते स्वच्छ कपडे घालून भीक मागायला निघाला तेव्हां लोकांनी त्याचे स्वच्छ कपडे पाहून त्याला विचारले—"काय रे, भीक मागायला तुला काही लाजलज्जा वाटत नाही का? तू लंगडा लुळा की आंधळा आहेस? मेल्याचे कपडे पहा!"

तेव्हां भिकाऱ्याच्या डोक्यात प्रकाश पडला. दुसऱ्या दिवशी तो आपले स्वच्छ कपडे बोचक्यात गुंडाळून ठेवून आपले नेहमीचे मळके कपडे घालून निघाला. मळके व फाटके कपडे पाहून लोकांनी 'गरीब बिचारा' म्हणून त्याला भीक घातली.





# अभ्याधान

फार प्राचीन काळातली गोष्ट आहे, विन्ध्य पर्वतात गंधर्व निवास करीत असत. कंदर्प नावाच्या एका लहानशा राज्याच्या गादीवर कुवलय नावाचा राजा राज्य करीत असे.

राजा कुवलय एकदा शिकारीसाठी अरण्यात गेला असता त्याला एका टेकडीवर एक अप्रतिम सुंदर स्त्री दिसली. तो तिच्या रूपावर इतका भाळला की त्याने तिच्याशीच लग्न करण्याचे मनाशी ठरविले. त्याने टेकडीवरून खाली उतरून येण्यास सांगितले. परंतु तिने नकारार्थी मान हलविली आणि टेकडीवरून उतरून कोठेतरी निघून गेली. कुवलयने टेकडीच्या टोकाला जाऊन चारी-बाजूला पाहिले, पण ती कोठे दिसली नाही.

परंतु तो निराश झाला नाही. काय वाटेल ते करून तिच्याशीच लग्न करावयाचे त्याने मनाशी ठरविले आणि दुसऱ्या दिवशी पुन्हां त्या टेकडीजवळ आला. त्या दिवशी सुद्धा ती स्त्री पहिल्या दिवसासारखी येऊन त्याच जागी बसली होती. परंतु कुवलय ती बसली होती तिकडे जाऊ लागताच ती पळून गेली.

कुवलय राजा या खेपेसही निराश झाला नाही. तिसऱ्या दिवशी पुन्हां तो त्या टेकडी जवळ आला. पण आश्चर्य असे की या वेळी त्याला तिच्याकडे पळत जाण्याची गरजच राहली नाही. ती स्त्री स्वतःच राजा कुवलय उभा होता त्या बाजूला आली. राजाला वाटले की ही स्त्री कोणी देवलोकातली किंवा गंधर्वलोकातली स्त्री असली पाहिजे. ती धीटपणाने जवळ येऊन म्हणाली—"माझे नाव मलयवती. आज तुम्ही तिसऱ्यांदा माझ्या शोधार्थ आलां आहां. कोण तुम्ही? काय पाहिजे तुम्हांला?"

कु. शीला सोहनी



"तुला पाहिल्यापासून, लग्न करावयाचे तर तुझ्याशीच, असे मी आपल्या मनाशी ठरविले आहे. तू माझ्याबरोबर माझ्या राजधानीत चल व माझ्याशी विवाह करून माझी पट्टराणी व्हायचे कबूल कर. मी तुला कोणत्याही गोष्टीची उणीव भासू देणार नाही." कुवलय म्हणाला.

मलयवती कुवलयशी विवाह करून घेण्यास तयार झाली आणि ती त्याच्या बरोबर त्याच्या राजवाड्यात आली. मलयवतीशी विवाह करून घेतल्यावर कुवलय राजाचे पशुधन दुप्पट झाले व पीक दुप्पट निघू लागले. म्हणून राजाला फारच आनंद झाला. त्याच्याकडे कोणी दान मागायला आला की राजा आनंदाने दान करी. दान घेऊन लोक त्याला आशीर्वाद देत–"राजा! तू एक पैसा दिलास, देव तुला दहा लाख देईल. कारण एका देवीने तुझ्या घरी गृहिणी म्हणून प्रवेश केला आहे."

परंतु सर्व संपत्ती व वैभव प्राप्त असूनही व संसारात सर्व सुख मिळत असूनही राजाच्या मनाचे समाधान झाले नाही. त्याला वाटू लागले की मलयवती देवी नसून कोणी मानव स्त्रीच आहे. म्हणून त्याच्या मनात पालट झाला. एका अपूर्व सुंदरीच्या दर्शनासाठी त्याचे मन उतावीळ झाले.

अशाच मन:स्थितीत तो एकदा एकटाच पायी चालत असता त्याला पाठीमागून एक रथ येत असल्याचा आवाज ऐकू आला. त्याने मागे वळून पाहिले. रथात एक अपूर्व सुंदरी स्त्री बसून येत होती. तिला पाहून राजाला वाटले, आपण मलयवतीशी विवाह करून घेण्यात घाई केली. या स्त्रीशी आपला विवाह झाला असता तर आपले आयुष्य सुखी झाले असते.

त्याने टाळी वाजवून रथात जाणाऱ्या त्या स्त्रीला थांबायला सांगितले. पण ती थांबली नाही. तेव्हां तो रथामागून धावत पळत निघाला. डोंगरी रस्ता होता. त्याच खळगे होते, पण तो तरी सुद्धा रथामागून पळत होता.

बरेच अंतर गेल्यावर एका जागी रथ थांबला. रथातून ती अपूर्व सुंदरी उतरून राजाजवळ आली. तिला पाहून राजा चकित झाला. कारण ती दुसरी तिसरी स्त्री नसून मलयवतीच होती.

"कोण मलयवती! तूच का? मी रथा-मागे तूच का की आणखी कोणी हे पाण्या-साठी पळत होतो. कोठे निघालीस? चल घरी!" कुवलय म्हणाला.

दोघे घरी परतले. त्या दिवसापासून कुवलयाच्या मनात असमाधान वाढत गेले. एक दिवशी तो घरी आला तेव्हां मलयवती घरात नव्हती. नोकर म्हणाले की ती आपल्या घरी निघून गेली. ती निघून गेली त्या दिवसापासून पशुधन झपाट्याने कमी होऊ लागले आणि पिके कमी निघू लागली.

आपल्या मागे कोणते तरी भूत लागले आहे. आतां आपले चांगले दिवस संपले, असे कुवलयला वाटू लागले. ते भूत दृष्टीस पडले तर त्याला ठार करावयाचे कुवलयने मनाशी ठरविले. तो त्या भुताच्या शोधार्थ रात्रंदिवस फिरू लागला आणि एकदां त्याला एक भूत दिसलेच. तो त्या भुताचा पाठलाग करीत पळत निघाला आणि त्याला धरून शेवटी त्याने जमिनीवर पाडले. त्याच्या छातीवर बसून त्याला ठार करण्यासाठी कुवलयने आपला खंजीर उचलला. त्याच वेळी ढगाआडून चंद्र बाहेर आला आणि त्या भुताच्या तोंडावर स्वच्छ चांदणे पडले. त्याने भुताचा चेहरा पाहिला आणि हाता-तला खंजीर दूर फेकून दिला. कारण तो चेहरा त्याचाच होता. तो पळत घरी गेला. मलयवतीने दार उघडले. कुवलयने तिला विचारले–"मलयवती! तू परत आलीस?"

"तू आपल्या मनातले असमाधान काढून टाकलेस म्हणून मी परत आले. यापुढे आपला संसार सुखाचा होईल." मलयवती म्हणाली.

ती म्हणाली ते खरे ठरले. असमाधान खरोखरच नाहीसे झाले होते व कुवलयचे चित्त शांत झाले होते.



# औषधाचे गुपित

एका गावी एक वैद्यबुवा रहात होते. ते गरिबांना फुकट औषध देत व श्रीमंतांकडून खूप पैसे वसूल करीत.

त्याच गावी एक श्रीमंत माणूस रहात असे. एकदा तो विषमज्वराने आजारी पडला. वैद्यबुवांनी रोग्याला तपासून वेळेवर औषधपाणी झाले नाही तर रोग धोक्याचा असल्याचे सांगितले.

"किती खर्च होईल!" त्या श्रीमंताने विचारले.

"माझ्याजवळ औषध तयार नाही, काहीं वनस्पती व द्रव्ये विकत घेऊन औषध तयार करावे लागेल. त्यासाठी कमीतकमी दहा रुपये तरी खर्च लागेल." वैद्यबुवा म्हणाले.

त्या श्रीमंतमाणसाला वैद्यबुवा औषधाची किमत भरमसाट काही तरी सांगत आहेत असे वाटले. म्हणून त्याने विचारले–"वैद्य बुवा! औषधी द्रव्यांची यादी द्या. मी मागवून देतो, बाजारातून!"

वैद्याने यादी दिली. परंतु यादीतल्या वस्तू गावात मिळाल्या नाहीत. एका माणसाला पाठवून जिल्ह्याच्या गावाहून त्या वस्तू त्या श्रीमंत माणसाने मागविल्या. औषधांची किमत पंधरा रुपये झाली व नोकराला जाऊन यायला वर पंधरा रुपये आणखी खर्च झाला.

औषध तयार करून वैद्याबुवांनी ते त्या श्रीमंताकडे पाठवून दिले. त्या औषधाने आजार बरा झाला. परंतु त्या श्रीमंताला दहा एवजी तीस रुपये खर्च करावे लागले.





# अंड्यातला राक्षस

स्वर्णगृह राज्याच्या राजधानीच्या गावी एका उद्यानात माळ्याला एक अंडे सापडले. माळ्यांनी ती गोष्ट राजाला कळविली. राजाने ते अंडे राजवाड्यात आणायला सांगून एका खोलीत ठेवले. ते अंडे दररोज थोडेथोडे वाढत एका माणसाच्या उंची एवढे उंच झाले आणि शेवटी एक दिवशी त्यातून अचानक एक राक्षस बाहेर आला.

राजा त्या राक्षसाला पाहून चकित झाला. त्याने त्याला एका निराळ्या खोलीत ठेवण्याची व्यवस्था केली. दररोज त्याला नियमित आहार मिळू लागला. त्याचा आहार झपाट्याने वाढू लागला आणि तो राक्षस दररोज दोनदोन इंच याप्रमाणे वाढत वाढत लवकरच सात फूट उंचीचा झाला.

राजाने त्याला पोटभर खायला घालण्याची उत्तम व्यवस्था केली होती, परंतु त्याचे पोट भरत नसे. पुढेपुढे तो राक्षस माणसांना खायला धावे. त्याला काबूत ठेवण्यासाठी राजाने दहाबारा शिपाई नेमले. परंतु हळूहळू राजाला शिपायांची संख्या वाढवावी लागली. म्हणून राजाने त्या राक्षसाला एका मोठ्या खोलीत बंद करून ठेवले. परंतु असे किती दिवस चालणार असा विचार करून राजा त्या राक्षसाला म्हणाला– "बाबा रे! तुझ्या जातीचे राक्षस जंगलात राहतात. तू त्यांच्या बरोबर जाऊन रहा."

राक्षसाची राजावर फार भक्ती होती. म्हणून तो नम्रपणे म्हणाला–"महाराज! मला आपण कैदेतून सुटका द्या. मी तुम्ही सांगाल तसा वागेन."

राजाला काय करावे हे सुचेना. तेव्हां दरबारी जादुगराने युक्ती सुचविली.

राजा त्या राक्षसाला भेटून म्हणाला– "मी तुझी परीक्षा घेतो. त्या परीक्षेत तू

श्री पी. सी. सरकार, जादुगार

यशस्वी झालास तर मी तुला सोडीन. नाही तर मी सांगितल्याप्रमाणे तुला जंगलात जावे लागेल." तो राक्षस परीक्षेस कबूल झाला.

राजा एक अंडे घेऊन आला आणि राक्षसासमोर टेबलावर चादर अंथरून स्वत: एका बाजूला खुर्चीवर बसला. नंतर राक्षसाला एक अंडे दाखवून तो म्हणाला–"या टेबलावर हे अंडे तू उभे कर. ते आडवे होता कामा नये. तसे उभे केलेस तर तुला माझ्या राज्यात सर्वत्र फिरायला परवानगी आहे, नाहीतर तुला जंगलात निघून जावे लागेल."

"एवढेच ना? मी स्वत: अंड्यातून बाहेर निघालो आहे. अंडे माझ्या आज्ञे प्रमाणे नक्कीच वागेल," राक्षस म्हणाला.

"पहा, तू वचन मोडता कामा नये!" राजाने बजावून सांगितले.

"महाराज! आमच्या जातीचे राक्षस दिलेले वचन कधी मोडत नाहीत," राक्षस गर्व करीत म्हणाला. राजाने राक्षसाला ते अंडे दिले. ते उभे करण्याचा राक्षसाने खूप प्रयत्न करून पाहिला. परंतु हाताचा आधार असेपर्यंत ते उभे राही व हात काढून घेतल्याबरोबर खाली पडून जाई.

नंतर राजा म्हणाला–"ते तुला शक्य नाही. आता मी तुला कसे उभे करावयाचे ते दाखवितो." असे सांगून राजाने ते उभे करून ठेवले व म्हणाला–"पाहिलेस तू परीक्षेत यशस्वी झाला नाहीस. आता तू माझ्या राज्यातून निघून जा."

राक्षस वचनाचे पालन करणारा होता. तो राज्याबाहेर निघून गेला. त्यानंतर त्याची कोणी चवकशी सुद्धा केली नाही.

मंत्र्याने चकित होऊन राजाला विचारले–"महाराज! आपण अंडे उभे करून कसे काय ठेवलेत?"

राजाने टेबलावर अंथरलेल्या चादरीखाली मीठाचा लहानसा ढीग होता तो दाखविला. त्यावर अंडे उभे होते.





# काकण

पांचसहाशे वर्षापूर्वीची गोष्ट आहे, विजयनगरच्या गादीवर हरिहर राय नावाचा राजा राज्य करीत असे. त्याच्या प्रधानाचे नाव भास्कर होते. भास्कर फार हुशार व कर्तव्यपरायण मंत्री होता. राजाने त्याला दोन मरकत मण्याची कांकणे करून देऊन त्याचा सत्कार केला.

मंत्री भास्कर दररोज तुंगभद्रेवर स्नानाला जात असे. स्नानसंध्यादी आटोपून तो नोकरांबरोबर परत येई. एकदां मंत्री स्नानाला तुंगभद्रेवर गेला. बरोबर काही दरबारी व नोकरचाकरपण होते. स्नान करीत असतां एक कांकण मंत्र्याच्या हातातून निसटून नदीत पडले. नोकरांनी एका हातात कांकण पाहून विचारले–"प्रधान! आपल्या दुसऱ्या हातातले कांकण कोठे आहे?"

"पाण्यात पडले." मंत्री भास्कर म्हणाला.

"कोठे पडले, दाखवा, आम्ही काढून आणतों." नोकर म्हणाले.

मंत्री भास्करने लगेच आपल्या दुसऱ्या हातातले कांकण काढून पहिले कांकण ज्या जागी पडले होते त्या जागी टाकले व "त्या जागी पडले." असे सांगून घरी निघून गेला.

नोकरांनी नदीत बुडी मारून पुष्कळ शोधले, पण एकदेखील कांकण सांपडले नाही.

ती गोष्ट दरबारी लोकांना कळली. त्यांनी राजाला जाऊन प्रधानाच्या उर्मटपणाविरुद्ध चहाडी केली. महाराजांनी प्रधानाला बोलावून विचारले–"मंत्री! आपल्या हातांत कांकणे दिसत नाहीत? आम्ही पाण्यात फेकून देण्यासाठी कांकणे आपणांस दिली नव्हती!"

ते ऐकून मंत्री म्हणाला–"महाराज! आपण माझ्या सत्कारासाठी म्हणून जी

श्री गु. ना. वज्रमट्टी








कांकणे मला दिली होती मी ती स्वत: काढून पाण्यात फेकली नाहीत. मी गंगेवर (तुंगभद्रेवर) स्नानला गेलो होतो. स्नान करीत असता गंगामातेने एक कांकण माझ्या हातातून काढून घेतले. तिने एकाच हातात कांकण घालणे मला आवडले नाही. म्हणून मी आपल्या दुसऱ्या हातातले कांकण काढून तिला दिले! त्यात आपला अनादर करण्याचा हेतू नव्हता, गंगामातेचा आदर करण्याचा हेतू होता."

ते उत्तर राजाला थोडे अहंभावीचे वाटले. परंतु स्वत:चा राग आवरून राजा म्हणाला–"तुम्ही जी कांकणे गंगामातेला अर्पण केलीत ती एकदां पाहण्याची मला इच्छा आहे. तुम्ही गंगामातेच्या ज्या हातात ती कांकणे घातलीत ते हात मला दाखवाल का?" राजाने विचारले.

"उद्यां सकाळी गंगेवर स्नानाला जाईन त्या वेळी आपण येण्याची कृपा करावी, महाराज!" मंत्री म्हणाला.

दुसऱ्या दिवशी राजा आपल्या दरबारी लोकांसह गंगेवर स्नानाला गेला.

मंत्री भास्करने स्नानसंध्या आटोपून गंगेला नमस्कार केला व म्हणाला–"गंगामाते! मी तुझ्या हातात घातलेली कांकणे घालून दर्शन देण्याची कृपा कर. या सर्वांना पण तुझे ते मंगल कर पाहू दे."

त्याबरोबर गंगेतून दोन हात वर आले. दोन्ही हातात मरकत मण्याची ती कांकणे होती. क्षणार्धात ते हात पुन्हा अदृश्य झाले.

ते दृश्य पाहून राजा लज्जित झाला आणि मंत्री भास्करचा निरोप घेऊन राजवाड्यात परत आला. काही काळ लोटल्यावर राजाने मंत्र्याला बोलावून त्याची क्षमा मागीतली.

मंत्री म्हणाला–"महाराज! आपण माझ्यासारख्या अनेकांचे रक्षण करतां आणि आपण माझ्याजवळ अशी क्षमा मागावी, हा धर्म नाही. आपला अनुग्रह असला की आम्हांला पुरे!" मंत्री भास्कर नम्रपणे म्हणाला.






पांडवांचा वनवास सुरू होऊन बारा वर्षे पुरी होत आली होती. इंद्राने पांडवांना थोडी फार मदत करतां आली तर पहावी या हेतूने कर्णाकडून त्याचे कवचकुंडले काढून घेण्याचे ठरविले. कर्ण दानी होता व ब्राह्मण जे मागेल ते तो देईल हे इंद्राला माहीत होते. परंतु इंद्राचा बेत कर्णपिता सूर्य याला कळला. तो कर्णाला स्वप्नात दर्शन देऊन म्हणाला–"कर्णा! तुझ्याकडे येऊन ब्राह्मणाने काही मागितले तर तू लगेच देऊन टाकतोस. ही गोष्ट इंद्राला माहीत आहे. तो त्याचा मुलगा अर्जुन याच्या रक्षणासाठी ब्राह्मण वेषधारण करून तुझ्याकडून कवचकुंडलांचे दान मागून घेणार आहे. म्हणून त्याला कवचकुंडले सोडून काय वाटेल ते मागून घ्यायला सांग. कारण कवचकुंडले असेपर्यंत तुझ्या जीवाला मुळीच धोका नाही. परंतु तू त्यांचेच दान केलेस तर मात्र तुला स्वत:चे रक्षण करणे अशक्य आहे."

"देवा! मला दर्शन देऊन सावध केलेस याबद्दल मी तुझा फार फार आभारी आहे. परंतु ब्राह्मणाने मागितलेली वस्तू दान करण्याचे व्रत मी घेतलेले आहे. म्हणून मला एवढी कीर्ती मिळाली आहे. मग स्वत: इंद्र एक ब्राह्मण होऊन भिक्षा मागायला आला तर मी नकार कसा काय द्यायचा? माझ्या कीर्तीला कलंक लागेल. यश व कीर्ती गमावून बसल्यावर जिवंत राहल्याने तरी काय मिळणार आहे?"



"खुळ्या! हा देहच राहला नाही तर कीर्ती संपादन करून तरी तुला काय मिळणार? प्रेतावरची आभूषणे आहेत ती! अर्जुनाशी तुझे शेवटचे युद्ध होईल त्यावेळी कवचकुंडलेच तुझा बचाव करतील. म्हणून त्यांचे दान करू नकोस." सूर्य म्हणाला.

"सूर्यनारायण! क्षमा कर! कोणी ब्राह्मणाने माझा जीव मागितला तरी मी तो देईन. पण व्रतभंग होऊ देणार नाही. कवचकुंडलांशिवाय मी अर्जुनाचा वध करीन. परशुरामाने व द्रोणाचार्यांनी दिलेली अस्त्रे माझ्याजवळ आहेत." कर्ण म्हणाला.

"तुला आपल्या व्रताचे इतक्या कटाक्षाने पालन करावयाचे असेल तर मी सांगतो ते इंद्राजवळ काही असामान्य अशी अस्त्रे आहेत. शत्रूचा नाश करून ती परत येऊ शकतात म्हणून इंद्र कवचकुंडले मागायला येईल तेव्हां तू त्याच्याकडून एक अमोघ अस्त्र मागून घे. त्या अस्त्राच्या सहाय्याने तुला अर्जुनाचा पराभव करता येईल." सूर्य म्हणाला आणि अदृश्य झाला.

त्याच वेळी कर्णाची झोप मोडली. उजाडण्याची वेळ होती. स्नानसंध्यादिक आटोपून कर्ण इंद्राची वाट पहात बसला. कर्ण दररोज सकाळी सूर्याची आराधना करून दुपारच्या सुमारास जे ब्राह्मण येत त्यांना ते मागतील ते दान करीत असे. त्या दिवशी इंद्र ब्राह्मण वेष घेऊन आला व त्याने कवचकुंडलांचे दान मागितले.

कर्णाने आपल्या नियमाप्रमाणे इंद्राची पाद्यपूजा केली आणि विचारले—"ब्राह्मणश्रेष्ठा! बोला, आपल्याला काय दान करावे? गाई, जमीन, दासदासी आपणांस जे काही हवे ते मागून घ्यावे."

"मला! मला हे सर्व काही नको. तुझी कवचकुंडले तेवढी दे." इंद्र म्हणाला.

"ब्राह्मणोत्तमा! ही कवचकुंडले मला जन्मत: मिळाली आहेत. ती माझी प्राणरक्षक आहेत. तेव्हां ती सोडून काय वाटेल ते मागून घ्यावे." कर्ण म्हणाला. त्याने इंद्राला ओळखले होते.





"ते सर्व बरोबर आहे. परंतु मला ती कवचकुंडलेच हवी आहेत. त्यां व्यतिरिक्त काही एक नको." इंद्र म्हणाला.

ते ऐकून कर्ण स्मित करून म्हणाला—"ब्राह्मणोत्तमा! आपण ब्राह्मण वेष धारण करून आलेले इंद्र आहांत हे मला माहीत आहे. आपण आमच्या सारख्या मर्त्यलोकांतील निवासियांना कोणता तरी वर द्यावा, हे इष्ट आहे. परंतु याचक होऊन आपण आमच्याकडे यावे हे मला नाही आवडले. कवचकुंडले देऊन शत्रूसमोर माझा पराभव होईल व माझी अपकीर्ती होईल. म्हणून आपण माझ्याकडून कवचकुंडले घेत असतां मला एखादे अमोघ अस्त्र देण्याची कृपा करावी."

इंद्र म्हणाला—"कर्णा! मी तुला एक अमोघ अस्त्र देईन. परंतु त्या अस्त्राचा प्रयोग तुला फक्त एकावरच व एकदाच करता येईल. तू त्या अस्त्राचा प्रयोग केल्यावर ते अस्त्र शत्रूचा संहार करून परत माझ्याकडे येईल. तुला हे मान्य असेल तर तू त्या अस्त्राचा स्वीकार कर."

"हे देवराज! माझा शत्रू असा एकच एक आहे. मी त्याचा नाश करण्याची प्रतिज्ञा केली आहे." कर्ण म्हणाला.

"ते मला माहीत आहे. तू या अस्त्राचा उपयोग फक्त अर्जुनाचा वध करण्यासाठी





करणार आहेस! परंतु कृष्ण जोंपर्यंत त्याचा पाठीराखा आहे तोंपर्यंत त्याच्या केसालाही धक्का लागणे शक्य नाही. तरी या अस्त्राचा प्रयोग अगदी निरुपाय झाल्यावरच तू कर. दुसरी अस्त्रे अगदी निरुपयोगी ठरली म्हणजे. परंतु घाईगर्दीत अशक्त दुर्बल माणसांवर या अस्त्राचा प्रयोग करू नकोस. तसे केलेस तर हे अस्त्र तुझ्यावरच उलटेल." इंद्र म्हणाला.

त्यानंतर कर्ण इंद्राला म्हणाला—"देवेंद्रा! ही कवचकुंडले माझ्या शरिराचा भाग आहेत. मी ती काढून दिल्यावर माझा देह विकृत दिसू नये असा वर द्यावा!" देवेंद्राने त्याला होकार



दिला. इंद्राने एक अमोघ अस्त्र कर्णाला दिले व कर्णाने कवचकुंडले काढून दिली. इंद्राने दिलेल्या वराप्रमाणे कर्णाच्या देहात कोणत्याही प्रकारची विकृती आली नाही.

कर्णाने कवचकुंडले काढून दिल्याचे ऐकून पांडवांना आनंद झाला. परंतु कौरव दुःखी झाले.

पांडव द्वैतवनात रहात होते. एकदा एक ब्राह्मण त्यांच्याकडे धावत आला व म्हणाला—" मी आपली अरणी एका झाडाला अडकवून ठेवली होती. इतक्यात एक हरण आले. ते झाडाच्या फांदीला अंग घाशीत असतां त्याच्या शिंगात अरणी अडकली आणि ती घेऊन हरण पळून गेले. त्याच्या शिवाय मला अग्नी पेटवितां येणार नाही. म्हणून तुम्ही अरणी आणून देण्याची कृपा करावी."

पंचपांडव त्या हरणाचा पाठलाग करीत निघाले. त्यांनी कित्येक बाण सोडून त्या हरणाचा वध करण्याचा प्रयत्न केला. परंतु आश्चर्याची गोष्ट म्हणजे ते हरण सर्व बाण चुकवून पळून गेले आणि जंगलात कोठे तरी अदृश्य झाले.

पांडव दमून भागून एका झाडाखाली बसले. त्यांना सर्वांना फार तहान लागली होती. नकुल म्हणाला—"आपल्यावर ही सर्व संकटे अशी कां येत आहेत?"

"पूर्वजन्मी आपण काही दुष्कृत्य केले असल्यास त्याची फळे आपल्याला भोगावी लागतात!" युधिष्ठिर म्हणाला.

"त्यादिवशी द्रौपदीला राज्यसभेत ओढून आणले तेव्हां त्या दुष्टांचे पारिपत्य आपण केले नाही, त्याचे पाप आपल्याला भोगावे लागत आहे." भीम म्हणाला.

"द्यूत चालू असतां कर्ण तोंडाला येईल ते बरळत होता तरी मी मूग गिळून स्वस्थ बसून राहलो त्याचे हे फळ आहे,—हा वनवास आणि हे कष्ट!" अर्जुन म्हणाला.

"दुष्ट शकुनीमामाचा त्याच वेळी कांटा काढला असता तर हे कष्ट आपल्याला



सहन करावे लागले नसते." सहदेव म्हणाला.

तेव्हां युधिष्ठिर नकुलाला उद्देशून म्हणाला–"नकुला! सर्वांना तहान लागली आहे. तू झाडावर चढून जरा पहा तर, कोठे पाणी दिसत असेल तर भाता भरून घेऊन ये."

नकुलाने झाडावर चढून पाहिले. त्याला जवळच एका जागी पाणी दिसले. तो पाणी आणायला निघाला. तो एका सरो-वराजवळ गेला आणि स्वतः पाणी पिण्या-साठी ओंजळ भरून त्याने पाणी घेतले. त्याच वेळी त्याला आकाशवाणीसारखा आवाज ऐकू आला. जवळपास कोणी मनुष्य दिसला नाही. ती अशरीरवाणी अशी होती–"थांब, तू माझ्या प्रश्नांची प्रथम उत्तरे दे व नंतर पाणी पी. ह्या सरोवराचा मालक मी आहे."

पण नकुलाने त्या वाणीकडे दुर्लक्ष केले व पाणी प्याला आणि बेशुद्ध होऊन पडला.

नकुलाला बराच वेळ न आलेला पाहून युधिष्ठिराने सहदेवाला पाठविले. तो सरो-वराजवळ गेला तेव्हां त्याला नकुल बेशुद्ध होऊन पडलेला दिसला. त्याला फार वाईट वाटले. परंतु तहान लागली होती, म्हणून पाणी पिऊ लागला. ती अशरीरवाणी झाली, पण तिच्याकडे दुर्लक्ष करून तो पाणी प्याला व बेशुद्ध होऊन पडला.

त्यानंतर दोघांना हुडकून आणण्यासाठी युधिष्ठिराने अर्जुनाला पाठविले. त्याला दोघे भाऊ बेशुद्ध होऊन पडलेले दिसले. कोणी शत्रू जवळपास दिसेल म्हणून त्याने चहूंकडे नजर फिरविली. परंतु कोणी दिसला नाही. तेव्हां तहान भागविण्या-साठी तो पाणी पिऊ लागला. त्याच वेळी ती अशरीरवाणी झाली. तेव्हां अर्जुन म्हणाला–"हिंमत असेल तर समोर ये. पाहतो तुझे सामर्थ्य!" असे म्हणत अर्जुन आवाज येत होता त्या दिशेने चालू लागला. नंतर पाणी पिऊन तोदेखील बेशुद्ध होऊन पडला.

नंतर आपल्या भावंडांच्या शोधार्थ भीम गेला व तोदेखील पाणी पिऊन बेशुद्ध होऊन पडला.

शेवटी युधिष्ठिर स्वतः सरोवराजवळ आला व आपल्या सर्व भावंडांना बेशुद्धा-वस्थेत पाहून फार दुःखी झाला. तेव्हां अशरीरवाणी झाली–"मी एक बगळा आहे. या तलावातले मासे हेच माझे खाद्य! माझ्या प्रश्नांची उत्तरे दिल्याशिवाय पाणी प्याल्यामुळे तुझ्या भावंडांची ही गत झाली. माझ्या प्रश्नांची उत्तरे देऊन मग तू पाहिजे तितके पाणी पी. नाहीं तर तुझी पण हीच दुर्गत होईल."

ते ऐकून युधिष्ठिर म्हणाला–"एका पक्षाच्या हाती मरण येण्याइतके माझे भाऊ दुर्बळ अशक्त नाहीत. तू बगळा नाहीस, कोण आहेस खरेखरे सांग! तुला काय पाहिजे?"

"होय, मी बगळा नसून मी यक्षांचा राजा आहे." असे म्हणत तो बगळा एका ताडाच्या झाडाखाली येऊन उभा राहला आणि म्हणाला–"तुला पाणी पाहिजे असेल तर प्रथम माझ्या प्रश्नांची उत्तरे दे."

"विचार, मी शक्य तो उत्तर देण्याचा प्रयत्न करीन." युधिष्ठिर म्हणाला.

यक्षाने प्रश्न विचारले व युधिष्ठिराने समाधानकारक उत्तरे दिली. तेव्हां खूष होऊन यक्ष म्हणाला–"युधिष्ठिरा! तू



दिलेली उत्तरे ऐकून माझे समाधान झाले आहे. मी तुझ्या भावंडांपैकी एकाला जिवंत करू शकेन. सांग, कोणाला जिवंत करू?"

"यक्षराजा! तरमग नकुलाला जिवंत कर!" युधिष्ठिर म्हणाला.

"भीमार्जुनासारख्या प्रतापी सख्ख्या भावंडांऐवजी तू आपल्या सावत्र भावाला जिवंत करण्यास सांगितलेस ते कां?" यक्षाने विचारले.

"माझ्या वडिलांच्या दोघां राण्यांपैकी एकीचा मुलगा मी जिवंत आहे. परंतु माझी सावत्र आई माद्री हिचा एक मुलगा तरी जिवंत राहवा, यासाठी मी तशी विनंती केली." युधिष्ठिर म्हणाला.








"तू धर्मपक्ष घेतलास म्हणून मी तुझ्या सर्व भावंडांना जिवंत करतो." यक्ष म्हणाला आणि तत्क्षण भीम, अर्जुन, नकुल व सहदेव उठून उभे राहले.

"यक्षराज! आपण नुसते यक्षच दिसत नाही, नक्कीच कोणी देव आहांत, आपण कोण, हे सांगण्याची कृपा करावी." युधिष्ठिर म्हणाला.

तेव्हां यक्ष म्हणाला–"युधिष्ठिरा, मी धर्म आहे, तुझा पिता! मी फक्त तुझी धर्मपरीक्षा घेण्यासाठी हा प्रसंग घडवून आणला."

"देवा! एका ब्राह्मणाची अरणी एक हरण उचलून घेऊन पळून गेले आहे. बिचाऱ्या ब्राह्मणांला अग्नी पेटविणे कठीण झाले आहे. त्याच्यावरचे हे संकट कसे टळेल, हे सांगण्याची कृपा करावी." युधिष्ठिराने विनंती केली.

"अरे, मीच तो हरण होतो. ही घे अरणी आणि आतां तू पाहिजे तो वर मागून घे!" धर्म म्हणाला.

"बारा वर्षांचा वनवास संपत आला आहे. आतां आपण, अज्ञातवासात आम्हांला कोणी ओळखू नये असा वर देण्याची कृपा करावी."

धर्म "तथास्तु" म्हणाला व अंतर्धान पावला.

पांडवांनी अरणी ब्राह्मणाला देऊन त्याचा आशीर्वाद घेतला.

पांडवांचा वनवास संपला होता. बरोबर आलेल्या ब्राह्मणांचा निरोप घेऊन अज्ञातवासात कोणत्याही प्रकारचा त्रास होणार नाही, असा त्यांचा आशीर्वाद मिळविला. धौम्यमुनी म्हणाले–"युधिष्ठिरा! स्वत: इंद्राला अज्ञातवासात दिवस काढावे लागले होते. तुम्ही पण या दिव्यातून सुखरूप परत याल, असा मी आशीर्वाद देतो."

त्यानंतर पांडव द्रौपदीसह धौम्यमुनींबरोबर एक कोस चालून गेले आणि त्यानंतर अज्ञातवासात कसा प्रवेश करायचा व काय काय करायचे, याविषयी त्यांनी गुप्तपणे परस्परांचा सल्ला व विचार घेतला.





# शिवपुराण

[१४]

शंकराला तेथे नाही असे पाहून पार्वती घाबरून गेली. तिने रुद्रगणांस शंकराला शोधून काढण्यास आज्ञा केली. त्यांना शंकर गजासुराच्या हृदयातल्या शिवलिंगात निवास करीत असल्याचे कळले.

लगेच पार्वती विष्णूकडे वैकुंठलोकी गेली आणि म्हणाली–"दादा! तुझ्या मेहुण्यांना गजासुराने आपल्या हृदयात लिंगरूपे लपवून ठेवले आहे. तू काय वाटेल तो उपाय करून त्यांना कैलास लोकी घेऊन ये."

विष्णूने पार्वतीला धीर दिला आणि शंकर कैलासलोकी परत येईपर्यंत गणपतीच्या प्रधानाला बजावून सांगितले की कैलास लोक व या सर्वांचे त्यांनी रक्षण करावे. नंतर विष्णू रुद्रगण व वीरभद्रांना बरोबर घेऊन ब्रह्मलोकी गेला. इंद्रादिकांना विष्णूने योजलेल्या प्रयत्नांची माहिती कळली. ते रुद्रगणांचे रूप घेऊन त्यांच्याबरोबर शोणितपूरला आले. नंदीने नंदीबैलाचे रूप घेतले. इतरांनी नंदी बैलाबरोबर वाद्ये वाजवणारांचे आणि विष्णूने नंदीबैलाच्या धन्याचे रूप घेतले. ते सर्व शिवस्तोत्र म्हणत वाजवीत नंदीबैलाला घेऊन शोणितपुराच्या गल्ल्यांबोळांत हिंडू लागले.

नंदीबैल लोक सांगतील तसा माना डोलावतो व नाचतो खेळतो, हे ऐकून गजासुर चकित झाला. त्याने आपल्या राज्यसभेत नंदीबैल घेऊन यायला सांगितले. नंदीबैल नाचू खेळू लागला व त्याला नाचवणारे शिवस्तोत्र म्हणू लागले. शिवस्तोत्र ऐकून गजासुराच्या हृदयातले शिवलिंग वाढू लागले. त्यामुळे गजासुराच्या

चवथ्या मलपृष्ठावरील गोष्ट



छातीत कळा येऊ लागला व श्वासोच्छ्वास सुद्धा बंद होतो की काय असे वाटू लागले. आपले मरण जवळ येऊन ठेपल्याचे त्याला कळले. म्हणून त्याने शेवटचा धावा केला–"हे सांब सदाशिवा! माझे रक्षण कर!"

"गजासुरा! तुझा अंतकाळ जवळ येऊन ठेपला आहे. वर मागून घे!" शंकर म्हणाला.

"माझ्या डोक्याची पूजा होत रहावी, माझे चर्म तू धारण करावे आणि माझा पुनर्जन्माचा फेरा सुटेल असे वर द्यावे." गजासुर म्हणाला.

शंकराने ते तिन्ही वर गजासुराला दिले. उंदीर रूपे गजासुराने शंकराजवळ रहावे, असा वर गजासुराला देऊन शंकर गजासुराच्या हृदयातून बाहेर आला.

त्यानंतर ब्रह्मा, विष्णू, इंद्र, नंदी आदिकांनी आपले पूर्व रूप धारण केले आणि शंकराला नमस्कार केला. नंतर रुद्रगणाला बरोबर घेऊन शंकर कैलास लोकी परतला. शंकराने येण्यापूर्वी पार्वतीकडे गजासुराचा वध करून परत येत असल्याचा निरोप पाठविला.

परंतु त्यापूर्वीच पार्वतीला ती बातमी कळली होती. म्हणून तिने न्हाऊन गृहदेवांची पूजा करण्याचे ठरविले होते. यासाठी ती स्नानाला गेली तेव्हां तिने लक्ष्मीगणाधिपांना सांगून ठेवले होते की मी न्हायला जात आहे. माझ्या अनुज्ञेशिवाय कोणाला आत येऊ देऊ नका.

परंतु थोड्याच वेळात नंदी आदिक आणि रुद्रगण शंकराचा निरोप घेऊन आले आणि आत जाऊ लागले. तेव्हां लक्ष्मीगणाधिपतींनी त्यांना पार्वती स्नान करीत असल्याचे व कोणाला अनुज्ञेशिवाय आत न येऊ देण्यास सांगितले असल्याचे सांगितले आणि म्हणाले–"देवीची अनुज्ञा मिळाल्याशिवाय आत जाता येणार नाही."

"व्हा बाजूला, म्हणे अनुज्ञेशिवाय आत जाता येणार नाही! प्रत्यक्ष शंकर महादेवाची आज्ञा आहे. त्यांच्या आज्ञेचा भंग करण्याची प्राज्ञा त्रिलोकात कोणाला आहे का?" असे सांगून रुद्रगण लक्ष्मीगणांशी युद्धास तयार झाले. आरडाओरडा वाढू लागला.

ते ऐकून पार्वतीची एक सखी पार्वतीला म्हणाली–"ताई! लक्ष्मीगणांशी रुद्रगण युद्ध करीत आहेत."

रुद्रगणांच्या त्या उर्मटपणाचा पार्वतीला राग आला. तिने लक्ष्मीगणांच्या मदतीला देवगणास पाठविले. लक्ष्मीगण व देवगण दोघांनी मिळून रुद्रगणांना पिटाळून लावले. त्यांनी शंकराकडे जाऊन त्या गोष्टीची तक्रार केली.

त्यावेळी तेथे नारद उपस्थित होता. तो म्हणाला–"पार्वतीच्या द्वारपालकांना एवढा गर्व झाला आहे का? शंकराच्या आज्ञेची सुद्धां त्यांना फिकीर नाही?"

शंकर सेवकांना जखमी झालेले पाहून फार रागावला होता. नारदाच्या बोलण्याने त्याचा राग जास्तच वाढला. त्याने आपले त्रिशूल सोडले आणि लक्ष्मीगणांची डोकी उडविली. आपल्या मुलांची झालेली ही स्थिती पाहून पार्वती शोक करू लागली.

आता पार्वतीच्या दारावर कोणी द्वारपालक नव्हता. म्हणून शंकर ब्रह्मा, विष्णू आदिकांना घेऊन घरी आला. तोंपर्यंत पार्वतीचे स्नानादी संपले होते व ती वस्त्रालंकार धारण करून आली होती व आपल्या मुलांची ती स्थिती पाहून शोक करीत बसली होती. म्हणून ती शंकराच्या











स्वागतास उठलीदेखील नाही. शंकर जवळ जाऊन तिची समजूत घालू लागला, पण पार्वतीने मान वर करूनदेखील त्याच्याकडे पाहिले नाही.

तेव्हां विष्णू पार्वतीला म्हणाला–"ताई! शंकर गजासुराचा वध करून व त्रिलोकाला सुखी करून येत आहे आणि तू अशी रुसून रागांवून कां बसली आहेस? तुला कोणत्या गोष्टीचे दुःख आहे? मला सांग, मी कांही करता आले तर करीन."

पार्वती विष्णूला म्हणाली–"दादा! तुझ्या मेहुण्याने विनाकारण माझ्या मुलांचा, लक्ष्मीगणांचा वध केला आहे. त्यांना जिवंत करून त्यांना मी जो अधिकार दिला होता तो दिला जात नाही तोंपर्यंत माझे दुःख दूर होणार नाही."

ब्रह्मा, विष्णू व महेश तिघांनी त्या गोष्टीवर विचार केला. तेव्हां शंकराने गजासुराला दिलेला वर आठवला. त्याने त्याच्या डोक्याचे पूजन व्हावे व त्याचे चर्म शंकराने ओढावे असा वर मागून घेतला

देह मागविण्यात आला आणि गजासुराचे डोके मागवून ते त्या धडावर ठेवण्यात आले. त्या बरोबर लक्ष्मीगणाधिपति जिवंत होऊन उभा राहला जणुकाही झोपेतून आतांच जागा झाला. त्याने पार्वती व विष्णूला नमस्कार केला. त्यानंतर त्याचप्रमाणे बाकी वीस गणाधिपतींच्या धडावर हत्तीचे तोंड बसविण्यात आले. ते सर्व जिवंत झाले. लक्ष्मीगण जिवंत झालेले पाहून पार्वतीला परमानंद झाला.

त्या वेळी विश्वदर्शी नामक उपब्रह्मा उठून म्हणाला–"हे शिवपार्वती! मी जगलक्ष्मी आदिक आपल्या मुलींचा विवाह लक्ष्मीगणाधिपतीशी करावा म्हणतो."

सर्वांना ती सूचना मान्य झाली. ब्रह्मदेवाने पौराहित्य केले आणि विश्वदर्शीच्या मुलींचा विवाह गणाधिपतींशी झाला. सर्व गणाधिपतींचा लक्ष्मीगणपती हा नायक होता आणि त्याच्या पत्नीचे नाव जयलक्ष्मी होते.



# १२४. सिनाय पर्वत

याच सुप्रसिद्ध पर्वतावर मोजेसने आपले "दहा आदेश" (Ten commaidments) स्वीकारले होते. खालच्या किल्ल्यात ख्रिश्चनानी आश्रय घेतला होता. सिनाय पर्वत वाळवंटात आहे.






कर्मायत्तं फलं पुंसां,
बुद्धिः कर्मानुसारिणी ;
तथापि सुधिया भाव्यं
सुविचार्यैव कुर्वता । ॥ १ ॥

[ माणसाला तो जसे काम करतो तसे फळ मिळते. कामाप्रमाणे बुद्धि चालते; तरी बुद्धिवंताने विचार करून काम करावे.]

कुदेशं च, कुवृत्तिं च,
कुभार्यां, कुनदीं, तथा,
कुद्रव्यं च, कुभोज्यं च
वर्जयेत्तु विचक्षणः । ॥ २ ॥

[ सदसद् विवेक बुद्धि असलेल्या माणसाने वाईट देश, वाईट धंदा, वाईट पत्नी, वाईट नदी, वाईट पैसा व वाईट भोजन सोडावे.]

यो ध्रुवाणि परित्यज्य,
अध्रुवं परिषेवते,
ध्रुवाणि तस्य नश्यंति,
अध्रुवं नष्टमेव च । ॥ ३ ॥

[ स्थिर वस्तू सोडून जो अस्थिर वस्तू स्वीकारतो त्याला स्थिर वस्तूचा लाभ होत नाही व अस्थिर वस्तूदेखील त्याच्या हाती येत नाहीत.]




एका जमीनदाराच्या गावी एक म्हातारी आपल्या नातवाबरोबर रहात असे. गरीबीमुळे त्यांना दोन घासदेखील सुखाचे मिळत नसत. एक पावलीदेखील त्यांना पुतळीसारखी वाटे. अशा स्थितीत म्हातारीच्या मनात एक विचार आला. तिला एक मंत्र येत होता. त्या मंत्राच्या सहाय्याने तिला सशाचे रूप घेता येत होते. तिने त्या मंत्राचा उपयोग थोडे पैसे मिळवायला करण्याचे ठरविले.

त्या गावाच्या जमिनदाराला अमुक जागी एक ससा दिसला असे कोणी सांगितले तर जमिनदार त्याला काही तरी बक्षिस देई. म्हातारीला ती गोष्ट माहीत होती. म्हणून ती आपल्या नातवाला म्हणाली—"तू जाऊन जमिनदाराला तुला चिंचेच्या झाडाखाली एक ससा दिसला असे सांग. तो तुला काही तरी बक्षिस देईल. परंतु तुला कोणी पाठविल्याचे सांगू नकोस."

आजीने सांगितल्याप्रमाणे नातवाने जमिनदाराकडे जाऊन त्याने चिंचेच्या झाडाखाली एक ससा पाहिला असल्याचे सांगितले. त्या जमिनदाराने मुलाच्या हातात बक्षिस म्हणून एक पावली ठेवली आणि सशाच्या शोधार्थ निघाला.

मुलाने सांगितल्याप्रमाणे जमिनदाराला खरोखरच चिंचेच्या झाडाखाली एक ससा दिसला. लगेच जमिनदाराने आपले शिकारी कुत्रे त्याला धरायला सोडले. परंतु कुत्रे जवळ येण्यापूर्वीच ससा एका झुडपात शिरला आणि घरी आल्यावर पुन्हा एक म्हातारी झाला. जमिनदाराने सशाचा पुष्कळ शोध केला आणि शेवटी निराश होऊन घरी परतला. त्यानंतर असाच कित्येक वेळां म्हातारीचा नातू जमिनदाराला ससा

पाहिल्याचे सांगे व जमिनदाराकडून बक्षिसाच्या पावल्या मागून घेऊन येई. जमिनदार प्रत्येक वेळी शिकारीच्या तयारीने जाई व प्रत्येक वेळी ससा जमिनदाराच्या डोळ्यात धूळ फेकून नाहीसा होई.

एकदा म्हातारी आपल्या नातवाला म्हणाली—"बेटा! जमिनदार आपल्याला पावली देतात ना तेवढ्यावर आपल्या पोटापाण्याची व्यवस्था होत आहे. परंतु यात धोका आहे जिवाला. मला वाटते की जमिनदाराला सुद्धा यात काही तरी लबाडी असल्याचा संशय नक्कीच आला असेल. त्याला खरी गोष्ट कळली तर तो आपल्याला जिवंत सोडणार नाही."

म्हातारीला वाटत होती ती भीती खरी ठरली. जमिनदाराला प्रत्येक वेळी शिकारी कुत्र्यांना पाहतांच ससा निसटून पळून जातो, यात काही तरी गुपित असावे, असा संशय आला. म्हणून या खेपेस ज्या वेळी म्हातारीचा नातू सशाची बातमी घेऊन आला त्याच्या आधी जमिनदाराने कुत्रे [illegible] सांगताच त्याने सशावर कुत्रे सोडले.

या खेपेस कुत्र्याने सशाचा पाठलाग केला आणि ससा म्हातारीच्या झोपडीत शिरेपर्यंत त्याचा पिच्छा पुरविला. ससा एका लहानशा भोकातून झोपडीत शिरला. शिकारी कुत्री त्या भोकाजवळ उभी राहून भुंकू लागली. जमिनदाराने झोपडीजवळ जाऊन दार वाजविले. म्हातारीने दार उघडले, परंतु ती त्या वेळी धापा टाकीत होती. सशाच्या रूपाने तिला जे पळावे लागले होते, त्यामुळे दम लागला होता.

जमिनदाराने रागाने तिला विचारले—"ससा कोठे आहे? तूच ससा झाली होतीस का?"

म्हातारीने रडतरडत आपल्या गरीबीची रडकथा सांगितली पोट भरायला दुसरा उपाय नव्हता म्हणून तिला जो मंत्र माहीत होता त्याचा प्रयोग स्वतःच्या पोटासाठी तिला करावा लागला. त्यात जमिनदाराला फसविण्याचा हेतू मुळीच नव्हता.





# जादूच्या वनस्पती

फार जुनी गोष्ट आहे. एका गावी एक दुष्ट जमिनदार रहात असे. कोणी त्याच्या दारी भीक मागायला जाई तेव्हां तो मारहाण करून त्याला हाकलून लावी. कोणी भीक मागायला येऊ नये म्हणून तो आपली कुत्री त्यांच्यावर सोडी.

एकदा गावी दुष्काळ पडला. कोणाला एक वेळदेखील पोटभर खायला मिळत नसे. परंतु जमिनदाराची कोठारे धान्याने भरलेली होती. लोकांनी जमिनदाराकडे जाऊन दयेची भीक मागितली, परंतु त्याचे दगडाचे काळीज विरघळले नाही. ते पाहून गावातला एक तरुण त्यांना म्हणाला—"मी जमिनदाराकडून पुष्कळ धान्य देववतो. तो जमिनदाराच्या बागेत गेला आणि एका झाडाखाली बसून झाडाच्या फांद्यांकडे पहात राहिला.

जमीनदार खाऊनपिऊन खिडकीजवळ येऊन उभा राहिला. त्याची नजर त्याच वेळी त्या तरुण माणसावर पडली. जमिनदाराला तो कोणीतरी चोर असावा असे वाटले. त्याने दरडावून विचारले—"कोण रे तू? काय करतो आहेस तेथे बसून?" त्या तरुणाने जणुकाही त्याला काहीच ऐकू न आल्याचे सोंग केले व फांद्यांकडे पहात बसला.

जमिनदार बाहेर येऊन म्हणाला—"अरे, वर फांद्यांकडे काय पाहतो आहेस? मी हाक मारली, पण तू उत्तरदेखील दिले नाहीस? बहिरा आहेस की मुका?"

"काही नाही हो, वर एक घरटे आहे, तिकडे पहात होतो. काल मी अग्निपक्ष्याला या झाडावर बसतांना पाहिले होते. त्या पक्ष्याने येथे घरटे बांधले आहे. त्याच्या घरट्यात मला एक जादूची वनस्पती मिळेल. पहा, त्या फांदीच्या टोकाला एक घरटे आहे." तो तरुण म्हणाला.

"जादूचा वनस्पती? तो कसा काय असतो बुवा?" जमिनदाराने विचारले.

"तो एक विचित्र वनस्पती आहे. एक हजार वर्षांनी एकदा त्याला फुले येतात. त्या फुलांची फळे व्हायला आणखी एक हजार वर्षे लागतात. परंतु त्या वनस्पतीच्या बारीकशा काडीत देखील एक अद्‌भुत शक्ती असते." तरुण म्हणाला.

"अरे पण ती अद्‌भुत शक्ती कशी काय असते हे तर सांगशील." जमिनदाराने थोडे चिडक्या स्वरात विचारले.

"एक शक्ती अशी आहे की त्याची एक बारीकशी काडी आपण आपल्या केसात ठेवून घेतली तर आपणांला कोणी पाहू शकत नाही; परंतु आपल्याला सर्व काही

ते करता येते. दुसरी गोष्ट..." तो तरुण पुढे काही बोलणार इतक्यात जमिनदार गरजला–"पहिल्याने तू बाहेर चालता हो!"

त्या तरुणाने चारीबाजूला एकदा पाहून जमिनदाराला विचारले–"आपण कोणाशी बोलत आहां? येथे तर तिसरा कोणी दिसत नाही?"

"मी तुलाच सांगतो आहे, बाहेर चालता हो! तो वनस्पती माझा आहे. ही बागपण माझी आहे." जमिनदार आणखी जास्त उच्च स्वरात ओरडून म्हणाला.

"ओहो, अस्सं! परंतु याचा शोध मी लावला. मी वाटल्यास तो वनस्पती नष्ट

देखील करू शकतो." असे म्हणत तो तरुण त्या झाडावर झपाझप चढू लागला.

"बरे तर थांब, मी तुला शंभर सुवर्ण मुद्रा देतो." जमिनदार म्हणाला.

"क्षमा करा. मी इतक्या स्वस्तात तो विकायला तयार नाही." तरुण म्हणाला.

जमिनदार त्याच्याजवळ किमत कमी जास्त करण्याबद्दल मोलभाव करू लागला.

"मला पैशाची गरज नाही. तुम्ही पन्नास पोती धान्य द्यायला तयार असाल तर मी तो वनस्पती सोडून द्यायला तयार आहे." तरुण म्हणाला.

त्याची ती अट जमिनदाराने मान्य केली. तेव्हां त्या तरुणाने ती सर्व पोती घेऊन जाऊन गरीबांना वांटून टाकली.

तिकडे जमिनदाराने आपल्या नोकरांकरवी घरटे उतरविले आणि ते आपल्या बायकोजवळ नेऊन देऊन म्हणाला–"सांग, मी आतां काय केले?"

"मला काय माहीत? कोणाला फसविले असेल." बायको म्हणाली.

"तुला काय कळणार? मी एक जादूचा वनस्पती संपादन केला आहे. त्याच्या सहाय्याने आपल्याला अपार धन मिळेल." जमिनदार म्हणाला.

जमीनदाराच्या बायकोने घरट्याकडे सशंक दृष्टीने पाहिले व म्हणाली–"हाच का तो जादूचा वनस्पती?" त्या घरट्यात वाळक्या काटक्या व गवताच्या काड्या होत्या.





"आपल्याला काटक्यात जादूचा वनस्पती कोणता हेच शोधून काढावयाचे आहे. मी एकेक काडी डोक्यावर ठेवून पाहतो. मी केव्हां एकाएकी दिसेनासा होतो, फक्त तेवढेच तू सांग." असे सांगून जमिनदार एकेक काडी उचलून आपल्या डोक्यावर ठेवून बायकोला विचारू लागला–"मी दिसतो का?" आणि बायको प्रत्येक वेळी म्हणे–"होय, छान दिसतां आहां." असे दहा एक वेळ तरी झाले असेल.

शेवटी बायको इतकी चिडली की ती असे सांगून उठून निघून गेली की मला आतां काही एक दिसत नाही. तेव्हां जमिनदाराला वाटले की त्याच्या डोक्यावर त्या वेळी जी काडी होती तीच तो अद्भुत शक्ती असलेला वनस्पती असावा. त्यानंतर तो मूर्ख जमिनदार ती काडी डोक्यावर ठेवून गावात निघाला.

वाटेत एका जागी मिठाईच्या दुकानातून खमंग वास येत होता. त्याला मिठाई खावीशी वाटली. दुकानातले दोन लाडू घेऊन खात स्वारी जाऊ लागली.

[illegible] त्याला वाटले की जमिनदार घाईत पैसे द्यायला विसरला असेल. परत जातांना देऊन जाईल असा विचार करून तो काहीच बोलला नाही.

जमिनदाराला वाटले की दुकानदाराला तो दिसलाच नसावा, म्हणून त्या पैशा-करिता त्याला अडविले नाही. म्हणून त्याची हिंमत वाढली.

एका दुसऱ्या दुकानाचा मालक दुकान बंद करून पैसे मोजीत होता व पिशवीत भरीत होता. पैसे पाहून जमिनदाराला लोभ आवरेना. त्याने दुकानदाराजवळ जाऊन त्याच्या हातातली पिशवी ओढून घेतली. त्या दुकानदाराने लगेच जमिन-दाराचा हात धरला आणि मोठ्याने ओरडला–"चोर, चोर! पकडा याला!" तेथे लोकांची गर्दी जमली. सर्वांनी जमिन-दाराला खूप बडविले. जमिनदार कसातरी त्याचे काय चुकले याचा विचार करीत घरी पोंचला.





# शिलारथ

[ २९ ]

[ खड्गवर्मा व जीवदत्त पुजारी आणि स्वर्णाचारी दोघांना बरोबर घेऊन जंगलात गेले. तेथे एका झाडाखाली वाघाचे छावे धरून एक तरुण ओरडत असलेला दिसला. खड्गवर्मा व जीवदत्त त्याच्याजवळ पोंचले तेव्हां गेंड्यावर बसून एका माणसाने पुढे येऊन त्यांना कैद करायला आपल्या अनुयायांना आज्ञा केली. पुढे– ]

गेंड्यावर बसून येणाऱ्या माणसाने आपल्या अनुयायांना सावध करून खड्गवर्मा व जीवदत्त दोघांना कैद करायला सांगितले. तेव्हां जीवदत्तने कुबडीचा वार गेंड्यावर बसून येणाऱ्या माणसाच्या टाळक्यात केला. तो मनुष्य "अरण्यमाते!" असे म्हणत जमिनीवर बेशुद्ध होऊन पडला.

"ए अरण्यमातेच्या पोरांनो! हत्यारे खाली टाका आणि आम्हांला शरण या. नाहीं तर तुम्हांला तुमच्या अरण्यमातेकडे पाठवून देऊ." जीवदत्त म्हणाला.

"या आमच्या वाघाला तुमच्या अंगावर सोडू की तुम्ही झुडपाआडून निमूटपणे समोर येता?" खड्गवर्माने दरडावून विचारले.

चौघे रानटी तरुण दोन्ही हात वर करून झाडीतून समोर आले. त्यांच्या हातात दगडी हत्यारे होती.












"तुम्ही आपली हत्यारे खाली टाका. जीवदत्तने त्यांना बजावले आणि खड्गवर्माला म्हणाला–"मित्रा! हे लोक जंगली आणि मागासलेले दिसतात. परंतु या तरुणाने आपल्या समोर आणखी एक प्रश्न उभा केली आहे. आता विन्ध्य पर्वतापर्यंत जायचे कसे?"

जीवदत्तचे ते शब्द ऐकून तो तरुण घाबऱ्या आवाजात म्हणाला–"अहो, मला सुद्धा आपल्या बरोबर घेऊन चला. वाघाच्या तोंडातून मला वांचवून तुम्ही मला अरण्यपुरच्या गणाचारीच्या हातात देणार का? तो मला जिवंत भाजून खाईल."

इतक्यात पुजारी व स्वर्णाचारी झाडावरून उतरून खाली आले.

"अरे तुम्ही दोघ अजून जिवंत आहां वाटते? होतां कोठे इतका वेळ?" खड्गवर्माने विचारले.

"हे वीरश्रेष्ठ हो! आम्ही झाडांवर पानांच्या आड लपून तुमचे शौर्य व साहस पहात होतो." विघ्नेश्वर पुजारी म्हणाला.

"अरे मग खाली येण्याची घाई कशाला केलीत?" असे म्हणत खड्गवर्मा जीवदत्तकडे वळून म्हणाला–"जीवदत्त! यांची ब्याद कशाला आणखी बरोबर न्यायची? यांना येथेच सोडून जाऊ या."

"खड्गवर्मा! घाई करू नकोस! यांना इतक्या सहजी सोडून देता येणार नाही." जीवदत्त म्हणाला.

तेव्हां तो तरुणाला म्हणाला–"तुझे नाव काय? तू या संकटातून वांचला आहेस. म्हणून अरण्यपूरच्या गणाचारीच्या तावडीतून आपली सुटका करून घेऊन पळून जा."

"माझे नाव अरण्यमल्ल आहे. गणाचारीच्या नजरेतून स्वतःचा बचाव करून या जंगलांत जिवंत राहणे अशक्य आहे. म्हणून मला बरोबर घेऊन चला. त्याने मला फसवून माझी गादी बळकावली आहे." तो तरुण म्हणाला.

"बरे तर तुझा प्रश्न सुद्धा सोडवून मग आम्ही पुढे जाऊ. परंतु हे सांग की गणाचारीने तुला कसे काय फसविले आणि गादी बळकावली?" जीवदत्तने विचारले.

अरण्यमल्लने आपली करुण कथा थोडक्यात सांगितली. अरण्यमल्लचा बाप अरण्यपुराचा राजा होता. तीन महिन्यापूर्वीच तो वारला. त्या दिवसापासून गणाचारी अरण्यमल्लचा कांटा दूर करण्याचा प्रयत्न करीत होता. परंतु त्याला त्यात यश मिळाले नाही. तेव्हां शेवटी एका आठवडयापूर्वी गणाचारीने आपल्या जातीच्या सर्व प्रमुख लोकांना अरण्यमातेच्या देवळात बोलाबून सांगितले की अरण्यमातेने त्याला स्वतः बोलावून सांगितले की अरण्यमल्ल गादीला वारस होण्यालायक नाही. पाहिजे तर सर्वांनी अरण्यमातेच्या तोंडी ती गोष्ट ऐकून घ्यावी.

त्यानंतर त्याने अरण्यमातेला धूपदीप दाखवून तिची पूजा केली व विचारले– "माते! अरण्यमल्ल या गादीवर बसण्यालायक आहे का की आणखी कोणी योग्य व्यक्ती तुझ्या मते आहे?"

लगेच त्या मूर्तीच्या तोंडातून सर्वांना ऐकू आले–"अरण्यमल्ल, अगदी नालायक आहे. तू माझा गणाचारी आहेस. तू गादीवर बसलास तर प्रजा सुखी होईल."

"माता काय म्हणते आहे ते सर्व ऐकत आहां ना?" असे म्हणत गणाचारी आनंदाने नाचू लागला.



अरण्यमल्लला ते सर्व नाटक वाटले त्याने हातातल्या दगडी गदेने अरण्यमातेच्या मूर्तीवर प्रहार केला आणि मूर्तीचा एक हात तुटून पडला.

"अरण्यमातेचा अपमान करणाऱ्या त्या मूर्खाला पकडा! त्याला त्याच्या पापाची फळे चाखायला लावा." गणाचारी ओरडून म्हणाला. काही तरुण मंडळी अरण्यमल्लला धरायला धावली. परंतु तो त्या पूर्वीच दाट झाडीत पळून जाऊन लपून बसला. गणाचारीच्या अनुयायांनी त्याला पकडण्यासाठी सर्व जंगल पालथे घातले. आता आपला बचाव होणे अशक्य आहे असे वाटून तो समोर एक वाघीण व्यालेली



दिसली तिच्या छाव्यांना उचलून पळू लागला.

"अरण्यमल्ल! दगडाच्या मूर्तीकडून बोलवणाऱ्या त्या गणाचारीला एकदा पाहून यायचा आमचा विचार आहे. म्हणून आम्हांला अरण्यपूरला घेऊन चल." जीवदत्त म्हणाला.

अरण्यमल्ल कापऱ्या आवाजात म्हणाला–"काय म्हणतोस?- तुम्हांला सरळ अरण्यपूरला घेऊन जाऊ? त्या दुष्टाचे शेकडो अनुयायी आहेत."

"काय रे! तुम्ही आम्हांला अरण्यपूरची वाट दाखवता की सोडू या आमच्या वाघाला तुमच्या अंगावर?" खड्गवर्माने थट्टेत विचारले. घायाळ झालेला रानटी लोकांचा नायक ते ऐकून थरथर कापू लागला. म्हणाला–"मालक! आम्हांला वाचवा! अरण्यमातेने स्वतःच अरण्यमल्ल पापी असल्याचे सांगितले. मग त्याला आम्ही कशी काय मदत करणार?"

ते ऐकून जीवदत्त त्याला म्हणाला–"ते खरे आहे की खोटे आहे, हे लवकरच कळेल. चला अरण्यपूरला!"

सर्वजण अरण्यपूरला निघाले. खड्गवर्माने वाघाच्या छाव्यांना खांद्यावर उचलून घेतले आणि वेलाच्या दोरीने बांधून ठेवलेल्या वाघिणीला धरून निघाला. दिवसभर पायी प्रवास करून सूर्यास्ताच्या सुमारास सर्वजण अरण्यपूरनजीक येऊन पोचले. त्या सर्वांना पाहून गणाचारी व त्याचे अनुयायी घाबरून गेले.

जीवदत्त आपली कुबडी वर उचलून जरा करड्या आवाजात म्हणाला–"ए अरण्यपूरच्या गणाचाऱ्या! मला वाटले होते की तुझी राजधानी म्हणजे नगर किंवा मोठी वस्ती असेल. पण येथे तर आहेत त्या सर्व गुहाच गुहा, घरकुलासारख्या लहान लहान चिटुकल्या! मी मंत्र टाकून सर्व भस्म करून टाकीन. मी येथे कशासाठी आलो आहे, हे या गेंड्स्वाराला विचारून घ्या. चांगले कान उघडून ऐका!"

त्या गोष्टींचा परिचय करून दिला.

ते सर्व ऐकून गणाचारी जास्तच घाबरून गेला आणि खड्गवर्मा व जीवदत्त यांना लवून नमस्कार करून म्हणाला–"मालक! या अरण्यमल्लने आमच्या अरण्यमातेचा अपमान केला आहे. अरण्यमातेने स्वतः मी गादीला वारस होण्यालायक असल्याचे सांगितले. तुम्हांला सुद्धां मातेचा आदेश ऐकावयाचा असेल तर रात्री दहाच्या सुमारास मातेच्या देवळात या."

"आम्ही येऊ! अरण्यमाता काय म्हणते ते आम्ही ऐकून घेऊन या अरण्यमल्लला आमच्या या वाघिणीसमोर फेकून आम्ही आपल्या वाटेने निघून जाऊ." जीवदत्त म्हणाला.

गणाचारीचे अनुयायी त्यांना एका पडक्या घरात बोलावून घेऊन गेले. तेथे त्यांच्या उतरण्याची व्यवस्था करण्यात आली.

नी पौर्णिमेची रात्र होती. चांदण्यात अरण्यपूर व जवळपासचे डोंगर चांदीचा मुलम्मा चढविल्यासारखेच दिसत होते. बरोबर दहा वाजता गणाचारीचा एक अनुयायी त्यांना बोलावून घेऊन जायला आला आणि अरण्यमातेच्या देवळात चलायला दोघांस सांगितले. ते विघ्नेश्वर पुजारी व स्वर्णाचारी दोघांना बरोबर घेऊन देवळात



येऊन पोचले. तोपर्यंत गणाचारी व त्याच्या अनुयायांची मोठी गर्दी जमा झाली होती.

खड्गवर्मा व जीवदत्त दोघांनी अरण्यमातेच्या मूर्तीजवळ जाऊन मूर्ती लक्षपूर्वक पाहून घेतली. मूर्ती उंच होती. तिचा हात तुटलेला होता. तिच्या उजव्या हातात एक दगडी गदा होती. मूर्तीचे तोंड उघडे होते.

मूर्तीसमोर एका ताटात निखारे होते. गणाचारीने त्याच्यावर धूप टाकल्याबरोबर धूर निघू लागला. थोडा वेळ तो मंत्र म्हटल्यासारखा काहीतरी गुणगुणला. इतक्यात त्याचा एक अनुयायी काही फळे घेऊन आला. गणाचारीने दोन केळी घेऊन अरण्य-



मातेच्या उघडया तोंडात टाकलां आणि विचारले–"हे माते! आणखी एकदां गादीला वारस होण्यालायक कोण आहे, हे सांगशील का, मी की अरण्यमल्ल ?"

पाठोपाठ मूर्तीच्या तोंडातून हे शब्द बाहेर पडले–"अरण्यमल्ल पापी आहे. त्याने माझा एक हात तोडला. ए गणाचाऱ्या, तूच या राज्याचा राजा होण्यालायक आहेस. या अरण्यमल्लला माझ्यासमोर बली देऊन टाक."

"ऐका, ऐका, मातेची आज्ञा ऐका." असे म्हणत गणाचारी आनंदाने नाचू लागला.

जीवदत्तने स्मित करून खड्गवर्माला काहीतरी कानात सांगितले. खड्गवर्मा उपसून उभा राहला. जीवदत्तने एकदा गणाचारीकडे पाहिले आणि मूर्तीसमोर ठेवलेले खाद्यांचे ताट उचलून मूर्तीच्या उघडया तोंडात ते ओतले. दुसऱ्या क्षणाला मूर्तीच्या पोटातून एक किंकाळी ऐकू आली. सर्व चकित होऊन त्या आवाजाकडे पाहू लागले. मूर्तीच्या पोटात लाकडी पेटी होती. ती पेटी उघडली तेव्हां तीतून एक तरुण मुलगा अर्धवट कपडे भाजल्याने अर्धमेलेल्या स्थितीत बाहेर आला.

या सर्व गोष्टी काही क्षणात घडल्या. लबाडी बाहेर आलेली पाहून गणाचारी घाबरला आणि स्वतःच्या बचावासाठी पळू लागला. तो देवळाबाहेर पडणार तेवढ्यात खड्गवर्माने आपल्या तलवारीने वाघिणीच्या गळ्यात बांधलेली वेलाची दोरी कापून टाकली. वाघिणीने त्या पळणाऱ्या गणाचारीला पकडले. त्याच वेळी तिचे दोन्ही छावे तिच्याजवळ पळत गेले.

रात्रीच्या चांदण्यात ते भयंकर दृश्य पाहून सर्व जंगली लोक घाबरले. जीवदत्तने त्यांना विचारले–"पाहिलीत ना गणाचारीची लबाडी? तो तुम्हांला असाच इतके दिवस फसवीत आला होता. आता तुम्हीच ठरवा, तुम्ही कोणाला आपला राजा करणार ते."

"आमचा राजा अरण्यमल्ल आहे. अरण्यमल्ल की जय!"

"ठीक, अरण्यमल्ल येथे आलेला आहे. तुम्ही त्याचा राज्याभिषेक करून त्याला गादीवर बसवा. आम्ही वर चांदण्या रात्रीची गंमत पहात गच्चीवर आराम करतो." असे सांगून जीवदत्त आपल्या बरोबरच्या लोकांबरोबर वर गच्चीवर निघून गेला.

थोडया वेळाने एक वादळ आल्यासारखे वाटले. जंगलातली सर्व झाडे जोराने हालू लागली. ढगांचा गडगडाट सुरू झाला. जीवदत्त व त्याच्या साथी मित्रांनी ती सर्व गडबड स्वतःच्या डोळ्यांनी पाहिली. दुरून एक काळया ढगासारखे काहीतरी त्यांच्याकडे येऊ लागले. सर्व भयभीत होऊन त्यांच्याकडे पाहू लागले. त्याच वेळी ती काळी वस्तू त्यांच्या डोक्यावर येऊन आकाशात थांबली. तो ढग नव्हता. फार दिवसांपूर्वी पद्मपूरच्या राजकन्येने खड्गवर्मा व जीवदत्त दोघांना दगडाचा जो शिलारथ दिला होता अगदी त्याच आकृतीचा तो रथ होता.

त्या रथात एक यक्ष बसलेला होता. त्याच्या बाजूला राजकन्या पद्मावती बसली होती. यक्ष गंभीर आवाजात म्हणाला–"खड्गवर्मा आणि जीवदत्त! आतां तुम्ही विन्ध्य पर्वतात जाऊन शिलारथ हालवण्याची गरज नाही. तो रथ हलवून मी त्या रथात बसून आकाशमार्गे पद्मपूरला जात आहे. तेथे राजकन्या पद्मावतीशी विवाह करून मी आपल्या गावी परत जाईन."



"ही राजकुमारी रथात कशी? तिला अपहरण करून आणलेस की काय? राजकन्या! यक्ष म्हणतो आहे ते खरे आहे का?" जीवदत्तने विचारले.

जीवदत्तच्या प्रश्नाचे उत्तर म्हणून यक्ष खदखदा हसला. शिलारथ पुढे निघाला आणि पाहता पाहता अदृश्य झाला. "जीवदत्त, आपण केलेला सर्व प्रयत्न फुकट गेला, म्हणायचा!" खड्गवर्मा निराश होऊन म्हणाला.

"नाही, आपला श्रम व्यर्थ गेला नाही. आपण शूर वीर आहो, हे दर्शविण्यासाठी पद्मपूरहून निघालो होतो. वाटेत आलेल्या संकटांना आपण साहसाने तोंड दिले. त्यासाठी कोणाच्या मदतीची अपेक्षा ठेवली नाही. स्वतःच्या मनगटाच्या बळावर अवलंबून राहलो आणि खरोखरच आपण शूर वीर असल्याचे दाखवून दिले. मग आपण निराश व दुःखी होण्याचे कारणच काय?"

"तू म्हणालास तेदेखील बरोबरच आहे. आता आपण या अरण्यपुरातच काही दिवस विश्राम करू या. याच्या आसपासच्या प्रदेशावर आपण आपले राज्य स्थापन करू या का?" खड्गवर्माने विचारले.

"फार छान, तुझी सूचना मला पटली. आता काही दिवस तरी आपण अरण्य-पुरातच रहावयाचे. राज्य स्थापनेसंबंधी आपण स्वस्थपण विचार करू." जीवदत्त म्हणाला.

[illegible] निर्माण करण्याची जबाबदारी माझ्यावर टाका. वास्तुशास्त्रात माझी मय राक्षसा इतकीच गती आहे." स्वर्णाचारी गर्वाने म्हणाला.

"वीरपुरुष हो! आपल्या तलवारीने किंवा स्वतःच्या शक्तिसामर्थ्याने तुम्हांला जे शक्य होणार नाही ते मी आपल्या चातुर्याने व कूट नीतीने साध्य करीन. मी या बाबतीत शकुनीमामाहून कमी नाही." विघ्नेश्वर पुजारी आपल्या चातुर्याच्या बढाया मारीत म्हणाला.

"तुमच्या योग्यतेवर आपचा पूर्णविश्वास आहे. आतां मध्यरात्र उलटली आहे. आम्ही थोडा वेळ या चांदणीत स्वस्थपणे विश्रांती घ्यावी, म्हणतो." असे सांगून जीवदत्त जमि-नीवर विश्रांतीसाठी आडवा झाला. त्याच्या पाठोपाठ खड्गवर्मा, विघ्नेश्वर पुजारी आणि स्वर्णाचारी सोयीची जागा पाहून सर्व जगाला विसरून शांतपणे झोपले. (संपूर्ण)



# बरे वाईट

विक्रमादित्याने हट्ट सोडला नाही. तो झाडावरून प्रेत खांद्यावर काढून घेऊन काही बोलल्याशिवाय स्मशानाच्या दिशेने चालू लागला. तेव्हां प्रेतात बसलेला वेताळ त्याला म्हणाला–"राजा, तू आपल्या, मेहनतीविषयी व्यर्थ फिकीर करू नकोस. जगात बरेवाईट प्रत्येक बाबतीत असते. उदाहरणार्थ मी तुला तपतीचा वृत्तांत सांगतो. लक्ष देऊन ऐक." असे सांगून वेताळ गोष्ट सांगू लागला.

कित्येक शतकांपूर्वी नागनगर येथे तपती नावाची एक विधवा स्त्री रहात असे. ती आपल्या मुलीबरोबर एका कवलारू घरात रहात असे. घराच्या पाठीमागे एक लहानशी बाग होती. तपती मुलीचे सर्व लाड पुरवी. दोघींचे दिवस आनंदाने जात होते.

काही काळ लोटल्यावर तपतीच्या मुलीचे डोळे आले. डोळे दुखत होते आणि लालबुंद



झाले होते आणि वर पू येई. तपती घाबरून गेली. वैद्यांनी जी जी औषधे दिली ती तिने मुलीला दिली, परंतु आराम पडला नाही. डोळे दुखत म्हणून मुलगी रडत असे. आईचा जीव कळवळून येई.

तपतीला शेजारच्या गावी एक न्हावी राहतो व तो डोळ्याचे आजार बरे करतो हे कळले. म्हणून ती आपल्या मुलीला घेऊन न्हाव्याच्या गावी निघाली.

गाव तसे दूर नव्हते तरी चालत असता दुपार झाली, उन वाढले. वाटेत एका झाडाखाली एक म्हातारी विश्रांती घेत पडून असलेली त्यांना दिसली. त्या म्हातारीने तपतीला व तिच्या मुलीला जवळ [illegible] म्हातारीला आपल्या मुलीच्या आजाराची गोष्ट सांगितली.

तपती म्हणाली ते शांतपणे ऐकून घेऊन म्हातारी म्हणाली—"बेटे, अडाणी वैदू लोकांकडून डोळ्याचा इलाज करून मुलीचे डोळे जास्त बिघडवून घेऊ नकोस. येथून थोड्या अंतरावर उजव्या हाताला एक पाऊलवाट लागेल. त्या वाटेने दहापंधरा मिनिटे चाललीस की तुला तेथे एक विहीर मिळेल. त्या विहिरीचे पाणी बर्फासारखं थंडगार आहे. त्या पाण्याने तू आपल्या मुलीचे डोळे धुतलेस तर डोळे बरे होतील."

तपती म्हातारीचे आभार मानून आपल्या मुलीला घेऊन निघाली. दोघी तीन प्रहराच्या सुमारास विहिरीजवळ येऊन पोचल्या.

तपतीने विहिरीतून पाणी काढले व त्यात फडके भिजवून मुलीचे डोळे पुसू लागली. त्याच वेळी तिच्या शेजारी कोणी तरी येऊन उभा राहिला. तपतीने दचकून त्याच्याकडे पाहिले. त्याने साधे कपडे घातले होते, पण तो कोणी तरी मोठा मनुष्य दिसत होता.

"तुम्हांला पाहून मी घाबरून गेले होते हो!" तपती म्हणाली.

"मी आपली चाहूल दिल्याशिवाय आलो ही माझी चूकच झाली परंतु मी [illegible] तिच्या डोळ्यांना औषध लावायला आलो आहे. ही घे लाकडाची डबी. यात अंजन आहे. हे तू आपल्या मुलीच्या डोळ्यांना लाव. तिला बरे वाटेल व सूज उतरेल आणि डोळे पहिल्यासारखे होतील." असे सांगून त्या माणसाने तपतीच्या हातात एक लाकडी डबी दिली.

तपतीने डबी उघडून पाहिली. आत हिरव्या रंगाचे सुवासिक अंजन होते. तपतीने त्या गृहस्थाचे आभार मानण्यासाठी मान वर केली. परंतु तो मनुष्य तेथे नव्हता.

अंजन लावावे की नाही असा विचार करीत तपती काही वेळ बसली. शेवटी तिने धीर करून मुलीच्या डोळ्यांना अंजन लावले. थोड्या वेळाने मुलगी म्हणाली—"आई डोळे दुखायचे कमी होऊ लागले आहेत ग." थोड्या वेळाने सूज कमी झाली व मुलीने आनंदाने छान डोळे उघडून आईकडे पाहिले. मायलेकी आनंदाने घरी परत आल्या.

दोन तीन दिवस तपती आपल्या मुलीच्या डोळ्यांना अंजन लावीत राहिली. सूज पार नाहीशी झाली आणि डोळे चांगले बरे झाले. म्हणून तपतीने डबी काळजीपूर्वक लपवून ठेवून दिली.



आणखी काही दिवस लोटले आणि तपतीला डावा डोळा दुखत असल्यासारखे वाटले. तिला मुलीसारखेच डोळे आले असावेत असे वाटले. ती घाबरून गेली. परंतु डबीतले अंजन लावायची तिच्या मनाची तयारी होईना. तिला वाटले की ते अंजन त्या अनोळखी माणसाने फक्त आपल्या मुलीसाठीच दिले असावे. म्हणून आपण ते अंजन लावणे बरोबर होणार नाही. परंतु डोळे जास्त जास्तच दुखू लागले. तेव्हां तिने विचार केला की त्या अनोळखी माणसाने ते अंजन मुलीशिवाय इतर कोणी वापरू नये, असे काही सांगितले नव्हते. मग ते लावून पाहले





तर त्यात नुकसानच काय? असा विचार करून तपतीने ते अंजन आपल्या डाव्या डोळ्यात घातले. त्याचा फायदाच झाला. दोन दिवसात डोळा छान बरा झाला.

आणखी दोन तीन महिने लोटले. एकदा तपती आठवड्याच्या बाजाराला गेली होती. एका जागी धान्याची पोती उघडून ठेवलेली तिला दिसली. परंतु तेथे त्यांचा मालक कोणी दिसला नाही. थोड्या वेळाने तिला एक भगवी वस्त्रे धारण केलेला मनुष्य पोत्यातले धान्य काढून आपल्या पिशवीत भरीत असलेला दिसला. तिला आश्चर्य वाटले. तिने शेजारी एक बाई उभी होती

तिला विचारले– "बाई, काय हो, हे? तो मनुष्य तर चोरी करतो आहे?" असे सांगत तिने त्या माणसाकडे बोटाने खूण केली.

परंतु त्या बाईने तिला उलट विचारले– "कोणत्या माणसाची गोष्ट तू सांगते आहेस?"

"भगवी वस्त्रे घालून पोत्यांजवळ उभा आहे त्या माणसाची!" तपती म्हणाली.

"ए बाई! पोत्याजवळ तर कोणी उभा दिसत नाही. भगवी वस्त्रे घालून आलेला कोणी मनुष्य जवळपास दिसत सुद्धा नाही." ती बाई चकित होऊन म्हणाली.

तेव्हां तपती चोराजवळ स्वतः गेली. तो मनुष्य दुसरा तिसरा कोणी नसून तिला अंजन देणारा तो अनोळखी मनुष्यच होता. ती त्याला म्हणाली–"काय हो, असली कामे तुमच्या सारख्यांनी करावी का? तुमच्याजवळ पैसे नसतील तर मी देते. घेऊन जा. एकदां तुम्ही मला मदत केली होती, या खेपेस मी मदत करते!"

त्या माणसाने चटकन मान वर करून तपतीला हळूच विचारले–"तू कोणत्या डोळ्याने मला पाहते आहेस?"

तपतीने एका मागून एक डोळे बंद करून पहात चट्टत म्हटले–"मी तुम्हांला आपल्या उजव्या डोळ्यांनी पहात आहे.

डोळ्यात फुंकर घातला आणि अदृश्य झाला. तपतीने डावा डोळा बंद करून पुन्हा उघडून पाहिले तर तिला दिसत नव्हते.

तरी तपतीला त्या गोष्टीबद्दल पश्चात्ताप वाटला नाही. तिने त्यानंतर अंजनाची डबी उघडूनदेखील पाहिली नाही.

येथवर गोष्ट सांगून वेताळाने विचारले– "राजा! तपती त्या माणसाला कां रागावली? त्याने तर तिच्यावर उपकार केला होता. पण त्याच्या चुकीकडे तिने दुर्लक्ष कां नाही केले? तिला काही कळत नव्हते की काय? की त्याने केलेले उपकार विसरून गेली होती? तिने ते अंजन देखील कां नाही लावले? या प्रश्नांचे उत्तर माहीत असून तू दिले नाहीस तर तुला परिणाम माहीतच आहे, तुझ्या डोक्याची शंभर शकले होऊन तुझ्याच पायावर लोळू लागतील."

ते ऐकून विक्रमादित्य म्हणाला–"अंजन देणाऱ्याने तपतीला मदत केली होती हे खरे आहे. परंतु कोणी मदत केली म्हणून माणसाने बऱ्यावाईटाचा विचार सोडून द्यायचा असे थोडेच आहे? तसे केले तर ती केवळ स्वार्थबुद्धी होईल. तपतीमध्ये तशी स्वार्थबुद्धी नव्हती. ती कोणते ही काम करण्यापूर्वी बऱ्यावाईटाचा विचार करून करीत असे. म्हणूनच उपकाराची थोडी फार फेड करण्याच्या हेतूनेच तिने उपकारकर्त्याला पैशाची गरज आहे का विचारले. तिला जे आपले कर्तव्य वाटले ते तिने केले. त्या प्रयत्नात अंधत्व येवो की आणखी काही होवो, तिची तिला फिकीर नव्हती. अनैतिक काम करणाऱ्याकडून मदत घेणे तिला पसंत नव्हते. म्हणून तिने पुन्हा ते अंजन वापरले नाही. म्हणून तपतीच्या व्यवहारात काही दोष आहे, असे म्हणतां येणार नाही.

अशा तऱ्हेने राजाचे मौन भंग होतांच वेताळ प्रेताबरोबर नाहींसा झाला व झाडाच्या फांदीला लोंबकळू लागला.

(कल्पित)



# धोब्याची बायको

एका गावी एक धोबी रहात असे. त्याची बायको फार हट्टी होती. एकदा नवराबायको कपडे धुवायला नदीवर गेली. दररोज दोघं ज्या जागी कपडे धूत असत तेथे पाण्याला जोर जास्त होता. म्हणून धोबी बायकोला म्हणाला—"आज पाण्याला जोर दिसतो आहे. दुसरीकडे जाऊ या."

परंतु धोब्याच्या बायकोने ऐकले नाही आणि पाण्यात उतरली आणि वाहून गेली. त्यानंतर ती एक पिशाचीण झाली आणि दुसऱ्या मुलीच्या अंगात शिरली. मांत्रिकांनी भूत उतरविण्याचा खूप प्रयत्न केला, पण तो सर्व फुकट गेला.

ती गोष्ट धोब्याला कळली तेव्हां त्या धोबिणीच्या आईवडिलांना तो म्हणाला—"मी हिचे भूत उतरवून देतो. मला तिच्याशी दोनच मिनिटे बोलायला परवानगी द्या." त्या मुलीच्या आईबापांनी होकार दिला. धोब्याने त्या मुलीच्या कानात जाऊन हळूच सांगितले—"तू ज्या मुलीच्या अंगात शिरली आहेस तीच जागा चांगली आहे. तू ही जागा सोडून आणखी कोठे जाऊ नकोस. समजले?"

लगेच ती धोबीण त्या मुलीला सोडून पळून गेली. त्या मुलीचे लग्न त्या धोब्याशीं तिच्या आईवडिलांनी करून दिले.





# बदकवाल्या केसू

एका गावी एक गरीब बाई रहात होती. तिला केसू नावाचा एक व्रात्य मुलगा होता. त्या गरीब बाईच्या घरी दोन मोठ्या बदके, एक नर बदक आणि मोळा पिल्ले होती. केसूला त्यांना दाणा चारा खायला घालायला गमत वाटे. एकदा तो बदकाची पिल्ले बाजारात जाऊन विकून येतो असे आईला सांगून निघून गेला. केसू पिल्लांबरोबर बाजारात पोचला त्या वेळी रविदास नामक एका श्रीमंत माणसाने त्याला विचारले—"काय रे ही पिल्ले काय भावाने विकणार आहेस?"

तो म्हणाला—"एका जोडीला दोन चांदीची नाणी."

रविदास गावातला सर्वात श्रीमंत मनुष्य होता. गावभर त्याचा वचक होता. तो केसूला म्हणाला—"काय रे पोरा! तू मला भाव सांगायला निघाला आहेस काय? मी दोन तांब्याची नाणी देईन."

"मी तुम्हांला एकदां सांगितले, दोन चांदीची नाणी घेईन. बदके हवी असली तर घ्या, नाहीतर चालू लागा." केसूने तितक्याच ताठर स्वरात उत्तर दिले.

"या मूर्खाला धरून माझ्या घरी घेऊन या आणि याची बदके देखील घेऊन या." रविदास आपल्या नोकराना म्हणाला. नोकर केसूला रविदासाच्या घरी पकडून घेऊन गेले आणि मालकाच्या आज्ञेने चिंचेच्या पंचवीस काठ्या ओढल्या त्याच्या अंगावर.

मार खाल्ल्यावर केसूचा 'अहं' जागा झाला. तो म्हणाला—"मी तुझ्याकडून तिप्पट रक्कम वसूल केली नाही तर नावाचा केसू नाही."

त्यानंतर केसू कित्येक वर्षं आपल्याच गावी हिंडून जे काम मिळे ते करून आपले दिवस कसेबसे काढीत होता. आता त्याला



पंचविसावे वर्ष लागले होते. परंतु रविदास-वरचा राग त्याच्या मनातून कमी झाला नव्हता. उलट वाढतच गेला.

काही काळ लोटल्यावर तो रविदासच्या गावी आला. रविदास एक वाडा बांधीत असल्याचे त्याला कळले. केसू सुतार होऊन रविदासकडे गेला आणि इमारती लाकूड ठेवले होते ते तो लक्षपूर्वक पाहू लागला.

रविदासने त्याला पाहिले आणि विचारले–"कोण रे बाबा तू? तुला माहिती आहे वाटते इमारती लाकडाची?"

"मी आहे सुतार. फार दूर आहे आमचे गाव. मला इमारती लाकडाची चांगली माहिती आहे." केसू म्हणाला.

"हे लाकूड कसे आहे वाटते तुला? मोठ्या इमारतीला हवे आहे म्हणून विचारले." रविदास म्हणाला.

"मोठ्या इमारतीलाच हवे असेल तर हे नाही कामाचे." केसू म्हणाला.

रविदास म्हणाला–"मी जंगलाचा एक भागच विकत घेतला आहे. तू माझ्या-बरोबर चल आणि इमारतीला लागणाऱ्या लाकडाची निवड कर."

केसूने होकार दिल्यावर रविदास त्याला बरोबर घेऊन आणि तिघाचौघा लाकूड-फोड्यांना बोलावून घेऊन जंगलात गेला. केसूने चांगल्या झाडांची निवड केली आणि लाकूडफोड्यांना ती झाडे तोडायला सांगितली. नंतर जंगलाच्या मध्यभागी केसूला घेऊन गेला. निर्जन जागी एक मोठे झाड दाखवून केसू म्हणाला–"हे झाड पहा. हे आहे तुमच्या इमातीच्या लायक झाड. पहा तर केवढे रुंद खोड आहे?" असे केसूने म्हटल्यावर रविदास दोन्ही हातांनी झाडाची जाडी मोजून पाहू लागला.

परंतु केसूने संधी साधून रविदासचे दोन्ही हात फास घालून घट्ट आवळले आणि रविदासाला त्या झाडाला बांधले. नंतर झाडाची एक काठी तयार करून घेऊन रविदासाला झोडपून काढले. नंतर रवि-दासाच्या खिशातून पैशांचा बटवा काढला

घेऊन म्हणाला–"रविदास मी सुतार नाही; बदकवाला केसू आहे, केसू. तू माझी बदके बळजबरीने घेऊन गेलास आणि मला नोकरांकरवी बडविलेस. आज मी तृतियांश कर्ज व्याजासकट वसूल केले. अजून पुरी किंमत वसूल करावयाची आहे. मी आणखी दोनदां तुझ्याकडे येईन किंमत वसूल करून घ्यायला." असे सांगून केसू निघून गेला.

रविदासाच्या नोकरांनी धन्याला हुडकून काढण्यासाठी सारे जंगल पालथे घातले. शेवटी तो एकदाचा सापडला. रविदासाचे सर्व अंग ठणकत होते. त्याहून जास्त केसूची त्याला धास्तीच वाटू लागली होती.

काही दिवसांनी केसूला लोकांच्या तोंडी ते सर्व कळले. तो एका वैद्याचा वेष करून गावातल्या धर्मशाळेत उतरला. गवातले लोक धर्मशाळेत रविदासाच्या आजारा-विषयी आपसात बोलत होते. केसू त्या लोकांना म्हणाला–"अरे, मी त्याचा आजार एका दिवसात बरा करून देईन."

लोकांच्या तोंडी धर्मशाळेत परगावचा एक वैद्य आल्याचे ऐकून रविदासने त्याला बोलावून घेतले व विचारले–"वैद्यबुवा! मी या आजारातून चांगला बरा होऊन हिंडू फिरू लागेन का हो?"



"का नाही हो? मी एक उत्तम औषध तयार करून देतो. काही मिनिटात तुम्हांला आराम पडेल." असे सांगून केसूने रविदासच्या एका नोकराला बोलाविले व म्हणाला–"तू जाऊन ही मुळी घेऊन ये." नंतर दुसऱ्या नोकराला व इतर नोकरांना कोणत्यातरी वनस्पतीचे नाव सांगून आणायला पाठवून दिले. नंतर एक काठी घेऊन आला व रवि-दासला म्हणाला–"तुझे खरे औषध हे आहे. मी बदकवाला केसू आहे, केसू. बदकांची किमत वसूल करायला दुसऱ्यांदा आलो आहे." केसूने रविदासला त्या स्थितीतही बडविले. अंगात शक्ती नसल्यामुळे रविदासला ओरडवत देखील नव्हते. त्याचे डोळे पांढरे

होण्याची वेळ आली व तो धापा टाकू लागला तेव्हां केसूने त्याला मारायचे सोडले. तिजोरी उघडून बदकांची किंमत वसूल केली व म्हणाला–"आता फक्त एकदांच येईन किंमत वसूल करायला."

त्यानंतर कित्येक वर्षे लोटली. रविदास चांगला बरा झाला होता व आपली सर्व कामे नित्याप्रमाणे करू लागला होता. तो बदकवाल्या केसूचे नावच विसरून गेला होता. परंतु केसू विसरला नव्हता.

एक दिवशी केसू बाजारपेठेत गेला. रविदास तोपर्यंत बाजारात आला नव्हता. एक मनुष्य एक घोडा विकत असलेला त्याला दिसला. घोडेवाला म्हणाला–"हा घोडा एक तापट घोडा आहे. याच्यासारखा पळणारा घोडा मिळणे शक्य नाही."

"मला चांगला पळणारा घोडा पाहिजे. मी सांगतो तसे केलेस तर मी तुझा हा घोडा विकत घेईन." केसू म्हणाला.

"मी काय करावे म्हणतां?" घोडेवाल्याने विचारले

एक श्रीमंत मनुष्य घोड्याच्या गाडीत बसून येतो आहे. तू त्याच्यासमोर जाऊन मोठ्याने ओरडून सांग, मी बदकवाला केसू आहे आणि लगेच घोड्यावरून परत ये. नाहीतर तुझा जीव धोक्यात पडेल."

घोडा विकणारा त्याप्रमाणे रविदासच्या गाडीजवळ जाऊन ओरडला आणि उलट पावली घोडा भरधाव सोडून परतला.

रविदासने घाईघाईने आपली गाडी थांबविली. घोडे सोडून द्यायला सांगून आपल्या नोकरांना म्हणाला–"तुमच्यापैकी जो कोणी त्या घोडेस्वाराला पकडून आणील त्याला मी दोन सोन्याची नाणी बक्षिस देईन, पळा." रविदास एकटा गाडीत राहून गेला. तेव्हां केसू येऊन म्हणाला–"बदकवाला केसू तो नव्हता, मी आहे." रविदासाचा चेहरा भीतीने पांढरा फट्ट पडला. केसूने रविदासाच्या खिशातून पैशांची पिशवी काढून घेतली व म्हणाला–आज तुझे कर्ज फिटले." त्यानंतर तो कधी रविदासाच्या दृष्टीसही पडला नाही.





# अबू - कीर सीर

[४]

दुसऱ्या दिवशी अबू सीरने गावभर दवंडी पिटविली की गावातल्या लोकांना हमाम हवा असल्यास सरकारी हमाममध्ये त्यांना हमाम घेता येईल (स्नान करता येईल.) सुरवातीचे तीन दिवस कोणाकडून ही पैसे घेतले जाणार नाहीत. दवंडी ऐकून हमाम खान्यासमोर लोकांची गर्दी जमा झाली. दवंडी पिटविल्याप्रमाणे अबू सीरने कोणाकडून पैसादेखील घेतला नाही. चवथ्या दिवशी हमाम खान्याच्या दारात अबू सीर एक पेटी घेऊन बसला. हमाम झाल्यावर लोक स्वेच्छेने पेटीत जेवढे पैसे टाकीत तेवढेच तो घेऊ लागला.

हमामखाना सुरू झाल्यानंतर काही दिवसांनी सुल्तानाच्या तोंडी हमामखान्याची वाखाणणी ऐकून स्वत: बेगम साहबांनी हमामखान्यात हमाम घ्यायला जाण्याची इच्छा दर्शविली. अबू सीरने सकाळी पुरुषांसाठी व संध्याकाळी स्त्रियांसाठी हमाम खुले राहील असे जाहीर केले. स्त्रियांच्या स्नानाच्या वेळी त्याने पैसे वसूल करायला एका स्त्रीला नेमले.

बेगमने हमामखान्यात स्नान केल्यावर खूष होऊन हमामखान्याची वाखाणणी केली आणि दर शुक्रवारी हमामखान्यात स्नानाला जाऊ लागली. सुलतान सकाळी स्नानाला येई व बेगम संध्याकाळी स्नानाला येई. दोघे प्रत्येक वेळी एकेक हजार दीनार देत.

अशातऱ्हेने अबू सीरची कीर्ती जवळपासच्या राज्यात पसरली. परंतु त्याचा नम्रपणा थोडा देखील कमी झाला नाही. गरिबांविषयी त्याच्या मनात दया होती. तो त्यांना काही पैसे घेतल्याशिवाय स्नानाला परवानगी देई.



अबू सीरच्या हमामखान्याची वार्ता अबू कीरच्या कानावर गेल्याशिवाय राहली नाही. त्याने देखील हमामखान्यात जाऊन हमाम घेण्याचे ठरविले आणि नोकरां-चाकरांबरोबर निघाला.

हमामखान्यात पाय ठेवताच ऊद व चंदनाचा सुवास अबू कीरला आला. आत जाणाऱ्यांची व बाहेर येणाऱ्यांची त्याला गर्दी दिसली. त्याचा जुना मित्र पेटीजवळ स्मित मुखाने बसलेला अबू कीरला दिसला. आता अबू सीरची प्रकृती उत्तम सुधारली होती. कपडे तसे साधेच होते, पण नीटनेटके होते. म्हणून अबू कीर त्याला प्रथम ओळखू शकला नाही. परंतु त्याला ओळखल्यावर व त्याचे वैभव पाहिल्यावर अबू कीरच्या पोटात ईर्षाग्नी पेटला. तरी स्वतःच्या मनातली गोष्ट लपवून व स्वतः अबू सीरशी तो किती निर्दयपणे वागला होता हे विसर-ल्यासारखे करून आनंद व्यक्त करीत म्हणाला—"अरे अबू सीर! तू हे सर्व काय केलेस? एक मित्र दुसऱ्या मित्राला कधी विसरेल का? मी गावात एक दरबारी रंगारी म्हणून काम करतो आहे हे तुला माहीत नाही का? तू आपल्या जुन्या मित्राला असा कसा विसरलास? मी तुझा शोध लावण्यासाठी आपले नोकर पाठविले होते. पण तू कोठे सापडलासच नाहीस!"

अबू सीर आश्चर्यचकित होऊन म्हणाला—"अबू कीर! मी तुझ्या दुकानात आलो होतो. तेव्हां तू मला नोकरांकरवी बडवून, स्वतः मला पाया खाली तुडवून व चोर व लुच्चा म्हणून सांगून हाकलून लावलेस हे सर्व तू विसरलास काय?"

अबू कीर आश्चर्य वाटल्याचा अभिनय करीत म्हणाला—"तू हे म्हणतो आहेस काय? मी तुला बडवून हाकलून लावले? मी पाहिले देखील नाही, कित्येक महिने झाले. एक चोर माझ्या दुकानात शिरला होता, त्याला मी बडवून हाकलून लावले होते खरे. म्हणजे तू इतका अशक्त झाला होतास? मी नाहीं बुवा ओळखले तुला! चूक तुझीच. तू सांगायचे नाहीस की त्या दिवशी तू कोण आहेस हे? नोकरांवर असा चिडलो होतो की त्या रागात मी तुला मुळीच ओळखले नाही.

"बरे तर विसर ते सारे! झाले गेले होऊन गेले. आत जाऊन हमाम घेऊन ये." अबू सीर अबू कीरला म्हणाला.

"पण, बडे भैयाजी तू कसा काय हा धंदा सुरू केलास?" अबू कीरने विचारले.

"तुला ज्याने हातभार दिला, त्यानेच माझा उद्धार केला." असे सांगून अबू सीरने थोडक्यात आपला धंदा कसा सुरू झाला व भरभराटीला आला हे सांगितले.

सर्व ऐकून घेऊन अबू कीर म्हणाला—"तुझ्यावर सुलतानाची मर्जी झाली ही त्या अल्लातालाची मेहरबानीच आहे. तू माझा दोस्त आहेस हे सुलतानाला सांगितलेस तर सुलतानाची मर्जी तुझ्यावर दुप्पट होईल."

त्यानंतर अबू सीरने स्वतः मालिश केली, अबू कीरला प्यायला सरबत दिले. अबू सीर हा आदर फक्त सुलतानाचा करीत असे. म्हणून इतर लोक रंगाऱ्याचा आदर झालेला पाहून चकित झाले.

हमाम घेऊन परत घरी जाताना अबू कीर पैसे देऊ लागला. पण अबू सीरने पैसे घेतले नाहीत व म्हणाला—"तू काय



विचार करून पैसे द्यायला आलास रे? मित्रांमध्ये पैशांची देवाण घेवाण कसली?"

"मर्जी तुझी, बरे तर येतो. तू माझी इतक्या प्रेमाने विचारपूस केलीस व माझा आदर केलास. तुला मी एक सल्ला देऊ इच्छितो. तुझा हमाम सुंदर आहे व येथे सर्व तऱ्हेची उत्तम व्यवस्था आहे. पण एका गोष्टीची उणीव भासते. फालतू केस गळून पडायचे एक उबटण तू तयार करून ठेव. कसे करतात, हे माहीत आहे का तुला? चुन्यात बिब्बा घालून वाट. नंतर त्यात तेल घालून त्याची गोळी तयार कर. वास राहू नये म्हणून थोडीशी कस्तुरी टाक. ते उबटण लावून तू सुलतानाला स्नान घाल. सर्व अंग



कसे तुळतुळीत मऊ होईल." अबू कीर म्हणाला.

अबू सीरने ते सर्व वर्णन टिपून ठेवून घेऊन अबू कीरला निरोप दिला.

अबू कीर सरळ सुलतानाकडे गेला व घाबऱ्या घाबऱ्या आवाजात म्हणाला– "सुलतान! आपल्याला सावध करून ठेवावे म्हणून आलो आहे."

"मला सावध करून ठेवायला?" सुलतानाने विचारले.

"अल्लाच्या मेहरबानीने आजपावेतो हा दुश्मन आपले काही बरेवाईट करू शकला नाही. अबू सीर कट करून आपला शेवट करणार आहे." अबू कीर म्हणाला.

[illegible] नाही सांगत." सुलतानाने विचारले.

"महाराज! या खेपेस आपण हमाम मध्ये जाल तेव्हां जिवंत परत येऊ शकणार नाही." अबू कीर म्हणाला.

"कां? सांग ना ते?" सुलतानाने विचारले.

अबू कीर घाबरून सर्व अंग हादरल्याचे सोंग करीत म्हणाला–"विष! बिब्बा, कुचल्याचे बी आणि चुना मिसळून अबू सीर आपल्या शरीराला त्याचे उबटण लावणार आहे. तो ते उबटण लावल्याने आपल्या अंगावरचे अनावश्यक केस गळून पडतील व अंग कसे तुळतुळीत होईल, असे सांगेल. परंतु ते उबटण अंगाला लागले की सर्व अंगाची लाही लाही होईल. तो दुश्मनांचा हेर आहे. त्यांनी त्याला तुमचा जीव घ्यायला पाठविला आहे. मी आपले मीठ खाल्ले आहे. म्हणून आपल्याला सावध करण्यासाठी मुद्दाम आलो आहे." अबू कीरने जे काही खोटे सांगितले त्यावर सुलतानाचा विश्वास तर बसलाच आणि वर त्याच्या हृदयाचा थरकाप उडून गेला. तो अबू कीरला म्हणाला–"तू ही गोष्ट कोणाला सांगू नकोस. मी आतां वजिराला घेऊन हमामखान्यात जातो. ते खरे आहे की नाही याचा शहानिशा मला करून घ्यावयाचा आहे."

[illegible] पोंचला तेव्हां अबू सीर सुलतानाला स्नान करून घायला तयार झाला. परंतु राजाने प्रथम वजिराला स्नान घालायला सांगितले.

वजिराचे स्नान झाल्यावर अबू सीर सुलतानाला म्हणाला–"सुलतान मी एक नव्या तऱ्हेचे उबटण तयार केले आहे. अंगावरचे सर्व अनावश्यक केस झडून जातील व अंग कसे तुळतुळीत होईल."

"पाहू तरी. तू त्याचा प्रयोग वजिरावर कर." सुलतान म्हणाला.

अबू सीरने ते वजिराच्या पायाला लावले. लगेच जेथे जेथे केस होते गळून गेले आणि अंगाची आग झाली.

ते पाहून सुलतानाला अबू कीर म्हणाला ते खरे वाटले व त्याने अबू सीरला कैद करायला शिपायांना सांगितले. म्हणाला– "या खुनी हेराच्या मुसक्या बांधून याला अंधारकोठडीत टाका."

त्यानंतर सुलतान, वजीर व नोकर अबू सीरला घेऊन महालात आले.

थोड्या वेळाने सुलतानाने बंदराच्या अधिकाऱ्याला बोलावून आज्ञा केली की तू या राजद्रोही माणसाला घेऊन जाऊन याला चुन्याच्या पोत्यांना बांधून समुद्रात टाक. मी महालातून पाहणार आहे. चुन्याने पाणी





खवळून आले की याला अंगाची आग ही वस्तू कशी असते याची कल्पना येईल."

"जो हुकूम सरकार!" असे म्हणत बंदराचा अधिकारी अबू सीरला एका लहानशा होडक्यात बसवून निघाला.

तो अधिकारी काही काळापूर्वी एका अबू सीरच्या हमामखान्यात स्नानाला गेला होता. त्याच्याजवळ तेव्हां पैसे नव्हते. तरी अबू सीरने त्याच्याकडून एक पैसादेखील घेतला नाही आणि त्याला हमामखान्यात उत्तम स्नान करविले. म्हणून तो अबू सीरच्या उपकाराची फेड केव्हां कशी करता येईल हा विचार करीत असे. या वेळी त्याला आयती संधी मिळाली. तो अबू सीरला एका बेटावर

घेऊन गेला आणि म्हणाला–"बडेमियां! तुझ्या उपकाराची फेड करण्याचा विचार माझ्या मनात आहे. परंतु मला पहिल्याने हे सांग की तू सुलतानाविरुद्ध असा कोणता कट केला होतास?"

"मित्रा! अल्ला साक्षी आहे. मी काही अपराध केला नाही. मला ही शिक्षा सुलतानाने कां केली हे मला माहीत नाही." अबू सीर म्हणाला.

"तरमग तुझा कोणीतरी शत्रू असेल व त्याने सुलतानाचे कान भरले असतील. तू या बेटावर रहा. तुझ्या जिवाला कोणत्याही प्रकारचा धोका नाही. तू मासे पकडत रहा, म्हणजे तुझा वेळ जाईल. मी तुला [illegible] करतो." बंदराचा अधिकारी म्हणाला.

त्यानंतर त्याने पोत्यात चुना भरला. पोती होडग्यात भरली आणि महालाच्या खिडकीजवळ होडके घेऊन जाऊन तेथे होडके थांबवले व म्हणाला–"त्या दुष्टाला चुन्याबरोबर पोत्यात कोंबले आहे." राजाने हात हलवून खूण करताच त्याने सर्व पोती समुद्रात फेकून दिली.

परंतु सुलतानाने जेव्हां हात हलवून खूण केली तेव्हां त्याच्या बोटातली अंगठी पाण्यात पडली. सुलतानाचा व त्याच्या प्रजेचा त्या अंगठीवर फार विश्वास होता. त्या अंगठीत काही तरी अद्‌भुत शक्ती आहे [illegible] युद्धास आला तर त्या अंगठीच्या प्रतापाने शत्रू जागच्या जागी भस्म होऊन जाईल असे सर्वांना वाटे. ती अंगठी हरवल्याचे प्रजेला कळले तर प्रजेचा सुलतानावरचा विश्वास उडून जाईल. म्हणून सुलतानाने ती गोष्ट कोणाला सांगितली नाही.

तिकडे बेटावर अबू सीर दररोज सकाळ संध्याकाळ मासे धरीत असे. तो स्वत:चा एकटेपणा विसरुनजाई व पोट भरायला मासेपण मिळत.

पहिल्याच दिवशी अबू सीरने पाण्यात जाळे टाकले त्यावेळी जाळयात निरनिराळया रंगाचे अनेक लहान मोठे मासे सापडले. मासे खाऊन बरेच दिवस झाले होते. म्हणून त्याची चंगळच झाली. पुढे तर इतके मासे मिळू लागले की तो बंदराच्या अधिकाऱ्याच्या हाती ते मासे सुलतानाकडे पाठवू लागला. सुलतानाच्या स्वैपाक-घरात ते मासे छान भाजून व तळून येऊ लागले. म्हणून त्याला मासे खायला मिळत व सुलतानाला पण मिळू लागले. बंदराच्या अधिकाऱ्याने तशी व्यवस्था केली होती.

अबू सीरने एकदा एक मोठा मासा धरून सुरीने कापला. परंतु सुरी बाहेर काढून पाहिली तर सुरीच्या टोकाला एक अंगठी अडकलेली दिसली. तीच सुलतानाची हर-





वलेली अंगठी होती. ती गोष्ट अबू सीरला माहीत नव्हती. म्हणून त्याने ती आपल्या बोटात घातली व ती छान बसली.

थोडया वेळाने बंदराचा अधिकारी अबू सीरला नित्याप्रमाणे भेटायला त्या बेटावर आला. त्याच्या हातात सुलतानाची अंगठी पाहून तो चकित झाला. त्याने अबू सीरला ती अंगठी कशी मिळाली हे विचारून घेतले व म्हणाला–"याला म्हणतात भाग्य! कोणाच्या नशिबात काय लिहिले आहे, हे त्या करीम परवर-दिगारलाच माहीत. तुला या अंगठीच्या सहाय्याने प्रत्यक्ष सुलतानाकडे जाता येईल. तुला कोणी अडवणार नाही. तुझ्या बोटात ही अंगठी पाहून सुलतान तुझ्या समोर गयावया करू लागेल. असा त्या अंगठीचा माहिमा आहे."

अधिकाऱ्याच्या सल्ल्याप्रमाणे अबू सिर सुलतानाच्या महालात गेला. त्यावेळी सुलतानाचा दरबार लागलेला होता. त्याने अबू सिरला पाहून विचारले–"कायरे तुला माझ्या समोर सुमुद्रात फेकले होते. मग तू कसा काय जिवंत बाहेर आलास?"

अबू सीरने सुलतानाला घडलेली गोष्ट जशीच्या तशी सांगितली. म्हणाला–सुलतान! आपण माझ्यावर जी मेहरबानी दाखविलीत ती मी कधी विसरणार नाही. त्या उपकाराची फेड म्हणून मी ही अंगठी आपणांला द्यायला आलों आहे. परंतु एक गोष्ट मी आपणांस सांगू इछितो. मी आपण समजत आहां तसा राजद्रोही किंवा विश्वासघातकं नाही. मी या पुढे कधी आपणांसमोर येणार नाही. परंतु जाण्या-पूर्वी एक निवेदन करीत आहे. आपण माझ्यावर कोणत्या आधोर राजद्रोहाचा आरोप लावून मला मृत्युदंड दिलात, सांग-ण्याची मेहरबानी करावी."

सुलतानाने जेव्हां अबू सीरच्या हातातली अंगठी घेऊन आपल्या बोटात घातली तेव्हां त्याला पुनर्जन्म झाल्यासारखे वाटले. तो अबू सीरची पाठ थोपटीत म्हणाला–"अबू! माझ्या क्रूरपणामुळे तुझा जीव जाणार होता. परंतु तुझे नशीब बलवत्तर. विश्वासघातकी व राजद्रोही कधी ही अंगठी परत करायला आला नसता. अबू कीरने तुझ्यावर खोटा आरोप लावला होता. त्याने मला सांगितले की तू शत्रूचा हेर असून केस गळण्यास उबटण म्हणून तू विष आणून माझा जीव घेण्याच्या विचारात होतास."

ते ऐकून अबू सीरच्या डोळयाला पाणी आले. तो सुलतानाला म्हणाला–"गरीब परवर! अबू कीरला मी आपला मित्र समजून त्याच्या साठी किती कष्ट सहन केले आणि प्रत्येक वेळी तो या ना त्या तऱ्हेने माझ्याशी दगाबाजी करीत आला. त्यानेच मला हे औषध तयार करून हमाम-खान्यात येणारांस लावायला सांगितले होते, व त्यापासून जिवाला धोका नाही, असे देखील सांगून ठेवले होते. परंतु ही सर्व त्याची लबाडीच ठरली."

सुलतानाला अबू सीर म्हणाला, ते सर्व खरे वाटले. सुलतानाने धर्मशाळेच्या दरबा-नाला व अबू सीरकडे काम करणाऱ्या नोकरांना बोलावून घेतले. सुलतानाने चवकशी केली तेव्हां त्यांच्या कडून अबू सीरने जे काही सांगितले ते खरे आहे असे



आढळून आले. त्यानंतर त्याने शिपायांना हुकूम केला–"तुम्ही जाऊन अबू कीर रंगाऱ्याला तो असेल त्या स्थितीत अटक करून माझ्या समोर हजर करा."

शिपायांनी अबू कीरला मुसक्या बांधून आणले. अबू सीरला सुलतानाच्या शेजारी बसलेला पाहून त्याची छाती धडधडू लागली.

सुलतानाने अबू कीरला पाहतांच विचारले–"हा तुझा दोस्त आहे, तू याचा अपमान केला आहेस. याचे पैसे चोरून नेलेस, याला शिवीगाळ केलीस, मार हाण केलीस व शेवटी माझ्या करवी याचा जीव घ्यायचा घाट घातलास.

अल्लाच्या मेहरबानीने हा मेला नाही. याने केलेल्या आरोपाविरुद्ध तुला काही बोलावयाचे आहे का?

"तो नकार काय देणार, कसा देणार?" सरदार म्हणाले. तेव्हां सुलतानाने हुकूम दिला की तुम्ही या दुष्ट माणसाच्या तंगडया धरून गावभर याला फरपटत हिंडवा. शेवटी चुन्याच्या पोत्यात त्याला कोंबून समुद्रात बुडवा."

अबू सीरला मित्राची दया आली. म्हणाला–"गरीब परवर! माझी एक विनंती आहे, आपण याला माफ करून सोडून द्यावे. मी याचे सर्व अपराध माफ करीत आहे."

"तू पाहिजे तर माफ कर. पण मी नाही माफ करणार. घेऊन जा रे याला." त्याने शिपायाला आज्ञा केली.

शिपाई अबू सीरच्या मित्रद्रोहाचे व राजद्रोहाचे वर्णन करीत त्याला राजधानी-भर फरपटत ओढून नेऊ लागले. शेवटी त्याला त्यांनी चुन्याच्या पोत्यात घालून [illegible] [illegible] अबू कीर मरण पावला.

त्यानंतर सुलतान अबू सीरला म्हणाला– "आता तू तुला जे काही पाहिजे ते मागून घे."

"गरीब परवर! मला फक्त स्वदेशी जाण्याची परवानगी देण्याची कृपा करावी." अबू सीर म्हणाला.

"मी तुला आपला वजीर नेमतो, आहे कबूल?" सुलतानाने विचारले.

परंतु अबू सीरने नम्रपणे ते नाकबूल केले. तेव्हां सुलतानाने त्याच्या प्रवासासाठी एक जहाज तयार करविले. त्याला निर-निराळ्या वस्तू भेट म्हणून दिल्या व अपार धन देऊन त्याला निरोप दला.

अबू सीर ॲलेक्झांड्रियाच्या बंदरात उतरल्यावर काही दिवसांनी एक पोते तरंगत येत असलेले दिसले. त्यात अबू कीरचे मृत शरीर होते. अबू सीरने त्यांच्या देशाच्या रीतीप्रमाणे त्याला पुरून त्यावर सुंदर कबर बांधली. (सम्पूर्ण)





# धर्मशाळा

एकदा गोविंदपूर गावच्या गावकऱ्यांनी एक सभा घेऊन गावात येणाऱ्या प्रवासी लोकांना उतरण्यासाठी एक धर्मशाळा बांधायचे ठरविले. धर्मशाळेची व्यवस्था पहायला एका कारकुनाची व जेवणा खाण्याची व्यवस्था करायला एका सैंपाकीण बाईची नेमणूक झाली. लहान मोठ्या कामा-साठी एक नोकर ठेवण्यात आला. देवळाची म्हणून जी थोडी शेत जमीन होती तिच्या वरच्या उत्पन्नातून सर्व खर्च काढायचे ठरले.

काही दिवस धर्मशाळेची व्यवस्था उत्तम राहिली. धर्मशाळा गावापासून थोडी दूर होती. म्हणून प्रवासी लोकांशिवाय गावातला कोणी मनुष्य धर्मशाळेत येत नसे. प्रवासी धर्मशाळेत जेवून झोपत व उजाडल्यावर आपापल्या कामाला निघून जात. प्रवाश्यात कोणी श्रीमंत असे, तो धर्मशाळेच्या नोकर-वर्गाला थोडे फार इनाम देई.

परंतु त्यामुळे नोकरवर्गाला प्रवाश्यांकडून पैसे उकळण्याची संवय पडू लागली. त्यांनी सर्व यात्रिकांकडून हक्काने पैसे मागायला सुरवात केली. जे लोक पैसे देत नसत त्यांना धर्मशाळेत पाय ठेवायला सुद्धा ते परवानगी देत नसत. यात्रिक लोकांनी धर्मशाळेत पाऊल टाकताच नोकर पैसे वसूल करी व सैंपाकीण बाई पैसे घेतल्या शिवाय जेवायला वाढीत नसत आणि कारकून झोपायला जागा देत नसे. अशा तऱ्हेने धर्मशाळा एक खानावळ झाली.

एकदा एक नोकर गोपाळपूरच्या वाटेवर गोविंदपूरला आला आणि त्याने धर्मशाळेत उतरण्याचा विचार केला. परंतु त्याच्या जवळ पुरेसे पैसे नव्हते. म्हणून धर्मशाळेत त्याला पाऊल ठेवता आले नाही. त्याला रात्रभर उपाशी एका झाडाखाली झोपावे लागले आणि दुसऱ्या दिवशी गोपाळपूरला

श्री म. र. कुलकर्णी



गेल्यावर त्याने ती गोष्ट आपल्या मित्र-मंडळीस सांगितली.

तेव्हां तेथे केशव नामक एका तरुणाने ते सर्व ऐकून घेऊन धर्मशाळेच्या नोकर-वर्गाची चांगली खोड मोडण्याचे ठरविले. तो आपल्या एका नोकराला बरोबर घेऊन रात्री जेवणाच्या वेळेला गोविंदपूरच्या धर्मशाळेत आला. धर्मशाळेत येण्यापूर्वी त्याने आपल्या नोकराला सांगून ठेवले होते की गोविंदपूरला जाऊन धर्मशाळेत गोविंदपूरच्या राजाचा मेहुणा येऊन उतरला असल्याचे त्याने सांगावे.

केशव धर्मशाळे जवळ पोचताच धर्म-शाळेचा नोकर त्याला म्हणाला–"साहेब, पैसे दिल्यास स्नानाची व्यवस्था वगैरे होईल."

केशवने बहिऱ्या माणसाचा अभिनय करून म्हटले–"होय होय, मी एकटाच आहे." असे म्हणत तो धर्मशाळेत शिरला.

जेवणाच्या जागी सैपाकीण बाई पाने मांडून सर्वांना जेवण वाढीत होत्या. केशवला पाहून ती म्हणाली–"पैसे द्या, सर्वांबरोबर आपले पानपण वाढते."

"मला सर्व आवडते. मी सर्व खातो, काळजी करू नका." असे म्हणत केशव एका वाढलेल्या पानावर बसला.

सैपाकीण बाई एकदम ओरडली–"अहो, उठा पानावरून! हे पान तुमच्यासाठी नव्हते वाढले." परंतु केशवने तिकडे दुर्लक्ष केले.

"अहो आजी! त्याला बसू द्या. त्याला ऐकायला येत नाहीसे दिसते आहे. बहिरा असेल." खायला बसलेले इतर लोक म्हणाले. त्यांनी तिला बसल्या पानावरून कोणाला उठून लावणे एक फार मोठे पाप आहे, असेदेखील समजावून सांगितले. सैपाकिणीला गप्प बसावे लागले.

केशवने पोटभर खाऊन घेतले व कार-कुनाला म्हणाला–"माझ्यासाठी झोपायला बिछाना कोठे घातला आहे?"

काढ!"

"मऊ शिवरीच्या कापसाचा बिछाना मला हवा." केशव म्हणाला.

ते ऐकून कारकून बाहेर येऊन नोकराला म्हणाला–"या बहिऱ्याला धक्के मारून बाहेर काढ रे! याला वाटते आहे, ही याच्या बापाची इस्टेट आहे."

दोघे आत जाऊन पाहतात तर केशव दुसऱ्यासाठी घालून ठेवलेल्या बिछान्यावर घोरत पडलेला होता.

नोकराने केशवला हालवून उठविले, तेव्हां केशवने आपल्या घरच्या नोकराशी तो बोले त्या तऱ्हेच्या आवाजात थोडा रागाने म्हणाला–"काय रे, तुझी धाड आली आहे काय?"

"पहिल्याने धर्मशाळेबाहेर हो!" कारकून तावातावाने म्हणाला.

"हा बिछाना पुरे मला. शिवरीच्या बिछान्याची गरज नाही आता." केशव म्हणाला.

"अरे, याला बिछान्यावरून ओढून धक्के मारून बाहेर काढ!" कारकून म्हणाला. नोकर कारकुनाच्या आज्ञेने केशवशी ओढा-ताण करू लागला. तेवढ्यात गावकरी केशवच्या नोकराबरोबर धर्मशाळेत येऊन पोचले आणि त्यांनी कारकुनाला विचारले–"सरकारांचे मेहुणे उतरले आहेत म्हणे, धर्मशाळेत कोठे आहेत ते?"

"अहो, तुमच्या राजाचा मेहुणा कोण आहे, देवाला माहीत. पण हे लोक पहा, मी पैसे दिले नाहीत म्हणून मला धर्मशाळे-बाहेर काढीत आहेत." केशवने घडलेला सर्व प्रकार सांगितला. गावकऱ्यांना आश्चर्य वाटले. त्यांना इतर प्रवाशांकडून तिघांनी पैसे वसूल केल्याचे कळले. त्यानंतर गाव-प्रमुख जमले त्यांनी चवकशी केली तेव्हां कारकून सैपाकीण व नोकर तिघे प्रवाशांना कसे कष्ट देत होते हे कळले. त्यांनी त्या तिघांना नोकरीवरून काढले व त्यांना दंड केला आणि त्यापुढे धर्मशाळेवर देखरेख ठेवण्याचे काम पाळीपाळीने करू लागले.



# मूर्ख चोर

एक ब्राह्मण कोठल्यातरी गावाहून आपल्या गावी परत चालला होता. वाटेत संध्याकाळ झाली आणि काळोख पडू लागला. ब्राह्मण एकटा होता आणि वाटेवर कोणी येणारा जाणारा पण नव्हता. म्हणून तो भीतभीत चालला होता. एका जागी चार चोरांनी त्याला अडवले आणि त्याच्याजवळ जे काही असेल ते मुकाट्याने द्यायला सांगितले.

ब्राह्मणाजवळ सोन्याची अंगठी आणि गळ्यातला सोन्याचा एक सर होता. थोडेसे पैसे पण होते. त्याने जवळचे काही दिले नाही तर चोर त्याला मारहाण करायला तयार होते.

ब्राह्मणाने आपली पिशवी उघडली आणि चोरांना पैसे व सोन्याचे नग दाखवीत म्हणाला–"चोरीचा माल चोरांच्या हाती चालला आहे."

"हा चोरीचा माल आहे?" चोरांनी आश्चर्यचकित होऊन विचारले.

"होय, कां? येथून दोन मैलांवर दोनतीन चोर वऱ्हाडाच्या गाड्या लुटीत होते. मी दुरून पाहिले. तेव्हां माझ्या हातात हे पैसे आणि दागिने देत चोर म्हणाले–"तू हे घेऊन जा, पण ही गोष्ट कोणाला सांगू नकोस." ब्राह्मण म्हणाला.

ते ऐकून चोरांनी ब्राह्मणाजवळचे पैसे घेण्याचा विचार सोडला आणि ज्या बाजूला चोरी झाल्याची गोष्ट त्याने सांगितली होती त्या बाजूला पळत निघाले. तिकडे चोर पळाले आणि इकडे ब्राह्मणाने पाय काढला.






# राजपुरोहिताचे चातुर्य

सुरेंद्रनगरच्या राजपुरोहिताचे नाव जाधोजी भट्ट असे होते. त्यांना नव्वदावे वर्ष लागले तेव्हांपासून त्यांनी दरबारात जायचे सोडले. वर्षातून फक्त एकदा आपला पगार घ्यायला ते जात. त्यांचा पुतण्या वल्लभ भट्ट राजपुरोहिताचे काम करी.

जाधोजी भट्ट सरकारी नोकरीतून सेवानिवृत्त झाला असला तरी दरबारच्या कामाकडे त्याचे लक्ष असे. दररोज वल्लभ भट्ट घरी आल्यावर त्याच्याजवळ दरबारच्या कामाविषयी विचारपूस करी.

एकदा जाधोजी पुजेला बसला होता त्याच वेळी वल्लभ भट्टाने घरी येऊन राजकुमार राज्याचे वांटे करणार असल्याचे सांगितले. त्या राज्यात दोन शहरे व बारा गावे होती. सुरेंद्रनगर व चूडानगर नावाची दोन नगरे होती. दोघां राजकुमारांची नावे अनुक्रमे अर्जुनसिंह आणि सबलसिंह अशी होती. दोघांना प्रत्येकी एक नगर व सहा गावे वांटयाला येण्यासारखी होती. परंतु प्रत्येक सुरेन्द्रनगराचाच हट्ट धरून बसला. म्हणून वांटे करण्याचे काम मध्येच थांबले.

जाधोजी भट्ट पूजा संपताच विचार करू लागला. त्याच्या मनात अर्जुनसिंहाला सुरेंद्र नगर मिळावे असे होते. त्याने मनाशी ठरवून टाकले की मोठ्या राजकुमाराला सुरेंद्रनगर देववून दुसऱ्या राजकुमाराला चुडानगर देववायचे.

दुसऱ्या दिवशी जाधोजी भट्ट दरबारात गेला. जाधोजीला एकाएकी दरबारात आलेला पाहून सर्व दरबारी चकित झाले. एका खोलीत राजकुमार बोलत बसले होते. जाधोजी तेथे गेला.

"आपण येथे येण्याची तसदी कशासाठी घेतलीत? निरोप पाठविला असतात तर आम्ही आपल्या सेवेला उपस्थित झालो

कु. सुरेश न. गव्हाणकर

असतो. विनाकारण आपल्याला इतके कष्ट सहन करावे लागले." दोघे राजकुमार म्हणाले.

"बाळांनो, तुम्ही दोघे राज्याची वांटणी करून घेत असल्याचे मी ऐकले. म्हणून तुम्हां दोघांना आशीर्वाद द्यावा, या हेतूने आलो होतो." जाधोजी भट्ट म्हणाला.

"वांटे कसे करायचे हे नाही ठरले. मी मोठा आहे. म्हणून माझे म्हणणे आहे की निवड करण्याचा अधिकार प्रथम मला मिळावा. परंतु सबलसिंहाचे म्हणणे निराळे आहे. तो म्हणतो की तो लहान आहे म्हणूनच त्याला निवड करण्याचा अधिकार प्रथम मिळायला हवा. आतां आपण आला आहां, हे बरेच झाले. आता आपणच [illegible] आहे, हे सांगावे!" अर्जुनसिंह म्हणाला.

"ते मी कसे काय सांगू बुवा? तुम्ही दोघे मला माझ्या दोन्ही डोळ्यांसारखे आहां. याशिवाय तुमच्या राज्यकारभाराच्या कामात माझे मुळीच लक्ष नाही. मी त्या बाबतीत विचारसुद्धा करायचे सोडले आहे." जाधोजी भट्ट म्हणाला.

"म्हणूनच तर आपण म्हणाल ते आम्हांला मान्य आहे. आपण म्हणाल तसे आम्ही करू. आपणावर आमचा पूर्ण विश्वास आहे." दोघे राजकुमार म्हणाले.

"मी तुम्हाला एक गोष्ट सांगतो. ऐका. प्राचीन काळी एका ऋषींकडे दोघे शिष्य होते. त्यांनी बारा वर्षे आपल्या गुरूकडे



[illegible] कला अवगत करून घेतल्या. नंतर त्यांनी स्वगृही जाण्याची गुरूची परवानगी मागि-तली. त्यावेळी गुरूने अग्निकुंडातून थोडेसे भस्म घेऊन थोडे थोडे प्रत्येक शिष्याच्या हातात ठेवले. एकाने ते गिळले. दुसऱ्याने ते फेकून दिले. ज्याने ते गिळले तो एक मोठा विद्वान पंडित निघाला आणि आयुष्यभर सुखी झाला आणि दुसरा मंदबुद्धी व गुरुनिंदक निघाला. तशी तुम्ही माझी निंदा करणार नसाल तर मी तुम्हांला एक युक्ती सांगतो." जाधोजी भट्ट म्हणाला.

दोघांनी दुसऱ्या दिवशी राजपुरोहिताच्या सूचनेप्रमाणे वांटणी करून घ्यायचे मान्य केले. त्यानंतर जाधोजी भट्टाने घरी येऊन अर्जुनसिंहाच्या नावी एक चिट्ठी "तू चांगल्या शिष्यासारखा वाग, तुझे हितच होईल." लिहून पाठविली.

दुसऱ्या दिवशी जाधोजी राजवाड्यात आला. त्याच्याबरोबर दोघे राजकुमार एका खोलीत गेले. जाधोजी भट्टाने दोन चिट्ठ्या दाखविल्या आणि म्हणाला—"या चिट्ठ्यात मी सुरेन्द्रनगर व चूडानगर नावे लिहून ठेवली आहेत. तुम्ही दोघे एकेक चिट्ठी उचला. ज्याला ज्या नगराचा कागद मिळेल ते नगर व सहा गांवे मिळतील."

अर्जुनसिंहाने चटदिशी एक चिट्ठी उचलली व ती उघडून पाहिल्याशिवाय तोंडात टाकली व गिळूनपण टाकली.

सबलसिंहाने चकित होऊन विचारले—"तू कोणते नाव लिहिले आहे हे नाही पाहिलेस."

"त्यात काय? तुझ्या चिट्ठीत जे नगर लिहिले असेल ते तू घे दुसरे मी घेईन." अर्जुनसिंह म्हणाला.

सबलसिंहाने आपली चिट्ठी उघडून पाहिली. चिट्ठीत चूडानगर गाव लिहिले होते. अशातऱ्हेने बिनबोभाट राज्याची वांटणी झाली. आजपर्यंत सुरेन्द्रनगरचे लोक ही गोष्ट सांगून हंसतात की राजपुरोहिताने दोन्ही चिट्ठ्यांवर "चूडानगर" लिहून सबलसिंहाला फंसविले.



     



# सैंपाक्यांचा मालक

एकदा एक संस्थानिक आपल्या एका सरदाराच्या घरी मेजवानीला गेला. संस्थानिकाला दररोज नवनवीन पक्वान्ने खाण्याची संवय होती. तो आपल्या सैंपाक्याकडून काही तरी नवीन पक्वान्न तयार करवी. त्याच्याकडे एकाहून एक हुशार सैंपाकी होते. परंतु सरदाराच्या घरी जी मेजवानी झाली तो सैंपाक काहीतरी औरच होता.

"तुमच्या घरचा सैंपाकी आमच्या राजवाड्यातल्या सैंपाकघरात राहण्याची लायकी असलेला आहे. त्याला माझ्याबरोबर पाठवा." संस्थानिक सरदाराला म्हणाला व सैंपाक्याला घेऊन राजवाड्यात आला. त्या सैंपाक्याचा पगार दरमहा पन्नास सुवर्ण मुद्रा ठरल्या. इतकी मोठी रक्कम आपण फुकट घालवतो आहो, असे संस्थानिकाला वाटले नाही. कारण खरोखरच सैंपाकात सुधारणा झाली होती. म्हणून संस्थानिकाने त्या सैंपाक्याचा पगार शंभर सुवर्णमुद्रा केला.

त्या दिवसापासून सैंपाक बेताचा होऊ लागला. सैंपाक चवदार होत नाहीसा झाला आणि ती गोष्ट जाणवू लागली. खरी गोष्ट काय आहे, हे कळावे म्हणून संस्थानिक स्वतः सैंपाकघरात गेला. तेथे जाऊन पाहतो तर तो सैंपाकी एका जागी बसून हुक्का पीत होता. दोघे जण सैंपाक करीत होते. सैंपाकी नवेच कोणी होते. संस्थानिकाने सैंपाक्याला विचारले– "हे दोघे जण कोण?" तो म्हणाला–"हे माझे नोकर आहेत, सरकार!"

"मी तुला सैंपाकी म्हणून नेमले होते. सैंपाक्यांचा मालक नेमले नव्हते. तुझा पगार वाढवला ही माझीच चूक म्हणा!" असे सांगून त्या दिवसापासून संस्थानिकाने त्या सैंपाक्याचा पगार कमी केला





# भुतांचा तलाव

फार प्राचीनकाळातील गोष्ट आहे. माधवी नामक गावाजवळ एक तलाव होता. उन्हाळ्याच्या दिवसात सुद्धा तलावात भरपूर पाणी असे. गावातल्या शेतांना, गुरांना व लोकांना त्याच तलावाच्या पाण्याचा पुरवठा होता.

त्या तलावाच्या उत्तरेला गावाचे स्मशान होते. त्या स्मशानात ज्या ज्या लोकांचा अंत्यसंस्कार झाला होता ते सर्व भुते होऊन त्या तलावाच्या आश्रयाला राहतात, असा गावातल्या लोकांचा समज होता. म्हणून लोक त्याला भुतांचा तलाव म्हणत. अशा तऱ्हेने तो तलाव जिवंत माणसांनाच नव्हे तर मृत माणसांना सुद्धा उपयोगी वाटत असे. काळोख पडल्यानंतर एकहि गावकरी त्या तलावाच्या बाजूला जात नसे.

गावातला कोणी दुष्ट मनुष्य मरे तेव्हां लोक म्हणत की भुतांनी त्याला दंड दिला आणि आपली पीडा कायमची टळली. भुते चांगल्या लोकांना त्रास देत नाहीत असे समजून लोक मनाचे समाधान करून घेत.

त्या गावी मारीच नावाचा एक विक्षिप्त मनुष्य रहात असे. त्याची बायको फार सुंदर होती. नवऱ्याचे बायकोवर फार प्रेम होते. तो काही कामधंदा करीत नसे. त्याची बायकोच काही तरी काम करून दोघांच्या पोटापाण्यापुरते मिळवी.

काही दिवसांनी मारीचची बायको आजारी पडून मेली व मारीच बेशुद्ध होऊन पडला. त्या बेशुद्धावस्थेत त्याला स्वप्न पडले की कित्येक भुते त्याच्या बायकोला ओढून तलावाकडे नेत आहेत.

मारीच शुद्धीवर आल्या नंतर बायकोच्या नावाने हाका मारीत तलावाकडे पळू लागला ते पाहून गावकऱ्यांना वाटले की

श्रीमती गोदावरी वर्तक

त्याला वेड तरी लागले असावे की त्याच्या मानेवर भूत बसले असावे.

त्यामुळे मारीचच्या बायकोला स्मशानात घेऊन जाऊन तिचा अंत्यविधि उरकून घ्यायला खोळंबा झाला. कारण मारीच म्हणाला–"माझी बायको मेली नाही, जिवंत आहे. तिला जाळू नका." तो आपले डोक्याचे केस पिंजारून उपटू लागला आणि वेड्यासारखा मोठमोठाने ओरडू लागला. लोकांना त्याची कीव येई. परंतु त्याला खरोखरी मतिभ्रम झाला होता.

पुढे मारीचला वेडच लागले. कोणी बाई समोर येई तेव्हां तो समोर जाऊन तिचा चेहरा जवळून पाही की ती त्याचीच बायको तर नाही? परंतु पुरुषांना पाही तेव्हां तो मोठ्याने ओरडे–"तुम्हीच नाही का [illegible] बायकोला तलावाकडे ओढून नेलेत? खरे सांगा!" गावकरी त्याच्या समोर यायला भीत. तो मेल्यावर नक्कीच भूत होऊन कोणाच्यातरी मानगुटीला बसणार अशी दहशत गावकऱ्यांना बसली.

काही लोकांनी मांत्रिकाला बोलावून मारीचचा काहीतरी इलाज केला पाहिजे, असे सुचविले. परंतु काही लोकांनी दुसरी एक शंका काढली की असे केल्यास भूते रागावतील आणि गावावर स्वारी करतील. म्हणून उगाच धोक्यात जीव घालणे शहाणपणाचे होणार नाही.

मारीच खाणेपिणे सोडून तलावानजीक स्मशानात हिंडू फिरू लागला. ज्या जागी



[illegible] होते त्या जागी बसून तो तासन्तास रडत बसे. त्याच्या चारीबाजूला कोल्हेकुत्री एकत्र होत. ऊन पाऊस, काही असो, तो स्मशानातून बाहेर निघत नसे. तेथेच झोपे.

एकदा मारीचला एक विचित्र दृश्य दिसले. तलावातून एकदम कित्येक चित्र विचित्र आकृती बाहेर निघून आरडाओरडा करू लागल्या. ही सर्व भुते असावीत व यांच्या गर्दीत त्याची बायको नक्कीच असेल असा विचार करून तो बायकोचे नाव घेऊन मोठमोठ्याने ओरडू लागला.

मारीचचे ओरडणे ऐकून काही भुते त्याच्याजवळ आली. मारीचने भुतांना विचारले–"काय हो, तुम्हीच नाही का, माझ्या बायकोला उचलून घेऊन गेलात? लवकर दाखवा तिला. मी तुमच्या वाटेला कधी गेलो का?"

"आम्ही तुझ्या बायकोला उचलून घेऊन गेलो, हे खरे आहे. पण आम्ही आपले कर्तव्य पालन केले आहे. परंतु तुझी बायको दोन दिवसांपूर्वी पुन्हां मेली. आता तुला कसे दाखवितां येईल?" भुतांनी उत्तर दिले.

"खोटे बोलता आहां तुम्ही. कोणी अशा गप्पांवर विश्वास तरी करील का? भुते कधी मरतात का?" मारीचने रागाने विचारले.

"आम्हांला सुद्धां मरण येते. तू आपल्या बायकोसाठी रडून रडून किती वाळून



अशक्त झाला आहेस, तशीच तुझी बायको अशक्त होऊन मेली. आज आम्ही वेताळाच्या आज्ञेप्रमाणे हा तलाव सोडून दुसरीकडे जात आहो. तुझी बायको आमच्यामध्ये नाही. पाहिजे तर तू येऊन पहा." भुते म्हणाली.

"तरमग मेल्यानंतर माझी बायको कोठे गेली?" मारीचने विचारले.

याच तलावात माशाचे रूप घेऊन तुझी बायको हिंडते आहे. तिला ओळखणे आम्हांला देखील शक्य नाही. आता तूदेखील तिला विसर." असे सांगून सर्व भुते निघून गेली.

"माझी बायको वाटेल ते रूप घेऊन रहात असली तरी मी तिला नक्कीच ओळखीन." मारीच म्हणाला.

दुसऱ्या दिवशी मारीच गावात गेला. एक जाळे घेऊन मासे पकडू लागला. जाळ्यात सापडलेला प्रत्येक मासा घेऊन तो जवळून न्याहाळून पाही आणि बाजूला उचलून ठेवी. गावकरी मासे विकत घ्या-

तेव्हां गावकऱ्यांनी त्यांना पाहिजे तेवढे मासे उचलले आणि पैसे तेथेच ठेवून निघून गेले. दररोज संध्याकाळपर्यंत माशांची रास संपून जाई व पैशांची लहानशी रास तेथे जमा होई.

परंतु मारीचच्या मनात बायकोला भेटण्याची इच्छा जशीच्या तशीच होती. मासे पकडण्याचे काम दररोज निर्विघ्नपणे चालू राही. मासे पाहण्यात व त्यात त्याची बायको शोधण्यात केव्हां रात्र होई हे त्याला कळत नसे. आयुष्याचा वीट येण्याऐवजी तो त्या निमित्ताने कामात गर्क होऊन जाई आणि हळूहळू त्याचे वेड पार नाहीसे झाले.

गावकऱ्यांना मारीच सुधारला असल्यासारखे वाटू लागले. त्यानेच तलावातल्या भुतांना पळवून लावले, असे गावकरी म्हणू लागले. हळूहळू 'भुतांचा तलाव' हे नाव जाऊन त्याला 'माशांचा तलाव' हे नाव मिळाले.





# महाभारत

युधिष्ठिराने सर्व भावंडांना एकत्र बसायला सांगून विचारले–"आता, अज्ञातवासात आपण कसे रहायचे? या एक वर्षात कोणी आपल्याला ओळखता कामा नये. सावधगिरी बाळगली पाहिजे."

अर्जुन म्हणाला–"पांचाल चेदी, मत्स्य, शूरसेन पौंचाल, दशार्ण, नवराष्ट्र, मल्ल, साल्व, युगंधर, कुंती, सुराष्ट्र, अवंती इत्यादी देश सुखी व संपन्न आहेत. यांपैकी कोणत्याही देशात आपल्याला निर्भयपणे अज्ञातवास करता येईल. आपल्यावर धर्मदेवतेचा अनुग्रह आहे. म्हणून अज्ञातवासात कोणत्याही प्रकारचे संकट येणार नाही."

"मत्स्य देशाचा राजा विराट थोर धर्मात्मा पुरुष आहे. आपण त्याच्या पदरी एक वर्षभर नोकरी करू या. पण तुम्ही कोणता वेष धारण करून राहणार?" युधिष्ठिराने विचारले.

ते ऐकून अर्जुन थोडा दुःखी होऊन म्हणाला–"दादा! आम्हांला कोणती ही नोकरी करायला काही वाटणार नाही. परंतु कधी कोणाची सेवा करण्याचा प्रसंग तुझ्यावर आला नाही. मग विराटाकडे तू कोणती नोकरी करणार?

तेव्हां युधिष्ठिर म्हणाला–"मी ब्राह्मण वेष धारण करून कंक नावाने विराट राजाच्या सभेत नोकरी मिळवीन. मी राजा, मंत्री व दरबारी सर्वांची सोंगट्यांचा खेळ खेळून करमणूक करीन. कोणी विचारले की तू पूर्वी काय करीत होतास



तर मी युधिष्ठिराचा एक मित्र आहे असे सांगेन." असे सांगून युधिष्ठिराने भीमाला विचारले–"भीमा! तू विराटाच्या दरबारी कोणत्या तऱ्हेची नोकरी करणार?"

"मला उत्तम सैंपाक करता येतो. मी बल्लव या नावाने सैंपाक्याची नोकरी पत्करून विराट राजाला पंच पक्वान्ने तयार करून वाढीन. कोणत्याही प्रकारचे कुऱ्हाड कोयता वगैरे हत्यार घेतल्याशिवाय लाकडे फोडून राजाला चकित करून सोडीन. राजाच्या करमणुकीसाठी कुस्तीचे कार्यक्रम ठेवून मोठ मोठ्या पहेलवानांची पाठ मऊ करीन. कोणी विचारलेच की तू कोठला व काय करीत होतास तर सांगेन की मी

असे. मला कोणी ओळखणार नाही, या गोष्टीची काळजी बाळगीत." भीम म्हणाला.

अर्जुनाचा प्रश्न जवळ जवळ सुटल्यासारखाच होता. ऊर्वशीने त्याला नपुंसक होण्याचा शाप दिला होता. इंद्राने अज्ञातवासात तो शाप भोगण्यास सुचविले होते. अर्जुन म्हणाला–"मी बृहन्नला नावाने विराटाच्या अंतःपुरात एक विचित्र वेष धारण करून प्रवेश करीन. मी पुरुष आहे की स्त्री हे कळणारच नाही. मी अंतः पुरातील स्त्रियांना नृत्य व संगीत विद्या शिकवीन. राजाने माझा पूर्व परिचय विचारला तर मी द्रौपदीची सेवा करीत असे असे सांगेन."

नंतर नकुल म्हणाला–"मी ग्रांथिक नावाने विराटाच्या अश्वशालेत राहून त्याच्या घोड्यांना उत्तम शिक्षण देईन. मी अश्वविद्येत व अश्वचिकित्सेत निष्णात आहे, हे आपल्याला माहीतच आहे. मी पूर्वी युधिष्ठिराच्या अश्वशालेवर एक अधिकारी होतो, असा आपला परिचय देईन."

शेवटी सहदेव म्हणाला–"मी तंतिपाल या नावाने विराट राजाच्या गोशालेत नोकरी करीन. मला गाईंच्या आजारांची व तिच्या वासरांचा वाढ कशी होईल याची उत्तम माहिती आहे. तेव्हां हे काम मी सहजी करू शकेन." सहदेव म्हणाला.



काळजी वाटू लागली. तिने राजमहिषी असूनही स्वतःची कामें आपखुशीने केली होती, परंतु दुसऱ्याच्या पदरी तिला नोकरी करावी लागणार, या गोष्टीस त्याचे मन तयार होईना.

परंतु सून द्रौपदी म्हणाली–"तुम्ही माझ्या विषयी इतकी काळजी करण्याचे कारणच काय? मी सैरंध्री नावाने अन्य दासींच्या बरोबर अंतःपुरात काम करीन. मी राजघराण्यातल्या स्त्रियांची वेणीफणी करीन. सुदेष्णा राणीच्या सहवासात मला कोणी ओळखणार नाही की वक्रदृष्टीने माझ्याकडे पाहणार ही नाही."

अशा तऱ्हेने धाकट्या भावंडांविषयी व द्रौपदीविषयी युधिष्ठिराची काळजी कमी झाली व मनाला थोडे हलके वाटले. त्यांनी धौम्य मुनींना व इतर सूत आदी नोकरांना द्रुपद राजाच्या आश्रयाला एक वर्ष भर जाऊन राहण्यास सांगितले. इतर काही लोक द्वारकेला गेले.

धौम्य ऋषी पांडवांना आशीर्वाद देऊन निघाले. नंतर इतर लोक निरोप घेऊन निघाले. त्यानंतर पंचपांडव द्रौपदीसह द्वैतवन सोडून पायी प्रवास करीत मत्स्य देशात येऊन पोचले. तो देश दशार्ण देशाच्या उत्तरेस, पांचाळ देशाच्या



दक्षिणेस व शूरसेन देशाच्या मध्यभागी होता.

द्रौपदी पायी चालून अगदी दमून गेली. तेव्हां ती म्हणाली–"आपण राजधानी पासून दूर कोठे तरी शेतात आहो. विराट नगरापर्यंत चालत जाण्याची माझ्या अंगात यावेळी तरी शक्ती उरली नाही. ही रात्र आपण येथेच झाडाखाली काढू या."

परंतु युधिष्ठिर अर्जुनाला म्हणाला–"तू द्रौपदीला खांद्यावर बसवून घेऊन चल. आपण कोठे ही न थांबता विराट नगरीत पोचले पाहिजे." त्याप्रमाणे अर्जुनाने द्रौपदीला उचलून घेतले व ते विराट नगरी येऊन पोचले.



शस्त्रास्त्रे कोठे ठेवावयाची याविषयी त्यांनी विचार केला. कारण ती घेऊन गावात जाणे धोक्याचे होते. अर्जुनाच्या गांडीव धनुष्याची ख्याती होती. म्हणून अर्जुनालाच शस्त्रास्त्रे लपवून ठेवण्यालायक जागा शोधायला युधिष्ठिराने सांगितले.

अर्जुनाने चारीबाजूला एकदा नजर फिरवून पाहिली. त्याला एका जागी स्मशानात एक शमी वृक्ष दिसला. त्या बाजूला कोणी फिरकत देखील नव्हते. म्हणून त्या शमी वृक्षाच्या दाट पानांच्या आड त्याने शस्त्रे ठेवण्याचे ठरविले.

पांडवांनी आपले धनुष्यबाण खाली व त्याच्या बाजूला तलवारी ठेवून इतर

सांगितले. त्याने झाडावर चढून शस्त्र कोणाला दिसणार नाहीत व त्यांच्यावर पावसाचे पाणी सुद्धा पडणार नाही अशा तऱ्हेने रचून ठेवली आणि शेवटी त्यांच्या-वर एक प्रेत ठेवून दिले.

प्रेत झाडावर नेत असतांना कदाचित गवळ्यांना दिसले. म्हणून पांडव त्यांना म्हणाले–"आमची आई ऐंशी वर्षांची म्हातारी होती. म्हणून आम्ही कुलधर्मा-प्रमाणे तिचे शव झाडावर टांगून ठेवले आहे."

त्यानंतर ते विराट नगराच्या दिशेने चालू लागले. त्यांनी आपसात बोलतांना परस्परांविषयी खुणेची नावे अनुक्रमे जय, जयंत, विजय, जयत्सेन व जयद्बल अशी ठेवून घेतली.

विराट नगराच्या वाटेवर युधिष्ठिराने दुर्गेचे स्मरण करून तिचे स्तवन केले व म्हणाला–"आम्ही तुझ्या आश्रयाला आहो. तूच आमचे रक्षण कर." देवी आपल्या दिव्य रूपात दर्शन देऊन म्हणाली–"तुम्ही लवकरच विजयी व्हाल." असा आशीर्वाद देऊन देवी अंतर्धान पावली.

त्यानंतर युधिष्ठिराने नदीत स्नान केले. हात जोडून धर्मदेवाचे स्मरण केले आणि म्हणाला–"यक्षरूपे तुम्ही मला जे





मागत आहे."

दुसऱ्या क्षणाला युधिष्ठिराचा वेष पालटला. त्याच्या हातात एक कमंडल आले व त्याची वस्त्रे भगवी झाली. इत-रांना वेष पालटण्यास आवश्यक सर्व वस्तू उपस्थित झाल्या. सर्वांनी त्यांना हव्या असलेल्या वस्तू उचलून घेतल्या आणि वेष पालटून तयार झाले.

युधिष्ठिराने फासे आपल्या उपरण्याच्या एका पदराला बांधून घेतले आणि विराट राजाच्या सभेत यतिवेष धारण करून प्रवेश केला. यतिवेषात ही युधिष्ठिराच्या चेहऱ्यावरचे तेज पाहून विराट राजा चकित झाला.

युधिष्ठिर विराट राजाला म्हणाला– "महाराज! मी आपले सर्वस्व घालवून बसलो आहे. काही काळ आपल्या पदरी रहावे म्हणतो. मी वैयाघ्रपद गोत्री आहे व माझे नाव कंक आहे. मी पूर्वी युधिष्ठिराचा मित्र होतो. द्यूतात मी कधी युधिष्ठिराच्या हाती हारे तर कधी ते. माझ्याकडून ते काही मागत नसत. आपण माझ्या बरोबर तसाच व्यवहार करावा."

ते ऐकून विराट म्हणाला–"माझ्या दरबारात किंवा कुटुंबात तुझ्याशी कोणी सद्व्यवहार केला नाही तर मी त्याला उचित दंड देईन. कोणी तुझ्याकडून धन किंवा धान्य मागितले तर मला सांग, मी त्यांना देईन."





काही वेळाने काळ मळके कपडे घालून भीम आला. त्याच्या एका हातात उलथणे व पळी होती व दुसऱ्या हातात सुरी होती. तो राजाला म्हणाला–"महाराज, मी एक सैंपाकी आहे. माझे नाव वल्लव आहे. मला सर्व तऱ्हेची पक्वान्ने करता येतात."

"पण तुला पाहून तू सैंपाकी असशीलसे वाटत नाही?" विराट राजाने भीमाला विचारले.

"माझ्या सैंपाकाची माहिती युधिष्ठिर राजाला आहे. माझ्या अंगात इतकी शक्ती आहे की आपल्या करमणुकीसाठी मी हत्तीशी किंवा वाघाशी युद्ध करून दाखवीन." भीम म्हणाला.

"ठीक, तरमग तू आमच्या स्वयंपाक घरात मुख्य आचारी म्हणून काम कर." असे सांगून विराट राजाने त्याला सैंपाक घरात पाठवून दिले.

त्याच सुमारास द्रौपदी मळकी साडी नेसून विखुरलेल्या केसानिशी सैरंध्री म्हणून राजधानीच्या गल्लयातून हिंडत होती. तिला पाहून नागरिकांनी तिला विचारले– "बाई, कोण तू? काय काम करतेस?"

"मी सैरंध्री आहे. कोणी मला दोन वेळ जेवायला व कपडे अंगात घालायला दिले तर मी त्यांच्या घरी सांगतील ते काम करीन." द्रौपदी म्हणाली.

त्याच वेळी सुदेष्णाराणी राजवाड्याच्या गच्चीवर फिरत होती. तिने द्रौपदीला बोलावून घेऊन यायला एका दासीला पाठविले आणि आल्यावर विचारले–"कोण ग बाई तू? काय काम करतेस?"

"राणी! मला सैरंध्री म्हणतात. मला वेणी घालता येते व फुलांचे हार, गजरे करता येतात. मी कृष्णाची राणी सत्यभामा व पांडवांची राणी द्रौपदी यांची सेवा करून त्यांच्या मनासारखे काम केले आहे. द्रौपदी मला प्रेमाने मालिनी म्हणत असे." द्रौपदी नम्रपणे म्हणाली.

"तू तर बायकांच्या सुद्धा डोळ्यात भरण्या इतकी सुंदर दिसतेस. मला वाटते की महाराजांची चुकून तुझ्यावर दृष्टी पडली तर म्हणून तुला आपल्या अंतःपुरात ठेवायला मला भीती वाटते." राणी सुदेष्णा द्रौपदीचे अप्रतिम सौंदर्यपाहून काहीसे थट्टेत व काही खरोखर भीतभीत म्हणाली.

"महाराणी! विराटच काय, कोणी दुसरादेखील माझ्याकडे वांकड्या नजरेने पाहणार नाही. पांच गंधर्वपुत्र माझे प्रियकर आहेत. ते सर्वदा गुप्तरूपे माझ्या रक्षणास उपस्थित असतात. मला सर्व कामे करता येतात. फक्त दोन कामे करायला मला सांगू नये. कोणाचे पाय मी धुणार नाही की कोणाचे उष्टे खरकटे मी खाणार नाही. कोणी मला सामान्य स्त्री समजून माझ्या वाटेला गेला तर रात्रीच्या रात्री माझे पती त्या माणसाचा समाचार घेऊन त्याला यमलोकी पाठवितील." द्रौपदी म्हणाली.

सुदेष्णाने द्रौपदीच्या सर्व अटी मान्य करून तिला अंतःपुरात कामाला ठेवून घेतले.

त्यानंतर नपुंसक रूपाने अर्जुन विराटाकडे आला. तो दाट तांबड्या रंगाचे कपडे घालून आला होता. तो सभासदांच्या मधून सरळ राजासमोर जाऊन उभा राहिला व म्हणाला–"महाराज! माझे नाव बृहन्नला. मी नृत्यकलेत प्रवीण आहे. तसे मला



वेणीफणीचे किंवा हारतुरे करण्याचे काम देखील करतां येते."

राजा विराटाला, अर्जुन म्हणाला त्यावर विश्वास होईना. म्हणाला–"तुझे लांबलांब हात व वृषभस्कंध पाहून तू कोणी तरी धनुर्धारी असावास असे मला वाटते."

"नाही महाराज, धनुष्य तर मी कधीच पाहिले नाही. मला संगीतशास्त्रांत पण चांगला प्रवेश आहे व नृत्यकलेत तर माझा हात धरू शकेल असा एक ही देव किंवा मानव मिळणार नाही." अर्जुन म्हणाला.

त्यानंतर विराटराजाने आपली मुलगी उत्तरा हिला बोलावून म्हटले–"बेटा! तू या बृहन्नलेजवळ नृत्यकला शीक." त्या










नंतर अर्जुन उत्तरेबरोबर अंतःपुरात गेला. काही वेळाने विराटराजा आपल्या अश्व-शालेत गेला तेथे त्याला नकुल दिसला. तो घोड्यांकडे लक्षपूर्वक पाहून सईस लोकांना ,घोड्यांच्या गुणावगुणांविषयी माहिती सांगत होता. राजाने आपल्या नोकरांना विचारले–"काय रे हा कोणी अश्वपारखी दिसतो आहे. घोड्यांची जात, त्यांचे आजार व औषधपाणी आणि निगा या गोष्टींची त्याला चांगली माहिती आहे वाटते ! दरबारात घेऊन या याला." असे सांगून राजा दरबारात परत गेला.

नकुलाने राजाला नमस्कार करून निवेदन केले–"महाराज, मी उपजीविकेसाठी आपल्या राजधानीत आलो आहे. आपल्या अश्वदलाच्या सेवेचे काम मला देण्याची कृपा करावी. मी पूर्वी महाराज युधिष्ठिराच्या अश्वशालेत एक अधिकारी होतो. माझे नाव ग्रांथिक असे आहे."

ते ऐकून राजाला आनंद झाला. त्याने नकुलाला अश्वदल व रथयांची देखरेख क[illegible] म्हणून नेमले. आणखी थोड्या वेळाने सहदेव आला. तो गवळ्याचा वेष करून आला होता. त्याच्या गळ्यात फुलांच्या माळा, हातात दोऱ्या व एक बासरी होती.

तो राजाजवळ जाऊन म्हणाला–"महाराज ! मला गाईंच्या जातींची, गोपालनाची व औषधपाण्याची उत्तम माहिती आहे. दुभत्या गाईंचे दूध वाढवून व उत्तमोत्तम बैलांच्या जाती निवडून गोधनवृद्धी करण्याच्या कामात माझी बरोबरी करू शकेल असा कदाचितच कोणी या जगात असेल. अरिष्टनेमी नामक वैश्यकुळात मी जन्मलो. युधिष्ठिराच्या कोट्यावधी गाईंची जोपासना मी करीत असे. तंतिपाल या नावाने लोक मला ओळखतात."

सहदेव म्हणाला ते ऐकून राजा खूष झाला व त्याने आपल्या गाईंच्या रक्षणाचा भार त्याच्यावर टाकला.

अशा तऱ्हेने सर्व पांडव विराट राजाच्या आश्रयाला येऊन अज्ञातवास करू लागले.





# शिवपुराण

## [१५]

एकवीस गणाधिपतींचे विवाह विश्वदर्शी नामक उपब्रह्माच्या मुलींशी झाले. तेव्हां पार्वती शंकराला म्हणाली–"हे सदाशिवा ! माझ्या मुलांना अधिकार देऊन गजासुराला आपण जो वर दिलात तो देखील सार्थक होईल असे करावे."

शंकर पार्वतीची ती इच्छा पुरी करण्याच्या प्रयत्नात असताना कुमारस्वामीने प्रवेश करून मागणी केली की त्याला देखील गणाधिपत्य देण्यात यावे.

"तुला देवांचे आधिपत्य देण्यात आले आहे. आतां रुद्रगणांवर अधिकार लक्ष्मी गणाधिपतींना देण्यात येत आहे. तूदेखील या गोष्टीस मान्यता दिली पाहिजे." शंकर म्हणाला.

कुमारस्वामीला ती गोष्ट मान्य झाली नाही. त्याने गणाधिपत्यासाठी हट्ट धरला. तेव्हां शंकराने कुमारस्वामी आणि एकवीस लक्ष्मी गणपतींमध्ये जो सर्वात मोठा होता त्यांच्यात एक चढाओढ ठेवली. दोघांनी आपापल्या वाहनांवर बसून जावयाचे ठरलें आणि त्यांनी सर्व तीर्थक्षेत्रांचे दर्शन, स्नान करून पृथ्वीप्रदक्षिणा करून परत कैलास पर्वतावर यावयाचे असे देखील ठरले. जो पहिल्याने परत येईल त्याला सर्व गणांवर प्रमुख म्हणून नेमले जाईल असें शंकराने सांगितले. दोघांनी चढाओढीच्या अटी मान्य केल्या. कुमारस्वामी मयूरवाहनावर व लक्ष्मीगणपति गजासुरांवर, म्हणजे मूषकरूपे त्याचा वाहन होऊन राहिला होता त्याच्यावर बसून तीर्थदर्शनाला व पृथ्वीप्रदक्षिणेला निघाले. कुमारस्वामी मोरावर बसून आकाशात उडू लागला.



लक्ष्मीगणपतीने पार्वतीजवळ जाऊन तक्रार केली–"आई, पाहिलेस ना, माझ्यावर कसा अन्याय केला आहे तो? कुमार वयाने मोठा आहे व उंचपण आहे, त्याला मयूरवाहन मिळाले आहे. मी आधीच गिड्डा. माझे डोके व पोट मोठे आणि मी उंदरावर बसून कशी काय पैज जिंकणार?"

तेव्हां पार्वती म्हणाली–"बाळा! तू तुझे मामा विष्णू आहेत ना, त्यांना जाऊन काहीतरी उपाय विचार." तेव्हां लक्ष्मी गणाधिपती विष्णूकडे गेला आणि चढाओढीची गोष्ट सांगून म्हणाला–"मामा! कुमारस्वामीबरोबर शर्यत लावून ती मी जिंकू शकेन का? तो केव्हांच पुढे निघून गेला. मला शर्यत जिंकून गणाधीश व्हायला काही तरी युक्ती सांग."

ते ऐकून विष्णू म्हणाला–"अरे, त्यात काळजी करण्यासारखे काहीच नाही. तू शिवपंचाक्षरी मंत्र पांच लाख वेळां म्हणून पार्वती व परमेश्वर म्हणजे तुझे आईवडील यांना तीनदा प्रदक्षिणा घाल, म्हणजे तुला तीर्थदर्शनाची व पृथ्वीप्रदक्षिणेची फलप्राप्ती होईल."

लक्ष्मीगणपति ते ऐकून फार खूष झाला. त्याने लगेच स्नान केले व दर्भासनावर बसून प्रथम प्रातःसंध्या करून नंतर शिवपंचाक्षरी मंत्राचा जप सुरू केला.

तिकडे कुमारस्वामी मयूर वाहनावर बसून पहिल्याच तीर्थक्षेत्रात पोंचणार एवढ्यात त्याला लक्ष्मीगणपती तीर्थस्नान करून पुढल्या तीर्थ क्षेत्राकडे निघालेला दिसला. कुमारस्वामीने जवळ जाऊन पाहिले तेव्हां वाळूत उंदराच्या पावलांच्या स्पष्ट खुणा दिसल्या. त्याने जवळपासच्या लोकांना विचारले–"काय हो, येथे कोणी "वक्रतुंड महाकाय" ढेरपोट्या, गिड्डा उंदरावर बसून स्नानाला आला होता का आणि तो स्नान करून गेला का?"

"होय हो, आत्तां आत्तांच गेला. तो पहा, दूर अजून जाताना दिसतो आहे. कोणी मोठा पुण्यवान दिसतो. आम्हां सर्वांना [illegible] घेऊन गेला.

"वा रे वा! या गिड्डयाने कायपण कमाल केली आहे? येथे फार वेळ स्नान करीत बसण्यात अर्थ नाही. पुढे निघून गेले पाहिजे." असे म्हणत कुमारस्वामी त्या क्षेत्रात तीर्थ स्नान व दर्शनादि केल्याशिवाय दुसऱ्या तीर्थ क्षेत्रात निघून गेला. परंतु तेथे पोचल्यावर कळले की तेथून स्नान करून लक्ष्मीगणपती पुढल्या तीर्थक्षेत्री निघून गेला आहे.

प्रत्येक तीर्थक्षेत्रात कुमारस्वामीला तोच अनुभव आला. तो कोणत्याही तीर्थक्षेत्रात स्नान, दर्शनादि केल्याशिवाय फक्त पृथ्वीप्रदक्षिणा करून कैलास लोकी परत आला.

त्या अवधीत लक्ष्मीगणपतीने शिवपंचाक्षरी मंत्राचा पांच लाख वेळां जप केला आणि पार्वती परमेश्वरांना तीनदां प्रदक्षिणा घालून त्यांच्यासमोर हात जोडून उभा राहिला.

सभेत जे लोक उपस्थित होते आपसात बोलू लागले–"हा लक्ष्मीगणपती पृथ्वीप्रदक्षिणा केल्याशिवाय गणाधीश होणार आहे वाटते?"

इतक्यात कुमारस्वामी परत आला आणि पार्वती परमेश्वरांस म्हणाला–"मी गणाधीश होण्यालायक नाही. गणपतीलाच गणाधीश नेमा."

सभेत उपस्थित असलेल्या लोकांना व पार्वती परमेश्वरांना ते ऐकून आश्चर्य



वाटले. त्यांनी कुमारस्वामीला चकित होऊन तसे विचारण्याचे कारण विचारले– "तू असे कां म्हणतो आहेस ?"

"मी जगातली सर्व तीर्थक्षेत्रे पाहून आलो. परंतु कोठे तीर्थस्नान केले नाही. कारण प्रत्येक तीर्थक्षेत्रात हा लक्ष्मीगणपती माझ्या आधी पोंचून तीर्थस्नान उरकून पुढे निघून जाताना दिसे. तीर्थस्नान करणाऱ्या इतर लोकांनी मला हेच सांगितले. हा माझ्याहून जास्त बलवान व वेगवान ठरला आहे. हाच रुद्रगणांचा प्रमुख होण्यालायक आहे." कुमारस्वामी म्हणाला.

सभेत उपस्थित व्यक्तींना तेव्हां कोठे शिवपंचाक्षरी जपाचे महत्व कळले आणि त्यांनी लक्ष्मीगणपतीला रुद्रगणाधीश करण्यास स्वीकृती दिली. गणपतीचा अभिषेक तेव्हांपासून सुरु झाला.

रुद्रगणांनी सर्व पवित्र नद्यांचे पाणी आणले. प्रथम, भूत, गरुण, गंधर्व, किन्नर, किंपुरुष, नाग आणि भूलोक वासियांस निमंत्रणे गेली आणि बृहस्पतीने अभिषेकाचा

व त्याची पत्नी जयलक्ष्मी दोघांना रत्न खचित सिंहासनावर बसविण्यात आले आणि त्यांना सर्व गणांवर व त्याच्या भावांवर अधिकार देण्यात आला. त्यानंतर पार्वती-परमेश्वरांनी अभिषेक केला आणि ती गणपतीला म्हणाली–"तू व तुझे भाऊ सर्व मिळून त्रिलोकावर राज्य करा. जे तुमची आराधना करतील त्यांना मदत करीत जा व त्यांच्या कार्याची सिद्धी करा."

तिकडे तारकासुराच्या मरणानंतर त्याची बायको आपले मुलगे तारकाक्ष, कमलाक्ष आणि विद्युन्मती यांना बरोबर घेऊन रसातळाला पळून गेली. तेथे शुक्राचार्यांच्या सहाय्याने त्यांना सर्व विद्या शिकविल्या आणि त्यांना लहानाचे मोठे केले.

ही मुले मोठी झाली तेव्हां त्यांना त्यांच्या मातेकडून त्यांच्या पित्याच्या मृत्यूचा वृत्तांत कळला. तेव्हां ते मेरुपर्वतावर जाऊन ब्रह्मदेवाचे स्मरण करून तपश्चर्या करू लागले.



# १२५. कोफुकंजिचे गोपुर

जपान देशातील 'नर' नामक एका प्राचीन नगरीत हा पाच मजली गोपुर आहे. सुमारे ५०० वर्षांपूर्वी याचा निर्माण झाला. याचे शिखर कांस्याचे आहे व याला विजेचा धक्का लागत नाही. गोपुराची उंची १६५ फूट आहे. समोर दिसत असलेल्या सरोवराचे नाव "सरुसवा" आहे.





# अमरवाणी

न सा सभा यत्र न सन्ति वृद्धा,
वृद्धा न ते ये न वदंति धर्मम्,
धर्मो न वै यत्र च नास्ति सत्यम्,
सत्यम् न तद्यच्छल नानु विद्दम् । ॥ १ ॥

[जेथे पोक्त विचार असणारे वृद्ध नाहीत ती सभाच नव्हे ज्यांना धर्म काय हे कळत नाही ते वृद्धच नव्हेत. सत्याचा अभाव असेल तर तो धर्मच नव्हे (आणि) कपट ज्यात आहे ते सत्यच नव्हे.]

विद्या ददाति विनयम्;
सा चे दविनया वहा,
किं कुर्मम ? कस्य वा ब्रूम ?
गरदायाम् स्व मातरि! ॥ २ ॥

[विद्येने विनय म्हणजे नम्रपणा येतो. विद्येमुळे अविनम्रपणा (उद्धटपणा किंवा गर्व) उत्पन्न झाला तर मातेने विषपान करविल्यासारखेच (नाही का) मग कोण काय करणार किंवा बोलणार ?]

राजवत् पुत्रदाराश्च,
स्वामिवत् मित्र बांधवाः,
आचार्यवत सभामध्ये
भाग्यवंतं स्नुवंति हि । ॥ ३ ॥

[जो भाग्यवान असेल त्याच्याशीच बायको व मुले राजा मानून वागतात, बंधुमित्र मालक मानून वागतात आणि सभेत त्याचा आदार गुरुतुल्य होतो.]

संग्रह



# संकेत पंडित

फार प्राचीन काळातील गोष्ट आहे. कांचीपुरम येथे 'संकेत पंडित' म्हणून एक पंडित रहात असे. तो सांगे व तसा वागेपण की मनुष्याने आपले विचार बोलून प्रगट करण्याऐवजी कोणता तरी संकेत करून व्यक्त करावेत.

एकदा तो राजाकडे गेला आणि त्याने ती गोष्ट राजाला सांगितली.

राजा त्या पंडिताची ती सूचना ऐकून मनातल्या मनात खूप हसला व म्हणाला– "पंडितश्रेष्ठ! आपण ही गोष्ट सांगण्यासाठी इतक्या दुरून येण्याचे कष्ट केलेत. परंतु मी यापूर्वीच एका संकेतशास्त्र्याला शिव गंगपूर नावाच्या गावी पाठशालेत नेमले आहे."

राजाने थट्टेत ती गोष्ट सांगितली होती. कारण त्याने तशा कोणत्या व्यक्तीला नेमले नव्हते. परंतु संकेत पंडिताला ते खरे वाटले व तो म्हणाला–"महाराज, आपण फार दूरदर्शी आहां. म्हणून एका पाठशालेत एका संकेत शास्त्र्याला आपण नेमले आहे. लहानपणीच कोणतीही विद्या अवगत करणे सोपे असते. मी त्या संकेतशास्त्र्यांना भेटायला जावे म्हणतो." असे सांगून संकेत पंडित राजाला नमस्कार करून शिवगंगपूरला जाण्यासाठी निघाला.

दोन दिवस पायी प्रवास केल्यावर संकेत पंडित शिवगंगपूरला येऊन पोचला. तेथल्या पाठशालेच्या अधिकाऱ्यांनी संकेत पंडिताचा आवश्यक स्वागत सत्कार केला आणि म्हणाले–"पंडित प्रवर आमचे शास्त्रीबुवा तीर्थ यात्रेला गेले आहेत व एका महिन्या-नंतरच परत येऊ शकतील."

"ठीक आहे, काही हरकत नाही. मी इतक्या दुरून येऊन त्यांना भेटल्याशिवाय गेलो तर ते बरोबर होणार नाही. म्हणून

बा. ना. गोडबोले

मी ते परत येईपर्यंत येथेच राहतो." संकेत पंडित म्हणाला.

पाठशालेच्या अधिकाऱ्यांनी या पंडिताची पीडा टळावी म्हणून तसे उत्तर दिले होते. परंतु तो पंडित पक्का वस्ताद निघालेला पाहून त्यांना दुसरीच युक्ती योजावी लागली. पाठशालेचा एक नोकर होता. त्याचा एक डोळा फुटलेला होता. पाठशालेच्या मुख्य अध्यापकांनी त्याला सर्व प्रसंग समजावून सांगून कसे वागायचे हे सांगितले आणि त्याला एका विद्वान शास्त्रीबुवाचा पोशाख देऊन एका खोलीत बसविले. त्याला बजावून सांगून ठेवले की तोंडाने एका शब्दाचाही उच्चार करता कामा नये.

यानंतर [illegible] संकेत पंडिताकडे येऊन म्हणाला—"पंडितप्रवर! आमचे संकेत शास्त्री आपली तीर्थयात्रा संपवून काल रात्रीच परतले. ते समोरच्या खोलीत बसतात. आपण त्यांना जाऊन भेटावे."

संकेत पंडित आनंदाने शास्त्रीबुवांना जाऊन भेटला. शास्त्रीबुवांना एकच डोळा असल्याचे पाहून त्याने आपले एकच एक बोट दाखवून आपणांला एकच डोळा आहे का संकेत भाषेत विचारले.

त्याचे उत्तर म्हणून संकेत शास्त्र्याने आपली दोन बोटे दाखविली.

तेव्हा संकेत पंडिताने आपली तीन बोटे दाखविली. तेव्हां संकेत शास्त्र्याने मूठ वळवून त्याला दाखविली.



[illegible] पंडिताने [illegible] एक बोर दाखविले.

संकेत शास्त्र्याने ते पाहून आपल्या गाठोड्यातून एक भाकर काढून दाखविली.

ती पाहून आनंदाने संकेत पंडिताने आदरपूर्वक संकेत शास्त्र्यांना नमस्कार केला आणि खोलीबाहेर आला.

खोलीबाहेर पाठशालेचे मुख्याध्यापक आपल्या सहकाऱ्यांबरोबर संकेत शास्त्र्यांची वाट पहात होते. त्यांनी संकेत पंडिताला "शास्त्री बुवांशी बोलणे झाले का?" विचारले.

संकेत पंडित म्हणाला—"आपले शास्त्रीबुवा संकेत शास्त्रात पारंगत आहेत. ते फार मोठे तत्ववेत्ते आहेत. मी त्यांना ईश्वर एक आहे हे सांगण्यासाठी एक बोट दाखविले. त्यांनी मला दोन बोटे दाखवून ईश्वर एक असला तरी त्याची शिव-केशव अशी दोन रूपे असल्याचे त्यांनी सांगितले. तेव्हां मी त्यांनी तीन बोटे दाखवून ब्रह्मा, विष्णु व महेश अशी ईश्वराची तीन रूपे असल्याचे सुचविले. पण त्यांनी आपली मूठ वळून ते त्रिमूर्ती एकच असल्याचे सुचविले.

"त्यानंतर ईश्वर फार दयाळू आहे व त्याने मानवांसाठी कित्येक फळांची सृष्टी केली आहे हे दाखविण्यासाठी मी एक फळ दाखविले.

"परंतु ते फार मोठे तत्ववेत्ते आहेत. त्यांनी आपल्या जवळची एक भाकरी मला दाखवून सुचविले की देवाने मनुष्य प्राण्या-







साठी अन्नपाण्याची कायमची व्यवस्था करून ठेवली आहे. बोर हे देवाने दिले व भाकरी देवाच्या कृपेने मानवाने स्वश्रमाने मिळविली. केवढे तत्वज्ञान भरले आहे या संकेतात?"

संकेत पंडिताने वरील गोष्टी सांगितल्या व त्याच्या मनाचे समाधान झाल्याचे सांगून निघून गेला.

त्यानंतर पाठशालेच्या मुख्याध्यापकांनी आपल्या नोकराला बोलावून विचारले– "काय रे! सांकेतिक भाषेत संकेत पंडिताने काय विचारले आणि तू कोणते उत्तर दिलेस?"

नोकर म्हणाला–"तो पंडित पक्का वस्ताद दिसला मला. त्याने माझी थट्टा उडविण्यासाठी खोलीत पाऊल टाकताच एक बोट मला दाखविले व माझा एक डोळा फुटका असल्याचे सुचविले. पण ते त्याबद्दल न रागावता त्याला दोन बोटे दाखवून त्याच्या दोन डोळ्यांची कामे माझा एकच एक डोळा करतो, हे सुचविले.

त्याने तीन बोटे दाखविली. म्हणजे माझा एक डोळा व त्याचे दोन मिळून तीन डोळे झाले.

"पण मला त्याचा राग आला व त्याला मी आपली मूठ दाखवून पुन्हां तीन बोटे दाखविलीस तर तुझे तोंडच फोडीन असे सुचविले.

"तेव्हां तो पंडित घाबरला. मला शांत करण्यासाठी एक बोर काढून खायला देऊ लागला.

"पण मी असल्या मोहाला बळी पडलो नाही. मी एक भाकरी काढून त्याला दाखविली व मला तुझ्या या भिकारड्या फळाची गरज नाही, हे सुचविले.

"तेव्हां माझ्या समोर त्याची डाळ शिजणे शक्य नाही हे त्याला कळले व तो मला नमस्कार करून निघून गेला."

पाठशालेचे मुख्याध्यपक संकतांचे निरनिराळे अर्थ ऐकून खूप झाले. ती बातमी राजाला जेव्हां कळली तेव्हां तो दरबारी खूप हसले.







# खरी लक्ष्मी

फार प्राचीन काळी धीमंत नावाचा एक राजा उज्जयिनी येथे राज्य करीत असे.

एकदा धीमंत राजाकडे एक योगी आला. राजाने योग्याला पाहून विचारले– "योगिराज! आपणांला काय पाहिजे?"

"महाराज! माझ्याजवळ एक पत्र्याचा पेला आणि काठी आहे. ती आपणाकडे विकण्यासाठी आलो आहे." योगी म्हणाला.

"किती किंमत आहे या दोन्ही वस्तूंची?" राजाने विचारले.

"या दोन्ही वस्तू घेऊन मला एक लाख रुपये द्यावेत, महाराज!" योगी म्हणाला.

ते ऐकून राजाने जास्त विचार केला नाही की मंत्र्याला विचारले नाही आणि योग्याला एक लाख रुपये देऊन त्या दोन्ही वस्तू खजिन्यात ठेवायला सांगितले.

त्या दिवशी रात्री धीमंत राजाला एक स्वप्न पडले. स्वप्नात त्याला एक अत्यंत रूपवती स्त्री सुंदर वस्त्राभूषणे घालून राजवाड्याबाहेर जात असलेली दिसली. राजाने तिला विचारले–"कोण ग बाई तू?"

"मी धनलक्ष्मी आहे." ती स्त्री म्हणाली.

"तू कोठे चाललीस व कां?" राजाने त्या स्त्रीला विचारले.

"तू एक लाख रुपये देऊन एका योग्याकडून एक निरुपयोगी पेला व काठी विकत घेऊन माझा अपमान केला आहेस. म्हणून मी एक क्षणभर देखील रहायला तयार नाही." धनलक्ष्मी म्हणाली.

"तरमग अवश्य जा." राजाने तिच्याकडे थोडेसे दुर्लक्ष करून उत्तर दिले.

प्रहर रात्र उलटल्यावर राजाला एक स्त्री स्वप्नांतच मोठाड बाईबाहेर जात असलेली दिसली.

"कोण ग बाई तू?" राजाने तिला विचारले.

"मी बललक्ष्मी आहे." ती स्त्री म्हणाली.

"तू कां व कोठे निघालीस?" राजाने तिला विचारले.

"धनलक्ष्मी तुला सोडून गेली. आतां तू किती दिवस माझे रक्षण करणार? म्हणून मी एक क्षणभर देखील येथे रहायला तयार नाही." बललक्ष्मीने उत्तर दिले.

"बरं बाई, तू देखील जा!" राजाने विशेष काळजी न दाखवितां उत्तर दिले.

दोन प्रहर रात्र उलटल्यावर राजाला एक म्हातारी राजवाड्यातून बाहेर जात असलेली दिसली.

"कोण ग बाई तू?" राजाने तिला विचारले.

"मी ज्ञानलक्ष्मी आहे." ती स्त्री म्हणाली.

"तू कां व कोठे निघालीस?" राजाने तिला विचारले.

"धनलक्ष्मी व बललक्ष्मी निघून गेल्या-वर मला येथे रहायला जागा कोठे आहे?" ज्ञानलक्ष्मी म्हणाली.

[illegible] राजाने [illegible] उत्तर दिले.

तीन प्रहर रात्र उलटल्यावर स्वप्नात राजाला देव जातीतली एक स्त्री बाहेर जात असलेली दिसली.

"तू कोण ग बाई?" राजाने तिला विचारले.

"मी धैर्यलक्ष्मी आहे." ती म्हणाली.

राजाने तिला थांबायला सांगितले. म्हणाला—"तू कां सोडून निघालीस मला?"

"तुला सर्व जणी सोडून निघून गेल्या. मी तरी कशाला राहू?" तिने विचारले.

राजा हात धरून म्हणाला—"तुला नाही जाऊ देणार मी. तू असलीस म्हणजे मला धन, बल व ज्ञान सर्व मिळेल."

धैर्यलक्ष्मी स्मित करून म्हणाली—"बरं तर, मी तुझ्या बरोबर सर्व काळ राहीन."

सर्वस्व गेले तरी माणसाने धीर सोडू नये. झोप मोडली तेव्हां राजाच्या चेहऱ्या-वर समाधान झळकत होते.



# वेताळाच्या गोष्टी

गोदावरीच्या काठी प्रतिष्ठानपुर पठण नावाचे एक नगर होते. तेथे एके काळी विक्रमादित्य राज्य करीत असे.

विक्रमादित्याच्या दरबारात दररोज शांतिशील नावाचा एक भिक्षु येत असे व दररोज विक्रमादित्याला एक फळ देत असे. विक्रमादित्य ती फळे आपल्या कोशा-ध्यक्षाला देत असे.

एक दिवशी भिक्षू राजाला एक फळ देऊन निघून गेला. त्याच वेळी द्वार-पालकांची नजर चुकवून एक माकड दरबारात शिरले. राजाने ते फळ माक-डाला दिले. माकड ते फळ खाऊ लागले तेव्हां त्याच्यातून एक हिरा खाली पडला.

तो हिरा पाहून राजाला आश्चर्य वाटले. त्याने आपल्या कोशाध्यक्षाला बोलावून विचारले—"मी दररोज तुम्हांला एकेक फळ देत असे. ती फळे काय झाली?"

## प्रथम

पोचला. तेथे एका झाडाखाली भिक्षु बसलेला दिसला. त्याला पाहून तो म्हणाला– "भिक्षु! मी आलो आहे. सांग, मी कोणते काम करावयाचे आहे?"

राजाला आलेला पाहून भिक्षूला आनंद झाला आणि म्हणाला–"राजा! तू येथून सरळ दक्षिणेकडे जा. तेथे तुला एक शिशवीचे झाड दिसेल. त्याच्या फांदीला एका पुरुषाचे प्रेत टांगलेले आहे. ते घेऊन ये आणि माझ्यासमोर ठेव."

राजा त्याप्रमाणे दक्षिणेकडे निघाला. उजेडासाठी त्याने चितेतले एक जळते लाकूड मशालीसारखे उचलून घेतले. शिशवीच्या झाडाजवळ त्याला अर्धवट जळलेले एक प्रेत झाडाच्या फांदीला लोंबत असलेले दिसले. राजाने झाडावर चढून प्रेताला बांधून ठेवलेली दोरी सोडली, तेव्हां प्रेत एकदम खाली पडले.

खाली पडल्याबरोबर ते प्रेत गळा काढून रडू लागले. राजाला वाटले की तो अर्धवट मेलेला कोणी दुर्दैवी मनुष्य असला पाहिजे. म्हणून राजाने खाली उतरून त्या प्रेताला हात भार दिला. त्याबरोबर ते प्रेत मोठ्याने हसू लागले.

त्या प्रेतात वेताळ बसलेला आहे ही गोष्ट राजाला माहीत नव्हती. म्हणून त्याने त्या प्रेताला विचारले–"असा कां हसतो आहेस रे? चल माझ्या बरोबर!"



राजाने असे म्हटल्याबरोबर ते प्रेत नाहीसे झाले आणि पुन्हां झाडाला लोंबकळू लागले. राजाने पुन्हां ते खाली पाडले आणि ते खांद्यावर उचलून घेऊन काही बोलल्या शिवाय स्मशानाच्या दिशेने चालू लागला. तेव्हां प्रेतात बसलेला वेताळ त्याला म्हणाला–"राजा! तुला कंटाळा वाटू नये म्हणून एक गोष्ट सांगतो." असे सांगून वेताळ गोष्ट सांगू लागला :–

प्राचीन काळी अंगदेशावर यश:केतु नामक एक राजा राज्य करीत असे. तो कामदेवासारखा सुंदर होता. त्याने स्वत:च्या पराक्रमाने आपल्या सर्व शत्रूंचा पराभव करून सर्व राज्यव्यवस्था आपला



मंत्री दीर्घदर्शी याच्यावर टाकली आणि स्वतः अंतःपुरात सुखोपभोग घेत राहू लागला.

दीर्घदर्शी राज्यात कोठे ही दंगधोपे होऊ नयेत याची काळजी बाळगीत असे. तो एक अत्यंत स्वामिभक्त सेवक होता. तरी राजाच्या काही दरबारी लोकांनी त्याच्या विरुद्ध राजाचे कान भरले त्यांनी राजाला असे समजावून सांगितले की मंत्र्याने राजाला भोगविलासात मग्न ठेवून राज्यसूत्रे स्वतःच्या हातात कायमची रहावी यासाठी प्रयत्न सुरू केला आहे.

दीर्घदर्शीला दरबारी लोकांचे ते कार-स्थान कळले. त्याला फार वाईट वाटले. ती आपल्या बायकोला म्हणाला—"राजा भोगविलासात गुरफटला आहे आणि माझ्या शिरावर राज्याचा भार आहे. हे काम करीत असता रिकामटेकडे लोक तोंडाला येईल ते महाराजांना जाऊन सांगत आहेत. हे सर्व खोटे असले तरी दुर्लक्ष करून चालणार नाही. तेव्हां आता मी काय करू?"

ते ऐकून मंत्र्याची बायको मेधाविनी नवऱ्याला म्हणाली—"तुम्ही तीर्थयात्रेचे नाव सांगून देशाटनाला निघून जा. असे केल्यास तुमच्यावर केलेला आरोप खरा नाही हे स्पष्ट होईल. नंतर महाराजांना स्वतः सर्व राज्यभार आपल्या शिरावर घ्यावा लागेल व भोगविलासात पडून रहायला वेळ मिळणार नाही."

दीर्घदर्शीला बायकोचा सल्ला पसंत पडला. त्याने महाराजांना विनंती केली की महाराज, शरीर चालू आहे तोपर्यंत तीर्थयात्रा करून यावे, असे म्हणत आहे. उतारवयात ते शक्य होणार नाही."

राजाने होकार दिला. दीर्घदर्शी एकटा देशाटनाला निघाला. तो कोठे व कसा जाणार आहे, हे राजाला कळविले नाही. काही दिवस प्रवास केल्यावर दीर्घदर्शी समुद्रकाठच्या पुंड्र देशात येऊन पोचला. तेथे निधिदत्त नावाच्या एका व्यापाऱ्या बरोबर सुवर्णद्वीपास निघाला. त्याचे गलबत काही दिवसांनी सुवर्णद्वीपात पोचले. तेथे दोघांनी व्यापार करून खूप पैसे मिळविले.

परत येताना दीर्घदर्शीला एक विचित्र दृश्य दिसले. एका लाटेबरोबर समुद्रातून एक मोठा अद्भुत वृक्ष वर आला. तो वृक्ष सोन्याचा होता. फांद्या पोवळ्याच्या होत्या आणि फळे हिऱ्या व मोत्यांची होती. त्या झाडाच्या टोकाला एका रत्नशय्येवर एक अनुपम सुंदर स्त्री बसून गाणे म्हणत होती. दीर्घदर्शीची नजर त्या स्त्रीवर पडल्या-बरोबर तो वृक्ष त्या स्त्रीसह समुद्रात अदृश्य झाला.

दीर्घदर्शीला चकित झालेला पाहून गल-बतातले खलाशी म्हणाले—"अहो आम्ही कित्येकदा हे दृश्य पाहिले आहे."

ती यात्रा संपल्यावर दीर्घदर्शी आपल्या मित्राचा निरोप घेऊन स्वदेशी परत आला.

दीर्घदर्शी एकाएकी निघून गेला होता आणि एकाएकीच परतला. ती बातमी कळल्यावर राजा यशःकेतु स्वतः आपल्या मंत्र्याच्या स्वागतासाठी सामोरा गेला आणि तीर्थप्रवासाचे वर्णन विचारू लागला.

दीर्घदर्शी प्रवासात त्याला जेजे अनुभव आले ते सर्व निवेदन करून शवटी म्हणाला—



"महाराज! मी अगदी अविश्वसनीय, परंतु प्रत्यक्ष डोळ्यांनी पाहून आलेले एक दृश्य आहे, ते सांगतो." त्याने त्या सुंदर वृक्षाची व त्यावर त्याने पाहिलेल्या एका अपूर्व सुंदरीची गोष्ट सांगितली.

त्या अपूर्व सुंदरीच्या सौंदर्याचे वर्णन ऐकून राजा म्हणाला—"मित्रा! मी त्या सुंदर स्त्रीला पाहणार आहे. तेथे कसे जावयाचे हे सांग राज्याचा सर्व भार या घटकेपासून तुझ्या शिरावर राहील." असे सांगून राजाने मंत्र्याला निरोप दिला.

दुसऱ्या दिवशी यशःकेतु साधूचा वेष करून कोणाला काही कळविल्याशिवाय निघून गेला. राजाने पुंड्र देशात पोचल्यावर



लक्ष्मीदत्त नावाच्या एका व्यापाऱ्याबरोबर स्वर्णद्वीपात जायला निघाला.

त्यांचे गलबत एक दोन दिवस प्रवास केल्यावर समुद्राच्या मध्यभागी पोचले असता एकाएकी तो अद्‌भुत वृक्ष समुद्रातून वर आला. त्या वृक्षावर वीणा वाजवीत गाणारी ती अपूर्व सुंदरी होती. त्या स्त्रीला पाहून राजा तिच्यावर मुग्ध झाला व विचार करू लागला त्याच वेळी तो वृक्ष समुद्रात बुडू लागला. राजाने त्याच्या पाठोपाठ समुद्रात उडी मारली.

समुद्राच्या तळाला राजाला एक सुंदर शहर दिसले. तेथे त्याला एकदेखील मनुष्य-प्राणी दिसला नाही. त्याने सर्व शहर पालथे घातले एका सुंदर राजवाड्यात पाऊल टाकताच त्याला ती अपूर्व सुंदरी एका सुंदर शय्येवर बसलेली दिसली.

राजाला पाहून ती सुंदर स्त्री एकदम उठून बसली व जवळ येऊन म्हणाली– "कोण आपण? या पाताळ लोकात कसे काय आलात? आपला वेष एकाद्या तपस्वी मुनीसारखा आहे, परंतु आपले रूप राज-पुरुषाला शोभेलसे आहे!"

राजा म्हणाला–"हे सुंदरी! मी अंग-देशाचा राजा आहे. मी तुझ्या रूपलावण्या-विषयी एका मित्राकडून ऐकले. तुझ्या दर्शनासाठी मी आपले राज्य सोडून आलो आहे. तू कोण? आणि येथे कशी काय?"

"मी मृगांकसेन नावाच्या एका विद्या-धराची कन्या मृगांकवती. माझे वडील मला एकटीला येथे सोडून निघून गेले. मी येथील कल्पवृक्षावर चढून मधून मधून समुद्रावर येते." ती अपूर्व सुंदरी म्हणाली.

त्यानंतर राजाने गोडगोड बोलून त्या अपूर्व सुंदरीचे मन हिरावून घेतले. तिने एका अटीवर त्याच्याशी विवाह करून घेण्यासदेखील मान्यता दिली. ती म्हणाली– "मी दर अष्टमीला व चतुर्दशीला तुझ्या स्वाधीन राहणार नाही. मला वाटेल तिकडे जाईन. परंतु तुम्ही मला तू कोठे जातेस हे विचारता कामा नये."

राजाने ती अट मान्य केली. दोघांनी गांधर्व विवाह करून घेतला एक दिवशी मृगांकवती राजाला म्हणाली–"मी एका आवश्यक कामाने कोठे तरी जात आहे. मी परत येईपर्यंत तुम्ही येथेच रहा. परंतु येथल्या बावडीत कधी उतरू नका. उतरलात तर सरळ भूलोकात जाल." असे सांगून व राजाला सावध करून मृगांकवती निघून गेली.

ती कोठे जात आहे हे पाहण्यासाठी राजा तिच्या पाठोपाठ निघाला. राजासमोरच एका ब्रह्मराक्षसाने मृगांकवतीला गिळले. राजाला इतका राग आला की त्याने ताबडतोब तलवार उपसून त्या ब्रह्मराक्ष-साचे मुंडके उडविले. परंतु क्रोध थोडा शांत झाल्यावर राजाला पश्चात्ताप वाटू लागला.

इतक्यात राक्षसाच्या शरिराला फाडून मृगांकवती बाहेर आली. राजाने तिला विचारले–"मी पाहतो आहे हे खरे आहे की फक्त स्वप्नच आहे?"

"महाराज! हे स्वप्न नाही. हा एक शाप होता. मी दर अष्टमीला व चतुर्दशीला शिवपूजेला जात असे. एका चतुर्दशीला गौरीची पूजा करीत असता मला फार उशीर झाला. माझे वडील माझी वाट पहात होते. एक थेंबभर पाणीदेखील प्याले



नाहीत. म्हणून मी आल्यावर त्यांनी मला शाप दिला की प्रत्येक अष्टमीला व चतुर्दशीला मला एक ब्रह्मराक्षस गिळून टाकील आणि त्याचे पोट फाडून मी बाहेर येईन त्यांनी मला असे देखील सांगितले होते की त्या ब्रह्मराक्षसाला कोणी ठार केला तर मला शापमुक्ती मिळेल. आता मी शापमुक्त झाले आहे. आता तू आपल्या गावी परत जा व मी आपल्या बाबांकडे परत जाते." मृगांकवती म्हणाली.

राजाने फक्त एकच आठवडा तिच्या-बरोबर सहवास करण्याची इच्छा प्रगट केली. नंतर सहा दिवस मनमोकळे

पणाने दोघे बरोबर राहली. सातव्या दिवशी राजा मृगांकवतीला बोलण्यात भुलवून बावडीजवळ घेऊन आला. निरोप घेण्यापूर्वी दोघांनी परस्परांना आलिंगन दिले. संधीसाधून राजाने मृगांकवतीसह विहिरीत उडी मारली आणि दोघे यश:केतुच्या राजधानीच्या एका विहिरीत येऊन पोचली. भूलोकात आल्यावर मृगांकवतीचे विद्याधरत्व नाहीसे झाले व ती एक सामान्य मानवी झाली. राजाला परमानंद झाला.

या सर्व गोष्टी दीर्घदर्शीने स्वत:च्या डोळ्यांनी पाहिल्या होत्या. त्या दिवशी रात्री घरी पोचल्यावर त्याची हृदयक्रिया बंद पडून तो स्वर्गलोकी निघून गेला.

येथवर गोष्ट सांगून वेताळ म्हणाला– "राजा, दीर्घदर्शीला अकाली मरण येण्याचे कारण काय? राजाने परत येऊन त्याच्याकडून राज्य परत घेतले म्हणून? की त्या अपूर्व सुंदरीशी विवाह करण्याची इच्छा त्याच्या मनात होती म्हणून? या प्रश्नांची

तुझ्या शवाची शंभर छकलं होऊन तुझ्याच पायावर लोळू लागतील."

तेव्हां विक्रमादित्य म्हणाला–"दीर्घदर्शीच्या मृत्यूची कारणे या दोन्ही पैकी एक ही नाहीत. राजाने सुखभोग करीत असता राज्याचा सर्व भार दीर्घदर्शीवर टाकला होता. आता मृगांकवती सारख्या सुंदरीच्या प्रेमात गुरफटल्यावर आपल्याला सुटका मिळणे शक्यच नाही. तेव्हां राजाने खोटा आरोप लावणाऱ्यांवर विश्वास करून त्याचा अपमान करण्याचे योजले होते. आतां तर तो वाटेल त्या गोष्टीवर विश्वास करू शकेल व आपला अपमान करून तुरुंगात टाकील. तो विचार त्याच्या मनाला असह्य झाल्यामुळे त्याच्या हृदयाला इतका मोठा धक्का बसला की त्याचे एकाएकी प्राणोत्क्रमण झाले."

अशा तऱ्हेने राजाचे मौन भग होताच वेताळ प्रेतासह अदृश्य झाला व पुन्हा झाडाला जाऊन लोंबकळू लागला.





# मीच जिंकलो

अरबस्तानातल्या एका गावी अली मुहम्मद नावाचा एक भला माणूस रहात असे. कोणाला कधी तो त्रास देत नसे. म्हणून लोक त्याला भोळा म्हणत.

एकदा त्याचे दोन मित्र त्याला भेटायला आले. ते बोलता बोलता म्हणाले की त्यांना भुताप्रेतांची फार भीती वाटते. अली मुहम्मदने त्यांना समजावून सांगितले की ती एक खुळी समजूत आहे. तेव्हां अलीचे मित्र त्याला म्हणाले–"गावाच्या पश्चिमेकडच्या डोंगरात झाडावर भुताप्रेतांचे एक ठाणे आहे."

"खोटे, अशक्य!" अली म्हणाला.

"तू हे खोटे आणि अशक्य म्हणून सुटणार नाहीस. अमावास्येला रात्री काळोखात दिव्याबत्तीशिवाय तू त्या झाडाखाली राहून दाखविले पाहिजेस. आहे कबूल?" दोघां मित्रांनी त्याला विचारले.

"मला मान्य आहे. मी एकटा दिवाबत्तीशिवाय काळोखात अमावास्येच्या रात्री त्या झाडाखाली बसतो." अली म्हणाला.

"ठीक, तरमग उद्याच अमावास्या आहे. उद्या रात्री दिव्याबत्तीशिवाय तू सकाळपर्यंत जिवंत राहलास तर आम्ही तुला एक मेजवानी देऊ, नाही तर तू आम्हांला दिली पाहिजेस." अलीचे दोस्त त्याला म्हणाले.

दुसऱ्या दिवशी तिघे मित्र संध्याकाळी डोंगर चढून गेले. काळोख पडल्यावर एकट्या अलीला त्या झाडाखाली सोडून दोघे मित्र गावात परत निघाले.

निघताना दोघे अलीला म्हणाले– "उद्यां सकाळी आम्ही तुला येथून घेऊन जाऊ, तू जिवंत असलास तर, नाही तर मृतावस्थेत! आहे ना कबूल?" असे सांगून दोघे मित्र निघून गेले.



ते गाव डोंगराच्या पायथ्याला होते. दिवे लागले होते. थोड्या वेळाने थंडी पडू लागली. ओससुद्धा पडू लागली.

अली मुहम्मदला भूक लागली व थंडी-मुळे भूक वाढत गेली. भूक आणि थंडी यांपासून होणाऱ्या कष्टापेक्षा का भुतांचा त्रास जास्त आहे? उजाडल्यावर पैज जिंकून त्या दोघांच्या वाटचाची पक्वान्ने आपणच संपवून ही तूट भरून काढू असे विचार त्याच्या डोक्यात चालू होते.

रात्र वाढत गेली तसतसे गावातले दिवे एका मागून एक दिसेनासे झाले. तरी एका वाड्याच्या खिडकीतून दिवा जळत असलेला त्याला दिसला. त्या खोलीत रात्रभर कोण जागरण करीत असेल बुवा, या गोष्टीचा विचार करीत अली मुहम्मदने सारी रात्र जागून काढली.

उजाडल्यावर अली मुहम्मदचे मित्र खेचरावर बसून आले.

**"मित्र हो! मी पैज जिंकली. मला भूक लागली आहे, तेव्हां मेजवानीची तयारी करा."** अली आपल्या मित्रांना म्हणाला.

"ओहो, तू जिंकलीस पैज? आम्ही घातलेल्या सर्व अटी तू पाळल्यास का नाही ते आम्ही पाहतो पहिल्याने." मित्र म्हणाले.

"अरे, हे काय बोलणे झाले? मी रात्र-भर त्या झाडाखाली काळोखात एकटा बसून होतो, आणखी कोणत्या रे अटी?" अलीने चकित होऊन विचारले.

"अगदी काळोखात रात्र काढलीस तू?" मित्रांनी विचारले.

"होय, माझ्या जवळ दिवाबत्ती काही नव्हते!" अली म्हणाला.

"तुझ्याजवळ दिवाबत्ती नव्हती, तर त्यात काय? आम्हांला हे कळले आहे व आम्हांला ते चांगले माहीत पण आहे की गावतल्या एका घरातल्या खोलीत रात्रभर मेणबत्ती जळत होती. त्या मेणबत्तीच्या उजेड तुला खिडकीतून दिसला नाही?"

अली चकित होऊन म्हणाला—"होय, मेणबत्तीची ज्योत दिसली खरी!"

"तरमग तू हरलास. तूच मेजवानी दिली पाहिजेस?" मित्र म्हणाले.

"कोणी एका मैलावर कोठे मेणबत्ती पेटवून ठेवली तर तो उजेड माझ्यापर्यंत कसा काय पोचणार?" अलीने आश्चर्य-चकित होऊन विचारले.

"ती मेणबत्ती एका मैलावर असो की दोन मैलावर, त्या मेणबत्तीची ज्योत तुला दिसत होती. मग तू रात्रभर पूर्ण काळो-खात दिव्याबत्तीशिवाय होतास हे कसे मानावयाचे?" मित्रांनी विचारले.

हे सर्व कारस्थान त्या मित्रांचेच होते, हे ओळखायला अलीला वेळ लागला नाही. तेव्हां तो आपल्या मित्रांना म्हणाला—"तुमच्या म्हणण्याप्रमाणे मी पैज हारलो. उद्यां माझ्या घरी या तुम्ही मेजवानीला." असे सांगून तो घरी निघून गेला.

अलीच्या मित्रांना वाटले की गडी फसला. आज त्याच्या पैशावर फुकटात मेजवानी उडवायला मिळणार. दोघे जेव-णाच्या वेळी अलीच्या घरी येऊन पोचले. तोपर्यंत अलीने पोटभर जेवून घेतले होते.

मित्र आल्याबरोबर अलीने पुढे येऊन बसायला सांगितले आणि त्यांच्याशी इकडच्या तिकडच्या गप्पा सुरू केल्या.



बराच वेळ गप्पा चालू होत्या. तेव्हां दोघां मित्रांच्या पोटात कावळे कोकलू लागले. एक जण म्हणाला—"काय रे! अजून सैपाक तयार झाला नाही वाटते?"

अली लगेच उठून आत गेला व थोड्या वेळाने येऊन म्हणाला—"अजून तयार झाला नाही बुवा!"

पुन्हा गप्पा सुरू झाल्या. थोड्या वेळाने अली आत जाऊन आला व म्हणाला—सैपाक होतो आहे मित्र हो!"

दुपार होऊन गेली. अलीच्या मित्रांना खूप भूक लागली होती. मेजवानी उड-विण्याच्या हेतूने ते घरून काही खाऊन पिऊन निघाले नव्हते. अली मधून मधून

आत जाऊन येई व "अजून सैंपाक झाला नाही. हा, होत आला आता, आणखी थोडा वेळ थांबले पाहिजे." असेच काही तरी सांगे. परंतु नक्की किती वेळ लागेल हे त्याने सांगितले नाही.

शेवटी एक जण म्हणाला—"उशीर झाला तरी हरकत नाही. सैंपाक उत्तम झाला पाहिजे?"

अलीने निरनिराळी नावे सांगितली. म्हणाला—"कोफ्ता, खुरमा, शोरबा, सालन, बिरयाणी आणि आणखी काय काय सांगू?" त्याने एक लांबच लांब यादीच दिली. नावे ऐकूनच दोघांच्या तोंडाला पाणी सुटले. गप्पा चालू होत्या. तीन वाजून मग चारदेखील वाजले. अली पुन्हां आत जाऊन आला व म्हणाला—"अगदी होत आली सर्व तयारी."

पण अलीच्या मित्रांना आता धीर धरवेना. दोघे उठून उभे राहले व म्हणाले—"आपण पाहून येणार बुवा, काय काय पदार्थ तयार झाले आहेत."

"तुम्हाला माझ्या बोलण्यावर विश्वास नसेल तर या खुशाल पाहून स्वतःच्या डोळ्यांनी!" अली म्हणाला.

दोघे अली बरोबर सैंपाक घरात गेले. एका मोठ्या पातेल्यात मांस शिजायला ठेवलेले होते. पण चुलीत लाकडे नव्हती. एक मेणबत्ती जळत होती."

"काय रे या मेणबत्तीवर सैंपाक कसा होणार? तू काय आम्हांला मूर्ख किंवा खुळे समजत होतास की काय? ही सर्व तुझी लबाडी आहे!" दोघे ओरडले.

"मित्र हो! तुम्ही तरी काय खुळ्यासारखे बोलता आहां? एका मैलावरून ज्या मेणबत्तीच्या उजेडाला पाहून भुते पळाली त्या मेणबत्तीवर सैंपाक होणार नाही म्हणता? माझे जेवण झाले आहे. मला गर्दी नाही. तुम्ही थोडा वेळ थांबलात तर तुम्हांला मी नक्कीच मेजवानी देईन." अली म्हणाला.

ते ऐकून अलीचे मित्र मान खाली घालून आपापल्या घरी निघून गेले. खरी पैज कोणी जिंकली हे स्पष्टच आहे!





# लौकिक ज्ञान

एका गावी चार तरुण युवक रहात होते. ते लहानपणापासून बरोबर वाढलेले होते. त्यांचे शिक्षण वगैरे पण बरोबरच झाले होते. त्यांच्यापैकी तिघांना तीन तऱ्हेच्या विद्या अवगत होत्या. त्या त्यांनी शिकून घेतल्या होत्या.

चवथा मित्र अक्षरशून्य होता. त्याला एकदेखील विद्या अवगत नव्हती. परंतु धक्के टोणपे खाऊन त्याने लौकिक ज्ञान पुष्कळ मिळविले होते.

काही काळ लोटल्यावर सुशिक्षित तिघां मित्रांनी देशाटन करण्याचे ठरविले व निघाले. निरनिराळ्या देशांचा राजांना आपल्या विद्येचा प्रताप दाखवून पैसे मिळविण्याच्या विचाराने ते निघाले होते.

त्या तिघांबरोबर चवथा अशिक्षित मित्र, त्यांनी त्याला बरोबर यायला बोलाविले नव्हते तरी निघाला. परंतु तिघांना ते आवडले नाही. म्हणून ते त्याला म्हणाले—"अरे वेड्या! आमच्या बरोबर येऊन तुला काय मिळणार रे? आम्ही आपल्या विद्येचे प्रदर्शन करून राजाला खूष करू. आम्हांला नक्कीच राजदरबारी नोकरी मिळेल! पण तुला काय मिळणार? तुला थोडे फार लौकिक व्यवहार ज्ञान आहे, हे आम्ही मानतो. पण लौकिक ज्ञान नसणारा राजदरबारी कोणी असतो का? म्हणून तुझी तेथे मुळीच गरज भासणार नाही. तू परत फिर."

चवथा आपल्या मित्रांना नम्रपणे गयावया करीत म्हणाला—"मला एकट्याला सोडून जाऊ नका. लहानपणापासून आजपर्यंत आपण एकत्र राहलो आणि आज तुम्ही मला एकट्याला सोडून गेलात तर कसे चालेल? तुम्हांला राजदरबारी मिळालेला मान पाहून मला आनंदच होईल

कु. कुसुम कारखानीस

व मी तो चार चौघांसमोर वर्णन करून सांगेन ही."

चवथ्या मित्राला सोडून जाणे अशक्य वाटले तेव्हां ते तिघे मित्र त्याला बरोबर घेऊन निघाले.

थोडे अंतर चालून गेल्यावर त्याना एका दाट रानातून जावे लागले. एका जागी हाडांचा ढीग पडलेला होता. तिघां पंडितां-पैकी एक जण म्हणाला—"ही हाडे एका सिंहाची दिसत आहेत. मी यांना जोडून सिंहाचा सांगाडा उभा करतो." असे म्हणत त्याने खरोखरच सिंहाचा सांगडा तयार केला.

दुसरा म्हणाला—"मी मंत्र टाकून या सांगाड्यावर मांस व कातडे चढवितो. रक्त प्रसरण सुद्धा सुरू करून दाखवितो." असे सांगून त्याने त्याप्रमाणे सिंहाचे शरीर बनविले.

तेव्हां तिसरा पुढे येऊन म्हणाला—"मी मंत्राने या शरीरात प्राण ओततो. तुम्हां दोघांच्या विद्येपेक्षां माझी विद्या जास्त महत्वाची आहे."

ते ऐकून चवथा म्हणाला—"मित्रा! तू तो मंत्र टाकण्याचा विचार सोड. सिंह एक क्रूर रानटी जनावर आहे. सिंह जिवंत होऊन समोर उभा राहला तर तो आपणां चौघांना खाऊन टाकील."

तिसरा पंडित आपल्या विद्येच्या तोऱ्यात रागाने म्हणाला—"मला जी मंत्रविद्या प्राप्त आहे त्या विद्येचा मी प्रयोग करू लागलो तर तू मध्ये अडवा येणार होय? ते मी ऐकणार नाही. मी किती कष्ट सहन करून ही विद्या संपादन केली आहे! ती काय निरुपयोगी आहे?"

"तुला जे करायचे असेल ते कर माझी 'ना' नाही. परंतु त्यापूर्वी मला झाडावर चढून बसू दे. असे सांगून तो चटकन झाडावर चढून बसला.

तिसऱ्या पंडिताने आपल्या मंत्राचा प्रयोग केल्याबरोबर सिंह जिवंत झाला आणि मोठ्या गर्जना करून त्याने त्या तिघां मित्रांच्या अंगावर उडी टाकली आणि तिघांना ठार केले.



# लोभाचे फळ

एका गावातल्या देवळात एक गरीब पुजारी होता. त्याला खूप पैसे मिळविण्याचा लोभ झाला. लोकांकडून पैसे उकळण्यासाठी त्याने एक उपाय योजला. तो उपाय सुचल्या-बरोबर त्या वेळेपासून त्याने देवळात जायचा विचार सोडला आणि घरीच राहू लागला.

गावकऱ्यांनी त्या पुजाऱ्याला जाऊन देवळाचे दार बंद कां असे विचारले.

पुजारी अगदी असहाय झाल्याचे सोंग करून म्हणाला—"अहो, मी तरी काय करू? काल रात्री रामाने मला स्वप्नात दर्शन देऊन सांगितले की मी फार गरीब असल्यामुळे तो या देवळात रहायला तयार नाही आणि आणखी कोठे तरी जाण्याचा त्याचा विचार आहे. तेव्हां मी त्याला नम्रपणे विनंती केली की देवा, तू माझ्या गरीबीसाठी हे देऊळ सोडून जाण्याची गरज काय? गावातली थोर श्रीमंत मंडळी माझे दारिद्र्य नक्कीच दूर करतील."

पुजारी म्हणाला ते ऐकून गावकऱ्यांनी परस्परांचा सल्ला घेऊन ठरविले की या पुजाऱ्याला देवळात पाठविले तर देव रागावेल. याच्या जागी कोणातरी श्रीमंत पुजाऱ्या-लाच नेमावे. त्याप्रमाणे त्यांनी त्या गरीब पुजाऱ्याच्या जागी एका श्रीमंत पुजाऱ्याला नेमले.

पुजाऱ्याला त्याच्या कर्माचे फळ भोगावे लागले.





# खलीफांचे स्वप्न

बगदादला हारुनुल रशीद खलीफांचे राज्य होते. एकदां खलीफा मक्केच्या यात्रेला गेले होते. ते परत आले त्याच दिवशी रात्री त्यांना एक स्वप्न पडले. स्वप्नात खलीफांना दोन पैगंबर दिसले. त्यांचे आपसात संभाषण चालू होते. एका पैगंबराने विचारले–"या वर्षी हज यात्रेला किती लोक आले होते?"

दुसऱ्या पैगंबरांनी उत्तर दिले–"दहा लाख यात्री तरी आले असतील!"

"त्यांच्या पैकी किती जणांची यात्रा सफल झाल्यासारखी तुम्हांला वाटते?" पहिल्या पैगंबरांनी विचारले.

"एकाची यात्रादेखील यशस्वी झाली नाही. परंतु हज यात्रेला आल्या शिवायच एकाची यात्रा खुदा तालाला फार आवडली." दुसरे पैगंबर म्हणाले.

"दहा लाख यात्री स्वत: येऊन अल्लाची मेहरबानी मिळवू शकले नाहीत आणि घर बसल्या अल्लाची मर्जी कबूल करवून घेणारा तो पुण्यवान मनुष्य कोण आहे, बरे?" पहिल्याने विचारले.

"त्याचे नाव इस्माईल आहे. तो बसऱ्याला हारुनमिया गल्लीत राहतो." दुसरे पैगंबर म्हणाले. त्याच वेळी खलीफांची झोप मोडली. ते अंथरुणावर उठून बसले व खुदाची मर्जी संपादन करून घेणारा तो पुण्यात्मा कोण बरे असेल, व त्या पुण्यवान पुरुषाचे दर्शन घडले तर आपल्याला देखील पुण्यलाभ होईल.

दुसऱ्या दिवशी खलीफा एका सामान्य माणसाचा पोशाख करून बसरा नगराला निघाले. बसऱ्याला हारुनमिया गल्ली सहजी त्यांना सांपडली. त्या गल्लीत पोचल्यावर त्यांनी एक इसमाला विचारले–"काय हो, या गल्लीत कोणी इस्माईल नावाचे गृहस्थ राहतात का?"

[illegible] वरपासून खालपर्यंत आश्चर्यचकित नजरेने पाहिले आणि म्हणाला–"इस्माईलचे घर या गल्लीच्या टोंकाला आहे."

गल्लीच्या टोंकाला खलीफांना एक झोपडे दिसले. झोपडीसमोर जमिनीवर बसून एक चाळीस पन्नाशीतला माणूस पादत्राणे शिवीत असलेला दिसला. त्याला खलीफांनी विचारले–"काय हो, इस्माईल कोठे राहतात?"

"याच गरीबाला इस्माईल म्हणतात. आपण कोण? आपली पादत्राणे शिवायची आहेत का?" त्या माणसाने खलीफांना विचारले.

ते ऐकून खलीफांना आश्चर्याचा धक्काच बसला. खलीफा त्याच मन:स्थितीत म्हणाले–"मी पादत्राणे शिववून घ्यायला आलो नाही. परंतु हे सांग, तू मक्केला जाऊन आलास का? कशी काय हजयात्रा झाली?"

इस्माईल एक लांब सुस्कारा सोडून म्हणाला–"मालक! मी हजयात्रेला जायचे ठरवून दररोज एक नाणे शिलकेत टाकीत गेलो आणि यावर्षी यात्रेपुरते पैसे जमापण झाले. हजयात्रेचा दिवस उजाडला. परंतु खुदातालाची मर्जी निराळीच होती. यात्रेला निघण्यापूर्वी एकच दिवस आधी ती गोष्ट



घडली. असे झाले, माझ्या बायकोला डोहाळे लागले होते. तिला एक न एक वस्तू खावीशी वाटे. यात्रेला निघण्याच्या अदल्या दिवशी ती म्हणाली–"शेजारच्या घरी शोरवा तयार करीत आहेत. त्याचा सुगंध येतो आहे. त्यांच्या कडून मागून थोडा घेऊन या."

"मी आपल्या बायकोची किती समजूत घातली की आपला शेजारी रजाक आपल्या सारखाच एक गरीब आहे. तो किती कष्टाने कोठून तरी मांस घेऊन आला असेल. ते त्या दोघां नवरा बायको पुरेसे जेमतेम असेल. त्यात आपण वांटेकरी होणे बरोबर नाही." परंतु माझ्या बायकोने फार

विनवण्या करून थोडासा वासापुरता तरी शोरबा मागून आणायला आग्रह केला.

"मी बायकोची इच्छा पुरी करण्यासाठी एक भांडे घेऊन रजाककडे गेलो.

"मी त्याला विचारले–"रजाक साहेब! माफ करा, तुम्हांला माहीतच असेल, माझ्या बायकोला डोहाळे लागले आहेत. तिने शोरबा आणायला मला पाठविले आहे. मेहेरबानी करून थोडा शोरबा द्या.

तेव्हां डोळ्यात पाणी आणून रजाक म्हणाला–"इस्माईल साहेब! अहो, ते मांस आपण माणसांनी खाण्यासारखे नाही."

"कसे ही असेल तरी चालेल. थोडे द्याच!" मी म्हटले.

रजाक भीत भीत म्हणाला–"बडेमिया! गेले चारपाच दिवस आम्ही नवराबायको व मुले अक्षरशः फाका करीत आलो. मुलांना भुकेने तडफडत असलेले पाहून घराबाहेर पडलो. एका जागी एक गाढव मरून पडलेले दिसले. त्याच्या मांडीचे मांस कापून घेऊन आलो आणि शोरबा तयार केला. कुराण [illegible] तेव्हां उचित किंवा अनुचित विचार करू नये व मिळेल ते खाऊन स्वतःचा प्राण वांचवावा असे लिहिले आहे."

"रजाक म्हणाला ते ऐकून माझे मन विरघळले. आजपर्यंत मीच सर्वात गरीब आहे असे समजत होतो. परंतु रजाक मियाची गोष्ट ऐकून मी घरी परत आलो आणि मक्केच्या यात्रेसाठी जे पैसे जमविले होते, ते सर्व रजाक मियाला दिले आणि व्यापार धंदा करून उदरनिर्वाह चालवायला मी त्याला सांगितले."

ते सर्व ऐकून खलीफा म्हणाले–"हे धर्मात्मा! या वर्षी दहा लाख लोक मक्का यात्रेला आले होते. त्या सर्वांचे पुण्य तुला एकट्याला लाभले आहे. ही गोष्ट स्वप्नात मला पैगंबरांनी सांगितली. म्हणून मी तुझा शोध काढीत येथवर आलो. मी बगदादचा खलीफा हारूनुल रशीद आहे." इस्माईल अवाक् होऊन खलीफांकडे पाहू लागला.



# पापाचे मूळ

एकदा एका पंडिताच्या मनात पापाचे मूळ काय याविषयी शंका उत्पन्न झाली. त्याने कित्येकांना त्या प्रश्नाचे उत्तर विचारले, परंतु त्याला समाधानकारक उत्तर मिळाले नाही. म्हणून त्याने काशीस जाऊन तेथल्या पंडितांना त्याचे उत्तर विचारून घ्यायचे ठरविले.

वाटेत त्याला एका गावाबाहेर एक देऊळ दिसले. देवळाजवळ एक लहानशी झोपडी होती. झोपडीत जाऊन पंडिताने तो काशीयात्रेला जात असल्याचे सांगून त्याचे कारण सांगितले आणि स्वैपाक करायला थोडी जागा मागितली.

त्यावर तो गरीब मनुष्य म्हणाला–"पंडितवर्य! आपण देवळातच स्वैपाक करावा व सभामंडपात विश्रांती घ्यावी. मी आलोच पाठोपाठ आपल्या मदतीला."

त्यानंतर थोड्या वेळाने तो गरीब मनुष्य एक ताट वाढून घेऊन आला आणि म्हणाला–"पंडितवर्य! आपण जेवून घ्यावे म्हणजे माझे व्रतदेखील पुरे होईल. मी हे व्रत पुरे करण्यासाठी कित्येक वर्षांपासून आठशे गिन्या जमविल्या आहेत.

"मूर्खा! तू वाढून आणलेले जेवण मी जेवलो तर मला पाप लागेल?" तो पंडित म्हणाला.

"मी जमविलेल्या सर्व गिन्या आपणांस दक्षिणा म्हणून देणार आहे." तो गरीब मनुष्य म्हणाला.

तेव्हां ब्राह्मण काही एक न बोलतां जेवला. त्यानंतर तो गरीब मनुष्य म्हणाला–"पंडितवर्य! आपणांस आतां पापाचे मूळ कळलेच असेल. पापाचे मूळ लोभ आहे. आतां आपण त्यासाठी काशी जाण्याची गरज नाही. घरी परत जावे."





# कोण पापी ठरला?

एका गावी धनगुप्त नावाचा व्यापारी रहात असे. त्याने नीती अनीती, औचित्य अनौचित्य कशाचा ही विधिनिषेध न ठेवून कोटयावधी रुपये मिळविले. धनगुप्तासारख्या प्रतिष्ठित व्यापाऱ्याला आपला आदर्श मानून त्याच्या मदतीने अनेक व्यापारी लक्षाधीश झाले.

उतारवय झाल्यावर धनगुप्ताला स्वर्गाची काळजी वाटू लागली. त्याने आयुष्यभर पापच केले होते आणि पापाशिवाय दुसरे काही केले नव्हते. निदान म्हातारपणी थोडे पुण्य करून स्वर्गारोहण करता आले तर करावे या हेतूने त्याने तीर्थयात्रा करण्याचे योजले.

धनगुप्त तीर्थयात्रेला निघाल्याची गोष्ट कळताच त्याच्या पावलावर पाऊल ठेवून चालणाऱ्या दोघां तिघांच्या मनात पण तीर्थयात्रा करण्याचा विचार आला आणि तिघे त्याच्याबरोबर तीर्थयात्रेला निघाले. परंतु त्यांना एक गोष्ट माहीत होती. धनगुप्त कोणते ही काम फायद्याशिवाय करीत नाही. तीर्थयात्रेत देखील काही तरी स्वार्थ साधण्याचा त्याचा विचार असणार हे त्यांनी ओळखले. पुण्य मिळो, किंवा न मिळो, धनगुप्ताला इतर गोष्टींचा जो लाभ होईल त्यात वांटेकरी होण्यासाठी का होईना तिघे बरोबर निघाले.

चौघे बरोबर गेले की यात्रा खर्च थोडा फार कमी होणारच. कोणी कधी आजारी पडला तर इतर तिघे मदत करू शकतील. धनगुप्तने असा विचार करून तिघांना बरोबर घेतले.

त्यांनी सर्वात आधी रामेश्वरची यात्रा करण्याचे ठरविले. रामेश्वर संपवून नंतर काशीला जाता येईल असा त्यांनी विचार केला. काशीच्या मानाने रामेश्वर तसे थोडे जवळ [illegible] होते [illegible] तितकी त्रासाची नव्हती. त्या गावात रामू नावाचा एक महार रहात असे. तो तीनदा रामेश्वर यात्रा करून आला होता. त्याला बरोबर घेतले तर रामेश्वरचा रस्ता दाखवायला एक माहीतगार मनुष्य बरोबर राहील असा विचार करून त्यांनी रामूला बरोबर घेतले.

चांगला मुहूर्त पाहून चौघे व्यापारी व रामू असे पाच जण निघाले. वाटेत कोणत्या ही प्रकारचा त्रास झाला नाही. कारण रामूसारखा माहीतगार वाटाड्या बरोबर होता. परंतु रामेश्वर दोन दिवसांच्या अंतरावर असता एकाएकी वादळ सुरु झाले आणि विजा चमकू लागल्या. वीज कडाडून पडली की सर्व व्यापारी घाबरून जात. त्यांच्या देखत एकामागून एक वीज पडून झाडे जळून गेली. म्हणून चौघा यात्रेकरूंनी एका देवळात आसऱ्यासाठी राहण्याचे ठरविले आणि एका जुनाट देवळात जाऊन बसले.

परंतु निसर्गाचे थैमान चालूच होते. देवळासमोरचे एक मोठे चिंचेचे झाड वीज पडून भस्म झाले आणि दुसरे झाड कलंडले. सर्व घाबरून गेले, "हा काय पाऊस झाला? मी असला पाऊस आयुष्यभरात कधी पाहिला नाही. आपल्यापैकी कोणी तरी पापी असल्याशिवाय ही आपत्ती आली नसती. त्या पापी [illegible]साच्या संगतीत आपण सर्वच रसातळाला जाणार." धनगुप्त म्हणाला.











बाकी तिघांनी परस्परांकडे पाहून 'महार पापी आहे' अशी सूचना करणारी खूण केली. एक जण म्हणाला देखील--"आपणच स्वत: होऊन आपल्या हाताने ही धोंड आपल्या पायावर ओढून घेतली! त्यात हा मागचापुढचा काही विचार केल्याशिवाय आपल्याबरोबर देवळात शिरला आणि याने देऊळ अपवित्र केले आहे. देव रागावला तर नवल काय?"

चौघांनी एका स्वरात रामूला देवळाबाहेर निघून जायला सांगितले आणि तो गेला नाही तर त्याला धक्के मारून बाहेर काढायचे पण ठरविले.

तो महार बिचारा त्यांच्या विनवण्या करू लागला–"या गरीबाला या प्रलयात ढकलू नका. रामेश्वर दर्शनापेक्षा तुम्हांला माझ्यासारख्या गरीबाला वांचविण्यात ज्यास्त पुण्य लागेल. मी पापी आहे म्हणूनच तर तुमच्या सारख्या पुण्यवानांच्या संगतीत देव मला क्षमा करील, म्हणून बरोबर आलो आहे. माझ्यामुळे तुम्हां चौघांना काही त्रास आजपर्यंत झाला का? मला बाहेर काढलेत तर देव माझे जे करील ते करील तुम्हांला कोणाला ही मुळीच क्षमा करणार नाही."

बिचारा रामू त्यांचे पाय धरून त्याला वांचविण्यासाठी विनंती करीत होता. परंतु त्या तिघांनी त्या बिचाऱ्याच्या विनवण्याकडे दुर्लक्ष केले आणि त्याला देवळाबाहेर निर्दयपणे हाकलून दिले.

रामू पळत जाऊन एका झाडाच्या आसऱ्याला देवाचे नाव घेत बसून राहिला. देव कदाचित त्याच्या हांकेला पावला. दुसऱ्या क्षणाला कडाडून एक वीज पडली. रामूने दोन्ही डोळे मिटून घेतले आणि त्याने डोळे उघडून पाहिले तेव्हां त्याला समोर देवळाऐवजी दगडांचुन्याचा एक मोठा ढीग पडलेला दिसला. धनगुप्त व त्याचे तिघे साथी व्यापारी तिघांना जिवंत समाधी मिळाली. ते पुण्यवान होते की पापी ते त्या देवालाच ठाऊक!





# ढब्बू पैशाचा राजा

पाटलीपुत्र येथे एक पाणक्या रहात असे. त्याचे काम पाणी भरण्याचे होते. त्यावरच त्याचा उदरनिर्वाह चाले. त्याची झोपडी नगराच्या उत्तरेकडील द्वाराजवळ होती.

नगराच्या दक्षिणेकडील द्वाराजवळ एक बाई रहात असे. ती सुद्धा लोकांच्या घरी पाणी भरून आपला उदरनिर्वाह करी. दोघांची एकदां परस्परांशी भेट झाली व दोघांनी विवाह करून घेतला.

विवाह झाला तरी दोघांना आपापल्याच घरी रहावे लागले व पाणी भरण्याचे काम करावे लागले.

त्याच सुमारास अक्षत दसरा आला. दोघांनी तो सण आनंदाने साजरा करण्याचे ठरविले. पाणक्याने भराभर आपले काम आटोपले आणि दक्षिणेकडच्या द्वारावर येऊन बायकोला भेटला.

"आज सण आहे. सर्व गाव सण साजरा करीत आहे. आपणदेखील साजरा करू या. माझ्याजवळ एक ढब्बू पैसा म्हणजे अर्धा आणा आहे. तुझ्याजवळ किती पैसे आहेत?" बायकोने विचारले.

"माझ्याजवळ सुद्धा एक ढब्बूपैसा आहे. मी तो उत्तरेकडील द्वाराजवळ दगडाच्या संधीत लपवून ठेवला आहे. पण एका आण्यात सण साजरा कसा काय करायचा बुवा?" नवऱ्याने विचारले.

"एका पैशाची फुले विकत घेऊ. एका पैशाचे चंदन विकत घेऊ आणि अर्ध्या आण्याची खीर करून खाऊ." बायको म्हणाली.

ते ऐकून पाणक्या आनंदाने नाचू लागला. आज नवराबायको दसरा साजरा करणार या आनंदात त्याला देहभान राहिले नाही. तो बायकोला म्हणाला–"मी उत्तरी द्वाराकडे

धावत पळत जाऊन तो ढब्बू पैसा घेऊन येतो. तू येथेच थांब." असे सांगून पाणक्या दक्षिणेकडच्या द्वारापासून उत्तरेकडच्या द्वारापर्यंत ढब्बू पैसा आणायला ऐन उन्हात अनवाणी पळत निघाला.

दोन्ही द्वारांच्या मध्यभागी वाटेवरच राजवाडा होता. त्याच वेळी राजा सज्जात उभा होता. तो उन्हात पळत जाणाऱ्या पाणक्याला पाहून चकित झाला. पाणक्या उड्या मारीत गात चालला होता. अर्थातच त्याच्या एवढ्या आनंदाचे कारण विचारून घ्यावेसे राजाला वाटले. म्हणून राजाने आपल्या एका नोकराला बोलावून आज्ञा केली—"तो पहा, तो मनुष्य उन्हात धावत पळत जातो आहे ना? त्याला बोलावून घेऊन ये."

नोकर पाणक्याला जाऊन म्हणाला—"अरे ए! तुला महाराज बोलावीत आहेत. माझ्या बरोबर चल."

"मला महाराजांशी काय काम? मी त्यांना पाहिले असले तरी ते मला ओळखत नाहीत!" पाणक्या म्हणाला.

तेव्हां राजाचे नोकर त्याला धरून राजाकडे घेऊन गेले. राजाने पाणक्याला विचारले—"काय रे! वरून अग्निवृष्टी होते आहे आणि खाली रस्ता तापला आहे आणि तू उड्या मारीत नाचत गात कोठे जातो आहेस?"

"महाराज! माझ्या मनात याहून जास्त गरम इच्छा उत्पन्न झाली आहे. म्हणून मला ही बाहेरची उष्णता मुळीच भासत नाही." पाणक्या म्हणाला.

राजाला कळेना की अशी कोणती मोठी इच्छा स्वारीच्या मनात एकाएकी उत्पन्न झाली असणार? म्हणून त्याने विचारले—"अशी कोणती इच्छा उत्पन्न झाली बुवा?"

"महाराज! आज दसरा आहे. माझ्या बायकोजवळ एक ढब्बू पैसा आहे. माझ्याजवळ पण एक ढब्बू पैसा आहे. मी उत्तरेकडील द्वाराच्या सांधीत तो लपवून ठेवला आहे. दोघांचे दोन ढब्बूपैसे मिळून एक आणा होईल. आम्ही एका पैशाची फुले, एका पैशाचे चंदन घेऊन अर्ध्या आण्याची खीर करायचे ठरविले आहे. म्हणून मी घाईघाईने उत्तरी द्वाराकडे निघालो आहे. उत्तरी द्वारापर्यंत जाऊन पुन्हां दक्षिणी द्वारापर्यंत परत यायचे आहे. त्यानंतरच आमचा सण साजरा होणार. माझी बायको वाट पहात बसली असेल. म्हणून मला लवकर जाण्याची परवानगी द्यावी."

ते ऐकून राजा चकित झाला. म्हणाला—"वेड्या! तू आतांपर्यंत जितका चालून आला आहेस तितके अंतर चालून गेल्यावरच तू उत्तरी द्वारापर्यंत पोचशील आणि त्याच्या दुप्पट अंतर चालून गेल्यावरच तुला दक्षिण द्वारापर्यंत पोचता येईल. तू इतकी मेहनत करण्याऐवजी मी तुला एक ढब्बू पैसा देतो तो घेऊन येथूनच परत आपल्या बायकोकडे जा. सण साजरा करायला उशीर होतो आहे."













"बरे महाराज! आपण ढब्बूपैसा द्यावा. परंतु मी आपला ढब्बूपैसा पण घेऊन येईन." पाणक्या म्हणाला.

राजाला गंमत करावीशी वाटली. या पाणक्याला ढब्बूचा जास्त मोह आहे की पैशाचा पाहू या, असा विचार करून त्याने एका रुपयापासून एका लाखापर्यंत रुपये देण्याचा मोह दाखवून मन त्याचे ढब्बू पैशापासून फिरविण्याचा प्रयत्न करून पाहिलातरी पाणक्या आपला ढब्बू पैसा घेऊन यायचा हट्ट सोडीना. तो घेऊन यायला राजाची परवानगी मागत राहिला.

शेवटी राजाने थोडेसे चिडून विचारले—"तुला मी आपले अर्धे नगर द्यायला तयार आहे. तू तो ढब्बूपैसा जाऊन आणण्याचा विचार मनातून काढून टाक. आहे कबूल?"

"आहे कबूल महाराज!" पाणक्या म्हणाला, जणुकाही अगदी नाइलाजाने त्याला ते मानावे लागले.

लगेच राजाने प्रधानाला बोलावून पाणक्याला नगराचे दोन वाटे करून अर्ध्या नगराचा राजा करायला सांगितले.

प्रधानाने नगराचे उत्तरी व दक्षिणी भाग पाडले. नंतर राजाने पाणक्याला विचारले—"बोल, तुला कोणता भाग हवा? तू तुला पाहिजे तो भाग खुशाल मागून घे! तुला आजपासून त्याचे अधिकार पत्र मंत्र्याकडून लिहवून देववितो. तुला आपल्या राज्यावर आपल्या इच्छेप्रमाणे राज्य करता येईल."

पाणक्याला विचार करायला फार वेळ लागला नाही. तो लगेच म्हणाला—"महाराज! मला उत्तरेकडचा भाग देवविण्याची कृपा करावी!" सर्वांना वाटले की उत्तरेकडच्या द्वाराच्या सांधीत त्याचा ढब्बूपैसा ठेवलेला होता. म्हणून त्याने तोच भाग मागून घेतला असावा. राजाने वचन-दिल्याप्रमाणे उत्तरेकडचा अर्धा भाग पाणक्याला देऊन त्याला त्या भागाचा राजा केले. परंतु "ढब्बूपैशाचा राजा" या नावीच लोक त्याला ओळखीत असत.





# कुळाचा अभिमान

बुंदेलखंडातील ही गोष्ट आहे. एक क्षत्रिय सरदार साहेब एका गावी रहात असत. त्यांना लोक सरदार साहेब म्हणून हाक मारीत. परंतु त्याला दोन वेळ पोटभर खायला मिळण्याची मारामार होती. परंतु त्यांना आपल्या कुळाचा फार अभिमान होता. सरदारसाहेब कामधंदा किंवा नोकरी करीत नसत. आपल्या पूर्वजांच्या शौर्याच्या व कुळाच्या मोठेपणाच्या बढाया मारणे एवढेच काय ते त्यांना माहीत होते.

एकदा 'सरदार साहेब' रस्त्यावर उभे राहून एका श्रीमंत माणसाजवळ आपल्या कुळाच्या बढाया मारीत होते. तेव्हां दुरून एक गाडी येत असलेली दिसली. गाडीत कापसाची किंवा धान्याची पोती भरलेली होती. गाडी दुरून येत असलेली पाहून सरदार साहेब म्हणाले—"कायपण हत्ती आहे? आमच्या आजोबांकडे अगदी असाच हत्ती होता."

तो श्रीमंत मित्र म्हणाला—"सरदार साहेब! तो हत्ती नाही. धान्य भरून गाडी येते आहे."

"मित्रा! तुम्हांला आता चश्मा लावावा लागणार!" सरदार साहेब म्हणाले.

"क्षमा करा सरदार साहेब! तो हत्ती नाही, गाडी आहे गाडी, नीट पहा." तो मित्र म्हणाला.

तेव्हां सरदार साहेबांचा कुळाभिमान एकदम जागा झाला. म्हणाले—"तो हत्ती निघाला तर मी तुमचे डोके उडवीन, गाडी निघाली तर तुम्ही माझे डोके उडवा. पैज आपली दोघांची." असे सांगून मिशांवर ताव देत सरदार साहेब उभे राहिले.

थोड्या वेळाने गाडीजवळ आली. तो मित्र म्हणाला—"काय सरदार साहेब! पैज हारलात तुम्ही."



"होय बाबा, मी हारलो! माझे डोके कापून घे!" जहागीरदार साहेब म्हणाले.

"जाऊ द्या हो, एवढ्याशा गोष्टीसाठी मी डोके कापून घेऊ म्हणता?" तो मित्र सरदार साहेबांच्या फुशारक्या बंद होतील असे समजून म्हणाला.

पण सरदार साहेबांचा कुळाभिमान जागा झाला होता. म्हणाले—"आमच्या क्षत्रिय वंशात दिलेला शब्द मागे घ्यायची पद्धत नाही. पैज मी हारलो, तुम्ही माझे डोके कापून घ्या!"

तो मित्र काळजीत पडला. म्हणाला—"असे करू या सरदार साहेब, आपण जाऊ या न्यायाधिकाकडे. तो सांगेल त्या निवाड्याप्रमाणे वागू या."

सरदार साहेबांनी ते मान्य केले आणि दोघे मित्र न्यायाधिशाकडे गेले.

न्यायाधिशाने पाहिले की सरदार साहेब माघार घेणार नाहीत. म्हणून त्याने निवाडा दिला—"सरदार साहेबांचे डोके आता त्यांच्या स्वतःच्या मालकीचे राहिले नाही. त्यांच्या मित्राच्या मालकीचे झाले आहे. त्याला वाटेल तेव्हां त्याने ते पाहिजे तर कापून घ्यावे."

ते ऐकून दोघांच्या मनाचे समाधान झाले. परंतु जहागीरदारसाहेबांनी आपल्या डोक्याच्या पोषणाची व रक्षणाची जबाबदारी आपल्या मित्रावर घालून आणखी एक प्रश्न उभा केला.

आणि ती जबाबदारी त्यांच्या मित्राला फार महाग पडू लागली. कारण सरदार साहेब आपल्या कुळाच्या नाव लौकिकाप्रमाणे आपल्या डोक्याचे पोषण झाले पाहिजे असा आग्रह करू लागले.

हा प्रश्न कसा सोडवायचा याचा विचार इतर मित्रमंडळींनी करून एक युक्ती काढली. त्याप्रमाणे एका जणाला गल्लीत ओरडत फिरायला सांगण्यात आले. तो मनुष्य "माणसांची नाके व कान विकत घेतो हो!" असे म्हणत सरदार साहेबांच्या व त्यांच्या मित्राच्या [illegible] लागला.

सरदारसाहेबांच्या मित्राने त्यालाबोलावून विचारले—"तू काय काय विकत घेतोस रे?"

तो म्हणाला—"मी माणसांची नाके व कान विकत घेतो."

"कोणत्या भावाने विकत घेतोस रे?" विचारतां "प्रत्येक नाक एक हजाराला व कान प्रत्येकी पांच पांचशेला." तो मनुष्य म्हणाला.

ते ऐकून सरदार साहेबांच्या श्रीमंत मित्राने सरदार साहेबांचा कुळवृत्तांत सांगून म्हटले—"यांच्यासारख्या कुलीन घराण्यातले नाक व कान असले तर?"

तो म्हणाला—"मी सांगितले तोच दर."

तेव्हां सरदार साहेबांचा मित्र त्याला म्हणाला—"सरदार साहेबांचे नाक व कान कापून घेऊन मला दोन हजार रुपये दे!"

ते ऐकून जहागीरदारसाहेब घाबरले. म्हणाले—"मित्रा! हा अन्याय नाही, आम्हांला कबूल.

"अन्याय कसा काय? हे डोके माझ्या मालकीचे आहे. त्याच्या रक्षणासाठी हजारो रुपये खर्च होत आहेत. मग ही रक्कम काढायची कशी?" मित्राने विचारले.

"तरमग चला न्यायाधिशाकडे, तो सांगेल तो निवाडा आपल्याला मान्य आहे." सरदार साहेब म्हणाले.

दोघे पुन्हां न्यायाधिशाकडे गेले आणि त्यांचा प्रश्न सोडवायला सांगितले.

दोघांचे म्हणणे ऐकून घेऊन न्यायाधीश म्हणाला—"तुमच्या मित्राला नाक व कान विकून टाकायचा अधिकार आहे. तुम्हांला ते मान्य नसेल तर त्यांनी तुमच्या डोक्याच्या रक्षणासाठी आजवर जो खर्च केला त्याची भरपाई तुम्ही करून दिली पाहिजे."

तो निवाडा सरदार साहेबांना मान्य झाला. त्यांनी आपल्या मित्राचा जो खर्च झाला होता त्याबद्दल आपला वाडा मित्राच्या नावी करून दिला आणि स्वतः गाव सोडून निघून गेले.



# विचित्र साक्ष

एकदा एका ग्रामप्रमुखाचा घोडा कोतवालाने चोरून नेला व त्याची लांब शेपटी कापून त्याला आपल्या घरांच्या वरसात बांधून ठेवला. शेजारच्या लोकांनी त्याला विचारले की घोडा कोठे खरेदी केला तेव्हां त्याने दूरच्या कोणत्या तरी गावाचे नाव सांगितले.

ग्रामप्रमुखाने कोतवालाच्या घरी जाऊन आपल्या घोड्याला ओळखले आणि न्यायाधिशाकडे जाऊन फिर्याद केली. न्यायाधिशाने त्याला विचारले–"काय हो, घोड्याला ओळखू शकणारा कोणी आहे का?" ग्रामप्रमुख म्हणाला–"आहे, गावातला दुकानदार."

न्यायाधिशाने दुकानदाराला बोलावून विचारले–"काय बुवा! तू ग्रामप्रमुखाच्या घोड्याला ओळखू शकशील का?"

लगेच कोतवाल म्हणाला–"साहेब! घोड्याची शेपटी लांब आहे हे. दुकानदाराला माहीत नसेल कदाचित!"

दुकानदार थोडा घुटमळला, त्याने घोड्याच्या चारीबाजूला फिरून घोड्याला लक्षपूर्वक पाहिलें व म्हणाला–"साहेब! समोरून पाहिले तर घोडा ग्रामप्रमुखांचाच वाटतो, परंतु पाठीमागून पाहिले तर हा घोडा कोतवालसाहेबांचा असावासा वाटतो."

दुकानदाराची साक्ष ऐकून कचेरीत जमलेले लोक खदखदां हसू लागले. न्यायाधिशाने निवाडा दिला की घोडा ग्रामप्रमुखाचा आहे.





इराण देशात खुसरो राज्य करीत असता घडलेली ही गोष्ट आहे. एकदा बादशाह आपली बेगम शिरीनच्या बरोबर महालाच्या गच्चीवर बसून बोलत होता तेव्हां एका कोळ्याने बादशाहला एक मासा आणून दिला.

तो मासा फार विचित्र होता. तो पाहून बादशाहला फार आनंद झाला. त्याने कोळ्याला चार हजार दीनार द्यायला आपल्या खजिनदाराला सांगितले.

बादशाह दररोज असे बक्षिस कोणाला तरी देत असतो हे बेगम पहात असे. कारण त्याला एखादी वस्तु आवडली की बादशाह काय व किती बक्षिस द्यायचे याचा विचार करीत नसे. तिला ते आवडत नसे.

कोळी आपले इनाम घेऊन खाली उतरून निघून गेला तेव्हां शिरीनने तिला ती गोष्ट न आवडल्याचे सांगितले.

म्हणाली–"तुम्ही तरी किती विचित्र तऱ्हेने वागता! एका माशाला कोणी चार हजार दीनार देतो का? अशा तऱ्हेने इनाम देऊ लागलात तर पुढे प्रत्येक गोष्टीसाठी लोक इनाम मागायला येतील व खजिना रिकामा झाला म्हणजे डोळे पांढरे होतील. म्हणून मी सांगते तसे करा. काही तरी युक्ती करून ते पैसे परत येतील असे करा."

"आम्ही जे इनाम दिले ते परत घेणे आम्हांला रास्त वाटत नाही. लोक नावे ठेवतील आम्हांला. पुढे पाहून घेऊ. याखेपेस झाले ते झाले." बादशाह म्हणाला.

"असे सोडून कसे चालेल? स्वतःचा मोठेपणा राखून ठेवून ते बक्षिस परत मिळविणे शक्य आहे. मी युक्ती सुचविते. ऐका. त्या कोळ्याला परत बोलवून



विचारा की तो मासा नर आहे की मादी? तो 'नर' आहे असे म्हणाला तर आपल्याला 'मादी' हवी होती असे सांगून परत करा. तो 'मादी' आहे असे म्हणाला तर आपल्याला 'नर' हवा होता असे सांगा." शिरीनने बादशाहला सल्ला दिला.

बादशाह बेगमच्या मनाविरुद्ध सहसा काही करीत नसे, म्हणून कोळ्याकडून इनामाचे चार हजार दीनार परत घेणे बादशाहला आवडत नव्हते तरी बेगमचे मन राखण्यासाठी बादशाहने नोकराला पाठवून कोळ्याला परत बोलाविले.

[illegible]ळी गच्चीवर परत आल[illegible] बाद-शाहने त्याला विचारले–"काय रे, तू जो मासा देऊन गेलास तो नर आहे की मादी?"

कोळ्याने वांकून सलाम केला आणि म्हणाला–"हुजूर! या जातीच्या माशात 'नर' किंवा 'मादी' हा फरक नसतो. प्रत्येक मासा अंडी घालतो."

ते ऐकून खुसरो जोराने हंसला आणि कोळ्याला आणखी चार हजार दीनार द्यायला त्याने खजिनदाराला सांगितले.

कोळ्याने आठ हजार दीनार आपल्या टोपलीत ठेवले व आनंदाने घरी निघाला.

तो महलाच्या आवाराबाहेर देखील गेला नसेल की तेवढ्यात एक दीनार जमिनीवर पडला आणि गडगडत दूर कोठे तरी जाऊन पडला.

कोळ्याने लगेच डोक्यावरची टोपली जमिनीवर उतरवून ठेवली आणि चारी-बाजूला तो दीनार हुडकू लागला. सुदैवाने दीनार सांपडला. तो टोपलीत ठेवून कोळी निघाला.

गच्चीवरून शिरीन ते दृश्य पहात होती. बादशाहदेखील बाजूला उभा राहून ते पहात होता. शिरीन बादशाहकडे वळून म्हणाली–"पाहिलेत ना? दरिद्री तो [illegible] त्याला आ[illegible] हजार दीनार दिलेत. परंतु तो इतका चिक्कू व मूर्ख निघाला की एका दीनारासाठी त्याने टोपली जमिनीवर ठेवली आणि दीनार हुडकू लागला. कोणी टोपली उचलून नेली असती तर? तो दीनार एखाद्या गरीबाच्या हाती लागला असता तर काय बिघडले असते?"

बादशाहने बेगमच्या शब्दाला मान देऊन कोळ्याला परत बोलाविले आणि म्हणाला–"अरे मूर्खा! एक दीनार खाली पडला तर तू त्याच्या लोभाने सर्व टोपलीभर दीनार जमिनीवर ठेवून दिलेस? एखाद्या गरीबाला मिळाला असता तर काय तू गरीब झाला असतास?"

ते ऐकून चकित होऊन कोळी जमिनी-पर्यंत वांकून सलाम करीत म्हणाला–"आपली दुवा आहे, या गरीबाला कोणत्या गोष्टीची उणीव आहे? एक दीनार गेल्याने मी कधीच गरीब होणार नाही. परंतु माझ्या मनात प्रत्येक दीनार एक पवित्र वस्तू आहे. त्याच्या एका बाजूला आपली मुद्रा आहे व दुसऱ्या बाजूला बादशाहाचे नाव आहे. त्या पवित्र वस्तूवर कोणाचा पाय पडला तर तो बादशाहचा अपमान होईल. माझ्या निष्काळजीपणामुळे बाद-शाहचा असा अपमान झालेला मला कसा खपेल? माझ्यासारख्या मातीमोल माण-साचा बादशाहने उद्धार केला तर माझ्या-कडून मातीत पडलेला दीनार उचलणे शक्य होणार नाही का?"

कोळ्याच्या त्या उत्तराने बादशाह इतका खूष झाला की त्याने कोळ्याला आणखी चार हजार दीनार इनाम म्हणून देण्यास खजिनदाराला सांगितले.

यावरून खुसरोला कळले की बायकोच्या बोलण्याकडे लक्ष दिल्याचा काय परिणाम झाला? त्याने दवंडी पिटवून प्रजेला सल्ला दिला. "बायकोचा सल्ला ऐकावा, पण त्याप्रमाणे वागू नये. कारण बायकोच्या सल्ल्याने एका चुकीची दुरुस्ती करायला जाऊन दोन चुका घडतात."



# दीर्घायुष्य देणारे दैवी औषध

चंदननगरच्या राजाचे वय मोठे असूनही लहान वय दिसे आणि कुंदननगरच्या राजाला अकाली वार्धक्य येऊ लागल्याची लक्षणे दिसू लागली. म्हणून कुंदननगरच्या राजाने आपल्या मंत्र्याला चंदननगरच्या राजाकडे असे बजावून सांगून पाठविले की चंदननगरच्या राजाच्या दीर्घायुष्याचे गुपित काय, हे विचारपूस करून यावे आणि औषध असेल तर ते काय आहे याची माहिती काढून यावे. परंतु ते औषध किंवा गुपित कळल्या शिवाय परत आल्यास फाशीची शिक्षा दिली जाईल.

मंत्री चंदननगरला पोंचला तेव्हां तेथील राजाने एका वडाच्या झाडाखाली तंबू लावून त्यात कुंदननगरच्या मंत्र्याला उतरवले. दिवसामागून दिवस लोटले परंतु चंदननगरच्या राजाच्या दीर्घायुष्याचे गुपित मंत्र्याला कळले नाही की औषधाचे नाव कळले नाही.

असेच आणखी काही आठवडे व महिने पण लोटले. कुंदननगरच्या मंत्र्याला काय करावे, सुचेना. गुपित तर कळत नाही व ते कळल्याशिवाय कुंदननगरला परतला तर फाशी होणार. याच विचारात तो वडाच्या झाडाखाली येरझाऱ्या घालीत हिंडू लागला.

एक दिवशी वडाच्या झाडाला एकाएकी आग लागली. चंदन नगरच्या राजाने कुंदननगरच्या मंत्र्याला बोलाविले व म्हणाला—"पाहिलेस ना, तुझ्या मनातल्या दुःखामुळे वडाचे झाड देखील जळून गेले. अशाच तऱ्हेने प्रजेच्या दुःखामुळे राजाला वार्धक्य आले आहे. म्हणून प्रजा सुखी राहली तर राजाचे आयुष्य वाढेल. तेव्हां राजाने प्रजा सर्वदा कशी सुखी राहील, या गोष्टीची फिकीर केली पाहिजे. तू ही गोष्ट आपल्या राजाला जाऊन सांग."





# पादत्राणांचा प्रताप

ही इजिप्त देशातील एक जुनी गोष्ट आहे. कैरो शहराच्या बाजारपेठेत अबू कासिम नावाचा एक व्यापारी होता. त्याचे औषधांचे दुकान होते. तो स्वभावाने फार चिक्कू होता. त्याला व्यापारात फार फायदा होत असे. परंतु तो खाण्यापिण्यावर किंवा कपड्यांलत्यांवर फारच कमी खर्च करीत असे. भिकाऱ्यांचे कपडे त्याच्या कपड्यांहून बरे वाटत. त्याचे पागोटे फाटून गेले होते व त्याचा रंग देखील फिक्कट झाला होता. परंतु त्याच्या पादत्राणांना जी ख्याती मिळाली होती तशी इतर वस्तूस मिळाली नव्हती. त्यांची जाहीरात फार झाली होती. कारण पादत्राणांना शेकडो खिळे मारलेले होते व चामड्याच्या तुकड्यांचे जोड इतके होते की पादत्राणे जाडजूड व त्यामुळे खूप जड झाली होती.

अबू कासिमच्या पादत्राणांचे वर्णन लोक निरनिराळ्या प्रकारे करीत बाजारातले हमाल म्हणत की धान्य भरलेले पोते तर "अबू कासिमच्या पादत्राणांसारखे जड आहे." कोणाच्या पोटात चावल्या चावल्यासारखे, म्हणजे दुखू लागले तर म्हणत की "अबू कासिमच्या पादत्राणांसारखे पोटात काही तरी चावत आहे."

एकदा अबू कासिमला व्यापारात फार फायदा झाला. दुसरे व्यापारी. व्यापारात फायदा झाला की आपल्या मित्रमंडळींना मेजवानी देत. पण अबू कासिमला तसला वेडेपणा कधी सुचला नाही. त्याने चांगला फायदा झाला म्हणून पर्वदिनी हिंदू लोक गंगास्नानाला जातात तशी अबू कासिमने हमामखान्यात जाऊन आंघोळ करण्याचा विचार केला. कारण हमामखान्यात आंघोळीला जाऊन कित्येक वर्षे लोटली होती'

अबू कासिमने मनात तो विचार आल्याबरोबर दुकान बंद केले आणि पादत्राणे खांद्यावर टाकून हमामखान्यात निघाला. पादत्राणे खांद्यावर टाकण्याचा हेतू ती घासून जाऊ नये हाच होता. तो हमामखान्यात पोचला तेव्हां त्याने सर्वांनी पादत्राणे बाहेर काढून ठेवली असलेली पाहिली. म्हणून त्याने पण आपली पादत्राणे तेथेच इतर लोकांच्या पादत्राणांबरोबर ठेवून दिली आणि हमामखान्यात आंघोळीला गेला.

अबू कासिमच्या अंगावर घामामुळे मातीच्या पुटांचे थर जमले होते. म्हणून मालिश करणारांना दोन दोनदां तेल लावून देखील पुरेनासे वाटले. त्याची आंघोळ संपायला तीन चार तास देखील [illegible] तो आंघोळ करून बाहेर आला तेव्हां संध्याकाळ झाली होती व पादत्राणांवर लक्ष ठेवणारा पगारी मनुष्य आपल्या घरी निघून गेला होता. अबू कासिमची पादत्राणे नाहीशी झाली होती व त्यांच्या जागी कोणाची तरी हिरवी पादत्राणे होती. कोणी तरी चुकून त्याची पादत्राणे घातली असतील असे समजून तो ती हिरवी पादत्राणे घालून घरी निघून गेला. कासिमच्या दुर्दैवाने ती पादत्राणे वास्तविक केरोच्या काजीची होती. तो सर्व गर्दी निघून गेल्यावर हमाम घ्यायला आला होता. त्याने आपली पादत्राणे बाहेर काढून ठेवली होती. त्यावेळी तेथे कोणाचीच पादत्राणे नव्हती.

[illegible] तेव्हां तेथ पुष्कळ पादत्राणे होती. परंतु अबू कासिमची पादत्राणे ओबडधोबड होती ती चांगल्या पादत्राणात ठेवलेली नोकराला आवडले नाही. म्हणून त्याने दूर उचलून ठेवली होती. संध्याकाळ झाल्यावर तो नोकर निघून गेला होता. म्हणून ती गोष्ट दुसऱ्या दिवशी तो परत कामावर आला तेव्हां कळली. अबू कासिमची पादत्राणे जागेवर होती व काजीची नव्हती. यावरून त्यानेच ती नेली असावीत या संशयावरून अबू कासिमकडे काजीच्या पादत्राणांविषयी चवकशी करण्यात आली व झडती घेतल्यावर त्याच्याकडे ती पादत्राणे सांपडली. अबू कासिमने काजीला पुष्कळसे पैसे देऊन स्वतःची सोडवणूक करून घेतली. तरी त्याला दोन दिवस कैदेत डांबून ठेवण्यात आले होते.

त्या दिवसापासून अबू कासीमला त्याची पादत्राणे नकोशी वाटू लागली. रागाच्या भरात त्याने ती नील नदीत नेऊन टाकली आणि एकदाची पीडा टळल्याचा सुस्कारा सोडला. परंतु ती पीडा तशी सुटणारी नव्हती.

दुसऱ्या दिवशी एक कोळी मासे पकडायला नील नदीत गेला होता. त्याने जाळे टाकल्याबरोबर त्यात ती पादत्राणे अडकली. काही तरी जड वस्तू आहे चांगला मोठा मासा सापडला असावा असे वाटल्यावरून त्या कोळचाने जाळे पाण्याबाहेर ओढले, तेव्हां मासाऐवजी अबू







कासिमची पादत्राणे सापडली. अबू कासिमची पादत्राणे प्रसिद्ध होती म्हणून ती ओळखणे कठीण गेले नाही. त्या पादत्राणांमुळे जाळयाला तीन चार जागी मोठी भोके पडली होती. म्हणून कोळी कासिमच्या दुकानावर आला आणि त्याने त्याला खूप शिव्या हासडून अबू कासिमची पादत्राणे दुकानात फेकली. त्यामुळे औषधाच्या कित्येक बाटल्या फुटल्या व पुष्कळ नासधूस झाली.

आता आपल्या पादत्राणांवर कासिमला इतका राग आला की ती पुरून टाकण्याचे त्याने ठरविले व त्यासाठी तो एका जागी खड्डा खणू लागला.

ते त्याच्या शेजाऱ्याने पाहिले. कासिमचे शेजाऱ्याशी वितुष्ट होते. म्हणून शेजाऱ्याने कासिम विरुद्ध खोटा आळ आणून काजीकडे फिर्याद केली की तो कोणाचा तरी जुना पुरून ठेवलेला ठेवा चोरून नेतो आहे.

कासिमचा लोभीपणा प्रसिद्धच होता. म्हणून काजीला ती गोष्ट खरी वाटली. त्याने जास्त चवकशी केल्याशिवाय कासिमला सरकारी कचेरीत हजर राहण्यास हुकूम देऊन शिपाई पाठविला.

कासिमने आपल्या तर्फे किती सांगितले की त्याने त्याची पादत्राणे त्याला ती नकोशी वाटू लागली म्हणून पुरून टाकण्यासाठी खड्डा खणला होता. त्याने शपथ घेऊन सांगितले, पण त्याच्या बोलण्यावर कोणी विश्वास केला नाही. तरी फक्त संशयावरून त्याला दंड झाला.

कासिमला आपल्या पादत्राणांवर जास्तच राग आला. त्याने आपली पादत्राणे दूर नील नदीच्या एका कालव्यात नेऊन टाकली आणि सुटलो बुवा एकदाचा असे समजून सुखाचा श्वास सोडला.

परंतु तो त्याचा एक निव्वळ भ्रमच ठरला. त्याच्या नशिबाने त्याच्या विरुद्ध पाठ फिरविली होती. म्हणून त्या कालव्यावर एक यंत्र होते, त्यात ती पादत्राणे जाऊन अडकली आणि पाणी वहायचे बंद [illegible] असता अबू कासिमची पादत्राणे आत अडकून राहलेली सापडली आणि नुकसान भरपाई करून देण्यासाठी त्याच्या विरुद्ध फिर्याद करण्यात आली. या भानगडीत कासिमला फार मोठी रक्कम दंड म्हणून द्यावी लागली.

आता अबू कासिमला वेड लागल्यासारखे वाटू लागले. तो आपली पादत्राणे घेऊन आपल्या घराच्या गच्चीवर गेला व त्या भिंतीवर ठेवून त्यांच्यापासून कशी सुटका मिळवावी या विचारात डोके खाजवीत बसला.

इतक्यात शेजारच्या लोकांचा कुत्रा धावत आला आणि त्याचा धक्का नेमका त्या पादत्राणांना लागून ती पादत्राणे, खाली रस्त्यावर एक म्हातारी चालली होती तिच्या डोक्यात जाऊन पडली आणि त्यातच तिचा जीव पण गेला.

रस्त्यावर जाणाऱ्या येणाऱ्या लोकांनी अबू कासिमची पादत्राणे ओळखली आणि त्याला शिव्या देऊ लागले. त्याच वेळी कोठून तरी शिपाई आले आणि त्यांनी म्हातारीचे डोके फुटले व कासिमला तुरुंगात टाकले.

म्हातारीच्या नातेवाइकांना नुकसान भरपाई देऊन कासिमने आपली सुटका करून घेतली.

आतापर्यंत काय करायचे हे कासिमने मनाशी ठरवून टाकले होते. तो काजीकडे गेला आणि आपली पादत्राणे काजीकडे जमा करून म्हणाला—"या पादत्राणांनी माझे फार मोठे नुकसान केले आहे, अगदी पिच्छा पुरवला आहे त्यांनी माझा! माझे सर्वस्व लुटले गेले आणि आज मी भिकारी झालो आहे. यापुढे मला या पादत्राणांची गरज नाही. तुम्हांला वाटेल तशी यांची विल्हेवाट लावा. यांच्यामुळे यापुढे कोणाचे काही नुकसान झाले तर मी त्याला जबाबदार नाही."

ते ऐकून काजी व काजीबरोबर कचेरीत बसलेले इतर लोक खदखदा हसू लागले.



# प्रारब्धाचा प्रताप

एका श्रीमंत माणसाच्या मळ्यात गोपू नावाचा एक माळी काम करीत असे. तो श्रीमंत मनुष्य स्वभावाने थोडा दुष्ट होता. त्या श्रीमंत माणसाचा मुलगा संधी मिळाली की लहान मोठ्या चोऱ्या करी.

एकदा गोपूकडे एक मनुष्य आला आणि त्याच्या हातात शंभर रुपये देऊन म्हणाला– "अहो दादा! तुमच्या सासुबाईंनी मरणासमयी तुम्हांला देण्यासाठी मला शंभर रुपये दिले होते. हे घ्या आणि संभाळून ठेवा." असे सांगून व पैसे देऊन तो मनुष्य निघून गेला.

गोपूने विचार केला की मालकाचा निरोप घेऊन जे पैसे मिळाले आहेत त्या भांड-वलावर काही तरी धंदा करावा. असा विचार करून त्याने ते रुपये एका फडक्यात बांधून चिंचेच्या झाडाच्या पोकळीत ठेवून दिले.

श्रीमंताच्या मुलाने ते पाहिले होते. माळी झोपडीत निघून गेल्यावर त्याने ते पैसे उचलून नेऊन आपल्या बापाला दिले. म्हणाला–"बाबा! मला हे रुपये मळ्यात मिळाले."

दुसऱ्या दिवशी गोपू आपल्या मालकाचा निरोप घेऊन निघून गेला. त्यानंतर श्रीमंत माणसाचा मुलगा घरी येऊन आपल्या बापाला उदास बसलेला पाहून विचारू लागला– "बाबा! तुम्ही असे दुःखी कां?"

"काल तू दिलेले रुपये दिसत नाहीत रे!" श्रीमंत मनुष्य म्हणाला.

"ते तुम्ही कोठे ठेवले होतेत, बाबा?" त्याने बापाला विचारले.

"चिंचेच्या झाडातल्या पोकळीत ठेवले होते रे!" तो श्रीमंत मनुष्य म्हणाला.





## ऋणानुबंध

प्राचीन काळात घडलेली गोष्ट आहे.

धारानगरीत धर्म नावाचा एक चांभार रहात असे. तो वहाणा चढावा वगैरे शिवून स्वतःचे पोटभरीत असे. त्याचबरोबर तो रात्रभर जागून गावात गस्त घाली आणि लोकांना सावध करी–"चोर फिरत आहेत, सावध रहा!"

धर्मला पोटा पाण्याची काळजी तेवढी कधीच वाटली नाही. त्याला व त्याच्या कुटुंबाला पोटभर खायला मिळे व रहायला एक खोपटे होते. त्याचा संसार त्यात आनंदाने चाले. पण त्याला एका गोष्टीचे दुःख होते. वंशवृक्ष वाढावा यासाठी त्याला एक मुलगा तरी व्हावा असे वाटे. परंतु त्याला आपत्य सुख नव्हते.

त्या गावात एक प्रसिद्ध पंडित रहात असे. धर्म रात्रीचा पहारा संपवून घरी निघाला की तो पंडित नदीवर स्नान करून घरी परत जात असे त्याची भेट होई. एकदा तो पंडित स्नानाला निघाला होता व धर्म भेटला. धर्मने त्या पंडिताला नमस्कार केला आणि म्हणाला–"पुत्रप्राप्तीचा आशीर्वाद द्या."

तेव्हां पंडित म्हणाला–"अरे धर्म मूल-बाळ नाही, एवढ्यासाठी तू इतकी काळजी कशाला करतोस? थोरामोठ्यांचे म्हणणे आहे.

ऋणानुबंध रूपेण
पशुपत्नी सुतालया.

अर्थात्, पशू, पत्नी, पुत्र, घरदार यांची प्राप्ती पूर्वऋणानुबंधाने होते. ते ऋण फिटले की ते निघून जातात."

पंडित तेवढे सांगून निघून गेला.

पंडिताने ती एक लोकनी म्हणून सांगितली. परंतु धर्मला प्रपंचाचा बोध आला नाही. उलट त्याच्या मनात एक

नवीन विचार उत्पन्न झाला. माझ्या धनाचा कोणाला उपयोग झाला तर ते ऋण फेडण्यासाठी त्याला माझ्या घरी जन्म घ्यावा लागेल. म्हणजे अशा तऱ्हेने मला पुत्र अपत्य होण्याची शक्यता आहे.

तो विचार मनात येताच धर्मूने विचार केला की कोणाच्या वहाणा किंवा चढाव फुकटात शिवून दिले तर त्याला ऋण फेडण्यासाठी माझ्या पोटी जन्म घ्यावा लागेल. परंतु कोणी फुकटात पादत्राणे घ्यायला तयारच होईना. कोणी त्याच्या त्या उपकाराचे ऋण डोक्यावर घ्यायला तयार होईना. प्रत्येक जण त्या पेक्षा पैसे घेऊन वहाणा शिवून देणाऱ्या चांभाराकडे जाऊ लागला.

[illegible] धर्मूने आणखी एक उपाय करून पाहण्याचे ठरविले. नदी व गाव यांमधील अंतर सुमारे एकदीड मैलांचे होते. येता जाता उन्हांत पाय पोळत असत. म्हणून वाटेत वहाणा मिळाल्या तर लोक नक्कीच घालतील. त्या विचाराने धर्मूने वहाणांचा एक नवा कोरा जोड वाटेत टाकून ठेवला. परंतु एक पंधरवडा लोटला तरी कोणी त्या वहाणांना हात लावला नाही. ते ऋण केव्हां कसे फेडावे लागेल कोणास ठाऊक या विचाराने सर्व भीत होते. म्हणून धर्मू फार निराश झाला. तो देवाचे स्मरण करून म्हणाला—"देवा! तरमग माझ्या नशीबी मुलगा नाही का? कोणी माझ्या या नव्या वहाणांना हात कां लावीत नाही? कोणी माझा ऋणी [illegible] तयार कां होत नाही?"

तरी धर्मू देवावर भरंवसा ठेवून आशा धरून होता. कोणीतरी नक्कीच वहाणा घेऊन माझा ऋणी होईल.

आणखी काही दिवस असेच लोटले. एक दिवशी वहाणांचा जोड नाहीसा झाला होता. त्याने देवाचे आभार मानले. म्हणाला— "देवा, तू माझ्या हाकेला पावलास!" त्याच आनंदात तो घरी धावत गेला आणि बायकोला त्याने आनंदाची बातमी सांगितली. बायकोला देखील फार आनंद झाला.

परंतु वहाणा उचलून नेणारा कोण, हे त्याला कळले नाही. त्या गोष्टीची त्याला फार उत्सुकता वाटू लागली.

## २

ज्या पंडिताने धर्मूला ऋणानुबंधाची गोष्ट सांगितली होती, त्याला एकदां ऐन दुपारी त्या वाटेने एका गावी जावे लागले. ऐन दुपारची वेळ होती व पायताणे नसल्यामुळे पाय पोळत होते. आता पुढे कसे जायचे हा प्रश्न होता. सुदैवाने त्याच वेळी त्याला समोर नव्या वाहणांचा जोड दिसला. त्या पंडिताला जिवात जीव आल्यासारखे वाटले.

त्याला वाटले की कोणीतरी चांभार या वहाणा विकायला बाजारात घेऊन गेला असेल आणि जाता जाता त्या खाली पडल्या असतील. कदाचित तो या वहाणा शोधीत परत येत असेल.







म्हणून त्याने मागे वळून पाहिले व चारी बाजूला नजर फिरवून पाहिली. परंतु कोणी दिसला नाही. तेव्हां त्याने विचार केला, आपण या वहाणा पायात घालाव्या. गावात जाऊन कोणी वहाणा विसरून गेला का, की कोणाच्या चुकून रस्त्यावर पडल्या होत्या का, चांभारांच्या वस्तीत चवकशी करून वहाणांची किंमत देऊन मोकळे होऊ या. याप्रमाणे आपले काम करून गावी परत आल्यावर त्याने चवकशीपण केली. परंतु प्रत्येकाने त्या वहाणा त्यांच्या नसल्याचे सांगितले. परंतु धर्मू त्या पंडिताची गाठच पडू नये या प्रयत्नात राहला.

पंडिताला वहाणांचा मालक मिळाला नाही आणि बिचारा हे ऋण पुढच्या जन्मी फेडावे लागणार या काळजीत आजारी पडला व त्याच आजारात त्याला परलोकाची यात्रा करावी लागली. त्याला भीती वाटत होती तसेच झाले. त्याच्यावर धर्मूचे ऋण राहून गेले व धर्मूच्या पोटीच त्याला जन्म घ्यावा लागला.

३

धर्मूच्या बायकोला दिवस राहले आणि दहाव्या महिन्यात तिला एक सुंदर मुलगा झाला. चांभारांच्या वस्तीत सर्वत्र आनंदी आनंद पसरला. धर्मू व त्याच्या बायकोच्या आनंदाला तर पारावार नव्हता. हा मुलगा तो ब्राह्मण पंडितच आहे, या गोष्टीची धर्मूला शंका नव्हती. त्याने आपल्या मुलाचे नाव रविदास ठेवले.

रविदास मोठा झाला तसतसा बापाचा धंदा करू लागला. वहाणा व चढाव शिवण्यात त्याने प्रविण्य मिळविले. तो जे पैसे मिळवी ते पैसे आपल्या बापाला देऊ लागला. परंतु बाप उपकाराची फेड होईल या भीतीने पैसे घेत नव्हता. ऋणानुबंध राहला नाही तर पितापुत्रांची ताटातूट होईल अशी त्याला भीती वाटत होती. त्याने रविदास पैसे देऊ लागला तरी न घेण्याचा सल्ला बायकोला दिला.

रविदासाला तो पूर्वजन्मी ब्राह्मण पंडित होता व तो धर्मूच्या पोटी कसा जन्मला ही गोष्ट माहीत होती. म्हणून तो ऋण मुक्त होण्याच्या खटपटीत असे. कारण त्या शिवाय या जगातून मोक्ष मिळणे शक्य नाही हे त्याला माहीत होते. परंतु आईबाप पैसे घेत नाहीत तर मोक्षपण मिळणे शक्य नाही असे त्याला वाटू लागले.

एकदा धर्मूला कामानिमित्त परगावी जावे लागले. तो आपल्या मुलाला बोलावून म्हणाला–"बाळ रविदास! मला एका कामानिमित्त परगावी जायचे आहे. मी उद्यां परत येईन. तू आज रात्रभर पाहरा देण्याचे काम कर. लोकांना प्रत्येक प्रहरी सावध करीत जा."

बापाच्या आज्ञेप्रमाणे रविदास रात्रभर नगरात पाहरा देऊ लागला. त्याच्याबरोबर आणखी एक साथीदार पाहऱ्यासाठी होता. तो रविदासाला म्हणाला–"रविदास! प्रहर रात्र संपली आहे. लोकांना एकदा सावध केले पाहिजे."

ते ऐकून रविदासाने उच्च स्वरात एक संस्कृत श्लोक म्हटला.

> "माता नास्ति पिता नास्ति,
> नास्ति बंधुः सहोदरः,
> अर्थं नास्ति गृहं नास्ति,
> तस्मात जाग्रत जाग्रत !"



बरोबर जाणाऱ्या पाहरेकऱ्याने चकित होऊन रविदासाला विचारले–"रविदासा! मी हा श्लोक पूर्वी कधी ऐकला नाही आणि हा संस्कृत भाषेत आहे. याचा अर्थ सांगतोस का?"

तेव्हां रविदास म्हणाला–"हे पहा, आपली कोणी आई नाही की, बाप नाही, कोणी बंधु बांधव नाहीत की घरदार धन दौलत पण नाही. म्हणून सावध रहा, सावध रहा! असा अर्थ आहे."

आणखी एक प्रहर रात्र लोटली तेव्हां रविदासाने उच्च स्वरात आणखी एक श्लोक म्हटला.

"कामक्रोधश्च लोभश्च
देहे तिष्ठंति तस्कराः
ज्ञान रत्नापहाराय
तस्मात् जाग्रत जाग्रत !"

रविदासाने तो श्लोक म्हटल्यावर साथी पाहरेकऱ्याने विचारले–"रविदासा! हा श्लोकपण मला कळला नाही रे. तू एवढे ज्ञान कोठून मिळविलेस रे? मला या संस्कृत श्लोकाचापण अर्थ सांगतोस का?"

रविदास म्हणाला–"मित्रा! आपल्या शरिरात जे ज्ञानाचे धन आहे ते चोरून नेण्यासाठी काम, क्रोध, लोभ वगैरे (सहा) चोर शिरले आहेत. म्हणून माणसाने (सर्वदा) सावध रहावे!"

पाहता पाहता तीन प्रहर रात्रपण लोटली. रविदासाने या खेपेस लोकांना सावध करण्यासाठी आणखी एक श्लोक म्हटला :

"जन्म दुःखं जरा दुःखम्
जाया दुःखं पुनः पुनः
संसार सागरम् दुःखम्
तस्मात् जाग्रत जाग्रत !"

तो श्लोक ऐकून साथी पाहरेकरी जास्तच चकित झाला. त्याने विचारले–"रविदासा! तुझ्या या श्लोकात दुःखच दुःख आहे. अशी कोणती दुःखे आहेत, त्यांची फोड करून तरी सांग." तेव्हां रविदासाने श्लोकाचा अर्थ समजावून सांगितला. म्हणाला–"या जगात जन्म घेणे हे एक दुःख आहे, वार्धक्य येणे हे देखील दुःखच आहे. बायको देखील दुःखच आहे. थोडक्यात संसार व प्रपंच हेदेखील दुःखच आहे. संसारसागरात पडलेला क्वचितच कधी वांचतो. म्हणून सावध रहा."

"अरे रविदासा, तू या वैराग्याच्या गोष्टी सांगतो आहेस? तुझे बाबा तुझे लवकर लग्न करून देण्याच्या खटपटीत आहेत आणि तू वैराग्याची गोष्टी करू लागला आहेस?" साथी पाहरेकरी म्हणाला.

तीन प्रहर रात्र संपून चवथा प्रहर सुरू झाल्यावर रविदासाने पहारा संपविण्यापूर्वी आणखी एक श्लोक म्हटला–

"आशया बद्धते लोके
कर्मणा बहु चिन्तया
आयुक्षीणम् न जानाति
तस्मात् जाग्रत जाग्रत !"

पाहरेकऱ्याने या श्लोकाचा अर्थ सांगायला पण आग्रह केला. तेव्हां रविदासाने त्या श्लोकाचा अर्थ या शब्दात सांगितला. म्हणाला–

"आशा, कर्म व अनेक प्रकारच्या चिंता यांच्या बंधनात इहलोकी मनुष्य बांधला जातो. या सर्वांत गुरफटलेल्या माणसाचे आयुष्य क्षीण होत चाललेले फार थोड्या लोकांना कळते. म्हणून सावध रहा, सावध रहा!"

रविदासाने प्रहर रात्र लोटल्यावर सर्वांत प्रथम जो श्लोक म्हटला होता तो त्या देशाच्या राजाने ऐकला होता. राजाला फार आश्चर्य वाटले. त्याला वाटले की आणखी एखादा असाच चांगला श्लोक





कदाचित् कानावर पडेल. म्हणून तो रात्र-भर जागत राहिला. त्याला त्यानंतर आणखी तिन्ही श्लोक ऐकू आले.

उजाडल्यावर राजाने आपल्या शिपायांना पाठवून रात्रभर कोणी पहारा दिला याची चवकशी करून त्याला बोलावून आणायला सांगितले. रविदासाला जेव्हां राजाच्या समोर हजर करण्यात आले तेव्हां राजाने त्याला नमस्कार केला व विचारले–"पुरुष-श्रेष्ठा! आपण कोणीतरी विद्वान पंडित दिसतां आहां. नाहीतर सामन्य पहारेकऱ्यात एवढे पांडित्य कोठून येणार? माझ्यावर कृपा करून एवढी भेट घेण्याची कृपा करावी!" असे म्हणन राजाने सुवर्ण मुद्रा भरून एक थैली रविदासाला दिली.

रविदासाला त्या पैशाची गरज काय? परंतु हे धन आईबापाना देऊन त्यांच्या ऋणांतून मुक्त होता आले तर पहावे या हेतूने त्याने ती थैली ठेवून घेतली.

दुसऱ्या दिवशी धर्म गावाहून परतला. रविदासाने विचार केला की त्याला राजा-[illegible] घेणार नाहीत. मग या पैशाचे काय करायचे हा एक प्रश्न त्याच्या समोर उभा राहिला.

त्याच सुमारास चांभारांच्या वस्तीस आग लागली सर्व लोक आपापल्या वस्तू घेऊन घरातून बाहेर ठेवू लागले. रविदास देखील बापाला घरातले सामान बाहेर काढायला मदतीला धावला. इतर सामाना-बरोबर रविदासाने ती सुवर्ण मुद्रांची पिशवी बापाच्या हातात दिली. धर्मने ती पिशवी इतर सामानाबरोबर पिशवीत काय आहे याचा विचार केल्याशिवाय ठेवून घेतली.

ऋण मुक्त झाल्याबद्दल रविदासाला फार आनंद झाला. नंतर तो जळणाऱ्या घरातले सामान काढण्यासाठी जो आत गेला तो बाहेर आला नाही.

धर्मला वस्तुस्थिती कळायला वेळ लागला नाही. त्याच्या पुत्ररूपे जन्म घेऊन पंडिताने जो उपदेश गावकऱ्यांना केला होता त्याचे स्मरण त्याला झाले व त्याच्या दुःखाचा भार हलका झाला. त्याला ज्ञानबोध झाला.





# आरोपीचा शोध

राजा प्रसेनजित श्रावस्ती राज्याचा अधि-पति होता. एकदा कोणीतरी ब्राह्मण दूर देशातून श्रावस्तीला आला. सुदैवाने त्या ब्राह्मणाची श्रावस्तीच्या प्रमुख व्या-पाऱ्यांशी मैत्री झाली. ब्राह्मणाला कोणत्या ही गोष्टीची उणीव वाटत नव्हती. एवढेच नव्हे तर, त्याला खूप दान व दाक्षिणादेखील मिळू लागली.

तो ब्राह्मण या जगात एकटा होता. त्याला बायको किंवा इतर नातेवाईकपण कोणी नव्हते. म्हणून त्याला जे पैसे मिळत त्याचा स्वतःच्या गरजासाठी आवश्यक खर्च करून जे पैसे उरत त्याचे तो सोने विकत घेई आणि ते एका जागी पुरून ठेवी. त्याच्याजवळ पुष्कळ सोने जमले. त्याला कळेना की इतके सोने कोठे व कसे काय लपवून ठेवायचे. म्हणून त्याने पुष्कळ विचार करून रानात एका जागी खड्डा खणून ते सर्व सोने पुरून ठेवले. तो दररोज जाऊन पाहून येई की कोणी सोने चोरून तर नेले नाही.

परंतु एक दिवशी त्या जागी जाऊन त्याने नित्याप्रमाणे खड्डा खणून पाहिले, तेव्हां त्याला, त्याने पुरून ठेवलेल्या सर्व सुवर्णमुद्रा नाहीशा झालेल्या दिसल्या. कोणी तरी त्या जागी खणून सर्व सुवर्णमुद्रा लांबवल्या होत्या.

इतक्या काळजीपूर्वक जमवून ठेवलेल्या सोन्याचा तो साठा एकाएकी चोरी गेलेला पाहून ब्राह्मणाला वेड लागल्यासारखे वाटले. तो कपाळ आपटून वाटेत त्याला जो भेटे त्याला त्याचे सर्वस्व लुटले गेल्याचे सांगत घरी परत आला. त्याच्या मनाचे सांत्वन करणे कोणाला शक्य नव्हते.

"आता जिवंत राहण्यात तरी काय अर्थ आहे? नदीत उडी टाकून जीव देऊन



"मोकळा होतो." असे ओरडत तो नदी काठी आला.

त्याच वेळी राजा प्रसेनजित नदीवर स्नान करून घरी परत निघाला होता. नदीत उडी टाकायला निघालेल्या ब्राह्मणाला मध्येच थांबवून त्याच्याकडून त्याने सर्व वृत्तांत विचारून घेतला व म्हणाला—"वेड्या ब्राह्मणा! तू अशी आत्महत्या करून घेऊन काय मिळविणार आहेस? माझ्या राज्यात चोरी झाली आहे. चोरी गेलेला माल परत मिळवून देण्याची जबाबदारी माझ्या शिरावर आहे. माल मिळाला नाहीतर मालाची जी किंमत असेल ती मी आपल्या खजिन्यातून तुला देववीन. तरी पण तू आपले धन ज्या जागी पुरून ठेवले होतेस त्या जागेची थोडी खूण सांगू शकशील का?"

"महाराज, ज्या जागी मी आपले धन पुरून ठेवले होते त्या जागी रानटी दोडक्याचे एक रानटी झाड होते. त्या जागी आता ते नाही." ब्राह्मण म्हणाला.

"रानटी दोडक्याचा वेल ही काय खूण झाली? अशी झाडे तर जागोजागी असतात?" राजाने विचारले.

"परंतु महाराज, जवळ पास त्या जागी तसे दुसरे झाड नक्कीच नव्हते." ब्राह्मण म्हणाला.

"तू त्या जागी धन पुरून ठेवले होतेस, या गोष्टीची माहिती आणखी कोणाला होती का?" राजाने विचारले.

"महाराज, ही गोष्ट माझ्याशिवाय इतर कोणालाच माहीत नाही. खरी गोष्ट म्हणजे या गोष्टीची माहिती सांगून ठेवायला माझा जवळचा नातेवाईक कोणीच नाही." ब्राह्मण म्हणाला.

राजाने ब्राह्मणाला घरी पाठवून दिले आणि एकांतात बसून चोरीचा शोध कसा लावायचा याविषयी विचार करू लागला. सुदैवाने त्याला एक युक्ती सुचली. राजाने आपल्या मंत्र्याला बोलाविले व [illegible] बिघडली आहे. वैद्यांना दाखवावी म्हणतो. म्हणून तुम्ही राजधानीतल्या सर्व वैद्यांना मला येऊन भेटायला सांगा."

राजाज्ञेप्रमाणे राजधानीतले सर्व वैद्य राजवाड्यात पळत आले. राजाने आपल्या एकांत स्थानी बसून एकेका वैद्याला बोलावून विचारले—"वैद्यबुवा! तुम्ही काल किंवा आज कोण कोणत्या रोगावर कोण कोणते औषध दिलेत?"

वैद्यांनी दिलेले उत्तर टिपून ठेवून घेऊन राजाने वैद्यांना एकामागून एक पाठवून दिले.

त्या वेळी प्रधान राजाजवळच बसला होता आणि राजाने विचारलेले प्रश्न आणि वैद्य उत्तरे देत ती ऐकत होता. परंतु राजा ही सर्व चवकशी कशासाठी करीत आहे हे त्याला कळेना.

एका वैद्याने राजाच्या प्रश्नाचे उत्तर दिले ते असे—"महाराज! काल मातृदत्त नावाच्या एका व्यापाऱ्यासाठी मी रानटी दोडक्याच्या रसात औषध तयार करून दिले होते."

तेव्हां राजाने उत्सुकतेने विचारले—"अस्सं! पण रानटी दोडक्याचे वेल क्वचितच कोठे कोठे मिळतात. तुम्हांला कोठे मिळाला तो?"



"होय महाराज! माझ्या नोकराने सारे रान पालथे घातले तेव्हां एका जागी तो वेल सापडला." वैद्य म्हणाला.

"तरमग तुम्ही त्या नोकराला माझ्याकडे पाठवून द्या." राजा म्हणाला.

थोड्या वेळाने वैद्याचा नोकर राजासमोर येऊन उभा राहिला.

राजाने त्याला विचारले—"तू काल रानटी दोडक्याचे झाड आणलेस त्याच्या खाली तुला एक हजार सुवर्ण मुद्रा मिळाल्या होत्या. त्या तू कोणाला दिल्यास?"

नोकराचा चेहरा खाडकन खाली उतरला. म्हणाला—"मी त्या सर्व सुवर्णमुद्रा आपल्या घरी नेऊन ठेवल्या."












"त्या सुवर्णमुद्रा मी सांगतो त्या ब्राह्मणाकडे पोचत्या कर. त्या त्याच्या आहेत." राजाने आज्ञा केली.

नोकराला दुसरा मार्गच नव्हता. त्याने त्या सुवर्णमुद्रा ब्राह्मणाकडे पोचत्या केल्या.

प्रधानाने राजाला विचारले–"महाराज! आपण या चोरीचा शोध इतका सहजी कसा काय मिळवून दिलात? मला मुळीच कळले नाही."

राजा स्मित करून म्हणाला–"चोरी संबंधाने ब्राह्मणाने जे काही सांगितले ते पूर्णपणे खरे मानूनच मी चोराला त्याच्या आधारे पकडण्याचे ठरविले. आपल्या राजधानीत लक्षावधी लोक राहतात. पण चोरी कोणीतरी एकालाच करता येणार. ब्राह्मणाने मला सांगितले की त्याने ज्या जागी सुवर्णमुद्रा लपवून ठेवल्या होत्या त्या जागेची माहिती कोणाला नाही. त्याला कोणी जवळचा आप्त नातेवाईक नाही. तेव्हां पुरलेल्या धनाच्या जागी खणण्याची गरज आणखी दुसऱ्याच कारणाने झाली असेल. त्याला रानटी दोडक्याच्या वेलाची गरज असणार तोच तिकडे फिरणार आणि खणणार.

"ब्राह्मणाने जवळपास दुसरे झाड नव्हते हेदेखील सांगितले होते. मी ब्राह्मणाच्या त्या म्हणण्यावर विश्वास करून विचार केला की त्या वेलासाठी जो खणायला जाईल त्याला ते धन मिळेल. फक्त धन चोरी करून नेण्याच्या हेतूने कोणी खणले असते तर फक्त धन उचलून नेले असते आणि वेल तेथेच टाकून दिला असता. परंतु धनाबरोबर वेलदेखील नाहीसा झाला होता.

"आतां रानटी दोडक्याच्या वेलाची गरज वैद्याशिवाय आणखी कोणाला असणार? म्हणून मी वैद्यांना बोलाविले होते. मला रानटी दोडक्याच्या वेलाचा प्रयोग करणाऱ्या बरोबर चोरदेखील सांपडला. न समजण्यासारखे यात काय आहे, सांगा प्रधान!"

राजाने केलेल्या युक्तीचे वर्णन ऐकून प्रधानाला राजाच्या चातुर्याचे आश्चर्य वाटले.



# खरे की खोटे

कांचनपूरची राजकन्या विवाह योग्य झाली तेव्हां दूरदूरच्या देशांच्या राजकुमारांच्या वतीने तिला मागण्या घालण्यात आल्या.

परंतु राजकुमारीने त्या सर्वांस कळविले की जो कोणी तिला सर्वात अधिक अविश्वसनीय व अद्भुत अशी गोष्ट सांगेल त्याच्याशीच ती विवाह करणार.

प्रत्येक राजकुमाराने आपल्या कल्पनेप्रमाणे अद्भुत व अविश्वसनीय अशा गोष्टी सांगितल्या. परंतु सर्व राजकुमारांना राजकुमारीने त्या खऱ्या वाटत नसल्याचे सांगितले.

शेवटी एका राजकुमाराने एक गोष्ट राजकुमारीला सांगितली. म्हणाला–"मी एकदा चांदण्या रात्री आपल्या उद्यानात फिरत होतो तेव्हां मला एक अप्रतिम सुंदर स्त्री दिसली. ती मला म्हणाली की ती माझ्याशीच विवाह करणार आहे व त्यासाठी जेथे स्वयंवराची व्यवस्था करण्यात येईल त्या जागी मी अवश्य उपस्थित राहिले पाहिजे. परंतु त्या स्वयंवराच्या वेळी मी तुला पाहून तूच ती सुंदर स्त्री होतीस हे मी ओळखले."

तो राजकुमार म्हणाला ते मान्य केले तर वचन दिल्याप्रमाणे त्याच्याशीच तिला विवाह करणे आवश्यक होते. विश्वास केला नाही तरी तिने जी परीक्षा घेतली त्यात तो तरुण यशस्वी झाला म्हणून त्याच्याशी तिला विवाह करून घेण्यास मान्यता देणे आवश्यक होते. म्हणून शेवटी राजकुमारीने त्या राजकुमाराशी विवाह करून घेतला.





# अमरवाणी

दुष्टा भार्या, शठो मित्रम्
भृत्योहंकारसंयुत:,
ससर्पे च गृहे वासो,
मृत्युरेव न संशय: ॥ १ ॥

[दुष्ट पत्नी (बायको), लबाड मित्र आणि घमेंडखोर नोकर यांच्याबरोबर राहणे, साप असलेल्या घरात राहण्यासारखे आहे ; परिमाण निश्चित मृत्यू.]

यस्मिन् देशे न सन्मानो,
न प्रीति, नंच बांधवा:,
न विद्या, नास्ति धनिको,
न तत्र दिवसं वसेत् ॥ २ ॥

[ज्या जागी आदर नाही, प्रेम नाही, बंधुमित्र नाही, विद्वान किंवा श्रीमान कोणी नाही, तेथे एक दिवसदेखील राहू नये.]

कुचेलिनम्, दंतमलापहारिणम्,
बह्वाशिनम्, निष्ठुरवाक्यभाषिणम्,
सूर्योदयेचास्तमये च शायिनम्,
विमुंचति श्रीरपि चक्रपाणिनम् ॥ ३ ॥

[घाणेरडे वस्त्र धारण करणारा, दांत न घुणारा, आधाशी, निष्ठुर बोलणारा, सूर्योदयाच्या वेळी किंवा सूर्यास्तसमयी झोपणारा असा स्वत: चक्रपाणी विष्णू जरी असला तरी त्याला लक्ष्मी सोडून देईल.]





# मानव स्वभाव

एका गावी गुणाजी नावाचा एक शेतकरी रहात असे. त्याच्या जवळ थोडीशी जमीन होती. त्याच्या शेतात जेवढे पीक निघे तेवढे त्याच्या घरखर्चापुरेसे नव्हते. म्हणून त्याला कर्ज काढून आपला खर्च भागवावा लागे. परंतु त्यामुळे त्याची गरीबी वाढतच गेली व कर्ज फेडणे अशक्य झाले.

एकदा त्याच्या बायकोने त्याला सुचविले की शेत विकून कर्ज फेडून टाकावे. अर्धपोटी रहावे लागले तरी हरकत नाही. परंतु कर्ज डोक्यावर असता आयुष्यात निश्चितपणा वाटत नाही. बायकोच्या म्हणण्याप्रमाणे गुणाजीने शेत विकायचे ठरविले. गावकऱ्यांनी विचार केला की, गुणाजी गरजवंत आहे. स्वस्तात शेत विकत घेऊन फायदा करून घ्यावा. म्हणून कोणी शेताची खरी किमत द्यायला तयार होईना.

त्याच गावी राघोजी नावाचा आणखी एक शेतकरी रहात असे. गुणाजीच्या वाडवडिलांची स्थिती चांगली होती त्यावेळी त्याला त्यांच्या कडून थोडी फार मदत मिळे. ती त्याला आठवली व त्याने गुणाजीच्या शेताची बरोबर किमत देऊन टाकून त्याचे शेत विकत घेतले.

गुणाजीने सर्व कर्ज फेडून टाकले आणि स्वत:च्या व कुटुंबाच्या पोटापाण्यासाठी मजुरी करू लागला. राघोजीने त्याला एकदा बोलावून विचारले—"गुणाजी, तुला शेतकामच करायचे असेल तर तू मला विकलेल्या शेतातच काम करीत जा. दुसऱ्या कुळाला शेत देण्याऐवजी तुलाच ते मी देतो."

"दादा! तुमचे केवढे उपकार आहेत माझ्यावर? या सर्व उपकारांची फेड केव्हां व कशी होईल ते त्या देवालाच माहीत."

श्री. श्री. के. देसाई



गुणाजी म्हणाला आणि राघोजीचे कूळ म्हणून काम करायला तयार झाला.

गुणाजी एकदा शेत नांगरीत असता त्याच्या नांगराच्या फाळाला लागून भांडे वाजावे असा आवाज झाला. गुणाजीने नांगर उभा करून ती जागा छान खणून पाहिली तेव्हां त्या जागी त्याला सोन्या-चांदीने भरलेले दोन हंडे सांपडले. त्याने ते हंडे राघोजीला नेऊन दिले व म्हणाला– "तुमच्या शेतात सापडले हे."

राघोजी गुणाजीच्या प्रामाणिकपणावर चकित होऊन म्हणाला–"गुणाजी! तू इतके धन फुकटात मिळाले असून माझ्याकडे

प्रामाणिकपणाची वाखाणणी करू? हे तुझ्याच शेतातले आहे व तुझेच आहे! तूच ते घे!"

"दादा! असे नका बोलू. मी शेत आपल्याला विकले तेव्हां पासून त्या शेतातली मातीच नव्हे तर माती खालची प्रत्येक वस्तु आपली झाली. म्हणून आपल्या शेतात मिळालेले हे दोन्ही हंडे आपलेच आहेत." गुणाजी म्हणाला.

"अरे गुणाजी! तू असे कसे म्हणतोस? तुझ्या शेतात जे पीक निघते त्याच्या आधारे मी तुझ्या शेताची किंमत ठरवून तुला दिली. तुझ्या शेतात सोन्या चांदीने भरलेले हंडे आहेत हे तुला माहीत असते तर तू आपले शेत मला विकले असतेस का? मी अन्याय केला तर मेल्यावर देवाच्या दरबारात काय उत्तर देऊ, म्हणतोस?" राघोजी म्हणाला.

"माझे तरी तेच म्हणणे आहे, देवाच्या दरबारात मला जाब विचारला तर मी तरी काय उत्तर देऊ म्हणता?" गुणाजी म्हणाला.

परस्पर समेट झाला नाही तेव्हां दोघे गावाच्या पाटलाकडे गेले. पाटलाने दोघांचे म्हणणे ऐकून घेतले. त्यावेळी पाटलाचा भाऊ जवळ उभा होता.

पाटील दोघांचे समाधान होईल असा निवाडा देण्याच्या हेतूने म्हणाला–"अरे, एवढ्याशा गोष्टी साठी तुम्ही माझ्यापर्यंत येण्याची गरजच काय होती? एकेक हंडा घेऊन मोकळे व्हा, झाले

दोघे त्या गोष्टीस कबूल झाले नाहीत. हंड्यातले एक नाणे देखील घ्यायला ते तयार होईनात. इतका वेळ गप्प बसलेला पाटलाचा भाऊ लखुजी म्हणाला–"तुम्ही दोघे मी सांगतो तसे करा, म्हणजे सहज हे कोडे सुटेल."

"सांगा, काय करू म्हणता?" दोघे म्हणाले.

"तुम्ही दोघे एकेक हंडा घेऊन जा आणि एक महिनाभर आपल्याजवळ ठेवून घ्या. त्यानंतर काय करायचे ते ठरवू." लखुजीने सुचविले. दोघे त्या गोष्टीस कबूल झाले आणि एकेक हंडा घेऊन आपापल्या घरी निघून गेले.

ते निघून गेल्यावर पाटलाने आपल्या भावाला विचारले–"तू ही तोड काय म्हणून सुचविलीस? एका महिन्या नंतर ते पुन्हां येऊन मला विचारू लागले तर मी काय निवाडा देणार?"

"एका महिन्यानंतर ते आपल्याकडे आले तर ना?" लखुजी स्मित करून म्हणाला.

"कां येणार नाहीत?" पाटलाने शंका केली

"एक आठवडाभर थांबा! तुम्हांला सर्व कळेल." लखुजी म्हणाला.

एक आठवडा लोटला. आठव्या दिवशी रात्री लखुजी आपल्या मोठ्या भावाला घेऊन गुणाजीच्या घरी गेला आणि बाहेर उभे राहून दोघे आत कोण काय बोलतो



आहे हे ऐकू लागले. गुणाजी कोणाला तरी सांगत होता–"मला हल्ली पहिल्यासारखे काम होत नाही. मुले मोठी होऊ लागली आहेत. वास्तविक दोन्ही हंडे मलाच मिळायला हवे होते. ज्या शेतात हंडे सापडले ते शेत माझेच तर आहे. शेत विकण्यापूर्वी हंडे सापडले असते तर मला शेत विकावे लागले नसते. पण आता मी दुसरा हंडा मागितला तर राघोजी देणार नाही आणि लोक पण हसतील. म्हणून माझ्याकडे आहे त्या हंड्यातले सोने विकून शेत विकत घ्यावे म्हणतो. उरलेले आयुष्य तरी सुखाने जाईल."

त्यानंतर लखुजी आपल्या मोठ्या भावाला घेऊन राघोजीच्या घरी गेला. तेथे बाहेर उभे राहून दोघे आत कोण काय बोलते आहे, हे ऐकू लागले. राघोजी कोणाला तरी सांगत होता–"गुणाजीने मला दोन्ही हंडे ठेवून घ्यायला सांगितले तेव्हां मी ते न घेऊन मोठी चूक केली. शेत माझे झाले तर शेतात सापडेल ते सर्व [illegible] पाटलाकडे जाऊन दोन्ही हंडे माझे आहेत असे म्हटले तर लोक मला मूर्खात काढतील. म्हणून एक हंडा मिळाला त्यावर मनाचे समाधान करून घेण्या व्यतिरिक्त दुसरा उपाय नाही."

पाटील लखुजी बरोबर घरी परतला. म्हणाला–"लखुजी! अरे तू म्हणालास तेच बरोबर निघाले! दोघांपैकी कोणी आता आपल्याकडे येतो कशाला? पण तू हे कसे काय ओळखलेस?"

"दादा! दोघे प्रामाणिक व नीतिवान आहेत, हे खरे असले तरी मानव स्वभाव हा मोठमोठ्या नीतिवानांचा निश्चय डळ-विण्यास कारण होतो. समोर एवढे धन पाहून त्याला लाथ मारण्याची तयारी दाखविणे हे मानव स्वभावाविरुद्ध आहे." लखुजी आपल्या मोठ्या भावाला म्हणाला.

त्या दिवशी रात्री राघोजी व गुणाजीच्या घरी त्यांच्या जवळ बोलत असलेले दोघे लखुजीने नेमलेले त्याचे मित्रच होते.





# गावदेवीचे देऊळ

हिमालयाच्या पायथ्याला एक दरी होती. त्या दरीत सहस्रावधी वर्षांपूर्वी एक डोंगराळ प्रदेशात राहणाऱ्या जातीचे लोक रहात असत. त्या जातीचे लोक गाई गुरे व मेंढरे पाळीत आणि शेती करून स्वताचे पोट भरीत. परंतु हळूहळू त्या दरीत गुरांना चारा मिळेनासा झाला आणि शेत नांगरून पीक काढणे अशक्य झाले. त्याचे कारण असे होते की दरवर्षी पावसाळ्यात ओढ्याच्या पाण्याबरोबर लहान मोठे दगड वहात येऊन दरी भरून गेली होती. सुपीक जमीन दगडा धोंड्याखाली झाकून गेली होती. कित्येक पिढ्या ही गोष्ट होत आल्याने अशी एक वेळ आली की त्या दरीतल्या लोकांना ते गाव सोडून दुसऱ्या जागी जाऊन वस्ती करावीशी वाटू लागली.

गावातल्या प्रमुख तरुण मंडळींनी सभा केली आणि आपला निश्चय आपल्या वृद्ध नायकाला कळविण्यासाठी गेले. म्हणाले–"आजोबा! आपण याच वर्षी आणखी कोठे जाऊन वस्ती केली नाही तर उपासमार होऊन आपली जात नष्ट होईल की काय अशी भीती वाटू लागली आहे."

वृद्ध नायक त्या तरुण मंडळींना म्हणाला–"तुम्हांला वाटत असलेली काळजी मला कळते. परंतु मी एक गोष्ट सांगू इच्छितो. अनादिकालापासून आपली ही जन्मभूमी राहिली आहे. आपले सर्व पूर्वज याच भूमीवर जन्मले व मोठ्या नावलौकिकाला पोचले. त्यांनी परिश्रम करून आपल्याला ही पवित्र भूमी वारस हक्क म्हणून दिली ती आपण स्वतःच्या चुकीमुळे घालवून बसू."

"परंतु आजोबा! वाडवडिलांच्या कीर्तीने आपली पोटे भरतील का?" तरुणांनी विचारले.

कु. मीरा चितळे

मुलांनो! तुम्हांला वाटते तशी ही भूमी मृतप्राय झालेली नसून जिवंत आहे. मी तुम्हांला ही गोष्ट पटवून देईन." असे सांगून त्या वृद्ध नायकाने दहावीस तरुण मंडळींना बोलावून एक मोठी शिळा जागची हलवून दूर सरकविली तेव्हां खाली काळी-भोर माती दिसली. वृद्ध म्हणाला–"ही माती नसून सोने आहे. तुम्ही पहाल तिकडे सर्वत्र तुम्हांला हीच सोन्याची माती दिसेल." वृद्ध नायक म्हणाला.

"पण आजोबा! जिकडे पहावे तिकडे दगड आणि गोटेच आहेत. हे येथून काढून उचलून कोठे व कसे न्यायचे? म्हणून आपण दुसरी सोयिस्कर जागा हुडकून काढणेच बरोबर होईल." तरुणमंडळी म्हणाली.

"मी गावदेवीच्या आज्ञेप्रमाणे करावे, म्हणतो."- वृद्ध नायक म्हणाला.

दुसऱ्या दिवशी वृद्ध नायक गावकऱ्यांना एकत्र जमवून म्हणाला–"बंधु व भगिनींनो! मला काल रात्री स्वप्नात गावदेवीचे दर्शन ...व तिने आज्ञा केली आहे की आम्ही सर्वांनी मिळून तिचे एक मोठे देऊळ बांधावे आणि देवळाच्या चारी बाजूला नवी घरे बांधून राहण्याची व्यवस्था करावी."

"गावदेवीच्या आज्ञेप्रमाणे काम करण्यास सर्व गावकरी तयार झाले. सर्वांनी दगड जमवून एक उंच चौथरा तयार केला व त्यावर देवीचे भव्य देऊळ बांधले. देवळाला लागलेल्यां दगडांखाली काळी कुळकुळीत सुपीक जमीन दिसू लागली. त्या नंतर सर्वांनी मिळून सर्वांना राहण्यासाठी घरे बांधली घरे बांधायला दगड व मोठमोठ्या शिळा वापरल्या. अर्धी अधिक जमीन शेती लायक तयार दिसू लागली. त्यानी ती जमीन नांगरून पीक काढले ते दहापट निघाले. जेथे दगडाच्या राशी पडल्या होत्या तेथे शस्य श्यामल भूमी दिसू लागली.

अशातऱ्हेने गुरांना गवत व गावकऱ्यांना अन्न मिळू लागले आणि त्यानंतर गाव सोडून जाण्याची गरज गावकऱ्यांना वाटेनाशी झाली.





# यक्ष पर्वत

कित्येक शतकांपूर्वीची ही गोष्ट आहे. नर्मदा नदीच्या जवळपासच्या जंगलात अनेक रानटीं जातींच्या वस्त्या होत्या प्रत्येक जातीचा एक राजा किंवा नायक असे. तोच त्या जातीचा शासक व पुढारी असे. या जातींची परस्परांशी मित्रता तर दूरच वैरच जास्त असे आणि हे वैर पिढ्यान् पिढ्या चालू असे. लहान मोठ्या कारणा-वरून त्यांची आपसात लहान मोठी भांडणे व युद्धे होत.

अशाच एका जातीचे नाव गेंड्यांची जात असे होते. या जातीचे लोक अरण्यपुर नावाच्या वस्तीत रहात असत. ह्या जातीचे लोक गेंड्यावर स्वारी करीत. म्हणून त्यांना गेंड्यांची जात हे नाव मिळाले.

गेंड्याच्या जातीचा नायक अरण्यमल्ल नावाचा एक तरुण होता. त्याची निवड नुकतीच झाली होती. त्याला हुसकावून लावण्याचा गणाचारी याने प्रयत्न केला होता. परंतु दोघां क्षत्रिय तरुणांच्या मदतीने अरण्यमल्ल याने गणाचारीची सर्व लबाडी बाहेर काढली आणि त्याला वाघाच्या तोंडी देऊन त्याचा शेवट केला.

गणाचारीच्या मृत्यूनंतर अरण्यमल्ल निर्विघ्नपणे राज्य करू लागला. सुरवातीला या जातीचे लोक फक्त शिकार करून आपला उदर निर्वाह चालवीत. परंतु हळू हळू त्यांनी शेती सुरू केली. गहू व ज्वारी ही मुख्य पिके ते काढीत व शेतीचा धंदा त्यांना चांगला अवगत झाला होता.



अरण्यमल्लला गादीवर बसून एक वर्ष होत आले होते, म्हणून त्या जातीच्या लोकांनी त्याच्या राज्यारोहणाचा वार्षिकोत्सव करण्याचे योजले. त्यासाठी निरनिराळ्या प्रकारच्या चढाओढी ठेवण्यात आल्या. तलवारीचे हात, भाला फेंक वगैरेचे प्रयोग करून तरुण मंडळी प्रेक्षकांची करमणूक करीत होती, तर काही तरुणमंडळी गेंड्यांवर चढून त्यांच्या शर्यती लावीत होती. काही तरुणमंडळी मल्ल युद्ध, कुस्ती वगैरेचे प्रयोग दाखवीत होते.

हा उत्सव पाहण्यासाठी स्त्रीपुरुष लहान थोर मंडळी जमली होती. अरण्यमल्ल एका नक्षी बांदकाम केलेल्या उच्च शिलासनावर बसून खेळ पाहण्यांत रंगला होता. प्रजेचा उत्साह वाढता होता. अशा परिस्थितीत दोघे तरुण गेंडा युवक गेंड्यावरून उतरून गर्दीतून वाट काढीत अरण्यमल्ल बसला होता त्याबाजूला घाईघाईने जात असलेले दिसले.

अरण्यमल्लच्या प्रधानाचे नाव शिलामुखी असे होते. त्याने त्या तरुणांना अरण्यमल्लकडे जात असलेले पाहून थांबायला सांगितले आणि दरडावून विचारले– "कोण रे तुम्ही? असे गर्दीने चाललात कोठे? परवानगीशिवाय नायकाकडे जाण्याची हिंमत तुम्हांला झालीच कशी? या उत्सवाच्या वेळी आपल्या राजाजवळ तुमचे असे कोणते निकडीचे काम आले? मी प्रधान येथे असतां, मला न विचारतां तुम्ही महाराजांकडे निघालात? तुम्हांला महाराजांजवळ जे काही सांगावयाचे असेल ते प्रथम माझ्याजवळ सांगा. खबरदार, पुढे पाऊल टाकाल तर?"

शिलामुखीच्या दरडावण्याने दोघे तरुण जागच्या जागी थबकले व थरथर कापू लागले. तेव्हां शिलामुखीने विचारले– "काय, झाले तरी काय? तुमची वाचा कशी काय बंद झाली?"

ते ऐकून दोघे तरुण परस्परांकडे पाहू लागले. तेव्हां दोघांपैकी एकजण म्हणाला– "सरकार! डोंगरी ओढ्याच्या बाजूला मक्याचे पीक तयार आहे आणि काही परदेशी लोक पीक कापून नेत आहेत. त्यांच्या डोक्याला मोठमोठी पागोटी आहेत आणि सर्व अंगाला त्यांनी कपडे गुंडाळले आहेत. सर्वात जास्त आश्चर्याची गोष्ट म्हणजे ते एका विचित्र प्राण्याच्या पाठीवर बसून आले जनावरांच्या पाठीवर ते लोक कणसांची गाठोडी बांधून ठेवीत आहेत. त्या विचित्र जनावरांना पाहून आम्हांला भीतीच वाटली.

"नव्या जातीची जनावरे?" शिलामुखीने विचारले.

"होय मालक! ते प्राणी पुष्कळ उंच आहेत. त्यांची मान बदकासारखी वाकडी पण खूप लांब आहे आणि त्यांच्या पाठीवर मोठे डोंगरासारखे कुबड आहे. ते जनावर अगदी विचित्र आहे सरकार!" एक जण म्हणाला.

त्यांचे ते वर्णन ऐकायला गेंड्यांच्या जातीचे पुष्कळ लोक घोळका करून चारी बाजूला उभे राहले. त्या विचित्र जनावरांचे वर्णन ऐकूनच पुष्कळ लोक घाबरून गेले आणि वेड्यासारखे ओरडत पळू लागले की विचित्र जनावरांवर बसून आलेले लोक आमचे मक्याचे पीक उपटून नेत आहेत.



करमणुकीचा कार्यक्रम एकाएकी बंद पडला. म्हणून राजा अरण्यमल्ल आपल्या शिलासनावर उठून उभा राहला आणि म्हणाला–"ही काय गडबड आहे? नवी शिलामुखी कोठे आहे?"

तेव्हां शिलामुखी त्या दोघांना बरोबर घेऊन आपल्या राजाजवळ घेऊन आला आणि त्यांच्या तोंडी ऐकलेले वर्णन सांगू लागला.

"आम्ही इतकी मेहनत करून छान पीक काढले आणि ते फुकटात लुटेरे लुटून नेत आहेत काय? तुम्ही ते पाहून भित्र्या भागुबाईसारखे इकडे पळून आलात, तुम्हांला लाज नाही वाटली? माझी प्रजा इतकी



भितरी असेल, असे नव्हते वाटले मला. कोणी ऐकले तर हसतील. तुम्ही माझ्या राज्याची प्रतीष्ठा मातीमोल केलीत. मी म्हणे एक राजा आहे व माझा एक प्रधान पण आहे. परंतु आम्ही आहो रानटी आणि जंगली ते जंगलीच. आपल्या प्रदेशाला राज्य मानणे हा केवळ मूर्खपणा आहे म्हणावयाचा!" अरण्यमल्ल रागाच्या भरात तोंडाला येईल ते बरळत होता.

अरण्यमल्ल जे म्हणाला ते ऐकून शिलामुखी प्रजेकडे पहात म्हणाला–"आपला हा करमणुकीचा कार्यक्रम आता बंद करू या. लुटेरे आपल्या राज्यात शिरून पिके कापून नेत आहेत. प्रथम आपल्या पिकाचे रक्षण केले पाहिजे. म्हणून सर्वांनी आपापली हत्यारे घेऊन तयार व्हा. शत्रूला पळवून लावले पाहिजे."

त्यानंतर गेंड्याच्या जातीचे लोक तलवार व भाले घेऊन निघाले. काही लोक गेंड्यांवर बसून निघाले. शिलामुखीसुद्धा एका गेंड्यावर बसून सर्वात पुढे निघाला. त्याच्या पाठीमागून शेकडो गेंडा जातीचे लोक निघाले. ते दृश्य पाहून एक मोठे सैन्यच कोणत्या तरी मोहिमेवर निघाल्यासारखे वाटत होते.

राजा अरण्यमल्ल आपल्या अनुयायांचा उत्साह वाढविण्यासाठी म्हणाला–"त्या लुटेऱ्यांच्या त्या विलक्षण जनावरांना पाहून तुम्ही भिण्याचे किंवा पाय मागे घेण्याचे मुळीच कारण नाही. या जगात आपले वाहन हा जो गेंडा आहे त्याहून भयंकर जनावर दुसरे नाही. आपल्या शेतांचे व त्यातल्या पिकांचेच फक्त रक्षण करावयाचे नसून त्या लुटेऱ्यांपैकी काही जणांना कैद करून घेऊन आले पाहिजे. त्यांच्याकडून त्या लुटेऱ्यांची गुपिते आपल्याला कळतील."

"अरण्यमाता की जय!" "राजा अरण्यमल्ल की जय" असा जयजयकार करीत लोक त्या डोंगरी ओढ्याच्या दिशेने निघाले.

त्या लुटेऱ्यांना व त्यांच्या त्या 'विलक्षण' जनावरांना पाहून गेंडा जातीचे लोक घाबरून गेले. परंतु लुटेरे गेंड्यावर आलेल्या या रानटी लोकांना पाहून त्यांच्याहून जास्तच घाबरून गेले. आजपर्यंत गेंड्याचे फक्त नावच ऐकून ते भीत असत. परंतु गेंड्यांचे अक्राळ विक्राळ रूप जवळून पाहून त्यांची गाळणच उडाली आणि तेथून पळ काढण्याचा ते विचार करू लागले.

लुटेऱ्यांपैकी एकाने आपल्या भाला उंच उचलून आपल्या अनुयायांना उद्देशून म्हटले–"पहा, त्या भयंकर जनावरांना व त्यांच्यावर स्वारी करून येणाऱ्या त्या रानटी लोकांना! गेंड्यासारख्या भयंकर प्राण्याला आपले वाहन करून घेणारे किती भयंकर असतील याची कल्पना सहजी होईल."

ते ऐकून पीक कापणाऱ्यांचे हात जागच्या जागी थांबले व त्यांनी माना वर करून पाहिले. त्यांना प्रथम गेंड्यावर चढून पुढे येणारा शिलामुखी दिसला व त्याच्या पाठोपाठ शेकडो गेंडा जातीचे लोक अगदी पाठीमागून येणारे गेंडा जातीचे लोक घाबरून गेल्यासारखे दूर थबकले आणि तेथूनच लुटेऱ्यांकडे भयभीत दृष्टीने पाहू लागले.

लुटेऱ्यांचा नायक घाईघाईने त्या 'विलक्षण' जनावरांपैकी एकावर बसला आणि गेंडा जातीच्या लोकांकडे पाहू लागला. थोडा वेळ पहात राहिल्यावर हल्ला करायला गेंडा जातीच्या लोकांची हिंमत होत नसल्याचे त्याला भासले. कारण त्यांच्या





पैकी एकाने देखील आपला गेंडा पुढे आणण्याची हिंमत दर्शविली नाही. सर्व तोंड वासून भयभीत नजरेने 'विलक्षण' प्राण्यांकडे व लुटेऱ्यांकडे पहात होते. त्यांच्या अंगात हिंमत असती तर त्यांनी एकदम हल्लाच केला असता. त्यांना साहस होत नसल्याचे त्याने ओळखले व त्याचा फायदा पदरात पाडून घेण्याचे मनाशी ठरविले. तो अनुयायांना उद्देशून म्हणाला—"ए उंटस्वार हो! आपण भिण्याचे मुळीच कारण नाही. हे गेण्डेवाले आपल्याला पाहूनच थरथर कापत आहेत. पहा ना, पाय पुढे टाकण्याची कोणाची छाती तरी होते आहे का? सगळे घाबरून जाऊन जागच्या जागी दगडासारखे उभे आहेत. हीच संधी आहे आपल्याला त्यांच्यावर हल्ला करायला. आपण त्यांच्यावर भाले फेंकून त्यांना पळवून लावू या."

आपल्या नायकाने केलेली सूचना ओळखून चारपांच उंटस्वार आपापले भाले घेऊन गेंडा जातीच्या लोकांवर धावले. त्यांना पाहून शिलामुखीच सर्वात जास्त घाबरला आणि आपल्या अनुयायांकडे वळून म्हणाला—"हे लुटेरे आपल्या उंच वाहनांवर बसून सहजी आपल्यावर भाले फेकू शकतील. त्यांच्या जवळपास जाण्यात धोका आहे. आपण वेळ न घालवतां मागे फिरले पाहिजे आणि झाडीच्या आश्रयाला धावले पाहिजे. झाडांवर चढून या लुटेऱ्यांवर भाला फेंक करणे किंवा बाण सोडणे आपल्याला सोपे जाईल. म्हणून सर्वांनी मागे जाऊन कोणत्यातरी झाडावर चढून बसावे."

शिलामुखीने सूचना थोडी उशिरा केली. त्याचे दोघे अनुयायी आपापल्या वाहनांवर उभे राहून आपल्या अनुयायांना म्हणाले—"जे लोक पायी येत आहेत त्यांनी झाडांवर चढून बसावे. लुटेरे जवळपास आले की त्यांना भाले टोचून ठार करावे."

त्याप्रमाणे गेंडा जातीचे लोक झाडांवर चढू लागले. परंतु शत्रू काय करणार हे [illegible] म्हणाला—"मित्रहो! तुम्ही ज्वारीची कणस कापायचे सोडून सर्व आपापल्या वाहनांवर चढा आणि शत्रूवर हल्ला करा. शत्रू घाबरला आहे. झाडावर चढणारांवर प्रथम हल्ला करा. शत्रूचा एकही मनुष्य निसटून पळून जाता कामा नये! लक्षात ठेवा!"

त्याच वेळी शिलामुखी आपल्या गेंड्याला मागे फिरवणार होता. पाठोपाठ लुटेऱ्यांनी उंटांवर येऊन गेंड्यावर बसलेल्या काही लोकांना घेरले. शिलामुखीवरच लुटेऱ्यांनी मुख्य हल्ला केला होता. तो स्वतःचा बचाव करीत आपल्या अनुयायांना सांगत होता—"अरण्यमाता की जय! तुम्ही आपापल्या गेंड्यांना झाडीकडे पळवून न्या."

शिलामुखीचे सर्व अनुयायी अरण्यमातेचा जयजयकार करीत झाडीकडे पळाले. शिलामुखी एकटाच मागे राहिला. तरी तो बचाव करीत ओरडून सांगत होता—"झाडावर चढून शत्रूला भाले खोचून ठार करा."

शिलामुखी स्वतःचा बचाव करण्यात गुंतलेला असल्यामुळे झाडीत काय होत आहे, हे त्याला कळण्यासारखे नव्हते. झाडावर चढणाऱ्या गेंडा जातीच्या लोकांना लुटेरे भाले खोचून खोचून खाली पाडीत होते. काही लोक झाडावरून खाली आदळून पडले व काही अरण्यपुरच्या दिशेने पळू लागले.

शिलामुखी स्वतःचा बचाव करून कसा बसा झाडीत शिरला. परंतु तेथे त्याला



आणखी काही लुटेऱ्यांनी घेरले. प्रसंग मोठा आणीबाणीचा होता. म्हणून तो आपल्या अनुयायांना सावध करीत म्हणाला–"मित्र हो! आता या लुटेऱ्यांशी दोन हात करणे आपणांस शक्य नाही. म्हणून अरण्यपूरच्या वाटेने पाय काढा."

त्याच वेळी जवळच्या एका झाडावरून त्याला कोणीतरी बोलल्याचा आवाज ऐकू आला–"महामंत्री शिलामुखी! पळून जाण्याचे कारणच काय? तुम्ही आपल्या गेंड्यांना उंटावरून येणाऱ्या या लुटेऱ्यांवर सोडा. तुमच्या गेंड्यांच्या शिंगासमोर या उंटाचे कुबड कितीवेळ टिकाव धरील?"

शिलामुखीने तो आवाज ओळखला. तो आवाज क्षत्रिय तरुणांबरोबर हिंडणाऱ्या स्वर्णाचारीचा होता. परंतु शिलामुखीच्या अंगात तेवढे साहस एकवटून पुन्हा मागे फिरायला व लुटेऱ्यावर हल्ला करायला धैर्य कोठे होते? म्हणून तो अरण्यपूरच्या दिशेने आपल्या अनुयायांसह पळाला. स्वर्णाचारीने जी सूचना केली होती ती [illegible] नायकाला पण ऐकू आली. त्याला फार राग आला. स्वर्णाचारी ज्या झाडावर चढून बोलला होता त्या झाडाखाली जाऊन नायकाने त्याला विचारले–"कोण रे तू, आमच्या शत्रूला युक्ती सुचविणारा तू मला ओळखले नाहीस वाटते?"

"माझे नाव स्वर्णाचारी आहे. मी पद्मपूरचा वास्तुशास्त्री आहे. जन्मापासून भित्र्या जातीच्या उंटांना पाहून पळून जाणाऱ्या शक्तिशाली गेंड्यांना पळून जाताना मी पाहिले तेव्हां मला राहवले नाही. म्हणून मी शिलामुखीला तसा सल्ला दिला. मला काय दोन्ही जातीचे लोक माझे मित्रच आहेत." स्वर्णाचारी झाडावरूनच म्हणाला.

"तू झाडावरून लवकर उतरून खाली येणार की मी तुझ्यावर भाला फेकून तुला खाली आणू?" असे म्हणत लुटेऱ्यांच्या नायकाने उंटावर उभा राहून भाला वर उचलला. (क्रमशः)



# पालट

विक्रमादित्याने आपला हट्ट सोडला नाही.

तो पुन्हां झाडाजवळ गेला, प्रेत खांद्यावर काढून घेतले आणि मौनपणे स्मशानाच्या दिशेने चालू लागला. तेव्हां प्रेतात बसलेला वेताळ त्याला म्हणाला–"राजा! तुझी निष्ठा पाहून मनात एक शंका येते की तुझी ही निष्ठा एकाएकी कापरासारखी नाहीशी तर होणार नाही? देवावर पूर्ण विश्वास ठेवणारा धर्मदास देखील एका क्षुल्लक गोष्टीवरून एकाएकी नास्तिक झाला. तुला मी त्यांची गोष्ट सांगतो, लक्ष देऊन ऐक." असे सांगून वेताळ गोष्ट सांगू लागला.

कलिंग देशात धर्मदास नावाचा एक धर्मभीरू वैद्य होता. त्याच्या हाताला असा काही गुण होता की लोक त्याला "कलि-युगातला धन्वंतरी" म्हणू लागले. तो शंकराचा फार मोठा भक्त होता. रात्रं-

दिवस तो देवळातच रहात असे. कोणी काही कामासाठी त्याला भेटायला येई तेव्हां तो शंकराच्या देवळातच भेटे.

धर्मदासाचे लग्न झाले होते. त्याला बायको व मुले होती. परंतु घराशी त्याचा संबंध अगदीच थोडा. घराचा ओढा म्हणतात तो त्याच्या मनाला कधीच शिवला नाही. शंकराच्या देवळातच तो नेहमी बसे उठे किंवा झोपे.

एका श्रीमंत मनुष्याच्या मुलाचा प्राणघातक रोग त्याने बरा केला. तेव्हां त्या श्रीमंत माणसाने धर्मदासाशीच आपल्या मुलीचे लग्न करून दिले आणि एक उत्तम घर बांधून दिले. त्याच घरात धर्मदासाच्या घरची मंडळी रहात असत.

[illegible] नेहमी शिवसेवेत रममाण झालेला असे. श्रीमंत लोक त्याला पुष्कळ पैसे देत. परंतु तो सर्व पैसे गोरगरिबांना वाटून टाकी. घरी अगदी आवश्यक तेवढेच पैसे पोचते करी. बायको येऊन घर खर्चासाठी पैसे मागून नेई.

धर्मदासाची बायको यशोधरा श्रीमंताच्या घरी वाढलेली होती. म्हणून स्वाभिमानी होती. म्हणून ती आपल्या श्रीमंत बापाकडे जाऊन मदत मागीत नसे. नवरा जे देई त्यातच ती संसार चालवी. तरी शेवटी ती कंटाळली आणि यशवंत नावाच्या एका माणसाला आपले घर विकून माहेरी निघून गेली. आश्चर्याची गोष्ट म्हणजे त्या [illegible] देखील परिणाम झाला नाही.

यशोधराचे घर ज्या श्रीमंत माणसाने विकत घेतले होते तो एक नास्तिक होता. देवाचे नाव कोणी घेतले तर ते त्याला खपत नसे. तो देवळासमोर गेला तरी देवळात चुकून देखील पाऊल टाकीत नसे. देवाला बाहेरून देखील नमस्कार करीत नसे. देवकृपेशिवाय स्वतःच्या अकलेने पैसे मिळविल्याची त्याला फार घमेंड होती. धर्मदास वैद्यकशास्त्रात जितका निष्णात होता, तितकाच यशवंत व्यापार धंद्यात हुशार होता.

यशवंतला दोन बायका होत्या. परंतु दोघी काही अपत्य झाल्याशिवायच वारल्या. तेव्हां त्याने तिसरे लग्न केले. तिसरी बायको बाळंत झाल्यावर यशवंत इतका खूष होता की तो आपल्या मुलासाठी वाटेल तो खर्च करायला तयार होता. बायको म्हणे, "ईश्वर कृपेनेच आपल्याला हा मुलगा झाला आहे." तेव्हां यशवंत म्हणे–"तू काय वाटेल ते म्हण, माझा देवावर विश्वास नाही."

यशवंतची बायको जेव्हां बाळंत झाली तेव्हां मुलगा अर्ध मृतावस्थेत होता. हृदयाचे ठोके ऐकू येत. पण शरिराची बाकी हालचाल पूर्णपणे बंद पडली होती. "या मुलाला धर्मदासाशिवाय सोडून कोणी वांचवू शकणार नाही." यशवंतला सर्व नातेवाईक सांगू लागले.







परंतु यशवंत धर्मदासाला एक ढोंगी व पाखंडी मानीत असे. "घर संभाळता येत नाही. म्हणून स्वारी ईशचिंतनाचे सोंग करीत आहे" असे यशवंत म्हणे. परंतु मित्रमंडळींच्या व नातेवाइकांच्या आग्रहास्तव एकुलत्या एका मुलाला वांचवितां आले तर त्याचे श्रेय कोणाला का मिळेना, असा विचार करून त्याने धर्मदासाला आपल्या घरी बोलाविले.

परंतु धर्मदास म्हणाला–"मी त्या नास्तिकाच्या घरी जाणार नाही. ज्याचा देवावर विश्वास नाही, त्याचा मुलगा माझ्या औषधाने बरा होणे शक्य नाही." मुलाचा जीव वांचविणे आवश्यक होते म्हणून लोकाग्रहास्तव यशवंत आपल्या मुलाला घेऊन शंकराच्या देवळात गेला आणि धर्मदासासमोर मुलाला ठेवून म्हणाला–"या मुलाला पुनर्जन्म देणे फक्त तुमच्याच हातात आहे." त्याने शंकराच्या पिंडीसमोर साष्टांग नमस्कार घातला आणि आपल्या सर्व अपराधांबद्दल देवाची व धर्मदासाची क्षमा मागितली. हे सर्व त्याने मनापासून विश्वासपूर्वक केले नव्हते. परंतु धर्मदासाचे मन वळविण्यासाठी त्याला ते सर्व करावे लागले.

धर्मदासाने आपल्या औषधांच्या पिशवीतून कोणती तरी मुळी काढून ती सहाणेवर उगाळली आणि तिचा रस मुलाच्या तोंडाला लावला. मुलगा लगेच हातपाय हालवून रडू लागला. ती गोष्ट प्रत्यक्ष डोळयांनी पाहून गावकऱ्यांच्या मनात धर्मदासाच्या औषधावरचा विश्वास जास्तच वाढला.

त्याच वेळी धर्मदासाची बायको यशोधरा आपल्या सर्वात धाकटया मुलाला कडेवर घेऊन आली व नवऱ्याच्या पायावर मुलाला टाकून म्हणाली–"आपल्या या मुलाला वांचवा हो!" धर्मदासाने मुलाची नाडी पाहिली व कसली तरी गोळी मुलाच्या तोंडात टाकली. मुलाने आईकडे एकदा डोळे उघडून पाहिले आणि जे डोळे मिटले ते कायमचेच मिटले. धर्मदासाने शंकराच्या पिंडीवर [illegible] ठेवून मुला[illegible]साठी देवाचा धावा केला, परंतु फायदा झाला नाही.

तेव्हां धर्मदास इतका हताश झाला की त्याने आपली औषधाची पिशवी शंकराच्या पिंडीवर आपटली आणि देवळाबाहेर निघून गेला. त्यानंतर तो देवळात एकदा आला, परंतु त्याने देवाच्या पिंडीवर दगड फेंकून नासधूस केली. याला मतिभ्रम झाला असावा असे समजून लोकांनी धर्मदासाच्या त्या दुष्कृत्याकडे दुर्लक्ष केले.

येथवर गोष्ट सांगून वेताळ म्हणाला–"राजा! धर्मदासासारख्या शिवभक्ताचा देवावरचा विश्वास एकाएकी कसा काय उडाला? आणि यशवंतासारखा नास्तिक आस्तिक कसा काय झाला? मनुष्याचा देवावर जो विश्वास असतो तो स्वार्थामुळेच उत्पन्न होतो असे नाही का वाटत तुला? या प्रश्नांची उत्तरे माहीत असून तू दिली नाहीस तर तुला परिणाम माहीतच आहे, तुझ्या डोक्याची शंभर शकले होऊन तुझ्याच पायांवर लोळू लागतील.

तेव्हां विक्रमादित्य म्हणाला–"मनुष्याच्या विश्वासाच्या मुळाशी देखील स्वार्थच असतो. यशवंताच्या मनात आस्तिकता मुलगा वांचल्यामुळेच उत्पन्न झाली. धर्मदासाचा विश्वास देखील असाच स्वार्थवश होता. त्याचा औषधावर विश्वास तरी कोठे होता? तो मंत्रवत् औषध पाणी करीत असे आणि रोग बरे होत. ते सर्व ईश्वर कृपेनेच होत आहे, असे त्याला वाटे. म्हणून देवावर त्याचा विश्वास होता. जेव्हां त्याचा देवावरचा विश्वास उडाला त्यात नवल काहीच नाही. त्याने दिलेले औषध चुकीचे होते असे त्याला वाटले नाही. देवानेच मुलाला वांचविले नाही असे त्याला वाटले. म्हणून त्याचा देवावरचा विश्वास उडाला. अंध विश्वासाचाच हा सर्व परिणाम झाला. तो वेडा झाला त्याचे मूळ कारण अंधविश्वासच होते."

अशातऱ्हेने राजाचे मौनभंग होताच वेताळ प्रेतासह अदृश्य झाला आणि झाडाला जाऊन लोंबकळू लागला.



# स्वर्ग प्राप्ती

एकदा त्रिलोकात संचार करणारा नारद भूलोकातल्या स्मशानातून फिरत जात असता त्याला एका माणसाची कवटी दिसली. त्याला त्याचे वडील ब्रह्मदेवयांच्या हस्ताक्षराची चांगली ओळख होती. त्या कवटीच्या कपाळावर 'स्वर्गप्राप्ती' असे स्पष्ट लिहिलेले नारदाने वाचले. तेव्हां नारदाला फारच आश्चर्य वाटले.

नारदाने आपल्या दिव्यदृष्टीने पाहून ती कवटी एका दरिद्र माणसाची असल्याचे ओळखले. नारदाने विचार केला या गरीब माणसाची जन्मभर उपासमार झाली असेल, मग याने दानधर्म कोठून केला असणार? आणि देवधर्मतरी याच्या हातून काय घडला असणार? मग याला स्वर्गप्राप्ती कशी काय होणार बुवा? ब्रह्मदेवाने ही एक फार मोठी चूक केली असावी.

ते कळावे म्हणून नारदाने ती कवटी घेऊन ब्रह्मदेवाला भेटून विचारले–"बाबा! या दरिद्र माणसाने एक देखील पुण्य केले नाही. मग तुम्ही याच्या कपाळावर "स्वर्गप्राप्ती" कसे काय लिहून ठेवले आहे? हे खोटे नाहीं का?"

"बाळा! हे खोटे कसे काय होईल? तू स्वतःच ही कवटी उचलून स्वर्गात घेऊन आला आहेस की?"





# थोर शिल्पकार

हजारो वर्षे होऊन गेली एका गावी एक फार मोठा शिल्पकार रहात असे. त्याने अनेक सुंदर देवळे, सभामंडप व राजवाडे बांधले होते. म्हणून त्याची ख्याती दूरदूरच्या देशांपर्यंत पोचली होती.

नागलोकातील राजाच्या राजवाड्यात भूकंप झाल्यामुळे भिंतींना चिरा पडल्या होत्या. तो राजवाडा पुन्हां पहिल्यासारखा बांधण्याच्या हेतूने नागराजाने भूलोकातून या शिल्पकाराला बोलाविले होते.

नागराजाचा निरोप ऐकून शिल्पकाराला वाटले की नागराजाने नवीन राजवाडा किंवा देऊळ बांधण्यासाठी आपणांस भूलोकातून नागलोकात बोलाविले असेल.

नागराजाने शिल्पकाराचे प्रेमाने स्वागत केले. दोघांची परस्परांशी चांगली मैत्री जमली. शिल्पकाराला मोठे ऐश्वर्य लाभले होते, परंतु त्याला नेहमी आपल्या गरीब कुटुंबाचीसारखी आठवण येत असे. एकदा शिल्पकाराने नागराजाला विचारले–"मला माझ्या गावाची व कुटुंबाची फार आठवण होते. आपण त्यांच्या खुशालीविषयी चवकशी करवू शकाल का?"

नागराज म्हणाला–"चवकशी कशाला मला सर्व माहिती आहे. तुझ्या गावात भयंकर दुष्काळ पडला आहे."

"मग तुम्हांला आमच्या गावी पाऊस पाडवता येणार नाही का?" शिल्पकाराने विचारले.

"तसे करणे शक्य नाही. कारण ते निसर्गनियमाविरुद्ध आहे. कोठे केव्हां दुष्काळ पडणार हे निसर्ग नियमाप्रमाणे ठरलेले असते. हा दुष्काळ नव्याण्णव दिवस आणखी चालेल." नागराज म्हणाला.

नागराज म्हणाला ते ऐकून शिल्पकाराचे सर्वांग हादरले. त्याने कल्पना केली की

श्री कृ. प्र. गाडगीळ



त्याच्या नातेवाईकांना प्यायला पाणी सुद्धा मिळत नसावे, पाला पाचोळा खाऊन कसे तरी दिवस काढीत असावेत. कित्येक उपाशी मरत असावेत. शेवटी तो जास्त कल्पना करण्याचे सोडून नागराजासमोर हात जोडून म्हणाला–"नागराजा! मी तुमच्या पायां पडतो, तुम्ही काय वाटेल ते करून माझ्या गावी पावसाला पाठवून द्या. नाही तर सर्वांचे मरण निश्चत आहे."

"अरे खुळ्या! तू सर्व जगाची काळजी कशाला करीत बसला आहेस? तू माझा हा राजवाडा पुरा कर. मी तुला खूप बक्षिस देईन, असंख्य हिरे, माणिक्ये, सोने ...वादी देऊन. तू आयुष्यभर राजासारखा राहा." नागराज म्हणाला.

"तुमच्या गावचे लोक व नातेवाईक मंडळी पाण्यावांचून पटापट मरू लागली तर तुमची काय स्थिती होईल याचा जरा विचार करा." शिल्पकार म्हणाला.

"मला उगाच जास्त सतावू नकोस. आतां पाऊस होणे शक्य नाही." असे सांगून नागराज तेथून निघून गेला.

शिल्पकार आपल्या गावी निघून जाण्यासाठी तयारी करू लागला.

ते कळल्यावर नागराज शिल्पकाराजवळ येऊन म्हणाला–"तू विनाकारण असा रागावलास तर कसे रे चालेल?"

"नागराज! मला आपल्या गावी जाऊन आपल्या गावकऱ्यांची चवकशी केली पाहिजे." शिल्पकार म्हणाला.

"कोण आहे रे तिकडे? या मूर्खाला कैद करा." नागराजाने आपल्या शिपायांना बोलाविले. दुसऱ्या क्षणाला कित्येक शिपायांनी येऊन शिल्पकाराला धरले.

"आता बोल तू माझ्या वाड्याची दुरुस्ती करणार आहेस की नाही?" नागराजाने दटावून विचारले.

"तुम्ही माझ्या गावाला पाऊस पाडणार की नाही शिल्पकाराने त्याच स्वरात दटावून विचारले.



"मी पाऊस पाडणार नाही, हे मी तुला पहिल्यानेच सांगितले आहे." नागाराज म्हणाला.

"तरमग मी सुद्धा तुमचे काम पुरे करण्यास बांधलेला नाही." शिल्पकाराने तितक्याच करड्या स्वरात उत्तर दिले.

"याला घेऊन जाऊन याचे डोके..." नागराजाच्या तोंडातून तेवढे शब्द बाहेर येता येताच राहून गेले. कारण शिल्पकाराचे डोके उडविले गेले तर आपला वाडा दुरुस्त होणे मध्येच थांबून जाईल. म्हणून एक लांब सुस्कारा सोडून तो म्हणाला–"शिल्पकाराला सोडून द्या."

परंतु त्यामुळे शिल्पकाराच्या स्थितीत काही सुधार झाला नाही. कारण नागलोकाबाहेर जाणे शक्य नव्हते. त्याच्या कुटुंबातली माणसे जिवंत आहेत की मेली हे कळायलादेखील मार्ग नव्हता. तो याच विचारात बसला असता त्याची नजर एका खांबावर खिळली. त्याच्या मनात एक विचार आला. त्याने करवत घेऊन खांब कापायला सुरवात केली. तो खांब कापून पुरा होण्यापूर्वीच सर्व वाडा डुलडुलू लागला. नागराज धावत तेथे आला व ओरडून म्हणाला–"शिल्पी! खांब कापायचा बंद कर. तुझे माझ्यावर उपकार होतील!"





"तरमग तुम्ही माझ्या गावाला पाऊस पाडणार का?" शिल्पकाराने विचारले.

"हो, पाडीन," नागराज म्हणाला.

"रागाने तू मोठा पाऊस पाडून गाव वाहून जाईल असे करता कामा नये. जितक्या पावसाची गरज आहे तितकाच पाऊस पाड!" शिल्पकाराने बजावून सांगितले.

"तू सांगशील तसेच करीन." नागराज म्हणाला. त्यानंतर नागराजाने शिल्पकाराच्या अंगावर आपली शाल घातली व म्हणाला–"तू स्वत: जाऊन तुझ्या मनासारखा पाऊस पडला आहे की नाही ते पाहून ये."

शिल्पकार भूलोकात आला स्वत:च्या डोळ्यांनी पाऊस पडत असल्याचे त्याला

दिसले. परंतु गावकऱ्यांना फक्त एक मोठा साप तेवढा दिसला.

"बापरे बाप! हा साप कोठून आला?" गावकरी ओरडू लागले.

"हाच साप आपल्या गावाला पाऊस घेऊन आला आहे. त्याच्यासाठी आपण एक देऊळ बांधू या." गावकरी म्हणाले. लवकरच तेथे एक देऊळ बांधून तयार झाले आणि दुष्काळ देखील नाहीसा झाला.

शिल्पकार नागलोकात परत येऊन म्हणाला—"नागराजा! तू मला नागरूपात आपल्या गावी पाठविले होतेस. मी आपल्या सर्व कुटुंबियास व गावकऱ्यांस पाहून आलो, परंतु त्यांच्याशी कोणाशी चार शब्द बोलू शकलो नाही."

"तू आहेस फार मोठा हट्टी व हेकेखोर! म्हणून मला जास्त काळजी बाळगावी लागली. मी आपले वचन "पाळले, आता तू आपले काम कर." नागराज म्हणाला.

शिल्पकाराने वचन दिल्याप्रमाणे नागराजाचा वाडा सुंदर बांधला. त्या वाड्याचा [illegible] होते इंद्राला नागराजाचा वाडा पाहून हेवा वाटू लागला. नागराजाने शिल्पकाराला अनेक सुंदर सुंदर वस्तू हिरे, माणिक्ये व सोनेचांदी उपहार म्हणून देऊन प्रेमादराने निरोप दिला.

शिल्पकार आपल्या गावी परत आल्यावर गावकरी म्हणाले—"तू इतके दिवस कोठे होतास रे? या गावावर एक मोठे संकट ओढवले होते. एक दुष्काळ पडला होता. एका नागसापाच्या कृपेने पाऊस पडला आणि दुष्काळातून गाव वांचले. पुढे काही दिवसांनी तो नागसाप निघून गेला.

"मीच तो साप होतो," शिल्पी म्हणाला! गावकऱ्यांपैकी कित्येकांना ते खरे वाटले नाही, तेव्हां त्याने नागरूपात त्याने काय काय केले व पाहले ते सांगितले. तेव्हां गांवकऱ्यांना ते सर्व खरे वाटले आणि त्याने केलेल्या उपकाराबद्दल सर्वांनी त्याचे आभार मानले. त्या दिवसापासून त्या गावाचे नाव नागपुर" असे पडले.







गौड देशाचा राजा देववर्मा हा थोडा अर्धवट होता. म्हणून लोक त्याला वेडपट राजा म्हणत. परंतु देववर्माचा मंत्री फार हुशार होता. राजा एकादे चुकीचे काम करी तेव्हां मंत्री जास्त बोभाटा केल्याशिवाय ते सावरून घेई.

एकदां राजाला भेटायला एक कपटी साधू आला. तो राजाला आशीर्वाद देऊन म्हणाला—"महाराज, तुझ्या मनातली कोणती तरी इच्छा अपूर्ण राहल्यामुळे तुझ्या मनाला चैन पडत नाहीसे दिसते आहे. ती अतृप्त इच्छा कोणती सांग. शक्य झाले तर मी आपल्या तपोबलाने तुझी ती इच्छा पूर्ण करण्याचा प्रयत्न करीन."

देववर्मा ते ऐकून चकित झाला. म्हणाला—"साधूबुवा! तुम्ही माझ्या मनातली गोष्ट अगदी बरोबर ओळखलीत. माझ्या मनाला ही गोष्ट सारखी पोखरत असल्यासारखी आहे की माझा जन्म चक्रवर्ती राजा म्हणून कां झाला नाही?"

कपटी साधूने थोडा वेळ विचार केल्याचा अभिनय केला आणि म्हणाला—"हा विचार तुझ्या मनात उगाच आला नाही. त्याचे तसेच कारण असले पाहिजे. तू आपली कुंडली दाखव. मी जरा पाहून सांगतो."

राजाने आपल्या दरबारी ज्योतिष्याला बोलावून आपली जन्मकुंडली त्या साधूला दाखवायला सांगितले.

साधूने जन्मकुंडली पहिल्याचे सोंग केले व म्हणाला—"महाराज! काय सांगू, वीस वर्षांपूर्वी तुझ्या राशीत चक्रवर्ती होण्याचा योग होता. त्या वेळी तू जर ग्रहशांती केली असतीस तर तुझी मनोकामना पूर्ण झाली असती. अजून काही बिघडले नाही. आज तरी तू ग्रहशांती केलीस तरी तू नक्कीच चक्रवर्ती होशील."

कु. मोना राणे

त्या वेडपट राजाला साधू म्हणाला ते खरे वाटले. त्याने त्या साधूला खूप दक्षिणा देऊन निरोप दिला. त्या दिवसापासून त्याच्या मनात चक्रवर्ती राजा होण्याची इच्छा बळावत गेली. वीस वर्षे थांबायला त्याच्या मनाची तयारी नव्हती. त्याच्या मनात एकाएकी एक विचार आला. त्याने आपल्या दरबारी ज्योतिष्याला बोलावून विचारले–"उद्यांपासून पंचांग वीस वर्षा-नंतरचे चालू करा. तिथि, वार, नक्षत्रे सर्व वीस वर्षांनंतरची असली पाहिजेत. नवे पंचांग तयार करा!"

सर्व दरबारी चकित झाले. ज्योतिष्याने चकित होऊन मंत्र्याला ती गोष्ट सांगितली. मंत्र्याने राजाकडे जाऊन निवेदन केले की महाराज! आपण नवीन पंचांग वीस वर्षा-नंतरचे तयार करायला सांगितले आहे. परंतु त्यापासून अडचणीं उत्पन्न होणार आहेत."

"कोणत्या अडचणी?" राजाने विचारले.

"आतां आपले वय चाळीस वर्षांचे आहे. पंचाग वीस वर्षांनंतरचे तयार झाले तर … साठावे वर्ष लागेल. युवराज … वर्षांचा होऊन जाईल. तेव्हा त्याला गादीवर बसवून आपल्याला वानप्रस्था-श्रमात प्रवेश करावा लागेल." मंत्र्याने समजावून सांगितले.

राजा म्हणाला–"असे का? मग नको बाबा पंचांग बदलू. पण एक काम करू या. पंचांग वीस साल मागे करू या. ग्रह शांती करून मी चक्रवर्ती राजा होईन."

"तसे झाले तर दुसऱ्या प्रकारच्या अडचणी उत्पन्न होतील. वीस वर्षांपूर्वी आपल्याला गादीवर बसवायला योग नव्हता. आपले वडील गादीवर होते, म्हणजे गादी सोडावी लागेल." मंत्री म्हणाला.

"नाही, नाही. मग पंचांगात फेरबदल मुळीच करतां कामा नये." नंतर त्याने ज्योतिष्याला बोलावून त्याने कडक आज्ञा केली–"तुमच्यापैकी कोणी पंचांग वीस वर्षे मागे केले तर तुमची डोकी उडवून तुम्हांला खंदकात फेकून देण्यात येईल."







# नवऱ्याच्या शोधार्थ

फार प्राचीन काळची ही गोष्ट आहे. उज्जयिनी नगरीत सागरदत्त नावाचा एक श्रीमंत व्यापारी रहात असे. तो एकदा व्यापारासाठी गलबतात बसून परदेशी जात असता त्याची एका दुसऱ्या व्यापाऱ्याशी भेट झाली. दोघांची परस्परांशी इतकी मैत्री जमली की दोघांनी परस्परांना होणाऱ्या मुलामुलींचे लग्न करून द्यायचे ठरविले. दुसरा व्यापारी बुधवर्मा हा राजगृहचा राहणारा होता.

सागरदत्त परदेशात व्यापार करून स्वदेशी परत आला तेव्हां त्याची बायको कडेवर एका सुंदर मुलीला घेऊन आली. व्यापाऱ्याने विचारले–"कोण मुलगी ही?"

बायको म्हणाली–"आणखी कोणाची असणार? मुलीचे डोळे पहा, अगदी तिच्या बाबांसारखे आहेत."

सागरदत्तने मुलीचे नाव मल्लिका ठेवले. त्याने बुद्धवर्माबरोबर त्याचे जे बोलणे झाले होते ते बायकोला सांगितले आणि कन्यारत्न झाले असल्याचे वर्तमान राज-गृहला पाठविले.

बुद्धवर्मा व्यापारासाठी परदेशी निघाला तेव्हां त्याची बायको गरोदर होती. बुद्ध-वर्माच्या बायकोने मुलाला आणून नवऱ्याला दाखविले. तो मुलगा अशक्त होता. त्याचा एक डोळा गेलेला होता व पाठीवर कुबड होते. मुलाला पाहून बुद्धवर्मा निराश झाला व बायकोला म्हणाला–"हा उंट तुझ्या पोटी कसा काय जन्मला?" त्याने मुलाला दृष्टीसमोरून घेऊन जायला बायकोला सांगितले. मुलाचे नाव 'ओष्ट्र' पडले.

त्याच वेळी सागरदत्तला एक सुंदर कन्यारत्न झाल्याचे बुद्धवर्माला कळले. ती बातमी घेऊन जो मनुष्य आला होता

श्री ना. रा. कलघटगी



त्याचे यथोचित स्वागत करून बुद्धवर्मा बायकोला म्हणाला–"पाहिलेस, मी काय विचार केला होता आणि आता काय झाले ते? आता सागरदत्ताकडे काय निरोप पाठवावयाचा?

"आतां तुम्ही माझा सल्लाच विचारता आहां म्हणून सांगते. तुमच्यासारख्या व्यापाऱ्याने हरिश्चंद्राचा अवतार होण्याचे कारण नाही. सत्य व असत्य याची सोयीप्रमाणे अदलाबदल करावयास तयार असले पाहिजे. तेव्हां मुलगा झाला असल्याचे सांगा. त्यात खोटे काहीच नाही. मुलगा म्हणजे पुत्ररत्न आहे असे पण सांगून पाठवा. सागरदत्ता सारख्या श्रीमंत [illegible] होणारा हा संबंध आहे. घरी येणाऱ्या लक्ष्मीला माघारी पाठविणे शहाणपणाचे लक्षण नाही." बुद्धवर्माची बायको म्हणाली.

बुद्धवर्माने त्याला त्याच्या बायकोने जे सांगितले होते ते आणखी तिखटमीठ लावून सागरदत्ताचा निरोप घेऊन येणाराला सांगितले.

त्यानंतर लागोपाठ आठ वर्षे उज्जयिनी व राजगृह दोन्ही नगरच्या दोघां व्यापाऱ्यांचे नोकर परस्पराकडे येत जात राहले. परंतु एकदा सागरदत्ताच्या नोकराने येऊन बुद्धवर्माला आपल्या मालकाचा निरोप सांगितला. म्हणाला–"मालक! या खेपेस आमच्या धन्याने मुलाला पाहिल्या शिवाय राजगृह सोडू नये असे सांगितले आहे."

बुद्धवर्मा निःसंकोच खोटे बोलला म्हणाला–"ओहो, ते खरे आहे हो. पण मुलगा आपल्या आजोळी ताम्रलिप्ती येथे आहे, विद्याभ्यास करतो आहे."

अशा तऱ्हेने आणखी चार वर्षे टाळाटाळ होत गेली. एक दिवशी सागरदत्ताने आपल्या चार अत्यंत हुशार कारकुनांना पाठविले. ते म्हणाले–"धनी! आपले मित्र सागरदत्त व त्यांच्या पत्नी दोघांनी आपणांस नमस्कार सांगून निवेदन करण्यास सांगितले आहे की बारातेरा वर्षे होऊन गेली. परंतु



आम्हाला आमच्या होणाऱ्या जावई बापूंचे दर्शन एकदा देखील घडले नाही. व्यापारी लोकांत एक म्हण आहे व ती आपणास माहीतच आहे–"माल पाहूनच भाव करता येतो? आपले चिरंजीव ताम्रलिप्तीला विद्याभ्यासासाठी इतका दीर्घकाळ राहले आहेत या गोष्टीवर विश्वास होत नाही. तेव्हां ताम्रलिप्तीला जाऊन त्यांना भेटून यायला आमच्या धन्याची आज्ञा झाली आहे."

बुद्धवर्मा या खेपेस जास्त सावधगिरी बाळगून म्हणाला–"अहो, इतके सगळे बोलण्याची गरजच काय? मुलगा परत आला आहे. या वेळी आपण मुलाला खुशाल भेटून जावे. आपली व त्याची गाठ घालून देण्याची मी व्यवस्था करून देतो. तुम्ही जाऊन थोडा वेळ विश्रांती घ्या." असे सांगून बुद्धवर्मा आपल्या बायकोचा सल्ला घ्यायला गेला. म्हणाला–"आपल्या होणाऱ्या व्याह्याचे दूत यमदूतासारखे येऊन बसले आहेत. मुलाला पाहल्याशिवाय राजगृह सोडणार नाही, असे म्हणत आहेत. मी, मुलाला पाहून जा, असे सांगून आलो आहे. तूच सुचव काही तरी उपाय."

"मी केव्हांच या गोष्टीचा विचार करून ठेवला आहे. आपले मुनीम आहेत ना.



त्यांचा मुलगा उसना आपल्याला मिळाला तर काम भागेल." बायको म्हणाली.

बुद्धवर्माला तो सल्ला पसंत पडला. तो आपल्या ब्राह्मण मुनिमाकडे गेला आणि आलेल्या संकटाला तोंड द्यायला विनंती केली आणि ती मदत त्याने दिली तर प्राप्तीचा अर्धा वांटा द्यायचे कबूल केले. म्हणाला–"तुमचा मुलगा यज्ञदत्त देखणा आहे सर्व शास्त्रांचा जाणकार आहे. माझ्या मुलाच्या ऐवजी सागरदत्तच्या मुलीशी तुमच्या मुलाचे लग्न करून देतो. परंतु लग्न सोहळा आटोपल्यावर मुलीला आमच्या घरी सोडून यज्ञदत्ताने निघून गेले पाहिजे, तिच्या अंगाला स्पर्शदेखील करता कामा








नये. सागरदत्ताकडून जे काही मिळेल त्यातला अर्धा वाटा तुमचा."

मुनीमाने होकार दिला व आपल्या मुलाला सर्व प्रसंग नीट समजावून सांगून त्याप्रमाणे वागायला सांगितले.

मुलगा म्हणाला—"पितृआज्ञा शिरोधार्य आहे." त्याने होकार दिला.

दुसऱ्या दिवशी बुद्धवर्माने सागरदत्तच्या दूतांची भेट यज्ञदत्ताशी करून दिली. मुलाला पाहून दूतांना आपल्या धन्याची मुलगी नशीबी असल्यासारखे वाटले सुमुहूर्तावर लग्न सोहळा उरकून घ्यावा, अशी धन्याची इच्छा असल्याचे त्यांनी बुद्धवर्माला सांगितले आणि आनंदाने उज्जयिनीला परतले.

[illegible] मुहूर्त ठरला [illegible] वऱ्हाड उज्जयिनीला आले. उज्जयिनीला नवऱ्या मुलाचे थाटाने स्वागत झाले.

ठरल्या मुहूर्तावर लग्नसमारंभ पार पडला. सप्तपदी संपताच एकाएकी नवरा मुलगा घेरी आल्यासारखा पडला. वधू पक्षाकडील लोक घाबरून गेले. काही अशुभ घडते की काय अशी शंका त्यांना वाटू लागली. वैद्यांनी बराच वेळ औषधोपचार केल्यावर नवऱ्या मुलाला शुद्ध आली व तो म्हणाला—"एकाएकी पोटशूल वाढल्याने घेरी आली होती."

वैद्यांनी त्याला एका खोलीत झोपविले आणि त्याला औषधे लिहून दिली. वधूने मुलाला वेळेवर औषध देण्याची जबाबदारी [illegible] कमी होण्याची चिन्हे दिसत नव्हती.

कुबडा वऱ्हाडाबरोबर होताच. तो मधून मधून यज्ञदत्ताच्या खोलीत जाऊन वधूशी थट्टा मस्करी करू लागला. मल्लिकाला ते आवडले नाही. यज्ञदत्त तिला म्हणाला—"थट्टा मस्करी केली म्हणून इतके रागावण्याचे कारण काय? तू दुर्लक्ष कर."

त्याचबरोबर यज्ञदत्ताला मनात भीती वाटू लागली की थट्टा मस्करी करता करता कुबडा त्याचे गुपित सांगून तर टाकणार नाही. म्हणून तो सागरदत्ताला म्हणाला—"लवकर स्वदेशी जाण्याची व्यवस्था करून द्या. घरी पोचल्यावर आराम पडेल."

वैद्यांनी नवरदेवतांच्या इच्छेविरुद्ध काही करू नये असे सुचविले.

सागरदत्तने मुलीच्या पाठवणीची आणि जावयांच्या प्रवासाची उत्तम तयारी केली. सामान उंटांवर चढविण्यात आले. दास-दासी व अंगरक्षकांबरोबर वऱ्हाड परत राजगृहला निघाले. सागरदत्तचे नोकर पुढे बातमी द्यायला निघून गेले. प्रत्येक पडावावर उतरण्याची उत्तम सोय करण्यात आली. दोन तीन वैद्यदेखील बरोबर गेले होते.

प्रत्येक पडावावर नवरदेवांच्या प्रकृतीत सुधारणा होत गेल्याचे दिसून आले आणि राजगृहला पोहचेपर्यंत त्यांची तब्येत उत्तम बरी झाली. वधूपक्षाच्या लोकांची काळजी दूर झाली. सागरदत्तला ती बातमी कळल्या-

वर त्याला अपार आनंद झाला व त्याने दानधर्म करून ग्रहशांती केली.

बुद्धवर्मा आपल्या सुनबाईचे सौंदर्य पाहून फार खूष झाला. एका सुमुहूर्तावर गर्भदान समारंभ ठरला. शैयागृहात मल्लिका आपल्या सखीबरोबर गप्पात रंगली होती. त्या वेळी यज्ञदत्त व कुबडापण हजर होते.

हा कुबडा येथे कशाला आला आहे हे मल्लिकेला कळेना. कुबड्याला वाटे की हा ब्राह्मणाचा मुलगा येथे अजून कशाला बसला आहे? सर्व परिस्थिती ओळखून यज्ञदत्त तेथून निघून जाण्यासाठी उठला. ते पाहून मल्लिका एकदम ओरडली–"तुम्ही कोठे निघालात, मला एकटीला सोडून?"

"तुझ्या नशिबांत जसा पती लिहिला आहे त्याच्याबरोबर तुला संसार करावा लागणार. त्यात माझा वांटा फक्त पापाची वांटणी आहे." असे म्हणत यज्ञदत्त बाहेर निघून गेला. मल्लिकाच्या सखीदेखील बाहेर निघून गेल्या.

कुबड्याने मल्लिकेचा हात धरून तिला थांबविण्याचा प्रयत्न करून पाहिला. पण [illegible] पळून गेली. ती घराच्या सर्व खोल्या पार करीत पळत बाहेर निघून गेली. त्या वेळी आनंदातिकाने बुद्धवर्मांच्या घरचे नोकरचाकर दारू पिऊन झिंगून पडले होते. कोणी तिला अडविले नाही.

मल्लिका कोणाला तरी काळोख्या रात्री पाहून "ते पहा, ते पहा!" असे ओरडत गल्लीत शिरली. पाय नेतील तिकडे ती जात होती. तिला एका रस्त्याच्या कडेला एक कापालिक दारू पिऊन झिंगून पडलेला दिसला. तिला पुढे काय करायचे हे ठरवायला वेळ लागला नाही. तिने आपले सर्व दागिने एका गोठोड्यात बांधले व ते गाठोडे कमरेला बांधून त्या कापालिकाच्या अंगावरचे वस्त्र काढून आपल्या अंगात घातले व दारुड्याचे सोंग करून चालू लागली. तिच्या झुकांड्या जात होत्या. कोणी तिच्याकडे लक्ष देखील दिले नाही. ती नगराबाहेर एका खेडे गांवाच्या दिशेने चालू लागली.

(क्रमश:)





# युक्ति की शक्ति

वीरसिंह व ज्ञानप्रकाश नावाचे दोघे मित्र होते. ज्ञानप्रकाश अशक्त होता, पण विद्याभ्यासात तो नेहमी पुढे असे. वीरसिंह अंगाने उंच होता व त्याचे सर्व अंग पिळदार होते. त्याचे दररोज कोणाशी तरी भांडण होई व मारामारीशिवाय एक दिवस गेल्याचे कोणाला आठवत नव्हते. तो घरी खाऊन पिऊन आल्यावर ज्ञानप्रकाशाच्या घरी पुन्हा पहिल्या पासून जेवीत असे. दोघांचा जन्म गरीब कुटुंबात झाला होता.

ज्ञानप्रकाश वीरसिंहाला अभ्यासाला बसायला सांगे. परंतु तो म्हणे, अभ्यास करून का पोट भरणार आहे? अंगात शक्ती असेल आणि मेहनत करून पोट भरता आले नाही तर काठी दाखवून पोटापुरेशी भाकर नक्कीच मिळेल."

ज्ञानप्रकाशने विचार केला, याच्या डोक्यात ही साधी गोष्ट देखील शिरायची नाही. त्याला पटवून द्यायला काही तरी युक्ती केली पाहिजे. म्हणून त्याने वीरसिंहाशी पैज लावली. म्हणाला–"आपण दोघे परगावी जाऊ या. तू काठीच्या जोराने पोट भर, मी बुद्धीचा उपयोग करून पोट भरतो." पाहूया कोणाला यश येते ते.

दुसऱ्या दिवशी दोघे एका गावी निघाले. वीरसिंहाच्या हातात एक मोठी काठी होती. ज्ञानप्रकाशाच्या हातात एक रिकामी पातेली होती व खिशात एक पांढरा दगड होता.

वीरसिंह उंच होता व जोरजोराने चालत होता. म्हणून गावात आधी पोचला. सकाळची वेळ होती एका घरी शेतकरी भाकरी खायला बसला होता. वीरसिंह घरात शिरला व म्हणाला–"मला पण भाकरी दे खायला."

शेतकरी चकित होऊन त्याच्याकडे पाहू लागला. त्याची बायको भाकऱ्या करीत

श्रीमती सुनंदा म. जोशी



होती. तिचा हात एकाएकी थांबला. शेतकरी काहीच बोलत नाही हे पाहून वीरसिंह त्याला दटावून म्हणाला–"माझे ताट वाढ म्हटले ना मी."

तोपर्यंत शेतकरी सावरला होता. म्हणाला–"तुझे पान वाढायचे, कशाला?" वीरसिंह म्हणाला–"तू माझे पान वाढायला सांगतोस की नाही?" दोघांची बोलाचाली चालू असता शेतकऱ्याची बायको हळूच मागच्या दाराने गेली व दोघातिघा शेजाऱ्यांना बोलावून घेऊन आली.

वीरसिंह शेतकऱ्याला दरडावून सांगत होता आणि त्याने त्याला मारायला काठी [illegible]

पाठीत दोनतीन काठ्या पडल्या. वीरसिंह "ओय, ओय!" करीत पळून गेला. गावाच्या टोकाला ज्ञानप्रकाश भेटला. तो वीरसिंहाला म्हणाला–"तू तासाभराने त्या झाडाखाली येऊन मला भेट. मी दोघांच्या पोटा पुरते खायला घेऊन येतो.

ज्ञानप्रकाश थोड्या वेळाने त्याच शेतकऱ्याच्या घरी आला. वीरसिंहाला पळवून लावल्यावर सर्व त्याच्या विषयीच बोलत होते. ठीक त्याच वेळी ज्ञानप्रकाश शेतकऱ्याकडे येऊन पोचला.

शेतकरी रागाने म्हणाला–"आमच्या घरी बाजारबुणग्यांना फुकटाचे जेवण नाही मिळणार."

ज्ञानप्रकाश हात जोडून नमस्कार करून म्हणाला–"मी या गावच्या गावकऱ्यांची ख्याती ऐकून आलो होतो. या गावात जसा अतिथिसत्कार होतो तसा दुसऱ्या कोणत्याहि गावात होत नाही. बरे ते सोडा. मला जेवायला वाढू शकला नाहीत तर नाही. थोडे पाणी तर द्याल. मी सर्वांना एक स्वादिष्ट पदार्थ तयार करून खायला देईन."

गावकरी उत्सुक होऊन तो काय करतो हे पाहू लागले. ज्ञानप्रकाश पातेलीत पाणी घेऊन त्या झाडाखाली आला. तेथे त्याने तीन दगड ठेवून चूल पेटवली व पातेली

[illegible] दगड टाकला. सर्व ते पहात होते. त्याने पातेलीवर झांकण ठेवले व थोडा वेळ पाणी उकळत राहिल्यावर झांकण काढून चमच्याने पातेलीतले पाणी चाखून पाहून म्हणाला– "काय पण चव आली आहे. चार बटाटे यात पडले तर छान रस्सा भाजी तयार होईल."

गर्दीतून दोघांतिघांनी घरी जाऊन बटाटे आणून दिले. बटाटे पाण्यात टाकून शिजल्यावर पाणी चाखून म्हणाला–"याला म्हणतात रस्सा भाजी. यात थोडीशी डाळ व तांदूळ पडले की जी खिचडी तयार होईल ती इंद्राच्या सैंपाकघरातल्या खिचडी सारखी होईल. काही लोक आपापल्या घरी धावले एकाने डाळ आणली व एकाने तांदूळ आणले. ज्ञानप्रकाशने ते पातेलीत घातले व म्हणाला–"तांदूळ थोडे जास्ती झाले, म्हणून मीठ कमी पडणार की काय वाटते. थोडे आणखी मीठ पडले असते तर छान चव आली असती!"

एक जण मीठ आणायला धावला. तोपर्यंत खिचडी शिजून तयार झाली होती.. सर्व चकित होऊन पहात होते. ज्ञानप्रकाशने वडाची पाने काढून दोन पत्रावळी तयार केल्या आणि गावकऱ्यांना म्हणाला–"एक उपाशी मनुष्य तुमच्या गावी आला होता त्याला तुम्ही हाकलून लावलेत. त्याला मी आज जेवायला बोलाविले आहे." मी, पहिल्याने ही खिचडी त्याला वाढतो."

ज्ञानप्रकाशने प्रथम वीरसिंहाला वाढले व पाठोपाठ स्वतःच्या पानावर वाढून घेऊन तो जेवायला बसला. दोघां मित्रांचे छान जेवण झाले. त्यानंतर दोघे आपल्या गावी निघाले. ज्ञानप्रकाश गावकऱ्यांना म्हणाला–"आता उरलेली खिचडी तुम्ही सांगाल त्याला वाढतो. नाहीतर सर्वांना एकेक चमचा वाढतो. आम्हांला भांडे रिकामे करून लवकर घरी जायचे आहे.

अशातऱ्हेने ज्ञानप्रकाशने युक्तीने दोघां पुरेसे अन्न मिळविले. शक्तीला उपाशीच रहावे लागले होते.



# तानसेनचे गुरु

अकबर बादशहा तानसेनच्या गाण्यावर इतका खूष झाला की त्याच्या मनात तानसेनच्या गुरुचे गाणे ऐकण्याची इच्छा उत्पन्न झाली. तेव्हां तानसेन अकबर बादशहाला त्याचे गुरु एका गुहेत तपश्चर्या करीत होते त्या गुहेजवळ घेऊन गेला.

तानसेनचे गुरु त्यावेळी समाधीस्थ होते. बराच वेळ गुरुवर्य बाहेर आले नाहीत तेव्हां तानसेनाने अपस्वरात गाणे म्हणायला सुरवात केली.

तेव्हां तानसेनाच्या गुरुची समाधी भंग झाली व ते बाहेर आले आणि म्हणाले– "मूर्खा! तू माझा शिष्य असून हे असे अपस्वर गायन करीत आहेस?" असे म्हणत गुरुने स्वतः तो राग म्हटला. ते गाणे ऐकायला जंगलातली रानटी जनावरे जमली. अकबराला कमालीचा आनंद झाला.

घरी परत आल्यावर बादशाहने तानसेनाला विचारले–"कायरे, तुझे गाणे ऐकून रानटी जनावरे जमलेली मी कधी पाहिली नाहीत?"

बिरबल जवळच होता. म्हणाला–"तानसेनचा गुरु देवांच्या दरबारातला गवई आहे आणि तानसेन आपल्या दरबारातला गवई आहे!"





# गप्पिष्टपणाचे फळ

एका गावी माणिकराव नावाचे एक गृहस्थ रहात असत. त्यांच्या वाडवडिलांनी इतके मिळवून ठेवले होते की माणिकरावांना काही कामधंदा करावा लागत नसे. ते चैनीत आयुष्य घालवीत असत. त्यांना आपल्या कर्तबगारीच्या गप्पा मारण्याची संवय लागली होती. कधी न पाहिलेले कधी न ऐकलेले त्यांनी केल्याचे सांगण्यात व आपल्या स्नेहमंडळीत फुशारक्या मारण्यात त्यांना मजा वाटे. त्यांच्या मित्र मंडळींनापण माणिकरावांच्या गप्पिष्टपणाची इतकी संवय झाली होती की मणिकराव म्हणत ते या कानाने ऐकून घेत व त्या कानाने सोडून देत.

एकदा माणिकराव कोठे तरी देवळात पुराण प्रवचनाला गेले होते. तेथे त्यांना एक नवीन मनुष्य भेटला. पुराण संपल्यावर दोघे गप्पा मारीत निघाले. थोडे अंतर चालून गेल्यावर तो मनुष्य माणिकरावांना म्हणाला–

"आज राजवाड्यात एक विचित्र गोष्ट घडली हो. राजेसरकार आपल्या दरबारी मंडळींत बोलत बसले होते आणि अंत:पुरातून बातमी आली की राणीसरकार पोटशूल झाल्याने तळमळत पडल्या आहेत. महाराजांशी बोलत बसलेल्या लोकात एक शेजारगांवचा वैद्यपण होता. राजेसरकारांनी त्या वैद्याला अंत:पुरात जाऊन राणीसरकारांचे औषधपाणी करण्यास पाठवून दिले. त्याने सुंठसाखरेची गुटी तयार करून दिल्याबरोबर पोटदुखी थांबली. राणी सरकारांनी त्या वैद्यबुवांवर खूष होऊन त्याला आपल्या गळ्यातला रत्नहार काढून बक्षिस दिला आणि तो कोठेतरी सुरक्षित जागी लपवून ठेवून द्यायला सांगितले. म्हणून मोठे लोक म्हणतात ते बरोबर आहे,

श्री बा. गं. नवरे



सेवा करायची झाली तर थोरामोठ्यांची करावी. तो वैद्य माझा मित्र होता म्हणून त्याने ही गोष्ट मला सांगून रत्नहार मला लपवून ठेवायला सांगितला."

दोघे बोलत बोलत एका बावडीजवळ आले. रत्नहाराची गोष्ट सांगणारा मनुष्य तहान लागल्याचे सांगून त्या बावडीत उतरला. त्याने तो हार सोयीची जागा पाहून दगडाच्या एका सांधीत लपवून ठेवला आणि पायऱ्या चढून बाहेर आला. माणिकराव ते सर्व पहात होता. नंतर दोघे आपापल्या वाटेने निघून गेले.

त्या दिवशी माणिकरावाला घरी यायला फार उशीर झाला होता. म्हणून बायकोने उशीरा घरी परत येण्याचे कारण विचारले. माणिकरावाने संवयीप्रमाणे एक लोणकडी थाप ठोकून दिली. म्हणाला—"अगं! काय सांगू? एक विचित्र गोष्ट घडली. मी राजेसरकारांच्या भेटीला गेलो होतो. राजवाड्यात नेमके त्याच वेळी राणी सरकारांचे पोट एकाएकी वातवृद्धीने दुखू लागले. मी त्यांना सुंठसाखरेची गुटी करून दिली आणि पोटदुखी ताबडतोब थांबली. राणी सरकारांनी माझ्यावर खूष होऊन मला गळ्यातला रत्नहार काढून दिला. म्हणून घरी यायला थोडा उशीर झाला. तुम्ही बायका उगाच नसत्या चवकशी करीत बसता?"

"कोठे आहे तो रत्नहार, पाहू तरी?" बायकोने उत्सुकतेने विचारले. रत्नहाराचे नाव ऐकल्या बरोबर तिच्या तोंडाला पाणी सुटले होते.

"अग, तुला आता काय सांगू? तो रत्नहार म्हणजे नवलखा हारच समज! काय पण इंद्रधनुषी चमक आहे त्यात? असा रत्नहार रात्री घरी घेऊन यायला माझी हिंमत होईना. कोणी दरोडा घालून काढून नेला तर! म्हणून मी बावडीत दगडाच्या एका खाचीत लपवून ठेवून आलो आहे. उजाडतांच जाऊन आपण तो घेऊन येऊ." माणिकराव तेवढ्याने बायको गप्प बसेल असे समजून म्हणाला.

माणिकरावाच्या [illegible] रात्रभर झोप येईना. त्या रत्नहारामुळे त्या बिचारीची झोप उडाली. भूक तहान पळून गेली. उजाडताच ती लगबगीने घागर घेऊन पाणी आणायला बावडीवर गेली आणि पायऱ्या उतरून सरळ आत गेली. तिने नवऱ्याला सांगितले नाही की आणखी कोणाला सोबत म्हणून बरोबर घेतले नाही. नवऱ्याने सांगितल्या प्रमाणे खरोखरच रत्नहार तेथे तिला सापडला आणि त्याची चमक पाहून तिला घेरी आली आणि रत्नहारासह पाण्यात पडली आणि गटांगळ्या खाऊ लागली.

ती ओरडली तेव्हां चार लोक जमा झाले आणि एका माणसाने हिंमत दाखवून तिला बाहेर काढले. त्या वेळी देखील तिच्या हातात तो रत्नहार होता. ती गोष्ट गावभर पसरली आणि राजाच्या कानावर पण गेली. रात्री राणीचा रत्नहार चोरीला गेल्याची गोष्ट कळल्यापासून शिपाई चोराचा शोध काढीत होते.

रात्री राणी पोटदुखीने आजारी होती ही गोष्ट खरी होती. राणीला औषधपाणी देणारा आणि पुराणाला आलेला व माणिकरावांना भेटून आपला पराक्रम वर्णन करून सांगणारा तो मनुष्य तो वैद्य होता. त्याने राणी बेशुद्धावस्थेत असतांना तो रत्नहार लांबविला होता. तो मनुष्य राजवाड्या बाहेर पडल्या नंतर शिपायांची नजर चुकविण्यासाठी पुराण ऐकायला जाऊन बसला होता. त्याची चूक एवढीच की त्याने माणिकरावांसारख्या गप्पिष्टाला ती गोष्ट सांगून त्याच्यासमोर बावडीत तो हार लपवून ठेवला.

शिपायांनी माणिकरावाला कैद करून त्याला खूप बडविले. खरा चोर दुसराच असल्याचे देखील माणिकरावाने सांगितले. पण माणिकरावाच्या बोलण्यावर कोणी विश्वास केला नाही.

माणिकरावाला गप्पिष्टपणाची चांगली अद्दल घडली आणि त्या दिवसापासून त्याने खोट्या फुशारक्या मारायच्या सोडल्या.






# चोर कोण साव कोण

एकदा एका माणसाने घोड्याच्या व्यापाऱ्याकडचा एक घोडा चोरून नेण्याचा प्रयत्न केला आणि तो त्यात फसला.

घोड्याच्या व्यापाऱ्याने त्याला पकडून विचारले–"कायरे, तू चोरी कां केलीस ?"

"अहो, मी चार दिवसांपासून उपाशी आहे. म्हणून हे पाप करायला धजलो. "भुभुक्षितो किं न करोति पाप ?" मला माफ करा. मी कान धरतो. पुन्हां चोरी करणार नाही." चोर गयावया करीत म्हणाला.

तो व्यापारी थोडा वेळ विचार करून म्हणाला–"तुला नोकरी द्यावी म्हटले तर तू अगदीच कुचकामाचा दिसतोस !"

"नोकरी ? सांगाल ती नोकरी करायला मी तयार आहे." चोर म्हणाला.

"तुझ्यासारखा दुबळा मला घोडे चोरून कसा काय आणून देणार ?" 'घोड्यांचा व्यापारी' म्हणाला.





# योगाचा महिमा

सुंदरपूरचा युवराज सुशीलकुमार याने वेष पालटून देशाटन करण्याचे ठरविले. आपल्या घोड्यावर बसून तो अनेक देश पहात हिंडत नवीन गोष्टी शिकत परत फिरला तो दुसऱ्याच वाटेने आला. नवीन वाटेने येत असता तो राजपट नावाच्या एका राज्यात आला. त्या राज्याची राजधानी फार सुंदर होती. तेथील भव्य राजवाडा, रुंद रस्ते व मनोहर उद्याने पाहून युवराजाचे चित्त प्रसन्न झाले. राजधानीत हिंडत असता एका जागी उंच भिंतीच्या आत एक सुंदर उद्यान युवराजाला दिसले. युवराजाने द्वारपालकाला विचारले तेव्हां राजकन्या शालिनीचे ते एक स्वतःचे खाजगी उद्यान असल्याचे त्याला कळले. त्या उद्यानात प्रवेश करण्यास पुरुषास मनाई होती.

ते ऐकून सुशीलकुमाराच्या मनात ते उद्यान पाहण्याची उत्सुकता अर्थातच जास्त वाढली. सोईची जागा पाहून कोणाला कळू दिल्याशिवाय तो भिंतीवरून उद्यानात शिरला. ते उद्यान म्हणजे खरोखरच इंद्राच्या नंदनवनास लाजवील इतके सुंदर होते. युवराज काही वेळ त्या उद्यानातले सुंदर लतावृक्ष पहात उभा राहिला. फुलांच्या सुवासवाऱ्याबरोबर चहूंकडे दरवळत होता. तो एका झाडाखाली बसून आपली बांसुरी वाजवू लागला. बांसुरीचा तो गोड आवाज ऐकूनच की काय, त्याच वेळी समोरच्या वारुळातून एक नागसाप बाहेर आला आणि फडा काढून डोलू लागला. नागसापाला पाहून युवराजाने बांसुरी जवावायची बंद केली. पण ती गोष्ट घातक ठरली. कारण लगेच साप त्याला चावला आणि पळून गेला. थोड्या वेळाने युवराज बेशुद्ध होऊन पडला. त्याचे तोंड व सर्व अंग निळे होऊन गेले होते.

श्री ए. सी. सरकार जादुगार



सुशीलकुमारने बांसुरी वाजविली ती क्रीडाभवनात आपल्या सखींबरोबर क्रीडा-करीत बसलेल्या राजकन्येला ऐकू आली होती. ती बांसुरी इतकी गोड होती की राजकन्या शालीनी आपल्या सखीं-सह त्या आवाजाच्या अनुरोधाने युव-राज बेशुद्ध होऊन पडला होता तेथे आली.

राजकन्येने युवराजाला बेशुद्धावस्थेत पाहिले. त्याच्या हातात बांसुरी होती. त्यावरून बांसुरी वाजवून तिला भुरळ पाडणारा तोच तरुण होता या गोष्टीची शंका राहली नाही. तिने सखींच्या मदतीने युवराजास आपल्या क्रीडाभवनात नेले आणि चार दिवस उपचार करून युवराजाला वांचविले.

राजकुमारी शालीनीच्या उद्यानात पुरुषांना प्रवेश वर्ज्य होता. परंतु युवराज सुशीलकुमार आत शिरला आणि त्याची सेवा स्वत: राजकन्येने चारपांच दिवस केलीं ही गोष्ट राजा, मंत्री किंवा दरबारी कोणाला कळल्यास अनर्थ होईल म्हणून राजकन्येने गुप्तपणे युवराजाची चिकित्सा केली होती. युवराज शुद्धीवर आल्यावर तो तरुण पुरुष एका राज्याचा युवराज असल्याचे राजकन्येला कळले. राजकन्येने सेवाशुश्रूषा केली असल्याचे युवराज सुशील-कुमारयासहि कळले. त्याचा परिणाम दोघांचे परस्परांवर प्रेम वाढले आणि दोघे विवाह करून घेण्यास वचनबद्ध पण झाली.

त्यानंतर युवराज गुप्तपणे उद्याना बाहेर गेला आणि घोड्यावर बसून स्वदेशी परत आला.

युवराज परत आलेला पाहून राजाला फार आनंद झाला. राजाने आपल्या प्रधानाला युवराजांच्या विवाहासाठी योग्य कन्येचा शोध करण्यास सांगितले.

सुशीलकुमाराने विवाहासाठी योग्य कन्येची निवड त्याने केली असल्याचे व तिच्याशी तो वचनबद्ध झाला असल्याचे कोणाला सांगितले नाही. कारण ती गोष्ट सांगायला त्याला संकोच होत होता. याहून दुसरे कारण असे होते की वडिलांना शालिनीशी विवाह करून देणे आवडले नाही तर मोठेच विघ्न उत्पन्न होण्याची त्याला भीती वाटत होती.

म्हणून त्याच्या साठी वधूचा शोध सुरू असल्याचे जेव्हां त्याला कळले तेव्हां त्याला खाणेपिणे सुचेना व त्यामुळे तो अशक्त झाला.

प्रधानाचा मुलगा देवदत्त याची युव-राजाशी मैत्री होती. त्याने युवराजाच्या मनातली खरी गोष्ट काढून घेतली. त्या प्रणयकथेमुळे युवराजाला खाणेपिणे काही सुचत नसल्याचे देवदत्ताला कळले. तेव्हां तो युवराजाला म्हणाला—"युवराज, तू काही काळजी करू नकोस. मी आपला दरबारी जादुगार मायाधर याच्या मदतीने शालिनीशीच तुझा विवाह होईल या गोष्टीची व्यंवस्था करतो."

युवराजासाठी मंत्र्याच्या प्रयत्नाने अनेक राजकन्या सांगून आल्या. दूरदूरच्या देशांचे राजदूत राजपटला येऊ लागले. शालिनीच्या वडिलांकडून देखील राजदूत आले होते.

परंतु राजाने व मंत्र्याने परस्पर सल्ला करून चार राजकन्या युवराजाला दाख-विण्याचे ठरविले. त्यात शालिनी नव्हती. देवदत्तला ती गोष्ट त्याच्या वडिलांकडून



कळली होती. म्हणून त्याने मायाधर जादुगाराच्या मदतीने युवराजाच्या इच्छे-प्रमाणे करण्याचे ठरविले.

राजाने मंत्र्याला सांगून ज्या राजकन्यांची निवड झाली होती त्यांच्या जन्मकुंडल्या मागविल्या.

तेव्हां मंत्री म्हणाला—"महाराज, त्या-पूर्वी आपण युवराजांचे मत विचारून घेणे बरोबर होईल."

"त्यात विचारण्यासारखे काय आहे? मी जो निर्णय करीन त्याच्या बाहेर युवराज नाही." राजा म्हणाला. कारण राजाने लहानपणापासून युवराजाला तशीच शिस्त लावली होती.



"आपले म्हणणे बरोबर आहे महाराज! परंतु ही राजकीय बाब नाही. युवराजांच्या स्वत:च्या जीवनाचा व आयुष्यभराचा प्रश्न आहे. त्यांच्या मनाचा अंदाज घेण्याची परवानगी मला द्यावी." मंत्री म्हणाला.

राजाने होकार दिला.

देवदत्त युवराजाला भेटला आणि अनेक प्रकारे त्याची समजूत घालून त्याला महाराजांशी भेट करायला बोलावून घेऊन आला.

युवराजाला महाराजांनी विवाहासंबंधी त्याचामानस विचारला तेव्हां युवराज एवढेच म्हणाला—"माझ्या हृदयावर ज्या राजकन्येने अधिकार केला आहे तिच्याशी माझा विवाह करून द्यावा."

"ते तुलाच कळणार, आम्हांला कसे कळणार? तू तिचे नाव सांगितलेस तर तिच्याशी तुझा विवाह करून देण्याचा प्रयत्न करता येईल." मंत्री म्हणाला.

"मला ती गोष्ट माहीत असेल तर ना मी ते सांगणार. म्हणून तुम्हीच काय वाटेल तो उपाय करून पहा." युवराज म्हणाला.

"युवराज हे कसे शक्य होईल?" मंत्री निराश होऊन म्हणाला.

तेव्हां देवदत्त म्हणाला—"मला आठवते, मायाधर जादुगार एकदा म्हणाला होता की त्याला हृदयातली गोष्ट ओळखण्याची कोणती तरी यौगिक क्रिया माहीत आहे. त्याचा सल्ला आपण घेतला तर?"

तेव्हां मंत्र्याने मायाधरला बोलावून त्याला सर्व गोष्टींचा परिचय देऊन विचारले—"आपल्या युवराजांच्या मनात कोणत्या राजकन्येने प्रवेश केला आहे हे त्यांना माहीत नसताना तुला ते सांगता येईल का?"

मायाधर स्मित करून म्हणाला—"योगबलाने शक्य आहे. एक रात्रभर युवराजांनी माझ्याबरोबर एकांतात योगसमाधीत राहले पाहिजे. त्यानंतर मी सर्वांसमक्ष त्यांच्या हृदयात बसत असलेली ती राजकन्या कोण हे पटवून देईन. परंतु त्यानंतर त्याच राजकन्येशी युवराजांचा विवाह करून दिला पाहिजे. [illegible] युव[illegible] मतिभ्रम होण्याची शक्यता आहे. आपण महाराजांचे मन या गोष्टीस वळवू शकल्यास मी आपल्या योगबळाचा प्रयोग करू शकेन."

मायाधरच्या तोंडचे ते वर्णन ऐकून महाराजांना आश्चर्याबरोबर शंकापण वाटू लागली. तेव्हां महाराजांनी लग्नाचे पुढे काय होईल ते पाहून घेऊ, प्रथम योगबलाचा काय परिणाम होतो तो पाहून घेण्यास मान्यता दिली.

सुशीलकुमाराला एक रात्र भर जादुगारा बरोबर एकांतात रहावे लागले. दुसऱ्या दिवशी त्याला दरबारात आणण्यात आले. मंत्र्याने सर्व राजकन्यांची नावे एका कागदावर लिहून काढली आणि सर्वांना वाचून दाखविली तो कागद मंत्र्याने जादुगाराला दिला.

जादुगाराने एका तबकात तो कागद जाळून त्याची राख हातात घेतली व राजकुमाराला सदरा काढायला सांगितले. जादुगाराने त्यानंतर राजकुमाराच्या उघड्या छातीवर ती राख चोळली. त्याबरोबर युवराजाच्या छातीवर "शालीनी" ही अक्षरे सर्वांना दिसली. सर्व चकित होऊन परस्परांकडे व युवराजांकडे पाहू लागले.

"आता पुढली जबाबदारी आपली सर्वांची!" असे सांगून जादुगार आपल्या आसनावर जाऊन बसला.

राजाने शालिनी बरोबर युवराजाचा विवाह करून दिला. विवाह झाला त्या दिवशी रात्री सुशीलकुमारने राजकन्येला एक साबण भेट म्हणून दिला.

"ही काय भेट झाली?" राजकन्येने विचारले.

"या साबणाचाच प्रताप आहे की आज आपण दोघे विवाहबद्ध होऊ शकलो. जादुगाराने याच साबणाने तुझे नाव माझ्या छातीवर लिहून ठेवले होते. त्यावर राख चोळली तेव्हां तुझे नाव प्रकट झाले. योगाचा महिमा होता म्हणून बाबांना माझ्या मनातली गोष्ट कळली व आपला विवाह झाला." सुशीलकुमार म्हणाला.



# पैंज

कांचनपूरचा राजा एक धर्मभीरु राजा होता. यथा राजा तथा प्रजा. त्या राजाची प्रजा देखील राजासारखीच धर्मभीरु होती. राजाला मूलबाळ नव्हते म्हणून राजाबरोबर प्रजापण दुःखी होती.

ही गोष्ट सांगण्याची गरज नाही की सरळ धर्मभीरु माणसात एकदा दुष्ट मनुष्य असला की तो आपला फायदा नक्कीच करून घेतो. असाच एक लबाड व्यापारी कांचनपुरात रहात असे. तो व्यापारी एकदा आपल्या एका गरीब शेजाऱ्याला म्हणाला–"एक मांत्रिक माझ्या ओळखीचा आहे. तो मनातली गोष्ट बरोबर ओळखतो. तू मला दहा रुपये दिलेस तर मी तुला त्याच्याकडे घेऊन जाईन."

"त्यासाठी मांत्रिकाची काय गरज आहे ? मी तुझ्या मनातली गोष्ट ओळखून सांगतो." तो गरीब मनुष्य म्हणाला.

"पैंज ! तू हारलास तर काय देशील ?" व्यापाऱ्याने विचारले.

"जर मी तुझ्या मनातली गोष्ट ओळखली तर तू आपली सर्व संपत्ती मला दिली पाहिजेस. मी ओळखली नाही तर मी आपली सर्व संपत्ती तुझ्या नावे करून देईन." गरीब माणसाने ती पैंज मान्य केली.

"आपण यासाठी एक मध्यस्थ नेमला पाहिजे. आपण तुम्हांला मान्य असेल तर राजालाच मध्यस्थ नेमू या." गरीब मनुष्य म्हणाला. व्यापारी राजाला मध्यस्थ म्हणून नेमायला तयार झाला. दोघांनी राजाकडे जाऊन पैंजेची गोष्ट सांगितली.

त्या गरीब माणसाने त्या व्यापाऱ्याच्या मनातली गोष्ट ओळखून सांगितली. म्हणाला–"तू या वेळी महाराजांना अपत्य व्हावे हा विचार करीत आहेस."

व्यापाऱ्याने होकार दिला आणि पैंज मान्य केली होती तशी आपली सर्व संपत्ती त्या गरीब माणसाच्या नावे करून दिली.






पंचपांडव द्रौपदीसह विराट राजाकडे अज्ञातवास करीत होते. युधिष्ठिर द्यूत खेळून जे पैसे मिळवी ते आपल्या भावांना गुप्तपणे वाटून टाकी. भीम निरनिराळ्या प्रकारची पक्वान्ने शिजवी व आपल्या भावंडांकडे सवडीप्रमाणे पोचती करी. अर्जुनाला अंतःपुरात निरनिराळ्या प्रकारची वस्त्रे मिळत, ती तो आपल्या भावंडांना वाटून टाकी. नकुलाच्या अश्वविद्येवर खूष होऊन विराट राजा जे बक्षिस देई ते तो आपल्या भावंडांना वाटून देई. सहदेव दूध, दही, लोणी आणून देई. द्रौपदी आपल्या सर्व पतींना काय हवे किंवा नको, विचारपूस करी, परंतु आपले गुपित कोणाला कळू नये या गोष्टीची काळजी घेई.

अशा तऱ्हेने चार महिने लोटले. त्या वेळी मत्स्यदेशात ब्रह्मोत्सव चालू होता त्यात भाग घेण्यासाठी दूरदूरच्या राज्यातुन मल्ल आले होते. विराट राजाला मल्लयुद्धाची फार आवड होती. म्हणून मल्लयुद्धाची व्यवस्था करून त्याने करमणुकीचा कार्यक्रम ठेवला.

त्या उत्सवात भाग घ्यायला आलेल्या पहेलवानात जीमूत नावाचा एक मल्ल होता. त्याने एकामागून एक सर्व मल्लांना आव्हान केले. परंतु मोठमोठे मल्ल त्याला भिऊन त्याचे आव्हान स्वीकार करायला तयार नव्हते. म्हणून विराट राजाने भीमाला जीमूतशी मल्लयुद्ध करण्यास सांगितले. राजाची आज्ञा मोडणे योग्य



होणार नाही असा विचार करून भीमाने जीमूतशी मल्लयुद्धास होकार दिला.

भीम व जीमूत यांचे मल्लयुद्ध सुरू झाले तेव्हां दोन हत्तींचे युद्ध होत असल्या-सारखे भासले. ते भयंकर युद्ध पाहून प्रेक्षक आनंदाने टाळ्या वाजवू लागले. भीमाने जीमूतला वर उचलले व चाकासारखे बराच वेळ गरगर फिरवून शेवटी जमिनीवर आपटले. तो जागच्या जागी ठार झाला. जीमूतला ठार केल्यावर विराटने भीमाला पुष्कळ बक्षिसे दिली.

भीमाची शक्ती आणि सामर्थ्य पाहून विराट राजाने त्याला इतर मल्लांशी कधी मल्लयुद्ध करण्यास सांगितले नाही. कधी कधी वाघ, सिंह किंवा हत्तीशी युद्ध करण्यास सांगीत असे. भीमाने अनेकदां वाघासिंहांना व हत्तीला शस्त्राशिवाय ठार करून प्रेक्षकांना खूष केले. भीमाचे ते मल्लयुद्ध पहायला अंत:पुरातील स्त्रिया-देखील जात असत.

अर्जुनाने अंत:पुरातील मुलींना नृत्य व गायन शिकवून आणि त्यांच्याकडून ते करवून राजाला खूष केले. हट्टी व तापट घोड्यांना वठणीवर आणण्याचे काम नकुलाने केले व राजाकडून शाबासकी मिळविली. अशाच तऱ्हेने सहदेवाने गाय, बैल व वासरांची इतकी उत्तम निगा ठेवली की राजा व दरबारी त्याचे कौतुक करीत. परंतु आपल्या पतींना परक्याची चाकरी करायला लागत असलेली पाहून मानिनी द्रौपदीला अनिवार दु:ख होई.

अशा तऱ्हेने अज्ञातवासातले कष्टाचे दिवस जवळ जवळ पुरे होत आले होते. कारण वर्ष पुरे व्हायला थोडेच दिवस उरले होते. त्याच सुमारास विराट राजाचा मेहुणा सिंहबल (ज्याला कीचक याच नावाने लोक ओळखत) आपली बहीण सुदेष्णा राणीला भेटायला अंत:पुरात गेला असता त्याची दृष्टी द्रौपदीवर पडली व त्याने आपल्या बहिणीला, त्या अप्सरेसारख्या सुंदर दासीला त्याची पट्टराणी करून देण्यास



सांगितले. म्हणाला—"हे रत्न दासी होऊन तुझ्या अंतपुरात कुजत राहणे बरोबर नाही. माझ्या हृदय सिंहासनावरच त्याचे योग्य स्थान आहे." तो तेवढ्यावर थांबला नाही, तो द्रौपदीला एकांतात भेटला व तिच्या समोर आपल्या मनातली इच्छा प्रगट केली.

द्रौपदी कीचकाला म्हणाली—"तुला असे बोलणे शोभत नाही. मी विवाहित आहे!"

परंतु कीचक तिला म्हणाला—"तू माझ्या शब्दाला मान दिला नाहीस तर तुला शेवटी पश्चात्तापच करावा लागेल. या विराट राजाची व त्याच्या राज्याची सर्व जबाबदारी माझ्यावरच आहे. धन, रूप व यौवन या तीन ही बाबतीत माझी बरोबरी करू शकेल असा जगात दुसरा एक तरी कोणी हुडकून मिळेल का? अशा माझ्या सारख्याला तू आपला दासानुदास करून घेऊन तू माझी मालकीण हो."

ते ऐकून द्रौपदीला जास्तच राग आला. म्हणाली—"तू आपली वांकडी नजर दुसरीकडे वळविली नाहीस तर तुझ्या जिवाला धोकाच आहे, हे लक्षात ठेव. माझे पांच गंधर्व पती सर्वदा गुप्त रूपे माझे रक्षण करण्यास तयार असतात. त्यांना ही गोष्ट कळली तर तुझा जीव निश्चितच धोक्यात पडेल, विसरू नकोस."

द्रौपदीने इतके स्पष्टपणे सांगितले तरी कीचकाने आपला मूर्खपणा सोडला नाही. तो सुदेष्णा राणीला जाऊन म्हणाला—"ताई! तू काय वाटेल ते करून जर द्रौपदीचे मन माझ्याशी विवाहास वळविले नाहीस तर मी जीव देईन. मी तिला किती तऱ्हेने समजावून सांगितले."

राणी सुदेष्णाचे मन भावाचे बोलणे ऐकून विरघळले व म्हणाली—"भाऊ, सैरंध्री माझ्या आश्रयाला राहते. तिचे रक्षण करण्याचे वचन मी तिला दिले आहे. तिचे पाच गंधर्व पती सर्वदा तिचे रक्षण करीत असल्याचे तिने मला सांगितले आहे.



तू माझा भाऊ आहेस म्हणून मी तुला हे सर्व सांगून टाकले. तू सैरंध्रीच्या वाटेला जाऊ नकोस."

"ताई, तू काय म्हणतेस? अग पाचच काय पाच हजार गंधर्व आले तरी माझ्या एका केसालाहि धक्का पोचणार नाही माझ्या सारख्यांवर कित्येक तरुण स्त्रिया स्वत:चा जीव ओंवाळून टाकतील. माझे वैभव पाहूनच सैरंध्रीचे मन पालटेल. तू काय वाटेल ते करून तिला माझी कर, नाही तर तुझा हा भाऊ तुला कायमचा पारखा होईल." कीचक म्हणाला.

"तुझ्या या पापकर्मात मी सहभागी होऊ म्हणतोस? मी स्वत: होऊन कुळघातकीपणा करणार नाही. तू घरी जाऊन काही तरी पक्वान्ने आणि पेये माझ्यासाठी तयार करून पाठव. मी ती द्रौपदीच्या हाती तुझ्याकडून मागवून घेईन. तेव्हां तू तिच्याशी काय ते बोल. मी मध्ये पडणार नाही." सुदेष्णा म्हणाली.

ते ऐकून कीचक आनंदाने आपल्या घरी गेला. उत्तमोत्तम पक्वान्ने व पेये त्याने तयार करविली व द्रौपदीची वाट पाहू लागला.

सुदेष्णाने तासा दोन तासानंतर द्रौपदीला बोलाविले व म्हणाली—"माझ्या भावाच्या घरी जाऊन तो जे देईल ते घेऊन ये."



द्रौपदी म्हणाली—"महाराणी! मी त्यांच्या घरी जाऊ शकणार नाही. मी त्यांच्याकडे गेले तर ते माझा अपमान करायला मागे पुढे पाहणार नाहीत आणि व त्याचा परिणाम फार वाईट होईल. आपणांकडे इतक्या दासी आहेत. आपण त्यांच्यापैकी एकीला पाठवा."

"अग, मी स्वत: तुला पाठवीत असता त्याची तुझ्या अंगाला स्पर्श करण्याची हिंमत तरी होईल का?" असे म्हणत सुदेष्णा राणीने एक सुवर्ण पात्र द्रौपदीच्या हातात दिले.

द्रौपदी नाइलाजाने कीचकच्या घरी गेली. तिला पाहून कीचकाला परमानंद



झाला. म्हणाला—"हे सुंदरी! तू स्वतः माझ्याकडे आलीस. सुंदर वस्त्रे परिधान करून व माझ्या रत्न भांडारातले वाटेल ते आभरण घालून ये."

"महाराणीने मला आपल्याकडे पेये आणण्यासाठी पाठविले आहे. आपण तेवढे देववून मला जाण्याची परवानगी द्यावी." द्रौपदी म्हणाली.

"मी ती पेये दुसऱ्या दासी करवी पाठवून देईन." असे म्हणत त्याने द्रौपदीचा हात पकडला. द्रौपदी घाबरून गेली. तिने कीचकाला जोराने दूर ढकलले व स्वतःची सुटका करून घेऊन सरळ विराट राजाच्या दरबारात आली. कीचक निर्लज्जपणाने तिच्या पाठीमागे धावत दरबारात आला व त्याने द्रौपदीची वेणी धरून ओढली.

तो अत्याचार युधिष्ठिर व भीम पहात होते. दोघे त्या वेळी दरबारातच होते. भीमाने कीचकाचा वध करण्याचे ठरविले व उठू लागला. त्याने आपला राग त्याच्यावर प्रत्यक्ष न दाखविता एक झाड उपटून दूर फेकून दिले व कीचकाला भीती वाटते का पाहिले. परंतु युधिष्ठिराने आपल्या पायाच्या अंगठ्याने भीमाच्या पायाचा अंगठा दाबून शांत रहायला खूण केली आणि म्हणाला—"अरे इंधनासाठी एवढा मोठा वृक्ष का तू पाडणार आहेस?"

द्रौपदीने पती असहाय असल्याचे ओळखले आणि एकदांच रागाने त्यांच्याकडे पाहिले व नंतर विराटराजाकडे वळून म्हणाली—"हा दुष्ट अशा तऱ्हेने माझा अपमान करीत आहे तरी ते सर्व पाहून ही माझे गंधर्वपती तत्काळ काही करू शकण्यास असमर्थ आहेत. म्हणून आपणांसमोर हात जोडते, माझी अब्रू वांचवा. परंतु आपण अशी उपेक्षा कां करीत आहां?" नंतर सभासदांकडे वळून म्हणाली—"राजा आणि कीचक मेहुणे आहेत व दुर्लक्ष करीत आहेत. पण तुम्ही स्वस्थ कसे?"

तेव्हां राजा विराट म्हणाला—"मुली! तुमचे दोघांचे कोणत्या गोष्टीवर भांडण





झाले हे मला माहीत नाही. ते कळल्याशिवाय मी काही न्याय देणे धर्माला अनुसरून होणार नाही."

तेव्हां युधिष्ठिर द्रौपदीला म्हणाला—"ए बाई! तू येथे कशाला वेळ घालवते आहेस? अंतःपुरात जा बघू? तुझे पती तत्काळ काही करू शकत नसतील तर त्याला काही तरी कारण असेलच की. जो कोणी तुझ्या वाटेला गेला आहे त्याला तुझे पती नक्कीच शिक्षा देतील."

त्यानंतर द्रौपदी धावत सुदेष्णाच्या महालांत धावत धावत गेली. तिचे केस सोडलेले होते व तोंडावर दुःख स्पष्ट झळकत होते. तेव्हां सुदेष्णाने तिला विचारले—"मालिनी! तू कां ग अशी दुःखी आहेस कोणी तुला काही बोलले का?"

"आपणच नाही का मला 'नाही नाही' म्हणत असता आपल्या भावाकडे पाठविलेत? त्याने माझे केस धरून माझा अपमान केला. हे पाहून माझे पती स्वस्थ बसणार नाहीत. त्याचा शेवट निश्चित आहे." द्रौपदी म्हणाली.

द्रौपदीने हे सुदेष्णाला सांगितले आणि कीचकाचा वध करविण्याचे मनाशी ठरवून टाकले. तिने घरी जाऊन स्नान केले आणि आपली ही इच्छा पुरी करण्यास एकटा भीम समर्थ आहे असे तिला वाटले. म्हणून ती रात्री उठून, भीम आपल्या खोलीत घोरत पडला होता तेथे जाऊन त्याला भेटली आणि त्याचे पौरुष जागे करण्याच्या हेतूने म्हणाली—"तुम्ही मढ्यासारखे येथे पडून आहां. स्वतःच्या डोळ्यांनी माझा झालेला अपमान पाहून फक्त वडील भावाची मर्जी राखण्यासाठी निर्जीव व पंगू प्राण्यासारखे स्वस्थ बसून राहलात. असले काही पौरुष तर बायकोच्या अपमानाचा सूड घ्या."

भीम आतापर्यंत चांगला जागा झाला होता. तरी म्हणाला—"तू अशी अवेळी येथे कशाला? असे झाले तरी काय? मी करण्यासारखे काही असेल तर सांग. करतो!"

जो झोपलेला आहे त्याला जागे करणे सोपे आहे, पण जागेपणी झोपण्याचे सोंग करणारांस कोणी जागे करावे? तुमच्या भावाच्या जुगारीपणामुळे आज मला हे दिवस पहायला मिळत आहेत? राणी होते, दासी झाले, म्हणून त्या दुष्ट कीचकाची दुष्ट नजर माझ्यावर पडली आणि हे सर्व कळून देखील तुम्ही शांतपणे विचारतां आहां की काय झाले?"

भीमाने द्रौपदीला धीर दिला व म्हणाला–"मी त्या दुष्टाचा वध जागच्या जागी केला असता. पण काय करू? दादाने मला अडविले. परंतु आतां दादाला कळण्यापूर्वीच मी दुष्ट कीचकाला वाटेला लावतो. मी त्याच दिवशी सभेत दुर्योधन, दु:शासन, कर्ण व शकुनी यांचा शेवट केला असता तर आपणां सर्वांना हा अरण्यवास सोसावा लागला नसता."

"मला हे सर्व असह्य झाले आहे. मला तुमचा हा अज्ञातवास नको की काही नको. जे काही व्हायचे असेल ते होऊ द्या. दुष्ट

त्याच्या नजरेस पडू नये म्हणून सुदेष्णा राणी किती काळजी घेते. तेव्हां तो आपल्या मेहुण्याला कोणती ही शिक्षा करण्यास धजणार नाही. दोघे एकाच माळेचे मणी आहेत. सुदेष्णा राणीनेच आपल्या भावाकडे मला पाठवून माझा काटा दूर करण्याचा विचार केला असावा, अशीदेखील मला शंका वाटते. तेव्हां हे काम तुमच्या शिवाय इतर कोणाच्या हातून होणार नाही. आणि तुम्ही हे करायला तयार नसाल तर मी विष खाऊन जिवाचा अंत करून घेईन."

भीमाने द्रौपदीचे अश्रू पुसले व म्हणाला–"मी तुला पहिल्यानेच सांगितले त्या दुष्टाचा वध मी करतो. परंतु तुला एक काम करावे लागेल. तू कीचकाशी थोडेसे प्रेमाचे नाटक कर आणि रात्री नृत्यमंडपात तुला एकांतात येऊन भेटायला सांग. मी जे काही करायचे ते करतो."

अशा तऱ्हेने कीचक वधाची पूर्व तयारी झाली.





# शिवपुराण

[१६]

ब्रह्मदेवाने तारकासुराच्या मुलांच्या तपश्चर्येवर खूष होऊन त्यांना दर्शन दिले व वाटेल तो वर मागून घेण्यास त्यांना सांगितले.

तिघे भाऊ आनंदाने ब्रह्मदेवाला नमस्कार करून म्हणाले–"ब्रह्मदेवा! जो मनुष्य अशा रथात बसून येईल जो वास्तविक रथ नाहीच व जो असे धनुष्य बाण घेऊन आमच्यावर बाण सोडील जे वास्तविक धनुष्य बाण नाहीत अशाच माणसाच्या हातून आम्हांला मरण येईल असा वर द्यावा. या शिवाय आम्हांला सर्व विद्या व कला आणि तेज, बल, सुखोपभोग, त्याग व शंकराची भक्ती प्राप्त व्हावी सोने, चांदी इत्यादिक मूल्यवान धातूंबरोबर लोखंड, तांबे वगैरे धातूंचा उपयोग करून बांधलेल्या नगरात राहण्याचे भाग्य आम्हांला मिळेल, असादेखील वर द्यावा."

ब्रह्मदेवाने तिघांना त्यांनी मागितले ते वर दिले. नंतर तिघांनी इच्छिल्याप्रमाणे नगरे निर्माण करण्याचे काम विश्वकर्म्याला सांगितले आणि अंतर्धान पावला.

विश्वकर्म्याने सोने, चांदी व लोखंड इत्यादि धातूंचा उपयोग करून तीन अत्यंत सुंदर नगरे निर्माण केली व ती नगरे तारकासुराच्या मुलांना दिली. त्याच नगरांना त्रिपुर हे नाव प्राप्त झाले. ही नगरे आकाशांत अधांत्री तरंगत होती व त्यांना वाटेल त्या जागी जाऊन उतरण्याची शक्ती प्राप्त होती. सोन्याच्या नगरात तारकाक्ष, रजत नगरात कमलाक्ष आणि लोखंडाच्या नगरात विद्युन्माली राहू लागले

शेवटच्या मलपृष्ठावरील चित्र



व परस्परांच्या मदतीने त्रिलोकावर राज्य करू लागले.

या त्रिपुरांवर अधिकार मिळविणे इंद्राला देखील शक्य नव्हते. म्हणून इंद्रादिक देवांनी ब्रह्मदेवाकडे जाऊन प्रार्थना केली की ब्रह्मदेवा! त्रिपुरासुर आम्हांला त्रास देत आहेत. आमच्या देवलोकातल्या नगरात शिरून ती उध्वस्त करीत आहेत. तरी त्यांचे पारिपत्य करावे."

परंतु ब्रह्मदेव म्हणाला–"त्रिपुरासुरांचा वध करणे इतके सोपे नाही. आपण याविषयी शंकराचा सल्ला घ्यावा." म्हणून सर्व देव ब्रह्मदेवाबरोबर शंकराकडे आले. शंकराने येण्याचे कारण विचारून घेतले व म्हणाला–"मी त्रिपुरासुरांचा वध करणार नाही. तुम्हांला पाहिजे असेल तर मी आपले अर्धे तेज देतो. त्याच्या मदतीने तुम्हीच त्याचा वध करा."

तेव्हां ब्रह्मदेव शंकराला नम्रपणे म्हणाला–"महादेवा! मी त्रिपुरासुरांना काही वर दिले आहेत. म्हणून माझे तेज सुद्धा तू घे." ब्रह्मदेवाने शंकराला, त्रिपुरासुरांना दिलेल्या वराची कल्पना करून दिली. त्यासाठी तीन वस्तूंची गरज होती (१) रथ नाही असा रथ (२) धनुष्य नाही असे धनुष्य आणि (३) बाण नाही असा बाण. म्हणून शंकराने पृथ्वीचा रथ केला. वेद त्या रथाला घोडे म्हणून जुपले. सूर्य चंद्र त्या रथाची चाके केली. मेरु पर्वताचा धनुष्य केला, आदिशेषाला त्या धनुष्याची दोरी करण्यात आले व स्वत: विष्णूला नारायणास्त्र म्हणून बाण करण्यात आले. अशी तयारी करून शंकराने त्रिपुरासुरांना भस्म केले. त्यांची राख पृथ्वीवर पसरली.

त्रिपुरासुरांच्या वधानंतर जलंधर नावाचा एक राक्षस त्रिलोकात धुमाकूळ माजवू लागला. त्याचे खरे नाव सूकर होते. तो हिरण्यकश्यपूचा दहावा मुलगा अग्निजिव्ह याचा मुलगा होता. त्याने ब्रह्मदेवाचे स्मरण करून घोर तपश्चर्या केली आणि असा वर [illegible] राक्षस, नाग किंवा मानव यांच्यापैकी कोणाकडूनही अपाय होणार नाही व पाण्यातच त्याला निवास करता येईल. तो वर मिळताच त्याने अष्ट दिग्गजांचा पराभव केला व त्रिलोक जिंकून राज्य करू लागला. जलंधर राक्षसाच्या हाती पराभव झाल्यामुळे शंकर कैलास पर्वत सोडून आणि विष्णु वैकुंठ लोक सोडून पळून गेले आणि मानस सरोवरावर जाऊन राहू लागले. दोघांनी तेथे तपश्चर्या करून परब्रह्माला प्रसन्न केले. परब्रह्माने शंकराला त्रिशूल व विष्णूला सुदर्शन चक्र देऊन सल्ला दिला की या आपापल्या शस्त्रांची अदलाबदल करून त्यांनी जलंधराचा वध करावा. त्याप्रमाणे शंकर व विष्णू दोघांनी आपल्या आयुधांची अदलाबदल केली आणि जलंधराची वाट पाहू लागले.

नारदाला ती गोष्ट कळली तेव्हां तो जलंधराला भेटून म्हणाला–"जलंधरा! अरे शिव व विष्णू मानस सरोवरात लपून बसले आहेत."

तेव्हां जलंधर लगेच मानससरोवरात शिरून शंकर व विष्णू दोघांना शोधू लागला. तें कळताच ते दोघे पाण्यातून बाहेर आले आणि मानस सरोवराच्या काठावर जलंधराची वाट पहात बसले. त्या वेळी शंकराच्या हातात चक्र आणि विष्णूच्या हातात त्रिशूल होते.

मानस सरोवर हुडकल्यावर देखील जेव्हां शंकर व विष्णू दिसले नाहीत तेव्हां जलंधर



बाहेर आला. त्याने काठावर दोघांना पाहिले. तो त्यांना मारायला धावला. त्यांनी दोघांनी मिळून जलंधरचे दोन तुकडे करून टाकले. जलंधरचा वध झाल्यावर त्रिलोकात आनंदीआनंद पसरला.

कश्यप प्रजापतीला विप्रजित नावाचा एक राक्षस मुलगा होता. विप्रजिताला दंभ नावाचा मुलगा होता. दंभ हा विष्णूचा भक्त होता. त्याला बरेच दिवस मूलबाळ नव्हते. म्हणून तो बद्रिकाश्रमात विष्णूचे स्मरण करून तपश्चर्या करू लागला. विष्णूने त्याच्या तपश्चर्येवर प्रसन्न होऊन वर मागायला सांगितले. तेव्हां तो म्हणाला—"देवा! मला आपल्या बरोबरीची शक्ति व सामर्थ्य असलेला पुत्र होईल असा वर द्यावा, त्रिलोक जिंकण्याची शक्ती त्याच्या अंगी असावी. तो अजिंक्य असावा आणि त्याच बरोबर आपला परमभक्त असावा."

विष्णूने 'तथास्तु' म्हटले आणि अंतर्धान पावला. दंभ आपल्या घरी परतला व ती शुभवार्ता त्याने आपल्या पत्नीस सांगितली. [illegible] रत्न झाले. त्याचे नाव शंखचूड असे ठेवण्यात आले. मुलाचे सर्व लाड आईवडिलांनी पुरविले. शंखचूडने शुक्राचार्यांकडे सर्व विद्या शिकून घेतल्या. वयात आल्यावर तो विन्ध्य पर्वतावरील अरण्यात राहू लागला. त्याने ब्रह्मदेवाचे स्मरण करून निर्जल अनशन व्रत घेतले आणि एका पायावर उभा राहून तपश्चर्या करू लागला. तेव्हां प्रसन्न होऊन ब्रह्मदेवाने त्याला वर मागून घेण्यास सांगितले.

तेव्हां शंखचूड म्हणाला—"ब्रह्मदेवा! मला देव, दानव व मानव यापैकी कोणी जिंकू शकणार नाही व सर्व सुख उपभोगण्यास भाग्य मिळेल, असा वर द्यावा."

ब्रह्मदेवाने त्याला त्याने मागितला तसा वर दिला व म्हणाला—"हे भक्तश्रेष्ठा, तू बदरिकाश्रमात जाऊन रहा. तेथे तुला तुलसी नामक कन्या तपश्चर्या करीत असलेली दिसेल. तू तिच्याशी विवाह करून घेऊन सुखपूर्वक आपले पुढील आयुष्य घालव." असे सांगून ब्रह्मदेव अंतर्धान पावला.



# १२६. वनगाईंचे पालन

सोविएट रशियात मास्को नगरापासून इशान्येला 'कस्त्रोम' नामक एक शेतकीची प्रयोगशाला आहे. त्या प्रयोगशाळेत वनगाई पाळण्यात आल्या आहेत. माद्या वनगाईंचे दूध काढण्याचा प्रयोग चालू आहे. त्यांना नवीन खाद्य व नवीन संवयी लावण्याचा प्रयत्न चालू आहे. वनगाईंच्या दुधात गाईंच्या दुधापेक्षा चरबीचा अंश तिप्पट असतो. त्यांचे दूध जास्त घट्ट असते व त्याला गोड वास असतो. हे दूध घुसळल्या शिवाय लोणी काढता येते.

येथे पाळण्यात आलेल्या वनगाई रानात स्वच्छंद विहार करतात. म्हणून वनगाईंच्या पालनाला खर्च कमी होतो. त्यांना उंच गोठे बांधण्याची गरज नसते. फार तर झोपड्या बांधल्या किंवा कुंपण घातले तरी पुरते. यांची संख्या दिवसेदिवस वाढत आहे. एका चांगल्या वनगाईचे वजन चारशे ते पांचशे किलो असते. यांना जंगलात उगवणारे साधे गवत पुरते. या प्रयोगशाळेत पाळलेल्या वनगाईंना भाजीपाला व गवत खायला घालतात. वनगाईंचे मांस, दूध, चरबी, शिंगे व कातडी फार उपयोगी असते यांना गाडीला जुंपतात अगर सामान वाहून नेण्याचे काम यांच्याकडून करून घेता येते. एकूण खर्च कमी असला तरी वनगाईंच्या पालनाचा खर्च कमी होतो.





# अमरवाणी

अहो प्रकृति सादृश्यम्
श्लेष्मणो दुर्जनस्य च,
मधुरैः कोप मायाति,
कटुकै रूप श्याम्यति ।                ॥ १ ॥

[दुष्ट व श्लेष्म यांच्यात स्वभावसाम्य असते. गोड पदार्थ खाल्याने श्लेष्मवृद्धी व कडूपदार्थांनि श्लेष्मह्रास होतो. तसाच दुष्ट मनुष्य गोड बोलल्याने रागावतो आणि कटु भाषण केलें तर गप्प बसतो.]

दातृत्वम्, प्रियवक्तृत्वम्
धीरत्व मुचितज्ञता,
अभ्यासेन न लभ्यंते,
चत्वारस्सहजा गुणाः ।                ॥ २ ॥

[दानशीलपणा, प्रिय भाषण, धैर्य व औचित्य हे गुण मनुष्यात जन्मतः सहजी असायला हवेत. शिकून अभ्यास करून येत नसतात.]

अभुक्त्वामलकम पथ्यम्
भुक्त्वा तु बदरीफलम्
कपित्थम् सर्वदा पथ्यम्
कदली न कदाचन्                ॥ ३ ॥

[रिकाम्या पोटी आंवळा, जेवणानंतर बोरे आणि कवठ हे नेहमीच पथ्य असते; परंतु केळे हे कधीच नसते.]



# चार प्रवासी

विमला नावाची एक हुशार बाई लग्न झाल्यावर सासरी आली. सासरी पतीशिवाय दुसरे कोणी घरात नव्हते. पती स्वभावाने रागीट व संशयी असल्याचे विमलाला एक दोन दिवसातच कळले. त्याने बायकोला बजावून सांगून ठेवले होते की कधी कोणाशी बोलता कामा नये.

विमलाला नवरा म्हणाला ते अर्थातच आवडले नाही. तिला माहेरी पाहुणारावळा दररोज कोणीतरी असे. परंतु सासरी कोणी येत नसे. कारण गावकरी विमला-च्या नवऱ्याचा स्वभाव ओळखून होते.

एकदा विमला गावाबाहेर विहिरीवर पाणी भरायला गेली असतां कोणीतरी चौघे परदेशी तहान लागली म्हणून आले. त्यांच्यापैकी एक जण जो वयाने थोडा मोठा होता, पुढे येऊन विमलाला म्हणाला– "बाई, फार तहान लागली आहे, थोडे पाणी प्यायला देता का?"

विमलाने त्याला विचारले–"कोण हो तुम्ही?"

"मी एक परदेशी प्रवासी आहे." तो मनुष्य म्हणाला.

"या जगात फक्त दोनच प्रवासी आहेत. तिसरा प्रवासी कोणी नाही." विमला म्हणाली आणि आपले काम करू लागली.

पहिला प्रवासी पाणी प्याला नाही व नुसता उभा आहे हें पाहून दुसरा प्रवासी पुढे गेला. विमलाने त्याला विचारले–"हे म्हणाले की कोणी प्रवासी आहेत, अगदी खोटे. तुम्ही सुद्धां कोणी प्रवासीच का?"

त्या प्रवाश्याने विचार केला की आपण प्रवासीच आहो, म्हटले तर ती बाई प्यायला पाणी देणार नाही. म्हणून तो म्हणाला–"मी एक गरीब मनुष्य आहे."

सौ. सुगुणा सरपोहार



"या जगात फक्त दोनच जण गरीब आहेत. तुम्ही खोटे बोलता आहां." असे सांगून ती आपले काम करू लागली.

थोड्या वेळाने तिसरा प्रवासी विहिरीवर आला. विमलाने त्याला विचारले–"हे दोघे आपल्याला प्रवासी व गरीब म्हणून सांगून सपशेल खोटे बोलले. तुम्ही कोण?"

"मी एक मूर्ख आहे." तिसरा प्रवासी म्हणाला.

"तुम्ही देखील खोटे बोलता आहां. या जगात दोनच मूर्ख आहेत." असे सांगून विमला पुन्हा आपले काम करू लागली.

अगदी शेवटी चवथा प्रवासी विहिरीवर आला तेव्हां विमलाने त्याला विचारले–"कोण हो तुम्ही? ह्या तिघांनी एकेका-मागून येऊन स्वतःची अनुक्रमें प्रवासी, गरीब व मूर्ख म्हणून ओळख दिली. अगदी खोटे. तुम्ही तरी खरे बोलणार का?" विमलाने विचारले.

"मी दांडगा भीम आहे!" चवथा म्हणाला.

"या जगात दोघेच बलवान दांडगे आहेत. तुम्ही सुद्धा खोटेच बोललात." विमला म्हणाली आणि धुतलेले कपडे आणि घागर घेऊन घरी जातांना पुन्हा म्हणाली–"तुम्हांला तहान लागलेली दिसते आहे. पाणी पिऊन घ्या आणि मग माझ्या घरी या. जेवून खाऊन मग पुढे कोठे जायचे ते जा." असें सांगून तिने चौघांना पाणी प्यायला दिले आणि त्यांना आपल्या घरी बोलावून घेऊन निघाली.

बायकोच्या बरोबर चौघांना येत असलेले पाहून विमलाचा नवरा रागाने एक काठी घेऊन आला आणि बायकोला विचारू लागला–"कोण ग, हे लोक?"

"त्यांना विचारा!". विमला म्हणाली आणि घरात निघून गेली.

"अहो, आम्ही चौघे प्रवासी आहों. आम्हांला तहान लागली म्हणून आम्ही विहिरीवर गेलो होतों. तेथें आम्ही प्यायला पाणी देतां का विचारले यांना. त्यांनी पाणी प्यायला दिलं आणि घरी जेवायला बोलाविलें. म्हणून आम्ही आलो आहों," प्रवासी म्हणाले.

"तुम्ही एका अनोळखी स्त्रीजवळ पाणी प्यायला मागायला गेलात? तुम्हांला लाज नाही वाटत?" असे म्हणत विमलाचा नवरा काठी घेऊन प्रवाश्यांना मारायला उभा राहिला. तेव्हां दांडगा भीम म्हणून ज्याने आपली ओळख सांगितली होती त्याने विमलाच्या नवऱ्याच्या हातातली काठी हिसकावून घेतली. तेव्हां दोघांची मारामारी सुरू झाली.

त्याच वेळी राजाचे शिपाई तिकडून जात होते. त्यांनी सर्वांना अटक केली आणि कोतवालाकडे बोलावून घेऊन गेले.

म्हणाले–"कोतवाल साहेब! हे लोक भर रस्त्यावर मारामारी करीत होते."

कोतवालाने सर्वांना दहादहा फटके देण्याची शिक्षा सांगितली. त्याच वेळी विमला तेथे आली व म्हणाली–"कोतवाल साहेब! आपण निकाल चुकीचा दिला आहे. आपण आपली चूक कबूल करायला तयार नसाल तर मी राजाकडे जाऊन फिर्याद करीन."

"जा, काय वाटेल ते कर." कोतवाल म्हणाला.

"तरमग राजा निकाल सांगेपर्यंत ही शिक्षा देतां कामा नये." असे सांगून विमला सरळ राजदरबारात गेली आणि म्हणाली–"महाराज! कोतवाल साहेबांनी



माझ्या पतीला व दोघां प्रवाश्यांना विनाकारण फटक्यांची शिक्षा सांगितली आहे. आपण कोतवाल साहेबांना बोलावून चवकशी करण्याची कृपा करावी."

राजाने कोतवालाला व बाकी पांच जणांना दरबारात बोलावून शिक्षा देण्याचे कारण विचारले.

कोतवाल म्हणाला—"महाराज! हे लोक भर रस्त्यावर मारामारी करीत असता पकडले गेले."

"हे सर्व कोण आहेत? भांडणाचे कारण काय होते?" राजाने विचारले.

विमला म्हणाली—"कोतवाल साहेबांनी ही चवकशी शिक्षा सांगण्यापूर्वी केली असती तर आपणांकडे फिर्याद घेऊन येण्याची गरज पडली असती का?" नंतर घडलेली गोष्ट सांगून ती म्हणाली—"महाराज! खरी चूक माझी व मला शिक्षा देण्याचा अधिकार माझ्या पतीस आहे."

"ते सर्व मान्य! पण तू यांना जगात दोनच प्रवासी, दोघेच गरीब, दोघेच मूर्ख [illegible] ते कसे काय?" राजाने विमलाला विचारले.

विमला म्हणाली—"महाराज! या जगात फक्त सूर्यचंद्र हे दोघेच सतत प्रवास करणारे प्रवासी आहेत. गाय व लग्नाची मुलगी दोघीच वास्तविक गरीब निरुपद्रवी आहेत. वरुण व वायू हे दोघेच खऱ्या अर्थाने बलवान आहेत."

"तू जगात दोनच मूर्ख आहेत म्हणालीस, ते कोण?" राजाने विचारले.

"मूळ चूक कोणाची व काय याची चवकशी केल्याशिवाय निकाल सांगणारा आणि घरी आलेल्या अतिथी अभ्यागताला मारायला धावणारा, माझ्या मते दोघे मूर्ख होत." विमला म्हणाली.

राजा विमलाची हुशारी पाहून खूष झाला. त्याने कोतवालाला तंबी दिली व बायकोशी अशा संशयी वृत्तीने वागू नये असे विमलाच्या नवऱ्याला समजावून सांगून सर्वांना निरोप दिला.





# घोड्याचे अंडे

परमानंद गुरु व त्यांचे शिष्य त्यांच्या मूर्खपणाबद्दल प्रसिद्ध होते. एकदा गुरु आपल्या शिष्यमंडळींबरोबर मठात बसले होते. एका शिष्याच्या मनात एक अद्भुत विचार आला. तो आपल्या सहपाठी शिष्यांना म्हणाला—"आपल्या गुरुवर्यांना माहीत नाही अशी एक ही वस्तू या जगात असणे शक्य नाही. त्यांना वार्धक्य आले आहे. हिंडता फिरता येत नाही. म्हणून त्यांना आपण एक घोडा विकत आणून दिला पाहिजे.

सर्व शिष्य परस्परांकडे पाहू लागले व सर्वांना आपल्या त्या सहाध्यायाचा सल्ला पसंत पडला. गुरु परमानंदांनीं पण होकार दिला. म्हणाले—"तुमच्यासारखी शिष्यमंडळी आहेत म्हणून माझ्यासारख्या गुरूची कदर होत आहे."

दोघां शिष्यांनी गुरुसाठी एका उत्तम घोड्याचा शोध काढून आणण्याची जबाबदारी आपल्या शिरावर घेतली. दोघे घोड्याच्या शोधार्थ निघाले.

बराच शोध केल्यावर त्यांना एका तलावाच्या काठी चार पाच घोडे चरत असलेले दिसले. जवळच एक मळा होता. कोहाळ्याच्या वेलाला मोठमोठे कोहाळे लागले होते.

एक शिष्य आपल्या साथी सहाध्यायाला म्हणाला—"हे घोडे तर चांगले दिसत आहेत. पण यांची किंमत फार होईल. त्यापेक्षां येथें घोड्याची अंडी बरीच पडलेली आहेत एक घेऊन जाऊ आणि उबवून घोडा निघाला म्हणजे थोड्या खर्चात गुरुवर्यांसाठी एक उत्तम घोडा मिळेल." दुसऱ्याला तो विचार पसंत पडला. दोघे शिष्य गुरुकडे परत गेले आणि त्यांनी गुरुला विचारले—"गुरुवर्य! एका जागी आम्हांला घोड्याची अंडी

दिसली. एक अंडे आणून उबवून घोडा निघाला तर तो घोडा आपल्याला स्वस्त पडेल नाही का?"

"छान छान! तुमच्या या विचाराबद्दल तुमची पाठच थोपटली पाहिजे! पण घोड्याचे अंडे उबवायचे कसे?" गुरूने विचारले.

शिष्यांनी परस्पर सल्ला करून अंड्या-तून घोडा निघेपर्यंत पाळीपाळीने दररोज त्या अंड्यावर बसण्याची जबाबदारी घेतली. त्यानंतर ते दोघे शिष्य घोड्याचे अंडे विकत घ्यायला पुरेसे पैसे घेऊन मळ्यात आले. त्यांनी माळ्याला विचा-रले—"काय रे बुवा? घोड्याचे हे अंडे तु केवढ्याला देणार?"

शेतकऱ्याने दोघे मूर्खराज असल्याचे ओळखले आणि थट्टेत म्हणाला—"घोड्या-च्या या प्रत्येक अंड्याची किंमत वीस रुपये आहे."

"एवढीच? वीसच रुपये?" दोघांनी चकित होऊन विचारलें आणि वीस रुपये [illegible] ठेच लागली आणि तो कोहळा जमिनीवर पडून फुटला. त्याच वेळी जवळच्या झाडीत बसलेला ससा दचकून पळाला. तो दोघांनी पाहिला.

"अरेरे! अंडे फुटले आणि आंतून घोड्याचे पिल्लू बाहेर पडून पळून गेले की रे! पाहिलेस घोड्याचे पिल्लू अंड्यातून बाहेर पडल्याबरोबर किती जोराने पळाले ते! मोठा घोडा झाल्यावर नक्कीच आका-शात उडू लागेल!" असा विचार करून दोघे सशाला झाडीत हुडकू लागले. परंतु तो का त्यांना सापडणार? हताश होऊन दोघे मठात परत आले आणि घडलेले वृत्त गुरुवर्यांसमोर निवेदन करून चुकीची माफी मागितली.

"जाऊं द्या रे! हे सर्व विधिलिखित आहे! माझ्या नशिबी घोडा नव्हता, हेच खरे!" असें म्हणत गुरूने दोघां शिष्यांचे सांत्वन केले.





# यक्ष पर्वत

[ २ ]

[अशी बातमी कळली की गेंडा जातीच्या लोकांची पिके काही लुटेरे कापून नेत आहेत. तेव्हां गेंडा जातीच्या लोकांनी आपल्या मंत्र्याच्या सल्ल्याप्रमाणे त्या लुटेऱ्यांना पळवून लावायचें ठरविले. ते तसे गेले देखील. पण हिंमत हारले. तेव्हा झाडावर बसलेल्या स्वर्णाचारीने त्यांना धीर देण्याचा प्रयत्न केला. परंतु लुटेऱ्यांच्या पुढाऱ्याने त्या माणसाला भाला उगारून खाली उतरून यायला सांगितले. पुढे–]

लुटेऱ्यांच्या नायकाचा चेहरा पाहूनच स्वर्णाचारीची गाळण उडाली. आता आपल्याला हे लोक जिवंत सोडणार नाहीत असे त्याला वाटले. गेंडा जातीचे लोक जीव मुठीत घेऊन अरण्यपूरच्या वाटेने पळत जात होते. म्हणून स्वतःचा जीव वाचविणे शक्य नाही, असे स्वर्णाचारीला सहाजिकच वाटले. त्याच बरोबर झाडावर बसून राहण्यात किंवा खाली उतरून येण्यात दोन्ही तऱ्हेने धोका आहे, असेदेखील त्याला वाटले.

"काय रे, इतका वेळ तू आपल्याला बृहस्पतीचा अवतार समजत होतास आणि आतां एकाएकी तुझी वाचा कां बंद झाली? खाली उतरून येतोस की फेकू भाला?" लुटेऱ्यांच्या नायकाने स्वर्णाचारीला दरडावून



विचारले. स्वर्णाचारी ते ऐकून जास्तच घाबरला आणि निमूटणे उतरून खाली येऊ लागला. उतरतांना कांपऱ्या आवाजात म्हणू लागला–"अहो, या गरीबाचा उगाच जीव कां घेता? मी पहिल्यानेच तुम्हांला नाही का सांगितले मी एक वास्तुशास्त्री आहे. एकाद्या झोपडीपासून राजवाड्यापर्यंत कोणतेहि बांधकाम कसे करावे, हे मला विचारून घ्या."

ते ऐकून लुटेऱ्यांचा नायक खदखदां हंसून म्हणाला–"तू काय बरळतो आहेस रे? तुला काय वाटले, मी एखादा वाडा बांधण्यासाठी तुझा सल्ला विचारायला आलो आहे? नाक दाबल्या बरोबर तुझे तोंड उघडले वाटते? तू पहिल्याने खाली उतरून येतोस की नाही?"

स्वर्णाचारी त्यानंतर एक चकार शब्द बोलल्याशिवाय झाडावरून खाली उतरून आला. लुटेऱ्यांचा नायक उंटावरच बसून राहून स्वर्णाचारीकडे निरखून पाहू लागला. म्हणाला–"तू गेंडा जातीचा दिसत नाहीस. पण तू या जंगलात कशासाठी आला होतास रे?"

"सरदार! मी आपल्या सूज्ञपणाची आणि सूक्ष्म दृष्टीची प्रशंसा ती काय करणार? आपण मला बरोबर ओळखलेत, मी गेंडा जातीचा नाही. मी पद्मपूरचा राहणारा आहे. घरे बांधणे हा माझा धंदा आहे. मी यंत्र निर्माण करण्यात देखील निष्णात आहे. मला घरे बांधण्याच्या धंद्यात पोटापुरती मिळकत होत नाहीशी झाली तेव्हां मी यंत्रनिर्माणविद्येचा प्रयोग करून विघ्नेश्वर पुजाऱ्याला मदत करण्याचे ठरविले. मी एक कृत्रिम हत्ती तयार करून त्याच्या शत्रूला पुरेसे करून सोडले. परंतु दोघां तरुण क्षत्रियांनी माझे गुपित ओळखले आणि आतां त्यांच्याच 'कृपेने' या जंगलात येऊन पडलो आहे. आमचे पद्मपूर दूर राहून गेले आहे." स्वर्णाचारी म्हणाला.

"काय रे, तू कोणी धर्मात्मा थोर पुरुष स्वतःला मानतो आहेस वाटते? तू या प्रदेशात काय करीत होतास, हा सरळ प्रश्न विचारला होता. परंतु तू कोणत्या तरी शहराचे नाव सांगितलेस आणि आणखी पुष्कळ बढाया मारल्यास! त्या गावचा कोणी आणखी जवळपास आहे का?" हे मी विचारण्यापूर्वी लुटेऱ्यांच्या नायकाने उंटावरून खाली उतरून भाल्याचे टोक स्वर्णाचारीच्या छातीवर ठेवले होते.

स्वर्णाचारी थरथर कांपत होता. तरी स्वतःला सावरून म्हणाला–"सरदार, माझा जीव घेऊ नका. मी कोण काय, थोडक्यात सांगितलेच आहे. पाहिजे तर सुरवातीपासून शेवट पर्यंत सविस्तर सांगतो. येथून थोड्याच अंतरावर दोन क्षत्रिय युवक आहेत. ते एक झोपडी बांधून बांधून त्यात रहात आहेत. त्यांच्या शेजारी दगडाचे एक झोपडे उभे करून मी विघ्नेश्वर पुजारी बरोबर राहतो."

क्षत्रिय तरुणांची गोष्ट ऐकून लुटेऱ्याच्या नायकाने संशयी नजरेने स्वर्णाचारीकडे एकदा पाहिले आणि विचारले–"येथून थोड्याच अंतरावर ते दोघे झोपडी बांधून रहात आहेत, म्हणतोस? या निर्जन जंगलात ते दोघे तपश्चर्या करीत आहेत का?"

"त्यांना तपश्चर्या करण्याची गरजच काय? ते युद्धकलेत निष्णात आहेत? जंगलात शिकार करणे, दुष्टांचे शासन



करणे आणि चांगल्या लोकांचे रक्षण करणे, हीच त्यांची नित्य नैमित्तिक कामे आहेत." स्वर्णाचारीने दोघांचे वर्णन मोठ्या उत्साहाने केले.

"अस्सं!" असे म्हणत लुटेऱ्यांचा नायक हसला. पण ते क्रूर हास्य होते. त्याने पुढे विचारले–"आम्ही गेंडा जातीच्या लोकांची शेते कापली, हे काम दुष्टपणाचे झाले का? त्यांना ही गोष्ट कळली तर ते काय करतील?"

स्वर्णाचारीचे मन सांगत होते की सांगून टाकावे की दुसऱ्याची शेते अशी कापून नेणे फार मोठी चोरी व दुष्टपणाच तर आहे आणि ते कळल्यावर दोघे क्षत्रिय



तरुण नक्कीच धावून येतील व तुमची सर्वांची खोड मोडतील. परंतु पुन्हां त्याने विचार केला, तो तसे बोलला तर त्या लुटेऱ्यांना खुले आव्हानच दिल्यासारखे होईल. म्हणून आपली चामडी बांच-विण्याचा विचार करून थोडा अडखळत म्हणाला—"सरदार! तुम्ही मला नीती आणि धर्म विचारू लागलात? हे माझ्या-सारख्या अशिक्षिताला काय कळणार?"

"तू वांचलास!" सुस्कारा सोडीत नायक म्हणाला. थोडा वेळ थांबून त्याने पुन्हां विचारले—"तू क्षत्रिय युवकांची झोपडी आहे म्हणाला होतास? चल, दाखव आम्हांला ती. अशा 'चांगल्या लोकांनी' या जंगलात राहणे आमच्या सारख्यांना धोक्याचे आहे."

स्वर्णाचारीला लुटेऱ्यांच्या बोलण्याचा भावार्थ कळला, त्या दोघां क्षत्रिय तरुणांचा शेवट करण्याचा सरदाराचा विचार असावा, हे त्याने ताडले. ते न समजण्या इतका तो भोळा नव्हता. त्या दोघांना आधी सावध केले पाहिजे. कसे होईल ते? तो विचार करू लागला.

लुटेऱ्यांच्या नायकाने स्वर्णाचारी काही बोलत नाही हे पाहून दरडावून विचा-रले—"काय, कसल्या विचारात आहेस? पळण्याचा विचार आहे वाटते? खबरदार! त्यापूर्वी हा भाला तुझ्या छातीच्या आरपार जाईल, आहे का लक्षात? आणि तुला या झाडाला टांगून ठेवून देईन" नायक धमका-वून म्हणाला.

स्वर्णाचारीने विचार केला की बोलण्यात गुंतवून लुटेऱ्यांच्या नायकाला फसविणे शक्य नाही. ते लक्षात ठेवून स्वर्णाचारी काही टाळाटाळ केल्याशिवाय दोघां क्षत्रिय तरुणांच्या झोपडीच्या वाटेने गुपचुप चालू लागला. नायक पुन्हां उंटावर बसला आणि दोघां अनुयायांना बरोबर चलायला खूण केली.

स्वर्णाचारी पुढेपुढे चालत होता आणि त्याच्या पाठीमागून तिघे लुटेरे चालत होते. थोड्याच वेळाने ते सब एका झोपडी-जवळ येऊन पोचले. फुलझाडे व फळझाडे चारीबाजूला होती व त्यांच्या मध्यभागी एक पर्णकुटी होती. त्या झोपडीच्या चारी बाजूला कांटेचे कुंपण होते. कुंपणाबाहेर एक गाय चरत होती.

लुटेऱ्यांच्या नायकाने गाईला पाहून विचारले—"काय रे स्वर्णाचारी! ही गाय दुभती दिसते आहे? पण हिचे वासरू कोठे दिसत नाही?"

"होय सरदार! ही गाय दुभतीच आहे. हिचे वासरू झोपडीच्या पलीकडे चरत असेल." स्वर्णाचारी म्हणाला. आता त्याच्या समोर दोघां क्षत्रिय तरुणांना शत्रू दारा-पाशी येऊन उभा असल्याचे कसे कळवायचे आणि कसे सावध करायचे हा प्रश्न उभा राहिला. परंतु लुटेरे त्या गाईविषयी विचारपूस करीत होते व त्याला विचार करू देत नव्हते.

"सरदार, तुम्ही येथेच थांबा, झोपडीत ते क्षत्रिय तरुण आहेत की नाही गुपचुप पाहून येतो." स्वर्णाचारी भोळसटपणाचे सोंग करीत म्हणाला.

तेव्हां लुटेऱ्यांचा नायक हळूच स्मित करीत म्हणाला—"लबाडा! तुझी ही लबाडी माझ्याजवळ चालेल असे वाटले होय तुला? सिंध प्रांताच्या वाळवंटातून येथवर आम्ही



आलो आहो आणि तुझ्यासारख्या अनेक लबाडांना आम्ही पाहिले आहे. तू कुंपणा-जवळ उभा राहून मोठ्याने ओरडून सांग दूर परदेशातून काही पाहुणेमंडळी आली आहेत. समजले? जोराने ओरडून सांग!"

नायकाचा हेतू काय आहे स्वर्णाचारीने ओळखले. तो तसे म्हणाला की परदेशातून पाहुणे आले आहेत, तर दोघे तरुण काही शस्त्रास्त्र घेतल्याशिवाय बाहेर येतील तेव्हां त्यांना शेळ्या मेंढ्यांसारखे ठार करता येईल आणि तो तसे ओरडून म्हणाला नाही तर त्याला स्वत: मरावे लागेल. काय करावे, त्याला सुचेना.










"हं! कां, गप्प कां? ओरडून विचार की!" असे म्हणत लुटेऱ्यांच्या नायकाने भाल्याचे टोक स्वर्णाचारीच्या पाठीवर टेकून ठेवले.

"उंटावर बसून परदेशातून पाहुणे मंडळी आली आहेत!" स्वर्णाचारी दोन तीनदा असे ओरडून म्हणाला. परंतु झोपडीतून कोणी बाहेर आला नाही की झोपडीत हालचाल झाल्यासारखे भासले नाही.

तेव्हां स्वर्णाचारी संकट टळल्याच्या आनंदात म्हणाला–"सरदार! दोघे क्षत्रिय तरुण शिकारीला कोठेतरी बाहेर गेलेले दिसतात!"

जोराने हाक मार!" लुटेऱ्यांचा नायक म्हणाला.

स्वर्णाचारी या खेपेस आणखी जास्त जोराने ओरडून म्हणाला. परंतु झोपडीतून कोणी बाहेर आला नाही. तेव्हां नायकाने आपल्या एका अनुयायाला स्वर्णाचारीवर नजर ठेवायला सांगितले व स्वतः दुसऱ्या अनुयायाबरोबर उंटावरून उतरून कुंपण ओलांडून झोपडीजवळ गेला.

झोपडीचे दार बंद होते. बाहेरून बांधलेले होते. ते पाहून नायक आपल्या अनुयायाला म्हणाला–"स्वर्णाचारी म्हणाला ते खरे असावे. दोघे क्षत्रिय तरुण आत नाहीत. आपण आत जाऊन पाहू तर या. एकादी कामाची वस्तू मिळेल, कदाचित!"

त्यानंतर दोघे दाराची दोरी सोडून आत गेले. त्यांना झोपडीत कामाची एक देखील वस्तू दिसली नाही. भिंतींवर वाघ, अस्वले, हरणे आदि जंगली जनावरांची कातडी टांगलेली होती. झोपडीच्या एका कोपऱ्यात दोन भाले व धनुष्यबाण भिंतीला टेकून ठेवलेले होते.

"हे दोघे चांगले धनुर्धारी दिसतात. दुरून शत्रूला किंवा जंगली जनावरांना ठार करायला धनुष्य बाणासारखे उपयोगी

शिकून घेतली पाहिजे. तू ते धनुष्यबाण उचलून घे." नायक आपल्या अनुयायाला म्हणाला.

नायकाच्या आज्ञेप्रमाणे त्या अनुयायाने धनुष्यबाण उचलून घेतले. नायकाने झोपडीत पुन्हा लक्षपूर्वक एकदा पाहिले. परंतु उपयोगी किमती वस्तू एकदेखील दिसली नाही. म्हणून निराश होऊन बाहेर आला.

"स्वर्णाचारी! काय रे त्या दोघांनी या झोपडीत धान्य सुद्धा ठेवलेले दिसत नाही? धनुष्यबाण व वाघा हरणांच्या कातड्या-शिवाय काही दिसत नाही? हत्तीचे दात देखील नाहीत? ते हत्तीची शिकार करीत नाहीत वाटत?" नायकाने स्वर्णाचारीला विचारले.

"सरदार! हे दोघे क्षत्रिय वीर खाण्या-करिता एकाद्या जंगली जनावराची शिकार करतात. उगाच हौशीखातर शिकार करीत नाहीत. जी व्याघ्रचर्में त्यांच्या पर्णकुटीत तुम्हांला दिसली तीं देखील त्यांनी आत्मरक्षणासाठी ठार केलेल्या वाघांची आहेत." स्वर्णाचारी म्हणाला.

"म्हणजे यांना हत्तीचे दात किती मूल्यवान आहेत, हे अजून कळलेले दिसत



नाही." लुटेऱ्यांचा नायक त्याच्यावर व्यंग्य करीत म्हणाला.

त्यानंतर त्याने आपल्या अनुयायांना गाईकडे खूण करीत म्हटले–"उंटाचे दूध पिऊन पिऊन त्याचा वीट आला आहे. ह्या गाईला धरून घेऊन चला. पण हिचे वासरू दिसत नाही?" चारी-बाजूला पहात नायक स्वर्णाचारीला विचारू लागला.

एका लुटेऱ्याने गाईच्या गळ्यात दोरी बांधली आणि तिला ओढून नेऊ लागला. गाय स्वतःला सोडवून घेण्यासाठी हुंबा मारीत ओरडू लागली. तो आवाज ऐकून वासरू झोपडीच्या मागून समोर आले.

"अरे वा! मला वाटले होते तेच झाले. आता या स्वर्णाचारीला पण उंटावर बसवा." लुटेऱ्यांचा नायक म्हणाला.

ते ऐकून स्वर्णाचारी थरथर कापू लागला आणि म्हणाला–"सरदार! मला सोडा येथेच! मला येथे कोणत्याहि प्रकारचा त्रास नाही. मला येथेच पुढील आयुष्य घालविण्याची इच्छा आहे."

"ते नाही चालायचे. आम्ही जेथे राहतो तेथे चांगली घरे बांधण्याची कामे तुला करावी लागतील. थोड्याच दिवसांनी आम्ही या प्रदेशातल्या चार सहाशे मैला-तल्या टापूवर आपले राज्य कायम करणार आहो. आम्ही तुला त्या जागी इमारती बांधण्याचे काम देऊ. तीच आमची राज-धानी होणार आहे. मी तुला आपला दरबारी वास्तुशास्त्री म्हणून नेमून तुझा सत्कार करीन." लुटेऱ्यांचा नायक म्हणाला.

"सरदार! मला तशा मोठ्या हुद्द्याचा मोह नाही हो. मला येथेच जास्त..." स्वर्णाचारीच्या तोंडचे ते वाक्य पुरे होण्या-

बसविले. स्वर्णाचारी ओरडू लागला–"शत्रू! शत्रू! मला वांचवा!"

विघ्नेश्वर पुजाऱ्याने स्वर्णाचारीचा आवाज ओळखला आणि तो संकटात सांपडला असल्याचे पाहून जास्त विचार करीत न थांबता क्षत्रिय तरुणांनी पाळ-लेल्या वाघाच्या छाव्याला त्याने सोडले. त्याला दोघां क्षत्रिय तरुणांनी एका बांबूच्या पिंजऱ्यात कोंडून ठेवले होते. त्या वाघाची व गाईची बरोबर वाढल्यामुळे मैत्री झाली होती. गाईला सोडविण्यासाठी तो नक्कीच जाईल असा विचार करून पुजाऱ्याने त्याला बांबूच्या पिंजऱ्यातून सोडले होते. त्याचा तो अंदाज बरोबर ठरला. वाघ पिंजऱ्या-तून सुटल्याबरोबर गाईला धरून नेणाऱ्या लुटेऱ्यांच्या अंगावर धावला. एक लुटेरा त्या गडबडीत उंटावरून खाली जमिनीवर आदळला. वाघाने त्याच्यावरच झडप मारली व त्या लुटेऱ्याचा गळा धरला.

(क्रमशः)



# अकल्पित दंड

विक्रमादित्याने आपला हट्ट सोडला नाही. तो झाडाजवळ गेला, प्रेत खांद्यावर काढून घेतले आणि नेहमीप्रमाणे मौन होऊन स्मशानाच्या दिशेने चालू लागला. तेव्हां प्रेतात बसलेला वेताळ त्याला म्हणाला–"राजा, तुझ्या हातून काही अपराध घडल्याशिवायच तुला हा अकल्पित दंड भोगावा लागत आहे, असे मला वाटते. कधी कधीं असे अकल्पित कष्ट सोसावे लागतात. यज्ञसोमच्या मुलांना कारणा-शिवायच असे कष्ट सोसावे लागले होते. त्यांची गोष्ट मी तुला सांगतो." असे सांगून वेताळ गोष्ट सांगू लागला.

यज्ञस्थल नावाच्या एका गावी यज्ञसोम नावाचा एक श्रीमंत ब्राह्मण रहात असे. त्याला हरिसोम व देवसोम नावाचे दोन मुलगे होते. मुलांचे बालपण सुखात व आनंदात गेले. परंतु थोड्याच दिवसांनी

वेताळाच्या गोष्टी



यज्ञसोम आपली सर्व संपत्ती घालवून बसला. त्याचे दुःख त्याला व त्याच्या बायकोला फार वाटू लागले आणि त्या दुःखातच प्रथम मुलांची आई व नंतर यज्ञसोम स्वतः मरण पावले. मुलांच्या नशिबी दारिद्र्य आले आणि त्यांना माधुकरी मागून आपले पोट भरावे लागू लागले.

पुढे हरिसोम व देवसोम कष्ट सोसणे अगदी अशक्य झाले तेव्हां आपल्या आजोळी निघून गेले. वाटेत जे मिळेल ते त्यांना खावे लागे. कसे बसे ते आपल्या आजोळी पोचले. त्यांना त्यांचे आजोबा व आजी थोड्याच दिवसांपूर्वी वारले असल्याचे कळले. परंतु त्यांचे मामा यज्ञदेव व रुद्रदेव दोघांनी आपल्या भाच्यांना प्रेमाने आजोळी ठेवून घेऊन त्यांच्या विद्याभ्यासाची व्यवस्था करून दिली.

अशीच काही वर्षे लोटली आणि त्यानंतर दोघां मामांच्या नशिबीपण दारिद्र्य आले. म्हणून दोघां मामांनी भाच्यांना समजावून सांगितले की, मुलांनो! आतां आमची स्थिती इतकी खालावली आहे की तुमचा खर्च निभावणे आम्हांला शक्य नाही. तरी गुराख्याचे काम आज गड्याची मुले करीत आहेत त्यांच्या जागी तुम्ही करायला तयार असाल तर त्यात जे पैसे वाचतील तेवढ्या वर तुमचा खर्च भागेल.

हरिसोम आणि देवसोम दोघांना त्यांच्या मामांनी जे सांगितले ते ऐकून वाईट वाटले. परंतु दुसरा काही उपायच नव्हता, म्हणून दोघे गुराख्याचे काम करण्यास तयार झाले. ते दररोज गुरे चरायला घेऊन जंगलात जात आणि संध्याकाळी घरी परत येत. परंतु दुर्दैव जणुंकाही त्यांच्या पाठीशी लागले होते. एके दिवशी एका गाईला वाघ ओढून घेऊन गेला. दुसऱ्या दिवशी एक गाय चोरांनी पळवून नेली. आपल्या भाच्यांच्या निष्काळजीपणामुळे दोन गाई गेल्याचे मामांना फार वाईट वाटले. दोन गाई गेल्याने दुभते कमी झाले आणि गरीबी जास्त जाणवू लागली. त्यानंतर आणखी एक संकट ओढवले. एके दिवशी एक गाय आणि एक बकरा कसेतरी नाहीसे झाले.

हरिसोम आणि देवसोम त्या दिवशी फारच घाबरले. त्यांनी उरलेली गुरे मामाच्या घरापर्यंत कशीबशी पोचविली आणि कोणाला काही न कळवितां हरविलेली गाय व बकरा शोधून आणायला निघाले. रानात फिरत असतां त्यांना बकरा मेलेल्या स्थितीत एका जागी दिसला.

तो बकरा मामांनी यज्ञ करण्यासाठी राखून ठेवला होता. त्या बकऱ्याला वाघाने मारल्याचे मामांना कळले तर त्यांना राग येईल, असा विचार करून दोघांनी तो बकरा भाजून खाऊन टाकण्याचा विचार केला आणि कोठेतरी पळून जायचे ठरविले. त्याप्रमाणे एका जागी वाळक्या काटक्या जमवून त्यांनी तो बकरा भाजायला आगीत ठेवला.

तिकडे मामांनी गुरे दुपारीच घरी परत आलेली पाहिली व त्यांत एक गाय व बकरा कमी आहेत हे दिसले. बरोबर भाचेपण नव्हते. म्हणून दोघे मुलांच्या शोधार्थ रानात निघाले. त्यांना एका जागी दोघे बकरा भाजीत बसलेले दिसले. ते पाहून दोघांचा मामांना फार राग आला. त्यांनी जास्त विचार केला नाही आणि दोघां भाच्यांना शाप देत म्हणाले—"तुम्ही खाल्लचा अन्नाला जागला नाही आणि यज्ञासाठी राखून ठेवलेला बकरा भाजून खाण्याच्या विचारात आहां. या अपराधाबद्दल तुम्ही दोघे ब्रह्म-राक्षस व्हा!"



मामांना येत असलेले पाहून मुलांनी पळून जाण्याचा विचार केला होता, परंतु त्या पूर्वीच मामांनी त्यांना ब्रह्मराक्षस होण्याचा शाप दिला.

ब्रह्मराक्षस होऊन हिंडत असतांना दोघांना एका जागी एक योगी दिसला. ते त्या योग्याला खायला धावले. त्या योग्याने त्यांना शाप देऊन भुतें करून टाकले.

भुते झाल्यावर दोघांनी एका ब्राह्मणाच्या गाईला मारण्याचा विचार केला. त्या

ब्राह्मणाने त्यांना चांडाल व्हायचा शाप दिला. ते दोघे धनुष्यबाण घेऊन चांडाल रूपे हिंडू लागले. भुकेने जीव कासावीस झाला असता ते त्याच अवस्थेत चोरांच्या वस्तीत पोंचले. गावात पाहरा देणाऱ्या चोरांनी त्यांना कैद केले आणि आपल्या सरदारासमोर उभे केले.

चोरांच्या सरदाराने त्यांचे पूर्व वृत्त ऐकले तेव्हां त्याला त्यांची कीव आली आणि त्याने त्यांना सोडून द्यायला सांगितले. त्याने त्यांच्या खाण्यापिण्याची व्यवस्था करून देऊन त्याच्याच बरोबर राहायला सांगितले. त्यांना त्या दिवसापासून भीती वाटत नाहींशी झाली आणि कोणत्याही गोष्टीची उणीव भासतनाशी झाली. चोरां-बरोबर दोघे चोरी करायला जाऊ लागले व पुढे चोरांच्या त्या टोळीचे नायक झाले.

येथवर गोष्ट सांगून वेताळ म्हणाला– "राजा, अपराध केल्याशिवाय त्याचा दंड दोघां भाच्यांना कां भोगावा लागला? समाजाने क्रूरपणाने वागविले, त्या उलट [illegible] काय? या प्रश्नांची समाधानकारक उत्तरे माहीत असून दिली नाहीस तर त्याचा परिणाम तुम्हांला माहीतच आहे, तुझ्या डोक्याची शंभर शकले होऊन तुझ्याच पायांवर लोळू लागतील."

राजा म्हणाला–"माणसात स्वार्थ बुद्धी प्रधान असते. स्वार्थी माणसाचे नुकसान झाले म्हणजे त्याला राग येतो. मामांचे भाच्यांवर प्रेम कमी नव्हते. त्यांची खालावत चाललेली स्थितीच त्यांच्या क्रूरपणाच्या मुळात होती. योग्याने किंवा ब्राह्मणाने दिलेले शाप, वरदानासारखेच परिणामी ठरले. कारण ब्रह्मराक्षसापेक्षा भूताचे जीवित आणि भुताच्या जीवनापेक्षां चांडालाचे जीवन बरे. आतां चोरांची गोष्ट. ते सुद्धां मनुष्यच होत. त्यांच्या औदार्यामुळे दोघे हीन काम करून उन्नतीच्या मार्गालाच लागले."

अशा तऱ्हेने राजाचे मौनभंग होताच वेताळ पुन्हां झाडाला जाऊन लोंबकळू लागला. (कल्पित)





# राजाचा मावसभाऊ

**फा**र जुनी एक हजार वर्षांपूर्वीची गोष्ट आहे. वंग देशाच्या गादीवर एक हुशार व धर्मात्मा राजा राज्य करीत असे. त्याचा खजिना नेहमी भरलेला असे. कोणी याचक भिक्षु त्याच्याकडे येऊन रिकाम्या हाताने परतला असे झाले नाही.

एकदा दरबारात राजा बसला असता एक गरीब म्हातारा मनुष्य दारासमोर येऊन उभा राहिला आणि द्वारपालकाला म्हणाला–"मी राजाचा मावसभाऊ आहे व मला महाराजांना भेटायचे आहे."

"तुम्ही महाराजांचे मावसभाऊ?" द्वार-पालकाने चकित होऊन विचारले.

"होय, मला एका अत्यावश्यक कामाने महाराजांना भेटायचे आहे, गप्पांत वेळ घालवू नकोस." तो म्हातारा म्हणाला.

द्वारपालकाने दरबारात जाऊन राजाला ते सांगितले. राजा चकितच झाला. तरी त्या म्हाताऱ्याला बोलावून घेऊन यायला राजाने सांगितले. दरबारी पण 'महाराजां-च्या मावसभावाला' पहायला उत्सुकतेने वाट पाहू लागले.

थोड्या वेळाने म्हाताऱ्याने दरबारात पाऊल टाकले व लवून महाराजांना मुजरा केला. म्हाताऱ्याच्या हातात एक काठी होती. त्याचे कपडे जुने व फाटके होते.

राजाने विचारले–"कोण तुम्ही?"

म्हातारा–"महाराज! मी आपल्या मावशीचा मुलगा, आपला मावसभाऊ!" राजाने स्मित करून विचारले–"दादा! कसे काय घरची सर्व मंडळी खुशाल आहेत ना?"

"खुशाल म्हणता महाराज! माझ्या आयुष्यात फार बदल झाला आहे. माझे सुंदर घर डगमगू लागले आहे, आज पडते की उद्यां याची चिंता आहे. माझे बत्तीस

श्री. मु. र. पाटील

      

नोकर, जे आजपर्यंत इमाने इतबारे माझी सेवा करीत होते, एक एक करून मला नमस्कार सांगून निघून गेले. माझे बाहेरचे काम फक्त दोघांवर भागत होते, आतां तिघे लागतात. माझे जवळचे दोन मित्र दूर गेले आणि दोघे मित्र दूर होते ते जवळ आले." म्हातारा म्हणाला.

"तरमग, तुम्ही माझ्याकडे कशासाठी आलां आहां?" राजाने विचारले.

"महाराज, माझे पुढील आयुष्य सुखाने जावे, यासाठी आपल्या मदतीची गरज आहे." म्हातारा म्हणाला.

राजाने म्हाताऱ्याला एक रुपया दिला, तो पाहून म्हातारा निराश होऊन म्हणाला–

बाबतीत ती कीर्ती खोटी ठरली!"

"अहो दादा! आमचा खजिना रिकामा झाला आहे." राजा म्हणाला.

"खजिना रिकामा झाला असेल तर लंकेला कां नाहीं जात? लंकेत सोन्याच्या विटा आहेत?" म्हातारा म्हणाला.

"लंकेला जायचे म्हणजे समुद्र पार करावा लागतो!" राजा म्हणाला.

"पहिल्याने मला लंकेला पाठवा, म्हणजे आपणांला पायीच लंका पार येता येईल." म्हातारा म्हणाला.

राजा मोठ्याने हसला व त्याने खजिन-दाराकडून एक लाख रुपये मागवून



आभार मानून निघून गेला.

राजा व म्हातारा दोघांचे परस्परांशी जे बोलणे झाले आणि शेवटी महाराजांनी त्याला एक लाख रुपये दिले हे सर्व एका कोड्यासारखे दरबाऱ्यांना वाटले. राजाने ते ओळखले व दरबाऱ्यांना म्हणाला–

"त्या म्हाताऱ्याचे कोडे तुम्हांला उलगडलेले दिसत नाही? तो म्हणाला की तो माझा मावसभाऊ आहे. लक्ष्मी व सरस्वती दोघी सख्या बहिणी असून लक्ष्मी श्रीमंत व सरस्वती गरीब हे जगात प्रसिद्धच आहे. म्हाताऱ्याचे म्हणणे असे की मी लक्ष्मीचा मुलगा व तो सरस्वतीचा. असे आम्ही मावसभाऊ. त्याचे डगमगणारे घर म्हणजे त्याचे अशक्त झालेले शरीर. त्याचे बत्तीस नोकर म्हणजे त्याचे बत्तीस दांत. ते सर्व पडले आहेत. पूर्वी त्याला बाहेरच्या कामाला दोन सेवक म्हणजे दोन पाय पुरत असत. आतां तिसरा नोकर म्हणजे काठीची गरज पडते. पहिल्याने जे मित्र दूर होते ते जवळ आले आहेत. म्हणजे त्याच्या डोळ्यांना दूरचे दिसत होते. आता जवळचेच तेवढे दिसते. पहिल्याने जे मित्र जवळचे होते ते दूर निघून गेले आहेत. म्हणजे त्याला बरोबर ऐकू येत नाही. नंतर त्याने या सर्वांपेक्षा जास्त गमतीचे एक उत्तर दिले. मी त्याला लंकेला पाठविले तर समुद्र पार मी पायी जाऊ शकेन. मी त्याला म्हटले होते की माझा खजिना रिकामा झाला आहे. त्याचे त्याने ते उत्तर दिले होते. तात्पर्य एवढेच की तो दरिद्री देवीचा पुत्र आल्याबरोबर खजिना रिकामा झाला. त्याला द्यायला माझ्याकडे काही उरले नाही. त्यापेक्षा त्याला मी हद्द पार लंकेला पाठवून दिले तर पुन्हां खजिना भरेल. त्याचे हे चातुर्य-पूर्ण उत्तर ऐकून मी त्याला एक लाख रुपये दिले.

तेव्हां दरबारी लोकांना म्हाताऱ्याचे गूढार्थ असलेले बोलणे कळले व महाराजांची मर्मज्ञता पण त्यांच्या लक्षात आली.



# दोघात क… फरक

एका गावी एक श्रीमंत मनुष्य रहात असे. तो चिक्कू व कवडीचुंबक होता. एक भिकारी त्याच्या घरी भीक मागायला आला आणि घरासमोरच्या ओटयावर बसला.

श्रीमंताला तो म्हणाला–"मालक, गरिबाला काही द्यावे."

"बाहेर नीघ काही मिळणार नाही." श्रीमंत म्हणाला.

भिकारी–एखादे, फाटके कापड तरी ?

श्रीमंत–काही नाही, चालता हो.

भिकारी–काही खायला तरी ?

श्रीमंत–काही नाही, एकदां सांगितले.

भिकारी–बिडीचे एक दोन तुकडे तरी ?

श्रीमंत माणसाला आतां मात्र फार राग आला म्हणाला–"माझ्याकडे काही नाही, तुला सांगितले नाही का ?"

"बरोबर आहे, धनी ! आपल्या दोघांत काय फरक आहे ? तुम्ही सुद्धां चला माझ्याबरोबर. चार घरे भीक मागितली तर पोट भरेल." भिकारी म्हणाला.





# याचको याचक: शत्रु:

'याचको याचक: शत्रु:', भिकारी परस्परांचे शत्रू असतात, असा एका संस्कृत म्हणीचा अर्थ आहे. अगदी अशीच एक गोष्ट मागे दक्षिणेतील एका गावी घडली. त्या गावी राघव आणि शंकर नावाचे दोघे भिकारी मित्र होते. पहिला विष्णुभक्त होता व दुसरा शिवभक्त. दोघे भीक मागत गावोगाव फिरत.

राघव सकाळी उजाडल्यावर एका गावी भीक मागायला एका दिशेने निघाला आणि शंकर दुसऱ्या दिशेने. एका घरासमोर जाऊन राघव म्हणाला–"गरिबाला एक मूठ तांदूळ द्या हो !"

त्याच वेळी घरात मालकीण आपल्या मुलीला म्हणाली–"माझे ऐकले नाहीस तर तुला त्या भिकाऱ्याला देऊन टाकीन."

नंतर ती मूठभर तांदूळ घेऊन बाहेर आली. भीक घेतल्यावर राघव घरासमोरून हलेना. म्हणाला–"बाई, तुम्ही मुलीला देणार म्हणाला होता ना."

मालकिणीला राग आला. म्हणाली–"होय, थांब, मालक शेतावरून आले म्हणजे एकाच्या जागी दोन देतील."

माधव मालक येईपर्यंत तसाच थांबला. मालकाने घरी आल्यावरोबर घरधनीणीला विचारले–"ह्या भिकाऱ्याला भीक का नाही वाढली ? उभा आहे हा !"

बायकोने थोडक्यात भिकारी उभा असण्याचे कारण सांगितले.

मालकाने त्या भिकाऱ्याला आपल्या काठीने दोन लगावल्या व म्हणाला–"एकाच्या जागी दोन घे !" राघव "ओय ओय" करीत तेथून निघून गेला.

दोघे भिकारी गावातल्या धर्मशाळेत उतरले होते. राघव परत धर्मशाळेत जातांना विचार करू लागला की शंकरलापण असाच

सौ. गंगूताई बापट

चोप मिळाला पाहिजे. परत आल्याबरोबर शंकरने त्याला विचारले–"कायरे राघव! तुला आज उशीर कां झाला?"

"नाही रे, त्या समोरच्या गल्लीच्या टोकाला एक शेतकरी राहतो. त्याच्या मुलीचा आज वाढदिवस आहे. त्याने मला लाडू, जिलब्या आणि कायकाय पक्वान्नं वाढली रे! मी तू येशील म्हणून बराच वेळ वाट पाहिली." राघव म्हणाला.

राघव म्हणाला ते ऐकून शंकरच्या तोंडाला पाणी सुटले. म्हणाला–"तरमग मी जाऊन येतो त्याच्या घरी!"

"तू सरळ जा, दारासमोर नारळाचे झाड आहे. घरासमोर जाऊन म्हण–'बाई, मुलगी देणार म्हणाला होता! आलो

तसे बोलायला सांगितले.

शंकर लाडू जिलब्यावर हात मारण्याचा विचार करीत निघाला. त्या वेळी राघवने तसे म्हणायला कां सांगितले याचा विचार सुद्धा त्याच्या मनात आला नाही. आपला साथी भिकारी असा कावेबाज असेल असे त्याला स्वप्नात देखील वाटले नाही. त्याने त्या शेतकऱ्याच्या घरासमोर जाऊन राघवने सांगितल्याप्रमाणे म्हटले.

ते ऐकून "कोण रे आला आहे मुलीला घ्यायला?" असे म्हणत शेतकरी दांडके घेऊन बाहेर आला व त्याने शंकरला खूप बडवून काढले. राघवने आपल्याशी दगाबाजी केल्याचा शंकरला राग आला. त्याने



धर्मशाळेत जाऊन झोपला.

दुसऱ्या दिवशी दोघे उजाडण्यापूर्वी लोळत पडले होते. शंकर राघवला म्हणाला–"काय रे, पाहिलीस का गंमत? हे वासे आहेत ना कसे माझ्या आडव्या गंधासारखे तुझ्या उभ्या त्रिपुंड्रासारख्या (गंधासारख्या) या खांबावर चढून ऐटीत झोपा काढीत आहेत!".

"हे नाही मी चालू देणार!" असे म्हणत राघव छपरावर चढला आणि त्याने भराभर वासे ओढून खाली टाकून दिले आणि शंकरने उभे खांब पाडून टाकले.

थोड्या वेळाने शंकर राघवला म्हणाला–"पण. कायरे, धर्मशाळेचा मालक येऊन विचारू लागला तर? मी आपल्या गंधासारखी आडवी मान हलवीन आणि तू काय आपल्या त्रिपुंड्रासारखी उभी मान हलविशील. कारण असे बघ, उगाच तोंडावाटे काही शब्द निघाला तर मारामारीपर्यंत मजल यायची!"

परंतु राघवच्या लक्षात आले नाही की उभी मान हलविण्याचा अर्थ 'होकार' आहे आणि आडवी मान हलविण्याचा अर्थ 'नकार' आहे. चांगले उजाडल्यावर धर्मशाळेचा मालक गावातल्या मानकऱ्यांबरोबर गप्पा मारीत धर्मशाळेजवळ आला. "कोणीरे हे वासे व खांब काढून टाकले? तू की तू?" धर्मशाळेच्या मालकाने दोघां भिकाऱ्यांना विचारले. ठरल्याप्रमाणे शंकरने नकारार्थी मान हलविली आणि राघवने होकारार्थी धर्मशाळेच्या मालकाला व ग्रामप्रमुखांना तोच अपराधी आहे असे वाटले व त्यांनी त्याला धरून खूप बडविले.

दोघे दुसऱ्या गावी निघाले तेव्हां राघवने शंकरला विचारले–"कायरे, तू सुटलास आणि मार खावा लागला मलाच!"

"बाबारे! 'करावे तसे भरावे' अशी जुनी म्हण आहे, विसरलास का? तू शेतकऱ्याकरवी मला चोप देवविलास, मी धर्मशाळेच्या मालकाकडून तुला देवविला! त्यात गैर काय केले?"



# खुळी

एका गावी एका शेतकऱ्याला एक मुलगी होती. ती थोडी अर्धवट होती. नेहमी तिचे तोंड चालू असे. म्हणून तिचे लग्न जमत नव्हते. तिला तिच्या आईवडिलांनी किती समजाऊन सांगितले की, मुली कोणी तुला पहायला आले की बोलू नये. पण तिचे ते आपले चालूच.

एकदा एक चांगला मुलगा मुलीला पहायला येण्याचे ठरले. तिच्या आईने तिला चांगले लुगडे नेसवून उत्तमोत्तम दागिने घातले आणि सांगितले की, मुली, मी तुला हा विडा करून देते. मुलाने उंबरठ्यात पाऊल टाकले की लगेच तू हा विडा तोंडात घाल, बैठकीत येऊन बसला की चाव चाव आणि उंबरठ्याबाहेर तो निघून गेला की थुंकून टाक."

थोड्या वेळाने मुलगा आला. त्याने उंबरठ्यावर पाऊल टाकताच मुलीने आईला विचारले–"आई! उंबरठ्यात आला, तोंडात घालू ?"

ते ऐकून मुलगा दचकला आणि घाईघाईने बैठकीत येऊन बसला.

"आई, आतां तो बैठकीत आला आहे, चावू का ?" मुलीने विचारले.

ते ऐकून मुलगा बैठकीतून बाहेर पळाला.

"बैठकीबाहेर उंबरठा ओलांडून गेला ग. थुंकू ?" मुलीने विचारले.

मुलाने पुन्हां मागे वळूनसुद्धां पाहिले नाही. तेथून पाय काढला.





# डाव उलटला

एका गावी एक म्हातारा शेतकरी रहात असे. त्याच्याकडे शेती करण्यालायक जमीन नव्हतीच. होती थोडीशी जमीन, पण ती घर बांधण्या पुरेशी होती. या शिवाय त्याच्याकडे काही कोंबड्या होत्या व एक शिकारी कुत्रा होता. घराची राखण करायला.

मरणसमयीं म्हाताऱ्याने आपल्या दोघां मुलांनाजवळ बोलावून सांगितले की बाळांनो, भांडल्याशिवाय वांटे करून घ्या. कोणी कोणाला फसविण्याचा विचार करू नका व होईल तेवढी परस्परांना मदतच करीत जा. दोघांचे भांडण आणि तिसऱ्याचा लाभ अशी जुनी म्हण आहे. त्याची आठवण करुन देत आहे. असे त्याने समजावून सांगितल्या नंतर दोघां मुलांनी बापाच्या इच्छेप्रमाणे वांटे करून घेतांना वागायचे वचन दिले. म्हाताऱ्याने सुखाचा सुस्कारा सोडून डोळे मिटले.

बाप मेल्यावर दोघां मुलांनी घराकरिता बापाने ठेवलेली जमीन अर्धी अर्धी वांटून घेतली आणि आपापल्यासाठी झोपड्या बांधून राहू लागले.

मोठ्या मुलाचे नाव रामू होते व धाकट्याचे बाळू होते. रामूने मनात विचार केला की कोंबड्यांची वांटणी होऊ शकली तरी कुत्रा कसा वांटणार? म्हणून तो आपल्या धाकट्या भावाला बोलावून म्हणाला–"बाळू! अरे या कोंबड्या वांटून घेतल्या तर दोघांना त्यात काय मिळणार? त्यापेक्षा एकाने कोंबड्या घ्याव्या व दुसऱ्याने कुत्रा घ्यावा. मी कोंबड्या घेतो व तू कुत्रा घे." त्यात त्याचा हेतू स्पष्टच होता की कोंबड्या अंडी देतील ती विकून दररोज चार पैसे मिळतील. उलट कुत्रा दररोज फुकटाचे खाणार तेव्हां कुत्र्याला धाकट्या भावाच्या गळ्यात बांधून मोकळे व्हावे.

कु. सतीश म. देसाई

परंतु त्याच्या मनातला हेतू धाकट्या भावाला मुळीच कळला नाही व त्याने भावाची सूचना मान्य करून कुत्रा आपल्या घरी ठेवून घेतला.

मोठ्या भावाला अंड्यांचे पैसे मिळू लागले व त्याच्या पोटापाण्याची सोय झाली. परंतु धाकट्या भावाला स्वतःच्या पोटापाण्याबरोबर कुत्र्याच्या खाण्या-पिण्याची फिकीर करावी लागली. म्हणून तो कुत्र्याला घेऊन रानात शिकारीला निघाला. त्याच्या नशिबाने थोड्याच वेळाने कुत्र्याने एक हरण धरले. ते घेऊन तो बाजारात गेला. चांगली किंमत मिळाली. एका आठवड्या पुरेशी खाण्यापिण्याची तरतूद झाली व चार पैसे हातात उरले. अशाच तऱ्हेने एक दोन महिने गेल्यावर धाकट्या भावाची आर्थिक स्थिती सुधारत असल्याचे मोठ्या भावाला कळले व त्याला कारण कुत्रा आहे हे कळल्यावर त्याला आपली चूक लक्षात आली. धाकट्या भावाची सुधारलेली स्थिति त्याला पाहवेना.

मनाशी ठरविले.

एक दिवशी बाळू कोठे बाहेर गेला असतां रामूने भातात विष कालवून तो कुत्र्याला खायला घातला. कुत्र्याने थोडाच भात खाल्ला व तो मळमळू लागले म्हणून रामूच्या परसात जाऊन ओकला. रामूच्या कोंबड्या खुराडाबाहेर होत्या. त्यांनी तो खाल्ला आणि खुराडात जाऊन बसल्या.

दुसऱ्या दिवशी उठल्याबरोबर रामू कुत्रा मेला की नाही पहायला गेला तेव्हां तो छान फिरत असलेला पाहून त्याला आश्चर्यच वाटले. एवढेच नव्हे, तर थोड्या वेळाने बाळू कुत्र्याला घेऊन शिकारीला निघालेला पाहून तर तो चकितच झाला.

विष पचविणारा कुत्रा पाहून रामूला आश्चर्यच वाटले. नंतर तो आपल्या कोंबड्यांची अंडी काढायला खुराड्याकडे गेला तर सर्व कोंबड्या मेलेल्या होता. त्याने भावाविरुद्ध टाकलेला डाव कसा उलटला हे त्याला कळले नाही.





# नवऱ्याच्या शोधार्थ

[ २ ]

त्या गावी एक म्हातारी सूत काढीत असलेली मल्लिकेला दिसली. म्हातारी अर्धवट आवाजात बडबडत होती— "हा वृषवर्मा किती नीच आहे!"

"आजी, तुम्ही त्याला कां शिव्या देत आहां हो?" म्हातारीला मल्लिका कोणी पुरुषच असावा असे वाटले. म्हणून ती म्हणाली—"अरे, तुला माहीत नाही का? सर्व जग त्याची निंदा करते आहे."

त्याच वेळी दवंडी ऐकू आली—"वृद्ध-वर्माच्या सुनेचा पत्ता जो कोणी कळवील त्याला मनमुराद बक्षिस दिले जाईल. कोणी तिला लपवून आपल्या घरात ठेवले असेल त्याला फाशी देण्यात येईल! ही राजाच्या आज्ञा आहे, ऐका हो, ऐका!"

ती म्हातारी डोळ्यात पाणी भरून म्हणाली—"बा मुली, मल्लिके! बहाद्दर मुली! तू घरातून पळून गेलीस ना, बरे केलेस! त्या कुबड्याबरोबर संसार करायला लागणार होता तुला! तुझा नवरा यज्ञदत्त आहे."

ते ऐकून मल्लिका निर्धास्त झाली. तिने आपले खरे चरित्र त्या म्हातारीला सांगून टाकले. म्हातारीने प्रेमाने मल्लिकेला पोटाशी धरले आणि घरात बोलावून घेऊन जाऊन तिचा कापालिक वेश बदलून तिला आंघोळ करायला व विश्रांती घ्यायला सांगितले.

दुसऱ्या दिवशी सकाळी मल्लिका आपला कापालिक वेश धारण करून पुन्हां निघाली तेव्हां गावात जागोजागी लोकांचे थवेच्या थवे उभे होते. मल्लिकेने एकां माणसाला विचारले—"काय हो, ही गर्दी कसली?"

श्री ना. रा. कलघटगी

तेव्हां तो म्हणाला–"येथे बुद्धव[illegible] नावाचा एक व्यापारी आहे. त्याला एक कुबडा मुलगा आहे. त्याने आपल्या मुला-ऐवजी एका ब्राह्मण तरुणाचा एका सुंदर कन्येशी विवाह करून दिला. परंतु ते फक्त नाटक होते. वास्तविक ते लग्न त्या कुबड्याशी झाले असल्याचे त्या मुलीला जेव्हां कळले, तेव्हां ती पळून गेली."

"तुला त्या ब्राह्मण तरुणाचे घर माहीत आहे का? मल्लिकेने त्या माणसाला विचारले. त्याने 'होकार' दिला आणि तिला यज्ञदत्ताचे घर दाखविले. नंतर तो आपल्या वाटेने निघून गेला. यज्ञदत्त गरीब घराण्यातला होता. म्हणून त्याचे घर सामान्यच होते. यज्ञदत्त आपल्या शिष्यांस शिकवीत होता. [illegible] ग्रंथ शिकवीत आहां?"

"मनुस्मृतीत वर्णाश्रम धर्म म्हणजे काय याचे जे वर्णन दिले आहे ते शिकवीत आहे." यज्ञदत्त म्हणाला.

"ढोंग कशाला? अन्तर जातीय विवाह करून आपल्या विवाहित पत्नीला एका कुबड्याच्या हाती सोपविणाऱ्याला धर्म-शास्त्र शिकविण्याचा अधिकार नाही." मल्लिका स्पष्ट शब्दात म्हणाली.

"पितृआज्ञा पालन हा सत्पुत्राचा धर्म आहे. श्री रामचंद्राने पितृ आज्ञा पालनार्थ वनवास स्वीकारला नव्हता का?"

"तू अवतारी पुरुष रामचंद्राशी आपली तुलना करतो आहेस? बरे तर हे सांग, तू [illegible] आज्ञेने केलास?" मल्लिकेने विचारले.

यज्ञदत्ताजवळ त्या प्रश्नाचे उत्तर नव्हते. मल्लिका दुपारपर्यंत तेथेच बसून राहली व नंतर भीक मागायला म्हणून सांगून म्हा-तान्या ब्राह्मणस्त्रीच्या घरी गेली. त्या दिवसापासून दररोज मल्लिका दिवसा यज्ञदत्ताच्या घरी जाऊ लागली व रात्री त्या ब्राह्मण म्हातारीकडे येऊ लागली.

मल्लिकेला यज्ञदत्ताने गरीबीमुळेच हे धर्मशास्त्राविरुद्ध काम केल्याचे कळले. म्हणून तिने त्याची सांपत्तिक स्थिती बदलून त्याचे मन वळविण्याचे आपल्या मनाशी ठरविले. तिने आपल्या गळ्यातला मोत्यांचा हार विकला आणि जे धन मिळाले ते एका सुरक्षित जागी पुरून ठेवले. नंतर ती यज्ञदत्तला म्हणाली–"माझ्या सारख्या कापालिक साधूंना एका जागी पाच दिवसा-पेक्षा जास्त राहतां कामा नये. परंतु तुझ्यावर माझे जे वात्सल्य आहे, त्यामुळे मी पाच दिवसांहून जास्त राहले. आतां मला पुढे जायचे आहे. माझ्याजवळ महा-काळ मंत्रांचा एक ग्रंथ आहे. त्याच्या आधारे पृथ्वीच्या पोटात कोठे कोठे धनाचा सांठा आहे, हे सहजी कळतें. मी एका जागी असा एक सांठा शोधून काढला आहे. तू पाहिजेतर तो स्वाधीन करून घे."

तेव्हां यज्ञदत्त आपल्या एका दोघां शिष्यांना बरोबर घेऊन मल्लिकेबरोबर







निघाला. मल्लिकेने दाखविलेल्या जागी तांब्याचे हंडे मिळाले. ते घेऊन तो घरी आला. त्याने ती गोष्ट आनंदाने आपल्या वडिलांना सांगून कापालिकाजवळ महाकाल नावाचा ग्रंथ असल्याचे सांगितले.

तो म्हणाला–"अरे यज्ञदत्त! मग या वेद ग्रंथांच्या मागे कशाला लागतोस? त्या कापालिकच्या आश्रमात जाऊन महाकाल ग्रंथाचा अभ्यास कर.

कापालिक पुढल्या प्रवासाच्या तयारीत असल्याचे यज्ञदत्ताने पाहिले व म्हणाला–"गुरुवर्य! माझ्यासारख्या पाप्याला तीर्थाटन केल्याशिवाय मुक्ती मिळणे शक्य नाही."

[illegible] घेण्यात तिला त्रासच असल्याचे दर्शविले आणि म्हणाली–"तू कशाला एवढे कष्ट करतोस?" परंतु शेवटी तिने होकार दिला. दोघे काशीला येऊन पोचले. तेथे काही दिवस राहून नैमिषारण्याच्या प्रदेशातून प्रवास करीत ते गंगाद्वारी आले. तेथून कुरु, पुष्कर, महालय इत्यादि तीर्थांचे दर्शन करीत उज्जयनीला निघाले.

मल्लिका यज्ञदत्तला म्हणाली–"तू उज्जयनीला येणे इष्ट नाही. तू तेथे मोठा अपराध केला आहेस. तेथील लोक तुला क्षमा करणार नाहीत. म्हणून तू घरी परत जा."

परंतु यज्ञदत्त म्हणाला–"जेथे गुरु तेथे शिष्य! आपल्या पावलावर पाऊल टाकून जाणार!"

दोघे उज्जयनीला पोचले. तेव्हां मल्लिका यज्ञदत्तला भद्रवट नामक स्थानी रहायला सांगून म्हणाली–"मी एक सांठयाची जागा शोधायला जात आहे, यायला उशीर झाला तरी घाबरु नकोस."

नंतर ती क्षिप्रा नदीच्या काठी गेली. स्नान करून कापालिनीची वस्त्रे धारण केली आणि आपल्या वडिलांच्या घरीच भिक्षेला गेली. भिक्षा घालण्यासाठी मल्लिकेची एक दासी आली. तिने मल्लिकेला ओळखले आणि मालकिणीला जाऊन

म्हणाली–"आई! [illegible] [illegible] मुलगी कापालिनी वेशात बाहेर भिक्षा मागायला आली आहे."

मल्लिकेच्या आईने बाहेर येऊन मुलीचा हात धरला. तिच्या अंगावरची कपालिनीची वस्त्रे काढवून तिला स्वच्छ स्नान करविले व नंतर विचारले–"मुली, हे सर्व काय ग?"

मल्लिका म्हणाली–"आई! मी कापालिनी झाले, असे का वाटले तुला? तू बाबांना बोलावून आण. सर्व सांगते तुला."

सागरदत्त आल्यावर मल्लिका म्हणाली–"बाबा! तुमचे जांवई भद्रवट स्थानी आहेत. त्यांना आदरपूर्वक घेऊन यायला माझ्या भावांना पाठवा."

यज्ञदत्तकडे त्याचे मेहुणे गेले आणि म्हणाले–"चल रे, महाराजांनी, तुला घेऊन यायला सांगितले आहे."

यज्ञदत्त थोडा घाबरला. परंतु स्वत:ला सावरून म्हणाला–"माझा कापालिक मित्र परत येईपर्यंत तुम्ही थोडे थांबा!"

मल्लिकेचे बंधू स्मित करून म्हणाले–"आहे कोठे तुझा तो कापालिक? त्याला जेथे जायचे होते तेथे तो गेला आहे. त्यानेच तुझा पत्ता सांगून तुला धरून आणायला पाठविले आहे." ते त्याला आपल्या घरी बोलावून घेऊन गेले.

आपले जांवई परत आलेले पाहून सागरदत्तला आनंद झाला. सर्व त्याच्या भोवती घोळका करून उभे राहले.

पतीच्या शोधार्थ मल्लिकेने जे कष्ट सहन केले ते कळल्यावर यज्ञदत्ताच्या मनात मल्लिकेविषयी आदरभाव जास्त वाढला.

हळूहळू मल्लिकेने दाखविलेले दिव्य राजाला कळले. तिने तिला व यज्ञदत्तला बोलावून घेतले. त्यांना धन व जमिन दिली व म्हणाला–"मुली! तुझा पती ब्राह्मण आहे. त्याला त्याच्या कुलरीतीप्रमाणे ब्राह्मण धर्म चालू ठेवण्यास तू सर्व तऱ्हेने मदत केली पाहिजेस."

त्यानंतर यज्ञदत्त व मल्लिकेचा संसार सुखाचा झाला.



# काय प

एका गावी एक हुशार मनुष्य रहात असे. तो शिकला सवरलेला नव्हता. पण होता हुशार. एकदा त्याला दहा रुपयांची गरज होती. कोणाकडे मिळतील म्हणून त्याने पुष्कळ प्रयत्न केला. परंतु त्याला एक रुपयादेखील मिळाला नाही. तेव्हां त्याला एक उपाय सुचला.

गावात ओळखीचे एक वकील साहेब होते. त्यांच्याकडे जाऊन तो म्हणाला—"तुम्ही कायदेपंडित आहां व मी अशिक्षित खेडवळ. मी एक प्रश्न विचारतो तुम्हांला. जर तुम्ही उत्तर देऊ शकलात तर मला वीस रुपये द्यावे लागतील. तुम्हीदेखील मला एक प्रश्न विचारा. मी देऊ शकलो नाही तर मी तुम्हांला दहा रुपये देईन. कारण मी गरीब आहे."

वकील साहेबांनी त्या गोष्टीस होकार दिला.

तेव्हां त्याने विचारले—"सांगा वकील साहेब, तीन पाय व दोनचोची असलेला पक्षी कोणता?"

वकील साहेब त्याचे उत्तर देऊ शकले नाहीत, म्हणून वीस रुपये काढून देत ते म्हणाले—"आतां मी तोच प्रश्न तुला विचारतो, तू त्याचे उत्तर दे!"

"मी हारलो! हे घ्या दहा रुपये!" असे सांगून तो निघून गेला. त्याच्याकडे वकील साहेबांनी दिलेल्या वीस रुपयांपैकी दहा राहलेच होते.





# भोळसट केसू

एका गावी जानकी नावाची विधवा बाई रहात असे. तिला केसू नावाचा एक मुलगा होता. मुलगा भोळसट होता. त्याच्या आईने त्याला नानाप्रकारे शिकविण्याचा प्रयत्न करून पाहिला, पण फुकट!

एकदा जानकी आपल्या मुलाला म्हणाली—"बाळ, काही तरी काम धंदा करून चार पैसे मिळव."

"बरं आई, मी जिल्ह्याच्या गावी जाऊन आपल्या जोगते काम शोधून पाहतो. मला वाटेत खायला चार भाकऱ्या बांधून दे." केसू म्हणाला.

जानकीने मुलाला भाकऱ्या बांधून दिल्या. केसू भाकऱ्या घेऊन निघाला. थोडे अंतर चालून गेल्यावर दमल्यासारखे वाटले व भूक पण लागली. म्हणून एक तलाव पाहून त्याच्या काठच्या झाडाखाली तो बसला. त्याने खाऊन पिऊन घेतले आणि विश्रांतीसाठी जमिनीवर आडवा झाला. लगेच त्याला झोप लागली.

झोप मोडली तेव्हां संध्याकाळ होऊन गेली होती. त्याच वेळी त्याला झाडावर एक सरडा दिसला. सरडा आपले डोके वरखाली करून हलवीत होता. केसूला वाटले की सरडा त्याला विचारतो आहे की तुला काय पाहिजे?

केसू म्हणाला—"मला काम पाहिजे."
सरड्याने संवयीप्रमाणे आपले डोके हलविले.

"ओहो, तूच का काम देणार आहेस मला. मी उद्यापासून कामाला येतो. आतां संध्याकाळ झाली आहे." असे सरड्याला सांगून केसू आपल्या घरी गेला आणि तो आपल्या आईला म्हणाला—"आई, मला काम मिळाले आहे. उद्यापासून मी दररोज कामावर जाणार आहे."

त्या दिवसापासून केसू दररोज भाकऱ्या बांधून नियमितपणे घरून निघू लागला आणि तलावाकाठी खाऊन पिऊन झाडाखाली झोपू लागला.

असाच एक महिना लोटला व केसू पगार घेऊन आला नाही. तेव्हां त्याला त्याच्या आईने विचारले–"काय रे, तुझ्या मालकाने महिन्याचा पगार नाही दिला का?"

"उद्यां येताना पगार मागून घेऊन येतो, आई!" केसू म्हणाला.

दुसऱ्या दिवशी नित्याप्रमाणे खाऊन पिऊन केसू झाडाखाली झोपण्याचा उपक्रम करू लागला. त्याच वेळी त्याला सरडा दिसला. तो झाडाच्या बुंधाजवळच्या भोकातून बाहेर येत होता. तेव्हां केसूने त्याला विचारले–"मी एक महिन्यापासून तुझ्याकडे कामाला येतो आहे, महिन्याचा पगार देशील की नाही?" सरड्याने मान हलविली ती होकारार्थी आहे असे समजून केसू म्हणाला–"उद्यां येऊ म्हणतोस, बरं बुवा!" नंतर घरी आल्यावर तो आईला [illegible] आहे." त्याची आई, मिळेल उद्यां असे समजून स्वस्थ बसली.

दुसऱ्या दिवशी केसूने सरड्याला पाहतांच विचारले–"आणलास का पगार?" सरड्याने नित्याप्रमाणे डोके हलविले. पण त्याच्याजवळ काही नाही हे पाहून केसूला राग आला. त्याने त्याला एक दगड मारला. म्हणून सरडा बिळात पळून गेला.

केसू एक कुदळ व पहार घेऊन आला. त्याने सरड्याचे बीळ खणून काढले आणि आश्चर्य म्हणजे सोन्याची नाणी भरलेला एक हंडा तेथे सांपडला. केसूने खिसे भरून नेता आल्या तेवढ्या मोहरा काढून घेतल्या आणि बाकी तेथेच सोडून निघून गेला. त्याच्या आईला जेव्हां मोहरा कोठे व कशा मिळाल्या हे कळले तेव्हां ती काळोख पडल्यावर मुलाबरोबर त्या झाडाजवळ गेली आणि सर्व मोहरा उचलून घेऊन गेली. त्यानंतर केसूला कामधंद्याच्या शोधार्थ कोठेही जावे लागले नाही.





# धर्मात्मा

फार प्राचीन काळातील गोष्ट आहे. बगदाद येथे एक लक्षाधीश रहात असे. तो खूप दानधर्म करी म्हणून लोक त्याला 'धर्मात्मा' म्हणूनच ओळखीत.

त्याच गावात आणखी एक लक्षाधीश रहात असे. तो फार चिक्कू होता. परंतु त्याला दानी म्हणून कीर्ती मिळावी असे फार वाटे. तो 'धर्मात्मा' नावाच्या दानी पुरुषाचा हेवा करी.

त्याने धर्मात्मा होण्याचे मनाशी ठरविले रजाक नांवाच्या आपल्या एका विश्वासपात्र नोकराला तो म्हणाला–"रजाक! तूच काही तरी मार्ग काढ!"

रजाक म्हणाला–"मालक! धर्मात्मा होणे सहस्रावधी रुपये खर्च केल्याशिवाय शक्य नाही. परंतु मी एक उपाय सुचवितो. त्या धर्मात्म्याला आपल्या घरी मेजवानीला बोलवा. तो मेजवानीला आला म्हणजे मी त्याच्यासमोर दोन तीनदां निरनिराळी सोंगे करून येईन. प्रत्येक वेळी आपण मला शंभर दीनार द्या. ते पाहून तो धर्मात्मा आपली प्रशंसा गावातल्या चार चौघांसमोर करील. सर्व शहर आपल्या दानशूरपणाची स्तुती करू लागेल."

त्या लक्षाधीशाला तो सल्ला पसंत पडला त्याने दुसऱ्याच दिवशी त्या धर्मात्मा पुरुषाला मेजवानी साठी त्याच नोकरा करवी बोलावणे पाठविले.

रजाक धर्मात्म्याच्या घरी गेला आणि आपल्या मालकाचे नाव सांगून म्हणाला–"मालक! आपण उद्यां मेजवानीला येण्याची मेहरबानी करावी. माझ्या मालकांनी मला खास या कामासाठी आपल्याकडे पाठविले आहे."

"काय रे, तुझे मालक कधी कोणाला एक कवडीदेखील दान करीत नाहीत

सौ. सुशीला कृ. जोशी



आणि मला मेजवानी कशाला? धर्मात्मा त्या नोकराला म्हणाला.

"मालक! आमचे धनी दान करतात ते या कानाचे त्या कानाला कळू देत नाहीत. उद्यां आपण प्रत्यक्षच पाहून घ्यावे." रजाक म्हणाला.

"बरे तर मी येतो मेजवानीला, तू सांग आपल्या धन्याला." असे सांगून धर्मात्माने रजाकला निरोप दिला आणि आपल्या अजीज नांवाच्या विश्वासपात्र नोकराला बोलावून त्याने काय करायचे ते त्याला नीट समजावून सांगितले.

दुसऱ्या दिवशी धर्मात्मा त्या लोभी लक्षाधीशाकडे गेला. लोभी लक्षाधीश

आला. दोघे बोलत बसले होते तेवढ्यात रजाकने तेथून पाय काढला आणि एका आंधळ्या भिकाऱ्याचा वेष करून भीक मागायला आला. "आंधळ्याला एक पैसा द्या बाबा!" म्हणत दारासमोर उभा राहिला. लोभी लक्षाधीशाने काही बोलल्या-शिवाय शंभर दीनार थैलीतून काढून त्या आंधळ्याला दिले आणि म्हणाला—"आपले हे असे आहे या हाताने दिलेले त्या हाताला कळणार नाही."

आंधळा भिकारी गेल्यावर थोड्या वेळाने एक म्हातारा भिकारी आला. लोभी लक्षाधीशाने त्याला देखील शंभर दीनार दिले. दुपारपर्यंत एक फकीर, एक लंगडा, एक मुका, एक कुष्टरोगी असे दहा भिकारी आले. प्रत्येकाला त्याने शंभर शंभर दीनार दिले. लक्षाधीशाने आपल्या नोक-राच्या हुशारीची मनातल्या मनात स्तुती केली की त्याने इतक्या थोड्या वेळात किती चलाखीने वेश पालटले.

धर्मात्मा ते सर्व कौतुकाने पहात होता. लोभी लक्षाधीशाला म्हणाला—"आपल्या-सारखा दानी आजपर्यंत पाहिला नाही. दानशूर म्हणविण्यासाठी कित्येक लोक पैसे लुटतात. परंतु तुम्ही केलेले सर्व गुप्त दान और आहे बुवा!"

जुळून आला नाही तर कोणाला कळले असते का? पण सोडा ते अहो, पैसा आणि कीर्ती आपल्या बरोबर जाणार आहेत का?" लोभी म्हणाला.

धर्मात्मा निघून जाण्यापूर्वीच रजाक आपल्या नेहमीच्या वेशात घरात गेला. त्याच्या पाठोपाठ लोभी लक्षाधीश आत जाऊन त्याची पाठ थोपटून म्हणाला—"काय पण बेमालूम काम केलेस रे?"

रजाकने तीनशे दीनार काढून दिले.

"तीनशेच का रे? मी तर एक हजार आतापर्यंत दिले!" लोभी लक्षाधीश घाबरून म्हणाला.

"एक हजार कसे काय? मी तर फक्त तीनदां वेश पालटून आलो होतो व आपण मला प्रत्येक वेळी शंभर शंभर दीनारच दिले होते?" रजाक म्हणाला.

"तू तीनच वेळां आलास तर आणखी सात वेळां कोण तुझा सासरा आला होता?" लोभी लक्षाधीश जरा रागावून म्हणाला.

"आणखी सात वेळा कदाचित माझा नोकर अजीज आला असावा." धर्मात्मा म्हणाला.

त्याचा शांत गंभीर आवाज ओळखून लोभी लक्षाधीशाने व रजाकने दाराकडे वळून पाहिले. तेव्हां धर्मात्मा तेथे उभा होता.

"अजीज येईल थोड्या वेळाने. तो तुमच्या नोकरासारखाच माझा विश्वास-पात्र नोकर आहे. तो तुमचे सातशे दीनार नक्कीच आणून परत देईल." धर्मात्मा म्हणाला.

लोभी लक्षाधीशाला तोंडात मारल्या-सारखे झाले. त्याच वेळी अजीजने सातशे दीनार आणून त्या लोभी लक्षाधीशाला दिले.

आश्चर्य व अपमान दोन्ही भाव लोभी लक्षाधीशाच्या चेहऱ्यावर स्पष्ट दिसू लागले. त्याच्या तोंडावाटे एक शब्ददेखील बाहेर पडला नाही.



Fullscreen 127 48 / 76

## दारुड्या...

एका गावी एक लाकूडफोड्या रहात असे. तो खूप दारू पीत असे. एकदां दुपारी तो भर उन्हात लाकडे फोडीत होता आणि दमून भागून पाणी प्यायला एका खडकाळ जागी आला. तेथे पाणी स्वच्छ होते.

पाणी पिऊन झाल्यावर तो बडबडला–"या डबक्यातले सर्व पाणी दारू आणि हे सर्व खडक मांसाचे गोळे असते तर मी मनसोक्त दारू प्यालो असतो व मांसावर हात मारला असता. नंतर आपले डोके फोडून स्वर्गाला स्वतःच्या पायाने चढून गेलो असतो."

एका वनदेवीने त्या लाकूडफोड्याचे बरळणे ऐकले आणि त्याची परीक्षा घ्यायचे ठरविले. तिने डबक्यातले पाणी दारू आणि सर्व खडक मांसाचे तुकडे करून टाकले आणि गंमत पहायला लपून बसली. लाकूडफोड्या थोड्या वेळाने पाणी प्यायला आला व त्याने मनसोक्त दारू पिऊन घेतली आणि पोटभर मांस खाऊन घेतले. नंतर तो तेथेच झोपला.

संध्याकाळी झोप मोडली तेव्हां तो घरी निघाला. वनदेवीने त्याला विचारले–"कायरे, मनासारखे सर्व झाले मग तू आपले डोके फोडून स्वर्गात कां नाही गेलास?"

"ए देवी! तू तरी किती भाबडी दिसतेस ग? दारुड्याच्या बरळण्यावर तुझा एवढा विश्वास बसला का?" असे म्हणत तो आपल्या घरी निघून गेला.





## कुशलप्रश्न

एका गावी एक श्रीमंत मनुष्य रहात असे. त्याला शिवराम नावाचा एक मुलगा होता. त्याची एका गरीब मुलीशी ओळख झाली आणि दोघांनी लग्न करून घेतले. परंतु सासू व सासरा आपली सून विशालाक्षी हिला प्रेमाने वागवीत नसत. कारण ती माहेरून हुंडा किंवा इतर काही घेऊन आली नव्हती.

सासू सासरे सुनेला ऐकू जाईल असे मोठ्याने नेहमी बोलत, काय पण दरिद्र सून मिळाली आहे. परंतु विशालाक्षीने चुकूनदेखील एका शब्दाने उत्तर दिले नाही. एकदा तिला तिच्या पतीकडून तिचे वडील तिला मोहरी घेऊन जायला येणार असल्याचे कळले.

विशालाक्षी पतीला म्हणाली–"तुम्ही वडिलांकडे जरा बरेसे कपडे पाठवून द्या व तेच घालून यायला सांगा."

जांवयांने पाठवलेला पोशाख करून विशालाक्षीचे वडील तिला भेटायला तिच्या घरी आले. शिवराम आईवडिलाचे दोघं घरात जाऊन सुनेला म्हणाली–"तुझा बाप आला आहे ग. बाहेर बसला आहे."

विशालाक्षी हुशार होती. ती बाहेर गेली आणि आपल्या वडिलांना नमस्कार करून माहेरची खुशाली विचारू लागली. सासू-सासऱ्यांना चांगले ऐकू येतील इतक्या मोठ्यानेच कुशल प्रश्न चालू होते. तिने विचारले–"बाबा! आपल्या घरची तिजोरी-सारखी खणखणत असते ना?"

"त्यात काय मुली? ती तर सारखी वाजत असतेच, कां?" बाप म्हणाला.

"पिके कशी आहेत धान्याचा सडा पडत असेल नाही?" विशालाक्षीने विचारले. वस्तुस्थिती ही होती की लोकांच्या शेतात पडलेले दाणे वेचून आणून माहेरची मंडळी

त्यावर अर्धपोटी जेवीत होती. "अंग, ते कधी थांबेल का?" बापाने विचारले.

"कोपऱ्यात पडलेले हत्तीचे दांत आहेत दांत त्यात नवीन येऊन पडत असतील?" विशालाक्षीने विचारले. वास्तविक ते हत्तीच दांत नसून बांबूचे तुकडे होते.

"नवे आणण्याच्या विचारात आहो." बाप म्हणाला.

"आणि आकाश कंदील?" मुलीने विचारले. घर कौंबळी होते व छपराला भोकें होती. त्यातून सूर्यचंद्र दिसत. म्हणून त्यांच्या घरात त्या भोकांना आकाश कंदील हे सांकेतिक नाव पडले होते.

"ते आहेत तसेच आहेत बाळ, काढले नाहीत?" बाप म्हणाला.

"आई, भाऊ आणि वहिणींच्या हातातली हिरे माणके आहेत तशीच आहेत ना?" मुलीने विचारले.

"होय, आहेत तशींच आहेत. नित्य वाढतपण आहेत." बाप म्हणाला.

हिरे माणके हा सांकेतिक शब्द [illegible] [illegible] वण यासाठी सर्वांना माहीत होता. बापाने दिलेली उत्तरे ऐकून विशालाक्षीला वाईट वाटले. माहेरची गरीबी होती तशीच होती. परंतु त्या दोघांचे संभाषण आड उभे राहून ऐकणाऱ्या सासूसासऱ्यांना मात्र सुनबाईच्या माहेरची मंडळी, गरीब नसून चांगली श्रीमंत असली पाहिजेत असे वाटले. लगेच दोघें बाहेर आली व सुनबाईला म्हणाली— "मुली! तुझे बाबा किती वेळ झाले, बाहेर ओसरीवरच आहेत. त्यांना हातपाय धुवायला पाणी दे आणि काहीतरी खायला करून दे! अग हे देखील सांगायला हवं का?"

विशालाक्षीला मनातल्या मनांत समाधान वाटले. निरोप देते वेळी तिच्या सासूसासऱ्यांनी तिच्या वडिलांबरोबर माहेरच्या सर्व नातेवाइकांसाठी चोळी खण व इतर वस्त्रे प्रेमाने पाठविली. शिवरामने सासऱ्याला गावाच्या वेशीपर्यंत पोंचते केले.





# झोपेचे औषध

फार प्राचीन काळातील गोष्ट आहे. एका देशाचा राजा फार श्रीमंत होता. त्याचा खजिना नेहमी भरलेला असे. त्याला कौटुंबिक सुखपण होते. त्याच्या शौर्याची त्याचे शत्रू देखील प्रशंसा करीत. तो एक प्रजावत्सल राजा म्हणून प्रसिद्ध होता.

राजाला सर्व सुख प्राप्त होते. पण त्याला कधी झोप येत नसे. अंथरुणावर रात्रभर तळमळत पडलेला असे. झोप न येणे हा देखील एक रोगच आहे हे त्याला माहीत होते. त्याने झोपेचे औषध मिळावे म्हणून निरनिराळ्या हकीम वैद्यांचा इलाज करून पाहिला. परंतु गुण पडला नाही.

त्याला जिवाचा कंटाळा आला आणि सकाळी सामान्य पोशाख करून कोणाला काही सांगितल्याशिवाय तो रानात निघून गेला.

रानांत त्याला गार वारा व उघडी हवा अनुभवायला मिळाली. त्याला हुशारी वाटू लागली. शिपाई सरदारांबरोबर रानात फिरत असतांना त्याला कधी मोकळेपणा मिळाला नव्हता. म्हणून त्याला एक तऱ्हेची मानसिक शांती वाटू लागली.

थोडे अंतर चालून गेल्यावर त्याला झाड तोडण्याचा आवाज तालात ऐकू येऊ लागला. तो त्याच दिशेने गेला त्याला एक लाकूडफोड्या झाड तोडीत असलेला दिसला. त्याचे सर्व अंग मळके होते व अंगाला घाम सुटला होता.

त्याला पाहून राजाच्या सहज मनात आले किती गरीब आहे बिचारा! ऊन सुद्धा किती कडक पडले आहे.

थोड्या वेळाने लाकूडतोड्याने आपली कुऱ्हाड खाली टाकली आणि आपल्या मळक्या कपड्यानेच घाम पुसून तेथेच आडवा झाला, आणि एका क्षणांत तो छान



घोरू लागला. थोड्या वेळाने झोप मोडली तेव्हां समोर एका माणसाला पाहून लाकूड-तोड्या उठून उभा राहला.

राजाला त्याची कीव आली व त्याने प्रेमाने त्याला विचारले–"कायरे तू दमलेला दिसतो आहेस. ऊन सुद्धा किती कडक पडले आहे. झोप थोडा वेळ!"

"साहेब! मी आपल्याला पाहिला तेव्हां मला वाटले की कंत्राटदाराचा मनुष्य असावा. म्हणून घाबरून उठून उभा राहलो. आप-ल्याला कदाचित मेहनतीची संवय नसावी." लाकूडतोड्या म्हणाला.

"तू म्हणालास ते खरे आहे!" राजा म्हणाला.

आहेत, आपले हात कसे मऊ दिसत आहेत. माझे हात व कपडे पहा. हाताला झाडाच्या सालींसारखे वण पडले आहेत. आपण कोणते काम करतां? शिवण काम का?" लाकूडतोड्याने विचारले.

"नाही रे बाबा! मी शिंपी नाही. पण हे मला सांग तू इतके परिश्रम आणि मेहनत करतोस आणि तुला झोप कशीरे येते?" राजाने विचारले.

लाकूडतोड्या तो प्रश्न ऐकून हंसला आणि म्हणाला–"दादा! मेहनत केली की झोप कशी भुतासारखी मानगुटीला बसते! जमिनीवर अंग टाकले की घोरू लागतो."

"मी ते स्वतः डोळ्यांनी पाहिले. पण विश्वास होत नाही!" राजा म्हणाली.

"कोणत्या गोष्टीवर तुम्हांला विश्वास होत नाही, सांगा. माझ्याजवळ आठवड्या पुरेसा पैसा असता तर आठवडाभर झोप काढली असती हो. पण मग असे वाटते, झोप आली नसती. गरीब माणसाला देव आठवड्या भरचा पैसा देत नाही. त्याला उद्यांची चिंता करावी लागते. परंतु मेह-नतीची भाकरी खाल्ली की झोप आलीच. मी मेहनत केली नाही तर माझे पोट कसे भरणार व बायकोमुले काय खाणार?" लाकूडतोड्या म्हणाला.





असं! पण काय रे आपल्या महा-राजांना झोप येत नाही, हे नाहीं का तुला माहीत?" राजाने विचारले.

"तेच तर मला कळले नाही की असे का? त्यांना माझ्यासारखे काम करावे लागत नाही. झोपायला बिछाना आहे, गाद्यागिर्द्या आहेत. मग. कां नाहीं झोप येत नकळे!" लाकूडतोड्या म्हणाला.

राजा काही बोलला नाही. लाकूड-तोड्या म्हणाला–"दादा! मला बोलायला वेळ नाही, माफ करा. राखणदार आला तर शिव्या खाव्या लागतील." असे सांगून तो झाड तोडू लागला.

राजा कौतुकाने त्याच्याकडे पहात होता. तो विचार करू लागला, मी राजा आहे व मला झोप येत नाही आणि सामान्य लाकूडतोड्या, याला कशी झोप येते?"

थोड्या वेळाने राजा लाकूडतोड्याला म्हणाला–"तू त्या झाडाच्या सावलीत थोडा वेळ विश्रांती घे. मी तुला झोप कशी येते, पाहणार आहे."

"अहो दादा! संध्याकाळच्या आत मला हे काम पुरे केले पाहिजे!" लाकूडतोड्या म्हणाला.

"त्याची फिकीर तू करू नकोस. मी तुझे काम करून टाकतो." असे सांगून राजाने लाकूडतोड्याच्या हातातली कुऱ्हाड मागून



घेतली. लाकूडतोड्याने सशंक मुद्रेने राजाकडे एकदा पाहिले. राजाला झाड तोडू लागलेला पाहून तो सावलीत जाऊन झोपला. एका क्षणाधीत त्याला झोप लागली.

राजा चकित होऊन विचार करू लागला, काय पण आश्चर्य आहे, बिछाना नाही, उशी नाही एक चटई देखील अंथरलेली नाही आणि पहा, कसा घोरू लागला आहे!

परंतु राजाने लाकूडतोड्याचे काम पुरे करण्याची जबाबदारी घेतली होती. म्हणून तो झाड तोडण्याचे काम करीत राहला. त्याला घाम आला तेव्हां त्याने अंगातला सदरा काढून ठेवला. झाड तुटले, पण राजाच्या हाताला फोड आले. त्याचे हात

व कंबर दुखू लागली. राजा लाकूड-तोड्याच्याच बाजूला जमिनीवर आडवा झाला आणि त्याला छान झोप आली.

संध्याकाळी राखणदार सर्व मजुरांनी दिलेले काम पुरे झाले कीं नाही पहात ज्या जागी राजा व लाकूडतोड्या झोपले होते तेथे आला. लाकूडतोड्याला लाथ मारून त्याने जागे केले व ओरडला–"ए गाढवा! घोरत पडला आहेस का?"

राजाने डोळे उघडून पाहिले आणि म्हणाला–"तो बिचारा झोपला आहे आणि तू त्याला कां शिव्या देतो आहेस रे?"

"तू कोण रे चोंबडेपणा करणारा? मी राखणदार आहे." तो आपल्याच तोऱ्यात म्हणाला.

राजाला राग आला. म्हणाला–"तू त्याला उठविलेस तर मी तुला उभा चिरून काढीन."

राखणदार दचकून मागे सरकला व म्हणाला–"थांब, मी येतो परत, तुझ्या समाचाराला!"

[illegible] राजा [illegible] झालेला पाहून शोध सुरु झाला होता. एका शिपायाने त्याच जंगलात शोध सुरू केला होता. त्याला तो राखणदार भेटला. त्याला त्याने विचारले–"काय रे, तू महा-राजांना कोठे पाहिलेस का?"

"महाराज आले आहेत की नाही, मला नाही माहीत. पण हे पहा कोण महाराजाधिराज आले आहेत ते!" असे म्हणत राखणदाराने राजाकडे बोट दाखविले.

त्या शिपायाने व इतर अधिकाऱ्यांनी राजाला ओळखले. एक अधिकारी म्हणाला–"महाराज! सकाळपासून आपलाच शोध चालला आहे."

राजा म्हणाला–"होय, पण मी झोपेचे औषध शोधायला निघालों होतो व ते मला मिळाले. या लाकूडतोड्याला घेऊन चला राजधानीत. यानेच ते औषध मला दिले. याला मी बक्षिस देणार आहे व याचा सत्कार करणार आहे."





# महाभारत

दुसऱ्या दिवशी उजाडल्यावर कीचक राज-वाड्यात येऊन द्रौपदीला भेटला आणि म्हणाला–"तुला माझा पराक्रम ठाऊकच आहे. मी राज्यसभेत तुला लाथ मारली तर कोणाची छाती झाली नाही पुढे येण्याची. विराट हा नावापुरता राजा आहे. सर्व सैन्य माझ्या आज्ञेप्रमाणे वागते. मला आपला दास करून घेऊन धन्य हो! मी तुला दररोज शंभर सुवर्णमुद्रा देत जाईन. शेकडो दासदासी तुझ्या हुकमाप्रमाणे कामे करतील. मोठा रथदेखील देईन." तो द्रौपदीला मोह होईल या आशेने म्हणाला.

"तू खरोखरच मी सांगते तसा वागणार असशील तर तुला काही अटी पाळाव्या लागतील. आपले हे गुपित राज्य सभेत किंवा तुझ्या भावंडांनादेखील कळता कामा नये. कारण कोणाला ते कळले तर माझ्या गंधर्व पतींना पण कळेल. मला तीच धास्ती वाटते." द्रौपदी म्हणाली.

"मी कोणाच्याही दृष्टीस पडल्याशिवाय येतो. या कानाची गोष्ट त्या कानाला कळणार नाही." कीचक म्हणाला.

तेव्हां द्रौपदी म्हणाली–"ते नको. रात्री नृत्यशाळेत कोणी नसते. काळोख असतो व एकांत आहे. तेथे रात्री तू ये. तेथे आपण भेटलो तर कोणाला, माझ्या गंधर्व पतींना देखील या गोष्टीची वार्तासुद्धा लागणार नाही की कल्पना होणार नाही." त्यानंतर द्रौपदी भीमाला भेटली आणि कीचकाबरोबर तिचे जे बोलणे झाले होते ते त्याला सांगितले.

      



कीचक मूर्ख होता. सैरंध्रीने त्याला ज्या जागी बोलाविले होते त्या जागी त्याचा काळ लपून बसणार आहे याची त्याला कल्पनादेखील नव्हती. द्रौपदी आता आपल्या मुठीत आलीच याच आनंदात तो मग्न होता.

तिकडे भीम कीचकाचा वध करण्यासाठी विचार करीत बसला होता. तो द्रौपदीला म्हणाला–"या कीचकाचा गुप्त पणे वध करणे जमले नाही तर उघडपणे त्याला यमसदनाला पाठविल्याशिवाय मी राहणार नाही. नंतर सरळ दुर्योधनाकडे जाऊन त्याला कीचकाच्या पाठोपाठ पाठवीन. युधिष्ठिराला पाहिजे असेल तर त्याने विराट राजाच्या पदरी कंकमुनीची चाकरी खुशाल करीत रहावी."

द्रौपदी भीमाला थोडा शांत करीत म्हणाली–"तसा उतावीळपणा नका करू. आपण स्वतःवर बंधन घालून जे नियम केले आहेत ते मोडल्याशिवाय कीचकाचा वध झाला पाहिजे."

"ठीक, आज रात्री! काळोखात त्याचा शेवट करणारा कोण हेदेखील त्याला कळणार नाही. ठरले." भीम म्हणाला.

त्या दिवशी रात्री ठरल्याप्रमाणे भीम कीचकाच्या आधी नृत्यशाळेत जाऊन कीचकाची वाट पहात, हरणावर एकदम उडी मारून त्याचे नरडे फोडण्यासाठी सिंह किंवा वाघ दबा धरून टपून बसतो तसा बसला.

थोड्या वेळाने कीचक उत्तमोत्तम वस्त्रे परिधान करून सैरंध्रीला आपली पट्टराणी करून घेण्यासाठी उत्सुकतेने नृत्यशाळेत आला. भीम एका खाटेवर पडून होता. त्याला सैरंध्री समजून त्याच्या पाठीवर प्रेमाने हात फिरवीत कीचक म्हणाला–"सैरंध्री! मी आपल्या अंतःपुरात तुझ्या स्वागताची केवढी तयारी करून ठेवली आहे म्हणून सांगू? दासदासी तुझ्या सेवेसाठी नेमल्या आहेत आणि तुझ्या करिता उत्तमोत्तम वस्त्रालंकार आणून ठेवले आहेत. माझ्या अंतःपुरातील स्त्रिया, माझ्यासारखा सुंदर तरुण दुनियेत मिळणे शक्य नाही असे म्हणतात. पण आज केवळ तुझ्या शब्दाला मान देऊन लपतछपत मला या नृत्यशाळेत यावे लागले."

ते ऐकून भीम म्हणाला–"होय, खरोखरच तुझ्यासारखा सुंदर अख्या दुनियेत मिळणार नाही. परंतु इतका 'गोड' व 'कोमल' स्पर्श तुला आयुष्यभरात कधी अनुभवायला मिळाला नसेल." असे म्हणत भीम उठून उभा राहिला व कीचकाचे केस धरून म्हणाला–"आज सैरंध्रीला भेटण्याची तुझी इच्छा 'पूर्ण' होईल."



कीचकाने स्वतःला सोडवून घेतले व भीमाशी द्वंद्वयुद्धास तयार झाला. ते द्वंद्वयुद्ध म्हणजे मल्लयुद्धच होते. मल्लयुद्धाचे विधिनिषेध पाळण्याचा प्रश्नच नव्हता. हातपाय, दांत व नखे यांचा भरपूर उपयोग होत होता. कीचकाने आपली सर्व शक्ती एकवटून भीमाच्या पाठीत गुद्दे मारायला सुरवात केली. परंतु भीम जागचा हलला देखील नाही. त्यांचे हुंकार व मारामारीच्या आवाजाने सर्व नृत्यशाला दुमदुमली.

दोघांचे द्वंद्व चालू असतां भीमाने कीचकाला इतक्या जोराने एक लाथ मारली की तो कोलमडून जमिनीवर पडला. कीचक उठून उभा राहिला नाही हे पाहून भीमाने त्याच्या छातीत मुष्टिप्रहार केला. नंतर त्याला उचलून गरगर फिरविला. त्याचा गळा दाबला. त्याच्या छातीवर बसून गुडघ्यांनी मारून त्याला ठार केले. कीचक ढोरासारखा मरून जमिनीवर पडला. भीमाने तरी त्याला सोडला नाही. त्याचे डोके त्याच्या छातीत दाबून त्याच्या हाडामांसाचा चेंदामेंदा करून टाकला.

नंतर खुणेसाठी जाळ करून द्रौपदीला कळविले की तिच्याकडे वांकड्या नजरेने पाहणाऱ्याची गत अशीच होत राहील. भीम पाकशालेत निघून गेल्यावर द्रौपदीने नृत्यशालेतल्या नोकरांना बोलावून तिच्या गंधर्व पतींनी कीचकाचा वध केला हे जाऊन



पाहायला सांगितले. ते मशाली घेऊन त्या जागी गेले. कीचकाला पाहून त्याचे हात पाय व डोक्याची नक्की जागा कोणती हे कोणाला कळले नाही.

कीचकाची सर्व आप्तमंडळी तेथे जमा होऊन आक्रोश करून रडू लागली. कीचकाचे शरीर कांसवासारखे झालेले पाहून सर्वांच्या छातीत धडकीच बसली. कीचकाचे भाऊ कीचकाचा दहन संस्कार करण्याच्या तयारीत असतां त्यांना एका खांबाआड उभी असलेली सैरंध्री दिसली.

"हिच्यामुळेच आमच्या भावाचा असा शेवट झाला. भावाबरोबर हिचा दहन संस्कार देखील केला पाहिजे, तरच त्यांच्या आत्म्याला शांती मिळेल." असे म्हणत ते विराट राजाची त्यासाठी परवानगी मागायला गेले.

विराटाच्या तोंडातून नकार आला नाही. त्याचे मौन हीच अनुज्ञा मानून कीचकाच्या भावांनी द्रौपदीला कीचकाच्या प्रेताबरोबर बांधले आणि तिला श्मशानात घेऊन गेले. वाटेत द्रौपदी आपल्यां पतींची गुप्त नावे घेऊन मोठमोठ्याने ओरडत होती–"जय, जयंत, विजय, जयत्सेन, जयद्बल! धावा, हे कीचक बंधू मला बांधून धरून घेऊन चालले आहेत.

भीम त्याच वेळी थोडा आडवा होऊन झोपण्याच्या प्रयत्नात होता. त्याला द्रौपदीचा आवाज ऐकू आला. तो ओरडून म्हणाला–"सैरंध्री! घाबरू नकोस! कीचकाचा काळ त्याच्या बंधूचा काळ होऊन येत आहे." त्यानंतर तो वेष पालटून स्मशानाच्या दिशेने धावला.

स्मशानात चिता रचलेली होती. भीमाने स्मशानातले एक मोठे झाड मुळासकट उपटले आणि ते घेऊन कीचक बंधूंसमोर आला.

त्याला पाहून ते ओरडू लागले–"बाप रे बाप! हा तोच गंधर्व वाटते?" आणि द्रौपदीला तेथेच सोडून ते तेथून पळाले. भीमाने त्या सर्व एकशे पांच जणांना ठार

बेफिकीर होऊन अंत:पुरात जा. मी पाकशाळेत जातो."

कीचक बंधूंची प्रेते व अंत:पुरात हिंडणाऱ्या सैरंध्रीला पाहून नगरवासी भयभीत झाले आणि विराट राजाला जाऊन म्हणाले–"कीचक व त्याचे सर्व बंधू ठार झाले आहेत. गंधर्वांनी त्यांना ठार करून सैरंध्रीला सोडविले. ती परत आपल्या अंत:पुरात आली आहे. ती दिसायला स्वर्गातल्या अप्सरांहून सुंदर आहे. तिला पाहून कोणाला स्वत:च्या मनावर ताबा राहात नाही आणि जो तिच्याकडे वांकड्या नजरेने पाहील त्याची अशीच गत होणार. अशातऱ्हेने सर्व विराट नगरीचा नाश होईल. म्हणून हिच्यामुळे राजधानीवर काही संकट येणार नाही असा काहीतरी उपाय करा."

विराट राजाने कीचक व त्याच्या सर्व बंधूंचा एकाच मोठ्या चितेत दहनसंस्कार करण्यास सांगितले. नंतर राणी सुदेष्णाला जाऊन म्हणाला–"सैरंध्रीला तू गोड शब्दात समजावून सांगून येथून कोठेतरी पाठवून दे. तिला सांग, तिच्या गंधर्व पतींमुळे आपल्या सर्व विराट राज्यावर संकट येईल. मीच हे तिला स्वत: सांगितले असते, पण सर्व गोष्टींचा विचार करूनच तुझ्या करवी सांगवीत आहे, असेदेखील तिला सांग."

द्रौपदी स्नान करून राजधानीत परत येत असतां नागरिकांनी तिला पाहिले तेव्हां सर्वांच्या अंगाचा थरकाप उडून गेला.





ती नृत्यशालेकडे गेली. तेथे राजकन्यांना बृहन्नलेच्या रूपात अर्जुन नृत्य शिकवीत होता. तिला पाहून सर्व राजकन्या व अर्जुन तिच्याजवळ आले. एका मोठ्या संकटातून सुटून आल्याबद्दल सर्वांनी तिचे अभिनंदन केले.

अर्जुनाने तिला विचारले–"या संकटातून तुला कशी काय सुटका मिळाली? ते दुष्ट कसे काय मेले?"

"बृहन्नले! तू हे सर्व कां विचारतेस? तुझ्या हातून मला काही मदत मिळाली असती का? तू आरामात अंत:पुरात बसून होतीस. आतां सैरंध्रीला कशी काय सुटका मिळाली हसत विचारीत आहेस?"

तुझ्याविषयी सहानुभूती वाटणार नाही का?" अर्जुन म्हणाला.

त्यानंतर द्रौपदी राजकन्यांबरोबर अंत:-पुरात गेली तेव्हां राणी सुदेष्णा तिला म्हणाली–"सैरंध्री! महाराजांना तुझी व तुझ्या गंधर्व पतींची फार भीती वाटू लागली आहे, बाई! म्हणून तू आणखी कोठे तरी जाऊन रहा कशी? तुला पाहून पुरुषांची डोकीच फिरतात आणि तुझे पती तर फारच तापट दिसतात!"

"महाराणी! आणखी फक्त तेराच दिवस मला आपल्या महालात आश्रय द्या. त्यानंतर मला माझे गंधर्व पती घेऊन घेऊन जातील. त्यानंतर तुम्हांला कोणालाच कसलीहि भीती नाही." द्रौपदी म्हणाली.

विराट नगरवासियांना कीचक व त्याचे सर्व बंधू ठार झाल्याचे जेव्हां कळले तेव्हां ते हळहळले. देशभर ती भयंकर बातमी पसरली. एका बाईच्या वाटेला गेल्यामुळे तिच्या गंधर्व पतींनी कीचकांचा वध केला.

त्याच सुमारास दुर्योधनाचे हेर पांडव कोठे अज्ञातवास करीत आहेत याचा शोध काढीत तीर्थक्षेत्रात, जगातल्या राजधान्यात आणि कोठे कोठे फिरत फिरत निराश होऊन हस्तिनापूरला परत आले. त्या

लोकांना वाटले की पांडव कदाचित कोण-त्यातरी संकटात सापडून मेले असतील. त्यांनी कीचकवधाची गोष्ट सांगितली. एका सुंदर स्त्रीकडे वाकडया नजरेने पाहल्यामुळे तिच्या गंधर्व पतींनी कीचकाचा व त्याच्या सर्व भावांचा खून केला असल्याचे त्या दूतांकरवी दुर्योधनाला कळले.

ते ऐकून दुर्योधन आपल्या सभासदांना म्हणाला–"आतां पांडवांना कोठे व कसे शोधायचे, मला कळेनासे झाले आहे. त्यांचा अज्ञातवास संपायला थोडेच दिवस उरले आहेत. तो अवधी पुरा होण्यापूर्वी आपण त्यांना ओळखू शकलो तर पांडवांना अटी प्रमाणे आणखी बारा वर्षे वनवास व एक वर्ष अज्ञातवास भोगावा लागेल."

कर्णाने व दुःशासनाने सल्ला दिला की पुन्हां पांडवांच्या शोधार्थ हेर पाठवावे. द्रोणदेखील तेच म्हणाला. पांडव नक्कीच जिवंत असणार. म्हणून पांडवांना ओळखू शकतील अशाच हेरांना पाठविण्याचे सर्वा-नुमते ठरले. भीष्म म्हणाला–"पांडव [illegible] देशात राहील त्या देशात शांति व सुबत्ता नांदत असणार. त्या देशातील प्रजा धर्म-भीरु असेल व नीति धर्माचे पालन करीत असेल. त्या देशात वेळेवर पाऊस पडेल व सर्व ऋतू नियमितपणे येतील. म्हणून असा देश हुडकून काढावा."

तेव्हां कृपाचार्य दुर्योधनाला म्हणाला– "भीष्म म्हणतो ते खरे आहे. पांडवांचा शोध काढीत असता आपण एक काम केले पाहिजे. त्यांचा अज्ञातवास संपला तर पांडव नक्कीच आपले राज्य परत मिळ-विण्यासाठी युद्ध करणार. म्हणून आपण आपली शक्ती, संपत्ती व राजनीती वाढवून तयार राहले पाहिजे. साम, दाम, दंड, भेद, जो उपाय कामाचा असेल तो सोडतां कामा नये. बलिष्ठ व दुर्बल राजांना आपल्या छत्रछायेखाली आणले पाहिजे. आपला खजिना भरला पाहिजे. तसे झाले तरच पांडवांच्या बाजूने युद्धास येणाऱ्या राजांचा पराभव करता येईल."







# शिवपुराण

[ १७ ]

ब्रह्मदेवाकडून वर मिळाल्यानंतर शंखचूड त्याच्या आज्ञेप्रमाणे बदरिकाश्रमात आला आणि तेथे त्याने तपश्चर्या करीत असलेल्या तुलसीला पाहिले. तिला पाहून तिच्या सौंदर्यावर तो भाळला आणि तिच्या-जवळ जाऊन त्याने तिला विचारले–"हे सुंदरी! तू कोण? कोणाची मुलगी? आणि तू या रानावनात एकटी कशी?"

तुलसी देखील शंखचूडच्या रूपलावण्या-वर मोहित होऊन त्याच्याकडे कौतुकाने पाहू लागली. थोडया वेळाने ती म्हणाली– "मी धर्मध्वज नावाच्या राजाची कन्या आहे. माझे नाव तुलसी. एक थोर शूर-पुरुषाशी विवाह व्हावा व एक पतिव्रता असा कीर्तिलाभ व्हावा म्हणून मी तपश्चर्या करीत आहे. परंतु आपण कोण?"

"मी दंभ नामक दानव राजाचा मुलगा आहे. माझे नाव शंखचूड असे आहे. मी ब्रह्मदेवाचे स्मरण करून तपश्चर्या केली आणि त्रिलोक जिंकण्याचा वर मिळविला आहे. ब्रह्मदेवानेच मला तुझ्याशी विवाह करून घेण्यास आज्ञा केली आहे. आपण दोघे लग्न करून घेऊ व सुखाने पुढील आयुष्य घालवू."

त्यानंतर दोघांनी गांधर्व विवाह करून घेतला आणि दऱ्याखोऱ्यात व रानावनात विहार करू लागले. नंतर शंखचूड तुलसीला बरोबर घेऊन आपल्या घरी गेला आणि त्याने सर्व वृत्तांत आपल्या आई वडिलांना सांगून त्यांचा व गुरुशुक्राचार्यांचा आशीर्वाद घेतला. नंतर दंभ राक्षसाने शुक्राचार्यांच्या सल्लयाने त्याचा मुलगा

शेवटच्या मलपृष्ठावरील चित्र












शंखचूड याचा राज्याभिषेक केला. शंखचूड शुक्राचार्यांच्या सल्ल्याप्रमाणे राज्य कारभार करू लागला. त्याच्या कारकीर्दीत प्रजा सुखी झाली आणि “बापसे बेटा सवाई” अशी कीर्ति शंखचूडला मिळाली.

एकदा काही दानव वीर आणि थोर मंडळी शुक्राचार्यांना पुढे करून शंखचूडकडे आली आणि म्हणाली–“हे दानवराज! ब्रह्मदेवाने तुला अनेक वर दिले आहेत. तुझ्या पूर्वजांवर इंद्राने आणि देवांनी अनेक अत्याचार केले आहेत. ते ‘शत्रु ऋण’ फेडण्याची जबाबदारी तुझ्यावर आहे. म्हणून स्वर्गावर स्वारी कर आणि इंद्राचे आसन हस्तगत करून घे.”

शंखचूड शुक्राचार्यांना म्हणाला–“गुरुवर्य! स्वर्गावर स्वारी करण्यासाठी शुभ मुहूर्त ठरवावा.” शुक्राचार्यांनी सांगितलेल्या मुहूर्तावर शंखचूडने स्वर्गावर स्वारी केली.

इंद्राला त्याच्या हेरांकरवी शंखचूड स्वारी करण्यास येत असल्याचे वृत्त कळले होते. म्हणून इंद्राने कुमारस्वामी व इतर देवांच्या सल्ल्याने युद्धाची तयारी सुरू केली.

देव व दानव यांच्यामध्ये लागोपाठ चाळीस दिवस युद्ध चालू होते. असे वाटू लागले की देव माघार घेणार आणि दानवांचा उत्साह तर वाढतच होता. म्हणून देवांनी पाय काढायला सुरवात केली.

आपले सैन्य पळू लागलेले पाहून व आपला पराभव होणार हे ओळखून इंद्राने ब्रह्मदेवाकडून शंखचूडला मिळालेल्या वराचे स्मरण करून आपले सैन्य मागे घेतले आणि शंखचूडाकडे जाऊन म्हणाला–“तू कश्यप मुनींच्या रूपाने जन्मला आहेस. मी तुझ्या शौर्य पराक्रमावर संतुष्ट झालों आहे, तूच त्रिलोकावर राज्य कर. आम्ही सर्व तुला मदत करू.”

तेव्हां शंखचूड म्हणाला–“इंद्रा! तूच आजपासून माझा प्रतिनिधि म्हणून माझ्या आज्ञेप्रमाणे स्वर्गाचा राज्य कारभार पहात जा.”

त्यानंतर शंखचूडने तो त्रिलोकाचा अधिपति झाल्याची घोषणा केली आणि आपली राजधानी शोणितपुर येथे परत आला. तेथूनच तो त्रिलोकावर आपली सत्ता गाजवू लागला. इंद्रादिक देव त्याच्या आज्ञेप्रमाणे त्याचे सेवक म्हणून राज्यकार भार पाहू लागले.

परंतु यज्ञयाग चालूच होते आणि यज्ञात इंद्राच्या नावानेच हवि देणे चालू होते. म्हणून शंखचूडने आपल्या दानव अनुयायांना आज्ञा केली की ब्राह्मण यज्ञाचा हवि इंद्राऐवजी दानवांना समर्पित करीत नाहीत तोपर्यंत त्यांना नानाप्रकारे त्रास देऊन त्यांच्या यज्ञांचा भंग करावा. आपल्या राजाच्या आज्ञेप्रमाणे राक्षसांनी यज्ञकार्यात विघ्ने आणून हाहाकार उडविला. तेव्हां ऋषी मुनी विष्णूकडे गेले आणि विनंती केली–“भगवन! शंखचूड राक्षसाच्या अत्याचारामुळे पृथ्वीवर हाहाकार उडाला आहे. त्याचे पारिपत्य करण्यास तूच एक समर्थ आहेस. तूच आमचे रक्षण कर.”

विष्णू म्हणाला–“शंखचूडाचा जन्म माझ्या अंशरूपानेच झालेला आहे. तुळसीचा जन्म लक्ष्मीच्या अंशरूपाने झाला आहे. म्हणून शंखचूडाचा वध करणे मला शक्य नाही. तुम्ही शंकराला शरण जावे.”

विष्णूच्या सल्ल्याने ऋषी शंकराच्या दर्शनासाठी कैलास लोकी गेले आणि हात



जोडून शंकराला विनंती केली–“देवाधिदेवा, महादेवा! शंखचूडाच्या अत्याचारांपासून तूच आमचे रक्षण कर.” शंकराने शंखचूड आदि दानवांचे पारिपत्य करण्याचे वचन देऊन त्यांना निरोप दिला.

ते कळल्यावर कळीचा नारद शंखचूडाकडे गेला व म्हणाला–“शंखचूडा! शंकराने तुझा वध करण्याचे वचन ऋषीमुनींना दिले आहे. रुद्रगण तुझ्यावर स्वारीला येतील त्यापूर्वी तू कैलासावर स्वारी करून शंकराचा पराभव का करीत नाहीस?”

शंखचूडाने नारदाच्या सल्ल्याप्रमाणे कैलासावर ससैन्य स्वारी केली. त्याला

पाहून शंकराने नंदीला पाठवून भद्रकाली, भद्रगण तथा कुमारांना बोलावून घेतले. सर्व आल्यावर रुद्र व दानव यांचे युद्ध सुरू झाले.

कित्येक दिवस युद्ध चालू राहले तरी शंखचूडाचे सैन्य माघार घेत नसलेले पाहून शंकराला आश्चर्य वाटले. त्याने विष्णूचे स्मरण करुन त्याला बोलाविले व शंखचूडाचा पराभव न होण्याचे कारण विचारले. म्हणाला–"कित्येक दिवस युद्ध चालू आहे पण शंखचूडाचे सैन्य कमी होत नाही. याचे कारण काय?"

तेव्हां विष्णू म्हणाला–"शंखचूड राक्षसाची पतिव्रता पत्नी आपल्या पातिव्रत्याच्या बळावर त्याचे रक्षण करीत आहे. मी तिचे पातिव्रत्य भंग करून तुझा मार्ग मोकळा करतो. तू त्याचा वध कर."

त्यानंतर विष्णु शंखचूडाचे रूप धारण करुन त्याच्या घरी गेला आणि तुलसीला म्हणाला–"मी शंकराशी युद्ध करीत आहे. आजपर्यंत कोणालाच जयलाभ झाला नाही.

तुझ्याकडे आलो आहे." तुळसीने विष्णूला ओळखले नाही आणि पति समजून त्याच्या सहवासात कित्येक दिवस राहली. अशा तऱ्हेने तिचे पातिव्रत्य भंग झाले.

तिकडे शंखचूडच्या सैन्याचा संहार होऊ लागला व शेवटी शंकराने शंखचूडाचा वध केला.

त्याच दिवशी रात्री विष्णूला आपल्या बरोबर एकाच शय्येवर झोपलेला असताना तुलसीने ओळखले. शंखचूडाचा वध झाला होता आणि विष्णूचे मायावी रूप उघडे पडले होते. उघड उघड तिची फसवणूक केली होती. म्हणून तिने विष्णूला "दगड हो" असा शाप दिला.

"तू गंडकी नदी होऊन व मी शाळिग्राम होऊन शाश्वत राहू. तुझ्या नावाने एक पतिव्रता नारी म्हणून तुळसीच्या झाडाची पूजा होत राहील." असा आशीर्वाद देऊन विष्णूने तुलसीला घेऊन वैकुंठलोकी प्रस्थान केले.



# १२७. जगाची बेंबी

या चित्राच्या खालच्या भागात जी वर्तुळे आहेत त्यातल्या मधोमध असलेल्या वर्तुळाला चीन देशाचे चक्रवर्ती "स्वर्ग वेदी" म्हणत आणि तेथे प्रार्थना करून हवि देत. त्यांच्या मताप्रमाणे–समजुतीप्रमाणे–हे स्थान जगाच्या बेंबीसारखे आहे. या वर्तुळाच्या वेदीवरचा भाग म्हणजे राजवाड्यासमोरचे आंगण आहे.





# लवंगी मिर्ची

चार पांचशे वर्षे तरी होऊन गेली असतील, तेव्हांची ही गोष्ट आहे. राजपुतान्यात नन्हाजी नावाचा एक लहान मुलगा होता. लहानपणीच त्याचे वडील वारले म्हणून त्याच्या चुलत्यांकडेच तो लहानाचा मोठा झाला.

नन्हाजीने रजपुतांच्या रीतीप्रमाणे लहानपणीच घोडेस्वारी व खड्गविद्या उत्तम प्रकारे शिकून घेतली.

एकदा नन्हाजीच्या गावी कोणी परदेशी एक घोडा घेऊन आला. घोडा फार तापट होता. कोणाला तो पाठीवर बसूच देत नसे. ती गोष्ट नन्हाजीला कळताच त्याने घोड्यावर चढून त्याला वठणीवर आणले. तो आपल्या दोघां चुलत्यांबरोबर त्याच घोड्यावर बसून शिकारीला जाऊ लागला. नन्हाजीशिवाय तो घोडा इतर कोणाला बसू देत नसे.

एकदा एक तलवारीचा व्यापारी नन्हाजीच्या गावी काही तलवारी घेऊन नन्हाजीच्या वाड्यात आला. नन्हाजी तलवारींकडे, मुले पेढेबरफी कडे जसे उत्सुकतेने पाहतात तसा पाहू लागला. तो एकेक तलवार हातात घेऊन जणु काही चांगली पारख असल्या सारखा पाहू लागला. परंतु त्याला एकदेखील तलवार मनासारखी आढळत नाहीसे व्यापाऱ्याला वाटले.

परंतु व्यापाऱ्याने मुलाची उत्सुकता पाहून नन्हाजीला एक सुंदर तलवार काढून दिली. ती तलवार पाहून त्याला हवी होती तशी तलवार मिळाल्याचा आनंद त्याच्या डोळ्यात झळकू लागला. म्हणाला—"मला पाहिजे होती तशी तलवार पहिल्याने पहायला मिळाली आहे! ही तलवार माझ्या हाती असेपर्यंत कोणी मला जिंकू शकणार नाही."

[illegible] आपल्या चुलत्याकडे गेला आणि म्हणाला—"काका! मला ही तलवार विकत घेऊन द्या."

तेव्हां त्याचा चुलता म्हणाला—"बाळ! आम्ही आहों तोंपर्यंत तुला तलवारीची गरजच काय?"

त्याचा दुसरा चुलता म्हणाला—"नन्हाजी! प्रत्येकाने झेपेल तेच काम करावे. अरे, ही तलवार किती मोठी आहे? तुला पेलणार नाही."

"असू दे, चिटुकली तलवार माझ्या काय कामाची? आतां मी मोठा झालो आहे. म्हणून मला मोठीच तलवार हवी!" नन्हाजी म्हणाला.

तेव्हां त्याच्या चुलत्यांनी त्याची समजूत घातली. म्हणाले—"बाळ, तलवार मोठी आहे की लहान यावरून माणसाचे शौर्य पारखले जात नाही. तलवार हाती धरणाऱ्यात शौर्य, धैर्य व साहस किती आहे त्यावरून त्याला यशापयश मिळते. तलवार असली तर एक पाऊल पुढे टाकून फार तर युद्ध करावे लागेल."

नन्हाजीने निराश होऊन ती तलवार व्यापाऱ्याला परत दिली. आणखी काही दिवस लोटल्यावर एक दिवशी दरोडेखोरांनी त्यांच्या गावावर हल्ला करून सर्व गाई पळवून नेल्या. गावकरी अशा प्रसंगी डफ वाजवून धोक्याची सूचना इतर गावकऱ्यांना देत असत.











राजवाड्यात बसून डफाचा तो आवाज नन्हाजीने ऐकला आणि चवकशी करता लुटेरे गाई पळवून घेऊन गेल्याचे कळले.

नन्हाजीने विचार केला आपण गावात असतां अशी गोष्ट घडणे एक नामुष्कीची गोष्ट आहे. आपल्या दोघां काकांचा अपमान आहे. मला स्वस्थपणे घरात आरामशीर बसलेला पाहून माझ्या आईला अपमान वाटल्याशिवाय राहणार नाही.

नन्हाजी जास्त वेळ विचार करीत बसला नाही. लगेच घोड्यावर बसला व त्याने लुटेरे ज्या दिशेने गाई पळवून घेऊन गेले होते त्या दिशेने घोडा भरधांव सोडला आणि थोड्याच वेळात त्या लुटेऱ्यांना एका जंगलात गाठले.

लुटेऱ्यांचा नायक नन्हाजीला पाहून हसत म्हणाला–"अजून मिसुरड्या सुद्धा फुटल्या नाहीत आणि हे क्षत्रिय वीर आले आहेत गाई सोडवून न्यायला."

नन्हाजी प्रत्युत्तर देण्याच्या फंदात पडला नाही. नायकाला असावध पाहून त्याने

नायकावरच वार केला. परंतु नायकाने शिताफीने खाली वाकून त्याचा वार चुकविला. तरी त्याचे नाक कापले गेले व तोंड रक्तबंबाळ झाली.

नायक चवताळून म्हणाला–"या पोराची खांडकी उडवून फेका घारी गिधाडांसमोर."

त्यावेळी जी चकमक झाली त्या गडबडीत गाई पळाल्या आणि सरळ गावाच्या दिशेने पळून गेल्या. एकट्याने इतक्या चोरांशी युद्ध करणे शहाणपणाचे नाही असा विचार करून नन्हाजीने घोडा मागे वळविला आणि आपल्या गावाच्या दिशेने भरधाव सोडला. लुटेरे त्याला पकडू शकले नाहीत.

गाई गोठ्यात परत आलेल्या पाहून गावकरी चकित झाले व त्यांनी नन्हाजीची पाठ थोपटली. त्याच्या काकांनी त्याला शाबासकी दिली आणि म्हणाला–"लवंगी मिर्ची लहान असली तरी फार तिखट असते!"





# पांच भाकऱ्या

एकदां रामू व श्यामू नांवाचे दोघे मित्र प्रवासाला निघाले. ते दोघे कित्येक दिवस बराच दूरचा प्रवास करून एका गावी संध्याकाळी एका खानावळीत उतरले. दुसऱ्या दिवशी ते पुढे निघाले तेव्हां त्यांनी खानावळीच्या मालकिणीला सांगून ठेवले होते की पुढे प्रवासात खायला भाकऱ्या करून द्याव्या. त्याप्रमाणे खानावळीने त्यांना भाकऱ्या बांधून दिल्या, रामूला तीन व श्यामूला दोनच. तिला काय वाटले कोणास ठाऊ? तिला रामूचा स्वभाव आवडला होता की काय, पण तिने दोघांना भाकऱ्या तीन व दोन अशाच दिल्या आणि तिने त्या दोघांना निरनिराळ्या पुड्क्यात बांधून दिल्या होत्या.

दोघे पुढल्या प्रवासाच्या वाटेवर दुपारपर्यंत चालत होते. ऊन वाढू लागले व दोघांना भूकपण लागली होती. त्याचवेळी त्यांना एक तलाव दिसला. म्हणून दोघे एका तलावाच्या काठी खाऊन घेण्याचे ठरवून एका झाडाखाली उतरले. नंतर आपापले सामान ठेवून तलावावरून हातपाय धुऊन आले आणि आपापली पुडकी सोडून खायला बसले. तेव्हां दोघांना कळले की एकाला एक भाकरी जास्त आहे. श्यामूला राहवले नाही, तो म्हणाला "खानावळीने भाकऱ्या बांधून दिल्या खऱ्या, पण कायरे, एकाला जास्त व एकाला कमी अशा कां द्याव्या?"

रामू म्हणाला–"जाऊ दे रे! तिने जाणून बुजून केले असेल असे वाटत नाही मला. चुकून झाली असेल एका पुडक्यात एक जास्त! तिने तीन तीन समजूनच ठेवल्या असतील. आणि आपल्याला या भाकऱ्या खाववणार देखील नाहीत इतक्या जाडजूड आहेत. तुला दोन पेलणार नसतील

कु. सरोजिनी पांडे



तर माझ्यातली एक तुला देतो. मला एक पुरेल."

रामू म्हणाला तेवढ्याने श्यामूच्या मनाचे समाधान झाल्या सारखे दिसले. दोघे खायला बसणार इतक्यात सोमु नावाचा आणखी एक जण तेथे आला. तो दमून भागूनच आला होता. म्हणाला—"मित्रहो, मी तुमच्याच सारखा दमून भागून आलो आहे. तुम्हांला शक्य असेल व जमत असेल तर एखादी भाकरी मला देऊ शकाल का?" दोघांनी त्याला, "या हो या, त्यात काय? बसा आमच्याबरोबर खायला," असा आग्रह केल्यावर तो खायला बसला. तिघांनी सारखे सारखे वांटे करून

तिथे काही वेळ झाडाखाली झोपले.

तो तिसरा प्रवासी उठला तेव्हां एकटा रामूच जागा होता. तो रामूला म्हणाला—"मी पुढे निघतो, मला लवकर निघाले पाहिजे. तुमच्या मित्राला माझे नमस्कार सांगा!" असे सांगून व दोघांचे आभार मानून तो निघून गेला. जाते वेळी त्याने रामूच्या हातात पांच रुपये ठेवले व रामू 'नको नको' म्हणत असूनही तो निघून गेला.

श्यामू उठल्यावर रामूने त्या तिसऱ्या प्रवाश्याने पांच रुपये दिल्याची गोष्ट सांगून श्यामूला दोन रुपये दिले. पण श्यामूच्या मनाचे तेवढ्याने समाधान झाले नाही. म्हणाला—"कायरे, आपण सारखे वांटे करून घेऊन भाकऱ्या खाल्या. म्हणून त्याने दिलेले पैसे आपण सारखे सारखे वांटून घेतले पाहिजेत. म्हणजे हिशोबा प्रमाणे तू मला आणखी अर्धा रुपया दिला पाहिजेस."

रामूने अनेक प्रकारे श्यामूला समजावून सांगण्याचा प्रयत्न करून पाहिला, पण तो विचार करायलाच तयार नव्हता, भांडण करायलाच उभा राहीला आणि म्हणाला—"चल, या गांवातल्या कोणा तरी तिऱ्हाइताला जाऊन विचारू या. तो सांगेल तो न्याय आपल्याला मान्य होईल."

जाऊं या."

त्याप्रमाणे दोघे गावच्या पाटलाकडे गेले. पाटलाने दोघांचे म्हणणे शांतपणे ऐकून घेतले. नंतर काहीवेळ विचार करून व मनाशी काहीतरी ठरवून त्याने दोघांकडून सोमूने दिलेले रुपये मागून घेतले आणि रामूला चार व श्यामूला एक रुपया देत म्हणाला—"न्यायाची गोष्ट म्हणाल तर असेच वांटे होणार?"

श्यामू "अन्याय, अन्याय!" म्हणून ओरडू लागल्यावर पाटील त्याला शांतपणे बसायला सांगून म्हणाले—"हे पहा, तुम्हीच नाही का सांगितलेत की तुम्ही तिघांनी पांच भाकऱ्या सारख्या सारख्या वांटून खाल्या. एकेका भाकरीचे तुम्ही किती तीनतीन तुकडे केले होते नाही का? ते एकंदर पंधरा झाले. प्रत्येकाला पांच पांच खायला मिळाले. तुझ्या दोन भाकऱ्यांचे तीनतीन प्रमाणे सहा तुकडे झाले. त्यातले तू स्वतः किती खाल्लेस, पांच खाल्लेस व एक सोमूला मिळाला. रामूच्या तीन भाकऱ्यांचे किती तुकडे झाले? नऊ तुकडे झाले, नाही का? त्यातले त्याने पाच खाल्ले व चार सोमूला दिले. अशातऱ्हेने सोमूला तुझ्या तुकड्यांतला एक व रामूच्या तुकड्यांतले चार, एकूण पांच तुकडे मिळाले. सोमूने पांच रुपये दिले होते. म्हणून रामूला त्याने सोमूला दिलेल्या चार तुकड्याबद्दल चार रुपये व तू दिलेल्या एका तुकड्याबद्दल तुला एक रुपया मिळाला."

पाटलाचा तो निवाडा ऐकून श्यामू निरुत्तरच झाला. त्याला बोलायला जागाच उरली नाही. तरी रामू पुन्हां श्यामूला त्याने देऊ केलेला आणखी एक रुपया देऊ लागला. पण श्यामूने घेतला नाही. म्हणाला—"मी मूर्खासारखा भांडू लागलो आणि माझी कान उघाडणी करून घेतली. त्याबद्दल मला शिक्षा द्यायच्या ऐवजी तू बक्षिस देतो आहेत, हे नाही मला मान्य!" असे सांगून तो हंसत पुढच्या प्रवासाला निघाला.





# अमरवाणी

ताव न्महताम् महिमा
याव न्न किमपि हि याच्यतेलोक:,
बलि मनुयाचन समये
श्रीपति रपि वामनो जात: ।                    ॥ १ ॥

[ थोरांचे थोरपण ते कोणासमोर हात पसरीत नाहीत तोपर्यंतच टिकते. बली चक्रवर्तीसमोर लक्ष्मीपती विष्णूने हात पसरला तेव्हां तो वामन झाला की नाही ? ]

माता निंदति, नाभि नंदति पिता,
भ्राता न संभाषते,
भृत्य: कुप्यति, नानुगच्छति सुत:,
कांतापि नालिंगते,
अर्थप्रार्थनशंकया न कुरुते
सल्लापमात्रम् सुहृत्,
तस्मा दर्थ मुपार्जय श्रुणि सखे
ह्यर्थेन सर्वे वशा: ।                    ॥ २ ॥

[ मातादेखील आपल्या गरीब मुलाची निंदा करते, व पिता त्याच्यावर खूष नसतो. त्याचे भाऊ त्याच्याशी बोलत सुद्धां नाहीत. नोकरदेखील त्याच्यावर राग दाखवितात. मुले त्याच्या सांगण्या-प्रमाणे वागत नाहीत. जीवश्च कंठश्च मित्र तो पैसे मागू लागेल म्हणून त्याच्याशी बोलायला देखील टाळतात. (तात्पर्य जवळ पैसा असेल तर सर्व नीट वागतात.) म्हणून (बाबा रे ! ) धनार्जन कर.]



# यक्ष पर्वत

[ ३ ]

[ लुटेऱ्यांच्या नायकानं स्वर्णाचारीला बंदी करून घेऊन उंटावर बसवून घेतले. त्याने जंगलातल्या क्षत्रिय तरुणाविषयी स्वर्णाचारीकडून सर्व माहिती काढून घेतली. विघ्नेश्वर पुजाऱ्याने स्वर्णाचारीला वांचविण्यासाठी क्षत्रिय वीरांचा पाळलेला सिंह सोडला. सिंहाने एका लुटाऱ्यावर उडी मारून त्याची मानगुटी धरली. पुढे– ]

पाळलेल्या सिंहानें अनपेक्षितपणे लुटेऱ्यांच्या नायकाच्या एका अनुयायावर उडी मारली. नायक पुढे काय करावयाचे या विषयी क्षणभरच विचार करायला थांबला असेल. त्याने आपला भाला सिंहावर फेकला. पण त्याचा नेम चुकला आणि भाला सिंहापासून एका पावलावर दूर जाऊन जमिनीत रुतला. सिंहाने एका लुटेऱ्याला लोळवले.

लुटेऱ्याच्या नायकाने चारीबाजूला नजर फिरवून पाहिले. सिंहाने ज्या लुटेऱ्याला ठार केले होते त्याचा उंट स्वत:चा जीव वांचविण्यासाठी पळून शेजारच्या झाडीत निघून गेला होता. दुसऱ्या एका उंटावर स्वर्णाचारीला बसविले होते. तो मोठ-मोठ्याने ओरडत होता,–" मला वांचवा हो, मला वांचवा !" तो उघडपणे नायकाला उद्देश्यून ते म्हणत असला तरी खरा हेतु



दुसराच होता. क्षत्रिय युवक जवळपास कोठे असले तर त्यांना ते ऐकू जावे, हाच त्याचा मुख्य उद्देश होता.

लुटेऱ्यांचा नायक आपल्या अनुयायाला सिहाच्या हातातून वांचवू शकला नाही. सिहासमोर तो किती असहाय्य अवस्थेत तडफडत होता, हे नायकाला स्पष्ट दिसत होते. पण त्याला आपल्या अनुयायाला वांचविणे अशक्य आहे, हेदेखील कळत होते. त्याचा अनुयायी जमिनीवरच काही वेळ तडफडून शेवटी गतप्राण झाला. सिहाने त्याला आपल्या तोंडाने एक दोनदा हलवून पाहिले व त्याची हालचाल बंद झालेली पाहून तो लुटेऱ्यांच्या नायकाकडे पहात

मधून तो त्याच्या मालकाच्या गाईकडे पहात होता.

नायकाला वाटले की सिह त्याच्यावर उडी मारणार किंवा गाईला धरून नेणाऱ्या त्याच्या अनुयायाला ठार करणार. पहिल्याने त्याला वाटले होते की सिह गाईला खायला धावणार. परंतु सिहाचे लक्ष गाईकडे नव्हतेच. त्याची नजर गाईला धरून नेणाऱ्या लुटेऱ्यावर खिळलेली होती. म्हणून त्याने गाईला सोडून दिले तर कदाचित तो वांचेल असे नायकाला वाटले.

त्याप्रमाणे त्याने आपल्या अनुयायाला गाईला सोडून द्यायला सांगितले आणि स्वतःचा जीव वांचविण्याचा सल्ला दिला. तो मोठ्याने ओरडून म्हणाला—"अरे मूर्खा! तुझ्या मूर्खपणाने आपला एक साथी सिहाच्या आहारी गेला. तू सिहाला येत असलेला पाहून गायीला सोडून दिले असतेस तर तो वांचला असता. निदान आतां तरी गाईला सोडून देऊन स्वतःचा जीव वांचव. गाय पळू लागली की सिह तिच्या पाठोपाठ पळून जाईल."

त्यानंतर तो स्वर्णाचारीकडे वळून म्हणाला—"काय रे ए, वास्तुशास्त्र्या! तोंड बंद करशील की नाही की ढकलू तुला खाली? सिह तुझ्या समाचाराला आहे उभा तेथे."

आनंदच वाटला. कारण सिह त्याला चांगला ओळखत होता. सिहाकडून त्याच्या केसाला ही धक्का होणार नाही हे त्याला माहीत होते. म्हणून तो म्हणाला—"सरदार! मला लोटा खाली! सिहाने खाल्ले तरी आपल्या मातृभूमीवर मेल्याचे सुख माझ्या आत्म्याला होईल. स्वतःच्या जन्मभूमीवर मरण आल्याच्या आनंदापेक्षा जास्त आनंद आणखी कशात आहे?"

लुटेऱ्यांच्या नायकाला प्रथम स्वर्णाचारीला उंटावरून खाली ढकलून मोकळे व्हावे असे वाटले खरे, पण लगेच त्याला नवीन राजधानी स्थापन करण्याची गोष्ट आठवली आणि त्यासाठी स्वर्णाचारीचा उपयोग होईल असा विचार करून त्याने स्वर्णाचारीला उंटावरून खाली ढकलण्याचा विचार बदलला. म्हणून तो आपल्या दुसऱ्या एका अनुयायाला म्हणाला—"स्वर्णाचारीला खाली फेकू नकोस, आपल्याला राजधानी निर्माण करण्याच्या वेळी त्याची गरज भासेल. त्या वेळी त्याने आपले ऐकले नाही तर त्याची शकले उडवून कुत्र्या मांजरासमोर फेकू."

स्वर्णाचारीला आता सुटका होण्याचा मार्ग दिसेना. म्हणून तो सिहाकडे वळून ओरडू लागला—"भीमा! भीमा!" थोडा



वेळ थांबून तो पुन्हा ओरडला—"वांचवा! वांचवा!"

त्या पाळलेल्या सिहाचे नावच भीम होते. आपले नाव ऐकून त्याने एकदा गर्जना केली आणि एकदा आपली अयाळ हलवून स्वर्णाचारी बसला होता त्या उंटावर उडी मारली. त्याच वेळी ज्या लुटेऱ्याने गाईला धरले होते त्याने गाईला सोडले आणि उंटाला पळायला खूण केली. उंट भरधाव पळू लागला आणि त्याच्या पाठीमागून नायकाने आपला उंट पळविला.

सिहाने गाईला पळत झोपडीकडे जाताना पाहिले व आपले काम संपले जणु अशा तऱ्हेने झोपडीकडे निघाला.



विघ्नेश्वर पुजारी झोपडीआड उभा राहून ते सर्व दृश्य पहात होता. त्याचा मित्र स्वर्णाचारी संकटात सापडला होता. त्याला कोणत्याही प्रकारे वांचविणे आपले कर्तव्य आहे, असे त्याला वाटले. परंतु त्याला स्वतःला ते शक्य नव्हते आणि त्या वेळी क्षत्रिय तरुण जागेवर असते तर हे संकट ओढवलेच नसते.

सुदैवाने त्याच वेळी दोघे क्षत्रिय तरुण आपली शिकार संपवून परत येत असलेले त्याला दिसले. त्या दिवशी त्यांची शिकार यशस्वी झाली होती. एकाच्या खांद्यावर एक हरण लोंबत होते. दुसऱ्याच्या खांद्यावर दोन रान कोंबड्या आणि हातात

बोलत परत येत होते.

दोघे झोपडीजवळ येऊन पोचले तेव्हां त्यांचा पाळलेला सिंह त्यांच्या पायाजवळ जाऊन चाटू लागला. सिंहाला असा मोकळा सुटलेला पाहून दोघां क्षत्रियांना आश्चर्य वाटले. कारण जातांना त्यांनी त्याला पिंजऱ्यात ठेवले होते. तो बाहेर आला कसा? त्याने कोणाला ठार तर केले नसेल? हा पिंजऱ्या बाहेर येणेच शक्य नव्हते इतक्या सावधगिरीने त्यांनी पिंजरा बंद केला होता. तरीदेखील त्याला बाहेर आलेलापाहून दोघे चकित होऊन सिंहाकडे व झोपडीकडे पाहू लागले.

त्याच वेळी पुजारी एका झाडाआडून पुढे पळत आला आणि रडक्या आवाजात म्हणाला–"शूर हो! आपला सर्वनाश झाला!"

ते ऐकून दोघे क्षत्रियवीर अवाक् होऊन परस्परांकडे थोडा वेळ पहात उभे राहले. त्यांपैकी एकाने पुजाऱ्याकडे जरा करड्या दृष्टीने पहात विचारले– "सर्वनाश! कसा काय? सिंह पिंजऱ्या-बाहेर कसा काय आला? बोल, लवकर काय झाले?" असे म्हणत तो सिंहाच्या आयाळीवर हात फिरवून त्याला गोंजारू लागला.

वृत्तांत वर्णन करून सांगितला. म्हणाला– "खड्गवर्मा व जीवदत्त! येथे जास्त वेळ उभे राहण्यापेक्षा, झोपडीत चल, म्हणजे सर्व कळेल. झोपडीपासून जवळच भीमाने ठार केलेल्या एका माणसाचे प्रेत दिसेल. ईश्वर कृपेने गाय व तिचे वासरू दोन्ही वाचली आहेत."

पुजाऱ्याच्या तोंडून ते ऐकून खड्गवर्मा व जीवदत्त यांना आश्चर्याबरोबर रागपण आला. पुजाऱ्याच्या तोंडून उंटावरून आलेल्या लोकांचे वर्णन ऐकून ते चकितच झाले. त्या जंगलात काही रानटी जातीच्या वस्त्या आहेत एवढेच त्यांना माहीत होते. पण उंटावरून येणारे हे लोक कोण बरे असावेत? त्या लोकांनी आपल्या झोपडीत शिरून कायकाय उद्योग केले असतील बरे? आणि स्वर्णाचारीला उचलून घेऊन का बरे गेले? म्हणजे ते धाडसीच असले पाहिजेत. स्वर्णाचारी किती झाला तरी आपल्या आश्रयाला आलेला एक असहाय मनुष्य आहे. त्याला वांचविणे आपले कर्तव्य आहे. असे निरनिराळे विचार त्यांच्या मनात येत होते.

खड्गवर्मा म्हणाला–"जीवदत्त! आपल्याला जास्त विचार करण्यात वेळ न घालविता त्या उंटावरून पळून जाणाऱ्यांचा



पाठलाग केला पाहिजे. स्वर्णाचारीला आपण वेळीच सोडविले नाही तर ते त्याच्या जिवाचे बरे वाईट केल्याशिवाय राहणार नाहीत." असे म्हणत त्याने आपली तलवार उपसली. त्याचा संताप त्याच्या चेहऱ्यावर स्पष्ट दिसत होता.

जीवदत्त आपल्या मित्राच्या खांद्यावर हात ठेवून म्हणाला–"खड्ग, अरे अशी घाई करून कसे भागेल? संकटात विचार केल्याशिवाय उडी घेणे म्हणजे शौर्य नाही. शत्रू किती आहेत? आपल्या झोपडीत ते शिरले, यात त्यांचा काहीतरी हेतू असणार. या सर्व गोष्टींचा विचार नको का करायला? वाळवंटांत राहणारे उंट या जंगलात



कसे काय आले? त्यांना घेऊन येणारे लोक वाळवंटात राहणारे असले पाहिजेत. पहिल्याने, आपण झोपडीतले त्यांनी काही उचलून तर नाही नेले, हे पाहिले पाहिजे. नंतर पुढे काय करायचे ते ठरवू या."

खड्गवर्मा व जीवदत्त झोपडीत जाऊ लागले तेव्हां पुजारी म्हणाला–"पहिल्याने त्या झुडपाजवळ पडलेले ते प्रेत पाहून घ्या. भीमाने त्याला तेथे ठार केले आहे."

खड्गवर्मा व जीवदत्त दोघे त्या प्रेताजवळ गेले. खड्गवर्माने पायानेच प्रेत हलवून पाहिले. जीवदत्त त्या प्रेताकडे गंभीरपणे पाहून म्हणाला–"हा मनुष्य रानटी जातीचा दिसत नाही. याचा

दूरच्या प्रदेशातून आलेला दिसतो आहे."

"हा जिवंत असता तर आपल्याला किती तरी गोष्टी याच्याकडून कळल्या असत्या. पण भीमाने याला जिवंत राहू दिले नाही. तो बिचारा तरी काय करणार? गाईला धरून नेताना पाहून त्याने समोर सांपडला त्याला धरून ठार केले."

त्यानंतर दोघे झोपडीत गेले. तेथे कित्येक वस्तू अस्ताव्यस्त पडलेल्या होत्या. भिंतीवर टांगून ठेवलेले धनुष्य, बाण, भाता वगैरे शस्त्रे नाहीशी झालेली होती.

"या चोरांना आपल्या झोपडीत चोरून नेण्यासारख्या वस्तू दिसल्या त्या ह्याच. या गुलामांना सोडतां कामा नये. आतां यांची शिकार केली पाहिजे. हे लोक आले कोठून आणि गेले कोठे, गेंडे जातीच्या लोकांना नक्कीच कळले असेल." जीवदत्त म्हणाला. नंतर पुजाऱ्याकडे वळून म्हणाला–"विघ्नेश्वर पुजारी! तू जाऊन जवळपास जंगलात गेंडे जातीचा कोणी मनुष्य आहे का पाहून त्याला बोलावून घेऊन ये."

विघ्नेश्वर पुजारी झोपडीबाहेर येऊन पाहतो तर झोपडीच्या चारी बाजूच्या कुंपणाजवळ गेंडे जातीचा राजा अरण्यमल्ल व त्याचे अनुयायी बोलत उभे असलेले दिसले. विघ्नेश्वर पुजारी जवळ जाऊन

शिकार संपवून परत आले आहेत. उंटावरून येणाऱ्या लुटेऱ्यांना तुम्ही कोणी पाहिले का? ते माझा मित्र स्वर्णाचारी याला उचलून धरून घेऊन गेले हो!"

ते ऐकून अरण्यमल्लचा चेहरा पांढरा फट्ट पडला. म्हणाला–"पुजारी दादा! या लुटेऱ्यांना पाहिलेत का विचारता आहां? अहो, हे लोक आमचे उभे पीक कापून घेऊन गेले आणि आम्ही त्यांना अडवू शकलो नाही. आम्हांला स्वतःचा जीव वांचविण्यासाठी पळून जावे लागले. माझ्या काही अनुयायांनी त्यांना पाहिले. एका विचित्र तऱ्हेच्या जनावरांवर बसून ते लोक आले होते. स्वर्णाचारीला त्यांनी त्याच जनावरावर बसविले होते. खड्गवर्मा व जीवदत्त त्या वेळी येथे असते तर त्या दुष्टांची छाती होती का पुढे यायची? एक तरी जिवंत सुटला असता का?"

बाहेरचा तो आवाज ऐकून खड्गवर्मा व जीवदत्त झोपडीबाहेर आले. अरण्यमल्ल जवळ जाऊन म्हणाला–"दादा! आमच्यावर आकाश कोसळले आहे हो. आमची सर्व शेते लुटून नेली हो! आमच्या गेंडे जातीच्या लोकांनी पराभव कसा असतो हे कधी पाहिले नाही. पण आज पहिल्याने त्या दुष्ट लोकांना पाठ दाखवावी लागली!"

उंटावरून येणाऱ्या लोकांनी पिके लुटून नेल्याचे दोघांना कळले पण गेंडे जातीच्या लोकांना त्यांच्यासमोर हिंमत हारून कां



पळून जावे लागावे हे दोघांना कळेना. खड्गवर्माला त्यांच्या भित्रेपणाची चीड आली. म्हणाला–"तू स्वतःला आपल्या जातीचा राजा म्हणवितोस व तू पळपुट्या-सारखा पळून गेलास तर त्या बिचाऱ्यांनी कोणाच्या तोंडाकडे पहायचे?"

"दादा! मी त्यांना पाहून पळालो होतो. आमचे महाराज तेव्हां तेथे नव्हते!" मंत्री शिलामुखी पुढे होऊन आपल्या राजाचा बचाव करीत म्हणाला.

"त्यांच्याजवळ तुम्हांला माहीत नसलेली हत्यारे होती का? की त्यांचे उंट पाहून तुमचे गेंडे घाबरून पळाले?" जीवदत्तने विचारले.

शिलामुखीने काय झाले ते सविस्तर सांगितले. म्हणाला–"त्या लुटेऱ्यांच्या हातात भाले व तलवारीशिवाय काही नव्हते. परंतु तुम्ही म्हणालात ते उंट नावाची नवीन जनावरे पाहून आम्हांला का कोणास ठाऊक धडकीच भरली. मी किंवा आमच्या अनुयायांनी त्या विचित्र जना-वरांना पूर्वी कधी पाहिले नव्हते. म्हणून ती जनावरे आम्हांला फार भयंकर असावीशी वाटली."

"बरे, आता झाले ते झाले. प्रथम आपण त्यांच्या हातातून स्वर्णाचारीला वाचविले पाहिजे. नंतर त्यांची छान खोड मोडली पाहिजे, कधी या बाजूला वळून पहायची हिंमतच होता कामा नये, त्या दुष्टांची. तुम्ही पुढे जाऊन ते कोणत्या वाटेने निघून कोठे गेले हे पाहून या. आम्ही सूर्यास्ताआधी थोडा वेळ येथून निघू. त्यापूर्वी आम्हांला त्यांच्या हाल-चालीची माहिती मिळाली पाहिजे." जीवदत्त म्हणाला.

जीवदत्त बोलतच होता. त्याचे बोलणे पुरे होण्यापूर्वीच अरण्यमल्लने आपल्या चौघां अनुयायांना बोलावून लुटेऱ्यांच्या मागावर जाऊन त्यांच्या हालचालींची माहिती गोळा करून यायला सांगितले. त्याप्रमाणे ते चौघे गेंड्यावर बसून डोंगरी ओढ्याच्या वाटेने निघाले. (क्रमशः)



# अपूर्व मैत्री

विक्रमादित्याने आपला हट्ट सोडला नाही. तो पुन्हा झाडाजवळ गेला, प्रेत खांद्या-वर काढून घेतले आणि नेहमीप्रमाणे मौनपणे स्मशानाच्या दिशेने चालू लागला. तेव्हां प्रेतात बसलेला वेताळ त्याला म्हणाला–"राजा, तू स्वर्ग मिळावा म्हणून हे कष्ट सहन करीत असशील तर तुला शेवटी तुझे परिश्रम व्यर्थ झाल्याचे दिसून येईल. कारण स्वर्गप्राप्तीसाठी पुण्यच करावे लागते असे नाही. समाजात घृणित समजली जाणारी पापे करून देखील अघोरदासा-सारख्याला स्वर्गप्राप्ती झाली होती. त्याची गोष्ट मी तुला सांगतो. लक्ष देऊन ऐक." असे सांगून वेताळ गोष्ट सांगू लागला.

वाराणसी येथे एका गुरुगृही अनेक ब्रह्मचारी विद्याभ्यासासाठी येऊन राहीले होते. त्या गुरुकुलात तेजसिंह नावाचा एक क्षत्रिय मुलगा वयाच्या आठव्या वर्षी

च्या गोष्टी

येऊन विद्याध्ययन करू लागला. तो फार हुशार होता. विद्याध्ययनाबरोबर त्या काळी शिष्यांना गुरूची सेवा करावी लागे. इंधन व समिधा रानात जाऊन आणण्याचे काम तेजसिंहाकडे होते.

रानात अघोरदास नामक एका मुलाशी तेजसिंहाची मैत्री जमली. कारण दोघांची दररोज भेट होत असे. जंगलात राहणाऱ्या जातींचे जीवित कसे चालते हे अघोरदासा-कडून तेजसिंहाला कळले. अघोरदासाचा बाप एका रानटी जातीचा नायक होता. त्या जातीचे लोक चोरी करून किंवा वाटसरूंना लुटून आपला उदरनिर्वाह चाल-वीत असे. अघोरदासाचा बाप त्या विद्येत फार हुशार होता. तो कधी कधी खेडे- [illegible] दरोडेखोर म्हणून प्रसिद्ध होता. परंतु तो आपल्या जातीच्या लोकांत फार लोकप्रिय होता. कारण लुटून आणलेले सर्व धन तो आपल्या जातीच्या लोकांत वाटून टाकी.

परंतु तेजसिंहाला अशातऱ्हेने त्याच्या मित्राला किंवा त्याच्या जातीच्या लोकांना जगावे लागते हे ऐकून वाईट वाटले. त्याने मित्राला विचारले—"मित्रा! तू मोठा झाल्यावर असेच आयुष्य घालविणार का? सभ्य लोकांसारखे जिणे तुला आवडत नाही का?"

ते ऐकून अघोरदास म्हणाला—"मित्रा! पिढ्यान्‌पिढ्या आम्ही हाच एक धंदा [illegible] मिळाले आहे. परंतु मला आमच्या समा-जातले शिक्षण मिळाले आहे. तू आमच्या-सारखा राहू लाग, असे मी म्हटले तर तुला पटेल का? तसेच मला तुमच्यासारखे राहणे कसे आवडेल?"

दोघांच्या आयुष्यात व जीवितात इतका फरक होता, परंतु त्यांच्या मैत्रीत कोणत्याही प्रकारे बाधा आली नाही.

काही वर्षांनंतर तेजसिंह आपला विद्याभ्यास संपवून आपल्या घरी परत जाण्यापूर्वी आपल्या मित्राचा निरोप घ्यायला विसरला नाही.

तेजसिंहाला काशीच्या राजाच्या पदरी नोकरी मिळाली. तिकडे बाप मरण पावल्यावर अघोरदास त्यांच्या जातीचा नायक झाला. त्याने बापसे बेटा सवाई या लोकोक्तीप्रमाणे आपल्या चोरी व वाटमारीच्या धंद्यात बापापेक्षा कांकणभर जास्तच यश मिळविले. हळूहळू त्याची दहशत राज्यभर प्रजेला वाटू लागली. वाराणसी नगराबाहेर कोणी व्यापारी जाई-नासा झाला व नगरात प्रवेश करण्याचे परदेशी व्यापाऱ्यांनी सोडून दिले. चोरांना पकडण्याचा प्रयत्न राजाने पुष्कळ केला, परंतु चोरांचा धुमाकूळ वाढतच गेला. राजाचे शिपाई चोरांना धरायला जात, पण जंगलाच्या आश्रयाला राहून चोर आपले रक्षण करीत. म्हणून काशीच्या राजाने, चोरांचा सरदार अघोरदास याला







धरून देणाऱ्या तरुणाशी राजकन्येचा विवाह करून त्या तरुणालाच आपले राज्य देण्याचे वचन जाहीर केले. ते कळल्यावर अनेक क्षत्रिय वीरांनी अघोरदासाला धरून आणण्याची शिकस्त करून पाहिली, परंतु कोणालाच यश आले नाही.

तेजसिंहाने त्याच्या बालमित्राच्या अत्याचारांची गोष्ट ऐकली, तेव्हां त्याला फार वाईट वाटले. आपण त्याचे मन वेळीच वळवून त्याला सन्मार्गाला लावले असते तर ही पापकृत्यें त्याच्या हातून घडली नसती. एका सभ्य नागरिकासारखा तो आयुष्य घालवू लागला असता. परंतु आपणच मनापासून त्याचे मन वळविण्याचा प्रयत्न केला नाही ही आपलीच चूक झाली, असे त्याचे मन त्याला खाऊ लागले.

अघोरदास कोठे राहतो, काय करतो, त्याचे मित्र व संगीसाथी कोण या गोष्टींची माहिती तेजसिंहाइतकी आणखी कोणालाच नव्हती. तरी तो इतके दिवस गप्प राहला.

परंतु राजधानीतला व्यापार बंद पडू लागला. व्यापाऱ्यांची परदेशातली ये जा बंद झाली. नागरिक जीवन विस्कळित होऊन गेले. एक स्वामिभक्त चाकर म्हणून त्याने आपल्या धन्यावरचे ते संकट दूर करण्याचे ठरविले. तो निवडक शिपाई बरोबर घेऊन गेला आणि अघोरदास महाशक्तीच्या पूजेत मग्न झाला असता तेजसिंहाने त्याला बंदी केले आणि राजधानीत घेऊन आला. राजाने वचन दिल्याप्रमाणे तेजसिंहाशी राजकन्येचा विवाह करून देऊन त्याला आपले राज्य देऊन टाकले.

तेजसिंहाने अघोरदासाला जन्मठेप तुरुंगवासाची शिक्षा केली. परंतु त्याच्या राहण्याची व जेवण्याची उत्तम सोय करून दिली. राज्यात शांतता नांदू लागली. तुरुंगातच वृद्ध होऊन अघोरदास मरण पावला.

तेजसिंहाने एका प्रजावत्सल राजासारखं प्रजेला सुखी केले. अनेक वर्षे राज्य करून [illegible]

परंतु त्याला आश्चर्य वाटले ते या गोष्टीचे की स्वर्गात त्याची अघोरदासाशी भेट झाली. परंतु स्वर्गात देखील मित्राबरोबर रहायला मिळणार याचा त्याला आनंदच झाला.

येथवर गोष्ट सांगून वेताळ म्हणाला– "राजा, अघोरदास एक चोर व दरोडेखोर होता, पापी होता. पण मित्रद्रोह करून तेजसिंहाने देखील पाप केले नव्हते का? दोघांना स्वर्गप्राप्ती कशी काय झाली? दोघांची भेट स्वर्गात कशी झाली आणि त्यांची मैत्री तेथें कशी चालू राहीली?" या प्रश्नांची उत्तरे माहीत असून तू दिली नाहीस तर तुझ्या डोक्याची शंभर शकले होऊन तुझ्याच पायावर लोळू लागतील."

राजा विक्रमादित्य म्हणाला–"तेजसिंह व अघोरदास निरनिराळ्या वातावरणात वाढले होते व त्यांचे संस्कार निरनिराळे होते. त्यांनी दोघांनी आपापल्या परीने आपली कर्तव्ये चोख बजावली. अघोरदासाने चोरी केली, परंतु त्याने ती आपल्या जातीच्या रक्षणासाठी केली. म्हणून त्याला पुण्य मिळाले. त्याचप्रमाणे आपल्या प्रजेचे रक्षण करण्यासाठी तेजसिंहाने अघोरदासासारख्या चोराचे अत्याचार बंद करून पुण्य संपादन केले. त्यात दोघांचा व्यक्तिगत स्वार्थ कोठेच नव्हता. इतरांच्या स्वार्थासाठी त्यांनी ही पापे केली होती. म्हणून ही पापकर्मे पुण्यकर्मेच ठरली व म्हणूनच दोघांना स्वर्ग प्राप्ती झाली. आतां राहली मित्रत्वाची गोष्ट. मित्रता दोघांच्या परस्पर व्यक्तिगत भावनेचा परिणाम होता. समाज किंवा प्रजा यांचा संबंध त्या भावनेशी नव्हता. म्हणून स्वर्गात त्यांची भेट झाली तेव्हां समाज किंवा प्रजा आड येणे शक्य नव्हते."

अशातऱ्हेने राजाचे मौन भंग होताच. वेताळ प्रेतासह अदृश्य झाला आणि झाडाला जाऊन लोंबकळू लागला.

(कल्पित)



# पापकृत्य कसे ?

एकदां एक संन्यासी लोकांना उपदेश करीत फिरत गावोगाव हिंडत असता एका गावी दोन चोर त्या संन्याश्याकडे येऊन त्याच्याबरोबर राहू लागले. एका चोराने संन्याश्याचे सोन्याचे ताट चोरले. ते पाहून दुसरा चोर म्हणाला–"अरे संन्याश्याची वस्तू चोरणे, म्हणजे पाप आहे!"

"संन्याश्यानेच दिले तर त्यात पाप नाही ना?" पहिल्या चोराने विचारले.

संन्याश्याचे प्रवचन संपल्यावर सर्व लोक निघून गेले. तेव्हां पहिला चोर जवळ येऊन संन्याश्याला म्हणाला–"स्वामीजी! मी एक अपराध केला आहे. मी सोन्याचे ताट चोरले आहे."

"तू ते त्याच्या मालकाला देऊन टाक, म्हणजे पाप लागणार नाही." संन्यासी म्हणाला.

"तर मग ते मी आपल्यालाच देतो." पहिला चोर म्हणाला.

"ते मला नको, ज्याचे असेल त्यालाच दे." संन्यांसी म्हणाला.

"त्यांनी ते घेतले नाही तर?" चोराने उलट प्रश्न केला.

"तर मग तू ते ठेवून घे." संन्यासी म्हणाला.

पहिल्या चोराने संन्याश्याला नमस्कार केला आणि ताट घेऊन दुसऱ्या चोराबरोबर निघून गेला.





# संशयी शेट

एका गावी सोमू शेट नावाचा एक वाणी रहात असे. त्याचा व्यापार धंदा होता. त्याच बरोबर तो सावकारीचा धंदापण करी. त्याच्याकडे कल्लू नावाचा मुनीम होता आणि मल्लू नावाचा गुमास्ता होता. घरातली कामे करायला त्याने एक नोकर ठेवला होता. ते तिघे ही विश्वासपात्र नोकरच होते. परंतु सोमूशेटचा तिघांपैकी एकावर ही विश्वास नव्हता. कारण सोमूशेट संशयी स्वभावाचा होता. परंतु तो त्याचा कोणावर संशय आहे ही गोष्ट प्रगट होऊ न देण्याची काळजी बाळगीत असे. आणि गंमत अशी की प्रत्येकाला असे वाटे की शेटजींचा विश्वास त्याच्यावरच जास्त आहे.

एकदां सोमूशेटला व्यापारा निमित्त परगावी जावे लागले. निघण्यापूर्वी त्यांनी बायकोला सर्वांवर कडक नजर ठेवायला सांगितले. बायकोने होकार दिल्यावर सोमूशेट निश्चित झाल्यासारखे भासले.

परंतु त्याच्या मनाचे तेवढ्यावर पूर्ण समाधान झाले नव्हते. म्हणून त्याने आपल्या मुनीमाला, गुमास्त्याला व नोकराला क्रमाक्रमाने बाजूला बोलावून दुसऱ्यांवर नजर ठेवायला सांगितले. त्याने प्रत्येकाला सांगितले की तोच काय तो विश्वासपात्र आहे व इतर दोघे लबाड आहेत म्हणून त्यांच्यावर नजर ठेवणे आवश्यक आहे. प्रत्येकाने शेटजींनी सोपविलेले काम इमाने इतबारे करण्याचे वचन दिले. तेव्हां सोमूशेटच्या मनाला थोडीशी निश्चिती वाटली. सोमूशेटने सर्वांना बजावून सांगितले की, कोणी आपापल्या कामात कुचराई करू नये आणि परत आल्यावर आपल्या कामाचे टिपण दाखविले पाहिजे, सोमूशेट परगावी जाण्यास निघाला.



शेटजी निघून गेल्यावर शेटजींनी सांगितल्याप्रमाणे सर्व त्यांच्यावर सोंपविलेले काम दक्षतेने करू लागले. असेच दोनतीन दिवस गेल्यावर मल्लू मुनीमांना वाटले की कल्लू गुमास्त्याची त्यांच्यावर बारीक नजर आहे. या उलट गुमास्त्याला वाटले की त्याच्यावर नोकराची नजर आहे आणि नोकराला मालकिणीची नजर त्याच्यावर असल्याचे आढळून आले.

परंतु सर्व व्यवस्था स्वत: सोमूशेट करून गेले होते ही गोष्ट कोणाला कळली नाही. प्रत्येकाला वाटे की सोमूशेटची आपल्यावर मर्जी आहे आणि दुसऱ्याने जी संशयी नजर ठेवली आहे ती बद्दल शेटजीकरवी त्याला [illegible] पाहिजे. त्यासाठी प्रत्येकाने संशय वाढेल असे काही तरी काम करण्याचे ठरविले.

एक दिवशी मुनीमाने गुमास्त्यासमोरच मोठमोठ्या थाळ्यातून तांदूळ, डाळ वगैरे शिधा व एक लोटीभरून तूप कोठीतून काढून घेतले आणि निघून गेला. गुमास्त्याला अपार आनंद झाला. सर्वासमक्ष थाळे भरभरून तांदूळ डाळ घेऊन जायला स्वारीला कसे काय काहीच वाटले नाही. मालक परत आल्यावर चांगली खोड मोडली पाहिजे स्वारीची, असा गुमास्त्याने विचार केला.

दुसऱ्या दिवशी नोकरासमोर गुमास्त्याने एका पिशवीत पैसे ठेवले आणि ती पिशवी खिशात ठेवून निघून गेला. नोकराने ती गोष्ट मालक परत आल्यावर त्यांच्या कानावर घालून गुमास्त्याची कान उघाडणी करविण्याचे ठरविले. त्याने तारीख व वेळ खुणेसाठी लिहून ठेवली.

तिसऱ्या दिवशी एक भाजीवाली सोमूशेटच्या घरी आली. नोकर आपले काम सोडून बाहेर आला व त्या भाजीवालीशी थट्टा मस्करी करीत बोलू लागला.

नोकराचे ते वागणे मालकिणीला आवडले नाही. भाजीवाली सांगेल तो भाव देऊन नोकर भाजी विकत घ्यायला मागेपुढे पाहणार नाही असे देखील तिला वाटले. ती म्हणाली—"काय रे, माझ्या समोर भाजीवालीशी सलगी करीत आहेस का? येऊ दे शेट साहेबांना. खोड मोडते तुझी!"

त्या प्रमाणे शेटजी परत आल्यावर बायकोने नोकराविरुद्ध तक्रार केली. गुमास्त्याविरुद्ध नोकराने आणि मुनीमांविरुद्ध गुमास्त्याने पण शेटजींचे कान भरले.

सर्वांच्या तक्रारी ऐकून न्याय निवाडा करण्यासाठी शेटजींनी सर्वांना एकत्र बोलावून चवकशी सुरू केली. म्हणाले—"तुम्ही तिघांनी माझ्या गैरहजेरीत काय काम कारस्थाने केलीत ती सर्व माझ्या कानावर आली आहेत. माझ्या घरचे मीठ खाऊन तुम्ही माझ्या विरुद्ध असे उलटाल हे मला स्वप्नात देखील वाटले नव्हते. यापुढे तुम्हांला माझ्याकडे ठेवणे धोक्याचे आहे."

तेव्हां मुनीम, गुमास्ता व नोकर तिघे मालकाला म्हणाले—"मालक! आपण डोके कापून आमच्या पायावर ठेवले तरी आम्ही एक शब्द बोलणार नाही. पण आम्ही मालकाशी दगा केल्याची एक गोष्ट तरी दाखवून दिली पाहिजे."

"त्यात सिद्ध करण्याची गोष्टच काय? तुम्ही तिघांनी माझ्याशी केलेली लबाडी डोळ्या देखत झालेली आहे व त्याला साक्षी



पुरावा आहे. मी तुमची लबाडी तुमच्या पदरात बांधून देईन, काय वाटले तुम्हांला?" चूक दाखवून दिल्यास शेटजी सांगतील ती शिक्षा आनंदाने स्वीकारण्याचे सर्वांनी कबूल केले.

शेटजी मुनीमला म्हणाले—"तुम्ही अमुक-अमुक तारखेला थाळे भरभरून तांदूळ, डाळ व लोटी भरून तूप उचलून नेले नव्हते?"

ते ऐकून मुनीम स्मित करून म्हणाले—"मालक, त्या दिवशी श्रावण शुक्रवार होता व लक्ष्मीचे व्रत होते. आपल्या दर वर्षीच्या वहिवाटीप्रमाणे मी ब्राह्मणांना शिधा वाटला होता."

सोमूशेट म्हणाले–"होय होय! ती गोष्ट मी पार विसरून गेलो. मी उगाच आळ आणला तुमच्यावर! पण या मल्लू गुमास्त्याने पिशवी भरून पैसे आपल्या खिशात कसे काय नेले? नोकरासमोर ही गोष्ट घडली आहे."

मल्लू गुमास्ता स्मित करून म्हणाला–"मालक! मुनीमांनी माझा महिन्याचा पगार दिला तो मी एका पिशवीत ठेवून पिशवी खिशात ठेवली. त्यावेळी नोकर तेथे हजर होता. मी लपवालपवी केली नाही."

"अरे हो तो पगाराचा दिवस होता नाही का तुमचा? माझ्या लक्षातच आले नाही. परंतु तुमच्या विरुद्ध माझे कान भरणाऱ्याला ती अक्कल नको होती का?" शेटजी म्हणाले.

नंतर ते नोकराला म्हणाले–"काय रे! तू अमुक दिवशी काम सोडून भाजीवालीशी गप्पा मारायला कशाला आला होतास? तिच्याशी लग्नविघ्न करणार आहेस की पाट लावणार आहेस?"

नव्हते असे दिसते. त्यांच्या मनात उगाच संशय आलेला दिसतो आहे." नोकर म्हणाला.

चवकशी संपली. मालकाला व नोकरांना ही गोष्ट चांगली कळून आली की हा सर्व संशयकल्लोळाचा परिणाम आहे. नोकरवर्गाला मालकाचा राग आला. इमाने इतबारे नोकरी करून सुद्धा मालकाने त्यांच्यावर संशय करावा हे त्यांना आवडले नाही व त्यांनी मालकाला तसे बोलून पण दाखविले. म्हणाले–"मालक! आपल्यासारख्या संशयी मालकाच्या पदरी नोकरी करण्यापेक्षां उपाशी घरी रहावे लागले तरी आम्हांला परवडेल. आपण आम्हांला निरोप द्यावा." असे सांगून तिथे नोकरी सोडून निघून गेले.

सोमूशेटला नवीन मुनीम, गुमास्ता व नोकर ठेवावे लागले. त्या दिवसापासून त्याने आपली संशयी वृत्ती सोडली.





# भक्तीचा महिमा

फार जुनी गोष्ट आहे, काशी येथे रैदास नावाचा एक चांभार होता. कबीरदासांचे सुप्रसिद्ध गुरु संतरामानंद हे रैदासाचे पण गुरु होते. रैदास एक सुप्रसिद्ध संतकवि होता, ही गोष्ट सर्वांच्या परिचयाची आहे. रैदास आपला वडिलोपार्जित चांभाराचा धंदा करीत असे.

एकदा तो आपली हत्यारे घेऊन रस्त्याच्या बाजूला चपला शिवीत बसला होता. परंतु संध्याकाळ झाली तरी कोणी गिऱ्हाईक त्याच्याकडे आले नाही. अगदी संध्याकाळी एक ब्राह्मण आला आणि आपल्या चपला रैदासासमोर टाकून म्हणाला–"दुरुस्त करून दे!"

रैदासने चपला शिवीत त्या ब्राह्मणाला विचारले–"महाराज! आपण कोठले राहणारे? आणि काशीला कसे काय येणे झाले?"

तो ब्राह्मण म्हणाला–"मी कावेरी काठचा राहणारा आहे. विश्वनाथाच्या दर्शनाला आणि गंगास्नानाला आलों आहे."

ते ऐकून रैदास म्हणाला–"महाराज! आपल्या कावेरी नदीत पाणी नाही की काय, इतक्या दूर स्नानाला यायला?"

ब्राह्मणाने चकित होऊन विचारले–"अरे असे काय बडबडतोस? गंगेकाठी काशीला राहतोस आणि असे बोलतोस? तुला गंगेचा महिमा माहीत नाही वाटते? तू कधी गंगेवर स्नानाला गेला नाहीस वाटते?"

"महाराज! मी नाही कधी गंगेवर स्नानाला गेलो." रैदास म्हणाला.

ते ऐकून ब्राह्मण चकितच झाला. म्हणाला–"बाबारे, जो गंगास्नान करतो त्याला व त्याच्या पितरांना स्वर्गप्राप्ती होते, हे तुला माहीत नाही का? तुझ्या-